ज्योतिषमाला–पुष्प आठवें

# मानव युग

– लेखिका –

श्रीमती इन्दुमती पंडित, बी. ए.

( The 1953, १९५३ वर्षभविष्य, आर्थिक भविष्य, Starline, आगामी काल, अनागत काल, भावी काल या पुस्तकांची लेखिका )

सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ति – मूल्य ३॥ रुपये

— लेखिका —
**श्रीमती इन्दुमती पंडित, बी. ए.**
मंगळवार पेठ, कोल्हापूर.

— संपादक —
**श्री. अजंता जैन**
कलकत्ता.

— प्रकाशक —
**गो. रा. पाटणकर**
कॉन्टिनेंटल बुक सर्व्हिस
आप्पा बळवंत चौक, पुणें २.

— मुद्रक —
**दामोदर ज. दाभोळकर,**
दाभोळकर ब्रदर्स प्रेस,
२४३२ ईस्ट स्ट्रीट, पुणें १.





**उमा अमरसिंग राणा**



**"सत्यमेव जयते"**






ज्योतिषशास्त्राच्या सर्वप्रकारचे

वर्तमान आणि भावी

## टीकाकारांना

**सविनय समर्पण**

—इन्दुमतीकडून.

# — विषय सूची —

# दोन शब्द

श्रीमती इन्दुमती पंडित यांनीं आजपावेतों ज्योतिषविषयक अनेक पुस्तकें लिहिलीं असून तद्विषयक जगांत त्यांनीं लौकिकहि कमावलेला आहे.



या पुस्तकांत पुढील ५० वर्षांचें राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय भविष्य वर्तविलेलें आहे. हा प्रयत्न भारतांत अपूर्व समजला पाहिजे. इतर संशोधनांतून स्वतःच्या मार्गदर्शनासाठीं आपण जसे कांहीं दुवे सांपडल्यास पहातों त्याचप्रमाणें या पुस्तकाचाहि उपयोग करून पहाण्यास हरकत नसावी. त्यांतील तथ्य किती व केवळ अनुमान किती हें अनुभवानें समजूं शकेल. कोणत्याहि शास्त्राची प्रगति व अनुमान त्याच्या क्रियाप्रतिक्रियांतून होत असते.

ज्योतिषशास्त्राबद्दल मला काडीमात्र ज्ञान नाहीं. आपल्या म्हणण्याला इंदुमति जेव्हां ग्रहांच्या विशिष्ट स्थानांचा आधार देतात तेव्हां त्यांचा हिशोब मला समजत नाहीं. परंतु तसें पाहिलें तर मला आधुनिक कविता व चित्रकला तरी कोठें समजते ? पण मला आधुनिक कवींची व चित्रकारांची धडपड समजते. तशीच मला इंदुमतींची सतत चालू असलेली निस्वार्थी धडपड समजते. बिहार व आसाममध्यें यंदा महापूर येणार हें भविष्य त्यांनीं पावसाळयाच्या आधीं वर्तविल्याला मी साक्ष आहें. हें त्यांना कसें वर्तवितां आलें तें मला समजत नाहीं. तथापि अशामुळें मला या शास्त्राबद्दल कुतूहल वाटतें आणि हें सर्व थोतांड आहे अशी हट्टी भूमिका घेण्याचें मला कारण दिसत नाहीं.

मात्र मी स्वतः पुरुष कर्तृत्वावरच सगळा भर असावा या मताचा आहें; आणि ही माझी भूमिका इंदुमतींनाहि बहुतांशीं मान्य आहे, याचा मला आनंद आहे. इंदुमतींनीं मोठ्या चिकाटीनें चालविलेल्या या संशोधनात्मक कार्यांत त्यांची नित्य प्रगति होवो आणि त्यांच्या हातीं ही विद्या पोटाचा धंदा म्हणून न राहतां विश्वाचें वाढतें ज्ञान करून घेण्याचें एक साधन बनो .... हा ग्रंथ लिहिल्याबद्दल इन्दुमतींना धन्यवाद !

पुणें, ता. १०।९।१९५४. —ना. ग. गोरे.

# सविनय निवेदन –

प्रस्तुत पुस्तक, "ज्योतिषशास्त्राच्या वर्तमान आणि भावी, सर्व प्रकारच्या टीकाकारांना सविनय समर्पण" करण्यापाठीमागें कांहीं कारणें आहेत. यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या माझ्या पुस्तकांपैकी कांहीं पुस्तकें ज्योतिषाची आवड असणाऱ्या कांहीं व्यक्तींना मी पाठविलीं होतीं. जगांत कांहीं तरी धक्का देणारी घटना घडली कीं यापैकीं कांहींजण मला सांगत असत कीं माझी भविष्यवाणी अचूक ठरली. कांहीं वेळां कांहीं विशिष्ट घटनांविषयीं भाकितें वर्तविलीं नसतांहि माझी प्रशंसा करण्यांत आली. उदाहरणार्थ, या पुस्तकाची छपाई चालू असतांना ज्योतिषाची अत्यंत आवड असलेले असे एक गृहस्थ—अथवा ज्योतिषशास्त्राचे अंध भक्त म्हणा—म्हणाले, "मी तुमचें अभिनंदन करतो. तुमचें भविष्य खरें ठरलें. तुम्हीं दिलेल्या पुस्तकांत मी तें वाचलें होतें." "कोणतें भाकीत ? आणि कोणत्या पुस्तकांत वाचलें होतें ?" मीं विचारलें. "ब्राझीलच्या प्रेसिडेंटनें केलेल्या आत्महत्येबद्दल मी बोलत आहें. 'आगामी-काल' या पुस्तकामध्यें तुम्हीं तें वर्तविलें होतें." आश्चर्यचकित होऊन मीं विचारलें, "आगामी काल पुस्तक तुम्ही नीट संपूर्णपणें वाचलें आहे का ?"



जरा ओशाळून त्यांनीं उत्तर दिलें, "वाचलें म्हणजे चाळलें आहे. पण मी तें नीट जपून ठेवलें आहे."

आतां खरें पाहिलें असतां ब्राझीलच्या राष्ट्राध्यक्षांच्या आत्महत्येचें भाकीत मी, वर्तमानपत्रांतील लेखांत अगर पुस्तकांत, कुठेंहि वर्तविलें नव्हतें. असें असतां, ज्यांनीं काळजीपूर्वक पुस्तक वाचलें नाहीं अशा एका वाचकाकडून माझें अभिनंदन करण्यांत येत होतें. त्यांच्या अज्ञानामुळें मला जरुरीपेक्षां अधिक श्रेय मिळत होतें ! परंतु मी स्वतः मात्र 'हा धोका आहे' असेंच मानतें. विशेषतः माझ्यासारख्या ज्योतिषशास्त्राच्या सामान्य विद्यार्थिनीला तर हा फारच मोठा "धोका" मानला पाहिजे.

सामाजिक दृष्टया पाहिलें असतां या व्यक्तीला एक हितैषी मानलें तरी कोणत्याहि प्रकारचा आडपडदा न ठेवतां या व्यक्तीला मी ज्योतिषशास्त्राचा 'शत्रूच' मानणार....कारण सत्याचा खून करून ज्योतिषशास्त्राला गारद करण्याचें कार्य, अजाणतां कां होईना, असे लोक करीत असतात.

मी फक्त एक उदाहरण दिलें, पण अशा प्रकारचे अनुभव नेहमीं सर्वत्र येतात! "जगांत दररोज घडणाऱ्या घटना कोणा ना कोणा तरी ज्योतिर्विदानें आधींच वर्तविल्या होत्या"— असें पुष्कळसे लोक बोलतांना आढळतात. इतकेंच कशाला आपल्या समाजाचा हा कल पाहून, घटना घडल्यानंतर "आपण याचें भाकीत पूर्वीं केलें होतें" किंवा "असें मी पूर्वींच सांगितलें होतें"— असा दावा मांडणारे ज्योतिर्विदहि असंख्य आहेत. आणि कांहीं स्वार्थी अनुयायांच्या मदतीनें असा दावा मांडणें त्यांना सहजसाध्य व बिनधोक झालेलें असतें. भविष्यकथनें करण्यासाठीं त्यांना पंचांग उघडण्याची किंवा, ज्योतिषशास्त्राच्या सिद्धांतांचें अध्ययन करण्याची किंवा त्यावर संशोधन करण्याची जरूरीच वाटत नाहीं. फुकट नांव मिळतें तर काम कशाला करावयाचें?

ज्योतिषशास्त्रावर व ज्योतिषशास्त्राधारें केलेल्या भविष्य-कथनावर कांहीं बुद्धिमान लोकांनीं टीकेचें शस्त्र चालविलें, हें लेखिकेचें सुदैवच होय! कारण ज्या वेळीं भाकितें खरीं ठरलीं त्यावेळीं उघडपणें माझें यश मान्य करून त्यांनीं आपलें "शस्त्र" खालीं ठेवलें. असेंहि आढळून आलें कीं, कित्येक वेळीं ज्याला टीका ही संज्ञा शोभणार नाहीं अशी टीका माझ्यावर कांहीं लोकांनीं केली. परंतु त्यांना माझ्या परोक्षहि, परस्पर उत्तर देणारे लोक भेटले. थोडे लोक असेहि होते कीं, जे लेखावर टीका न करतां व्यक्तीवरच टीका करावयास उठले, याला काय म्हणावें हें मात्र समजत नाहीं!

खरें सांगायचें म्हणजे विधायक, द्वेषरहित आणि खरीखुरी टीका करणाऱ्या उत्साहि टीकाकारांमुळेंच मी हें पुस्तक पूर्ण करूं शकलें. असे लोक पुन्हापुन्हा जन्मावेत असेंच कोणीहि म्हणेल. जे यथार्थ रसग्रहण करूं शकतात तेच बरोबर टीका करूं शकतात, व अशा प्रकारचे उत्साही व विद्वान टीकाकारच भावी पिढ्यांनाहि या पुस्तकाची स्मृति करून देतील अशी माझी श्रद्धा आहे.

ज्योतिषशास्त्रावर टीका करावयाची आहे, किंवा कोणा तरी ज्योतिषाला खोटें ठरवावयाचें असल्यानेंच असेल कदाचित्, शत्रु असो कीं मित्र, कोणत्याहि हेतूनें असो, टीका करणारे तेवढे समग्र पुस्तक काळजीपूर्वक वाचून काढतात......कांहीं खोटे आरोप करावयाचे असले तरीसुद्धां कांहीं मुद्दे शोधण्यासाठीं त्यांना पुस्तक काळजीपूर्वक वाचावेंच लागतें.......इतकेंच काय, पण यामुळें लेखक किंवा लेखिकाहि सावधान चित्तानें लिहीत असतात. अधिक विचारपूर्वक ते आपली लेखणी चालवितात. आणि निदान पुढील खेपेला तरी टीकाकारांला "चोंच" मारण्यास "जागा" राहूं नये म्हणून अधिक परिश्रमपूर्वक काम करतात...म्हणूनच चांगले वा वाईट असोत, पण टीकाकारच, मग ते वर्तमानकालांतील असोत किंवा भावी कालांतील असोत प्रस्तुत पुस्तक काळजीपूर्वक संपूर्णतया वाचतील; ते हें पुस्तक मनापासून वाचतील याच जाणीवेनें, सुखद अंतःकरणानें, अगदीं मनःपूर्वक, मी त्या सर्व प्रकारच्या टीकाकारांना प्रस्तुत पुस्तक समर्पण केलें आहे.

......आजपर्यंत अनेक तऱ्हेच्या लोकांनीं विचित्र तऱ्हेचे प्रश्न विचारलेले आहेत, याशिवाय सध्याची परिस्थिति पुढें बदलणार असून, हें पुस्तक पुढें अनेक वर्षें टिकणारें असल्यानें या निवेदनांत बऱ्याच गोष्टींचा उहापोह करीत आहें व त्यामुळें ही प्रस्तावना जरा प्रदीर्घ झाली आहे, तरी वाचकांनीं क्षमा करावी.

* * * *

आपण पहातों तीं स्वप्नें, करतों ते विचार, बाळगतों त्या आशा, ठरवितों वा आंखतों त्या योजना—ह्या "सत्य" असतात असें म्हणतां येत नाही अशी माझी स्वतःची श्रद्धा आहे. कारण त्यांना "अस्तित्व" नसतें.... परंतु आपण जें कांहीं प्रत्यक्ष केलेलें असतें त्याला आपण "सत्य" म्हणूं शकतों !

घटनांच्या, वस्तुमात्रांच्या वा मनुष्यप्राण्याच्या बाबतींत त्या सत्याचा ( म्हणजे कार्यांत आपण किती यशस्वी होणार ) साक्षात्कार किंवा निर्देश फक्त ग्रहनक्षत्रांच्या संकेतावर आधारलेलें ज्योतिषशास्त्रच देऊं शकतें. उदाहरणार्थ, राजवाड्यासारखा एखादा भव्य बंगला बांधण्याचे, लक्षाधीश होण्याचे, अथवा एखादा मोठा उद्योगपति होण्याचे व गिरणी सुरू करण्याचे

"मनोरे बांधणें" या गोष्टी "सध्याच्या कक्षें"त येऊं शकत नाहींत, मग या गोष्टींचा तुम्ही कितीहि विचार करा वा त्यासंबंधीं कितीहि योजना आंखा !

माझी स्वतःची परिस्थिति कांहीं अंशीं अशीच झालेली आहे. कांहीं वर्षांपूर्वीं मी अशी योजना आंखली होती कीं या वर्षाच्या (१९५४) अखेर-पर्यंत निदान १२ पुस्तकें प्रसिद्ध करावयाचीं व पांचशेंच्यावर लेख वृत्तपत्रां-तून लिहावयाचे. आणि आज ही प्रस्तावना लिहीत असतांना (अर्थातच ठरविलेली ती कालमर्यादा संपली आहे) फक्त आठ पुस्तकें व चारशेंहून थोडेसे अधिक भविष्यविषयक लेख मी प्रकाशित करूं शकलें असें आढळून येत आहे.

ही योजना यशस्वी करण्याकरितां भरपूर श्रम घेतले नाहींत, किंवा प्रयत्न केले नाहींत असें म्हणतां येणार नाहीं. आतां पाठीमागें दृष्टिक्षेप टाकला असतां असें दिसून येतें कीं ठरविलेला संकल्प मानवी प्रयत्नांची परा-काष्ठा करूनहि पूर्ण होऊं शकला नाहीं. ......

० ० ० ०

मराठी भाषेंत,—आगामी काल, अनागत काल, भावी काल व मानव युग हीं चार पुस्तकें प्रसिद्ध करून महाराष्ट्राच्या ऋणांतून, मी माझ्या मतें, थोडीफार मुक्त झालें आहें. या पुस्तकांच्या प्रकाशनानें प्रांतीय मित्रांना व नातेवाइकांना दिलेलें वचन मी पूर्ण करीत आहें.

आजपर्यंत जीं आठ पुस्तकें लिहून प्रकाशित केलीं, त्यांचीं नांवें याच पुस्तकाच्या शेवटच्या पानावर सांपडतील. परंतु मी ज्या ज्या वृत्तपत्रांतून भविष्यविषयक माझे लेख प्रसिद्ध केले त्यांचीं नांवें येथेंच खालीं देत आहें.

**अहमदाबादचें**—(१) मासिक 'प्रोफेसी', (२) मासिक "भविष्यवाणी", **मुंबईचें** —(३) दैनिक "नवशक्ति", (४) जन्मभूमी पंचांग, (५) 'अलका' दिवाळी अंक. **पुण्याचें**–(६) पूना डेली न्यूज, (७) दैनिक 'लोकशक्ति', (८) साप्ताहिक "युगांतर", (९) दैनिक "प्रभात", (१०) साप्ताहिक 'चांदणी', (११) मासिक "ज्योतिर्विज्ञान", (१२) मासिक "महाराष्ट्र", (१३) मासिक "माधुरी", (१४) मासिक "ज्योतिष पत्रिका", (१५) सायं-दैनिक "आज", (१६) सायंदैनिक "लोकराज्य", **कोल्हापूरचें**–(१७)

दैनिक "सत्यवादी"—हीं वृत्तपत्रें व शिवाय गुजराथमधील दोन गुजराथी साप्ताहिकें.

मला वाटतें कीं प्रत्येक गोष्टीला कांहीं मर्यादा व सीमा असतात, व त्या गांठल्या गेल्या कीं त्यांच्या बाहेर जाणें हें मर्यादेचें उल्लंघन होय. तसें करून कार्याचा नाश करण्यापेक्षां मर्यादेच्या आंतच काम करणें किती तरी पटींनीं चांगलें असतें. कांहीं मोबदला न घेतां गेलीं कांहीं वर्षें मी पुस्तकें प्रसिद्ध केलीं आणि वृत्तपत्रांत लेख लिहीत आलें याचें कारण पृष्ठ पंचेचाळीस वरतीं दिलेलेंच आहे. आतां मीं मर्यादा गांठली असून यापुढें असेंच चालूं देणें माझ्या शक्तिबाहेरचें ठरत आहे.

ज्योतिषशास्त्राच्या प्रसारार्थ व संशोधनकार्यासाठीं खर्च किती झाला याची कल्पना कोणालाच संपूर्णपणें नसेल. माझे वडील, (श्री. बाळामहाराज पंडित), चुलते (श्री. दादामहाराज पंडित, लक्ष्मीबाग, कुन्नर, चित्र पृ. १२६) आणि मामा (श्री. राजाराम कालिया, अगस्ति कुंड, बनारस, चित्र पृ. १२६) यांनीं जें सक्रिय साहाय्य केलें त्याचें वर्णन मी करूं शकत नाहीं. तें ऋण मी या जन्मीं फेडूं शकणार नाहीं. ... ..

* पुस्तकें व वृत्तपत्रीय लेख चालू असतांनाच्या कालांत, मला जवळ जवळ, अडीच हजारांहून अधिक पत्रें वाचकांकडून आलीं. त्यांतील बहुतेक पत्रलेखकांनीं स्वतःची पत्रिका पाठवून त्याचें विवेचन केलें जावें अशी इच्छा प्रगट केली होती. वृत्तपत्रीय लेखांतून आजपर्यंत आठ–दहा वेळेला मीं वाचकांना अशी जाहीर विनंति केली होती कीं, जन्मपत्रिकेबाबत मला पत्र लिहिण्याचा व भेटण्याचा त्रास कोणीहि घेऊं नये. कारण व्यक्तिगत कुंडल्या पाहण्याची व अनोळखी लोकांना भेटण्याची माझी इच्छा नाहीं व परिस्थितीहि नाहीं; तथापि पत्रें थांबलीं नाहींत. म्हणून सर्वच वाचकांना मी या ठिकाणीं, पुन्हा विनंति करतें कीं, कांहीं विशिष्ट व्यक्तिगत परिस्थितीमुळें व या शास्त्रांतील पुढील अध्ययनाचें व संशोधनाचें काम असल्यानें, विशेषतः मेदिनीय ज्योतिष हाच माझा आवडता विषय असल्यानें कोणीहि वाचकांनीं आपल्या पत्रिका माझ्याकडे पाठवूं नयेत, किंवा भेटण्याचा प्रयत्न करूं नये. कारण पैसा घेऊन अथवा न घेतां, कोणत्याहि प्रकारें वैयक्तिक पत्रिकेकडे लक्ष देण्याची माझी इच्छा नाहीं. पुढील अभ्यासा-

करितां मला मोकळेपणा हवा आहे. * परंतु ज्यावेळींजनतेच्या माहितीसाठीं विशेष गोष्ट सांगावयाची असेल, त्यावेळीं वृत्तपत्रांतून लेख लिहीन अथवा एखादें पुस्तक प्रकाशित करीन.

० ० ० ०

हजारों वर्षांपूर्वी भारत, चीन, बॅबीलोन, ग्रीस व रोम या देशांनीं ज्योतिषशास्त्रांत खूपच प्रगति केली होती. तरी या शास्त्राचें जास्ती ज्ञान भारतीय ज्योतिर्विदांनाच झालें होतें असें अभिमानानें म्हणतां येईल; व कांहीं भारतीय ज्योतिर्विदांनीं शोधलेल्या पद्धति व मांडलेले सिद्धांत हे तुलनेच्या पलीकडे आहेत असेंच म्हटलें पाहिजे.

आपल्या भारतांत प्राचीन कालीं ज्योतिर्विदांनीं लिहिलेले भृगुसंहिता, सूर्य-संहिता, कौशिक नाडी, नंदि नाडी, सूर्य नाडी, छाया शास्त्र, बृहत् जातक इत्यादि ग्रंथ जातक ज्योतिषाच्या ( Natal Astrology ) क्षेत्रांत अद्यापहि अतुलनीय व अद्वितीय आहेत.

* या ठिकाणीं जिज्ञासू विद्यार्थ्यांना एका मुद्याची माहिती देणें जरूरीचें वाटतें; ती म्हणजे, भृगु संहिता किंवा कौशिक नाडी सारख्या सर्व प्राचीन ग्रंथांत अयनांश तेवीस मानले गेले आहेत.

यांपैकीं कांहीं प्राचीन ग्रंथ भारतांत अद्यापहि उपलब्ध असून ते वाचल्यानंतर कट्टर तर्कनिष्ठांना, नीतितत्ववेत्त्यांना किंवा नास्तिकांनाहि असें वाटूं लागलें कीं, ज्योतिषशास्त्रद्वारा समजूं शकणार नाहींत, अशा या जगतांत फारच थोड्या घटना आहेत. परंतु कांहीं लोकांना याची प्रत्यक्ष माहिती झाली नसल्यानें ते ज्योतिषशास्त्रावर टीकेचें शस्त्र उपसतात. अर्थात् ज्यावेळीं ते या ग्रंथांचें अवलोकन व मनन करतील तेव्हां त्यांची खात्री पटेल, हें निश्चित !

* प्राचीन कालांतील भारतीय ज्योतिर्विदांचे हे ग्रंथ पाहिल्यानंतर त्या विषयावर त्यांच्या तोडीचे ज्योतिर्विद सध्या कोणीहि नाहींत असें वाटूं लागतें. व्यक्तिगत ज्योतिषाच्या क्षेत्रांत खऱ्या ज्ञानापेक्षां खोट्या गर्वानें फुगलेले ज्योतिषीच अलीकडच्या कालांत फार दिसतात (विशेषतः जातीयवादी मुद्यावर). अर्थात यांपैकीं कोणत्याहि प्राचीन ग्रंथांत, राष्ट्राबद्दल सूक्ष्म वा अचूक आणि स्पष्ट असें भविष्यकथन दिलेलें नाहीं. व्यक्तीबद्दल या प्राचीन

महाग्रंथकारांनीं जितकें तपशीलवार, सूक्ष्म व सर्वस्पर्शी भविष्य कथन केलें, तितकें समाज व राष्ट्राच्या बाबतींत कां केलें नाहीं हें कळणें कठीण होऊन बसतें. एरव्हीं याच देशावर व समाजावर किंवा विशिष्ट जाति–धर्मावर त्यांचें प्रेम होतें. असें असतांना या क्षेत्राकडे त्यांचें लक्ष कसें वळलें नाहीं, या प्रश्नाचें उत्तर मला अद्याप सांपडलें नाहीं.

भारतांत कांहीं लोकांच्याजवळ प्राचीन ज्योतिष ग्रंथ अद्यापहि आहेत, त्याऐवजीं ते जर जनतेच्या सरकारच्या संग्रहीं असते तर ते कालाच्या ओघांत नाश पावणार नाहींत असें समाधान वाटलें असतें. कारण हे दुर्मिळ ग्रंथ म्हणजे भारताचा अभिमानास्पद ठेवा आहे; जगांत ज्याला तोड सांपडणार नाही असे हे ग्रंथ आहेत. विविध शास्त्रीय क्षेत्रांत इतर देशांत आश्चर्यकारक शोध लागले असले व भरपूर ग्रंथनिर्मिती झाली असली तरी, भारतानें ज्योतिष क्षेत्रांत श्रेष्ठत्व संपादून आघाडी साधलेली आहे. निदान या क्षेत्रांत तरी भारत श्रेष्ठ आहे असें आपण म्हणूं शकतों.

आपल्या सरकारनें एक मंडळ नेमून या प्राचीन अद्वितीय ग्रंथांच्या सहाय्यानें शक्य तेवढी माहिती मिळविण्याची खटपट करावी असें सुचवावेंसें वाटतें. कारण संभव आहे कीं, यांतून आपल्याला कांहीं दुर्लभ व महत्त्वाची माहिती उपलब्ध होईल. हे सर्व प्राचीन ग्रंथ एखाद्या व्यक्तीची मालमत्ता न समजतां राष्ट्राची संपत्ति या दृष्टीनें त्याकडे पाहिलें जावें. आपल्या सरकारला ही गोष्ट पटून एक दिवस योग्य ती हालचाल सरकारकडून केली जाईल अशी मी आशा बाळगतें.

या पुस्तकाबद्दल मराठीचे एक नामवंत लेखक व भारतीय प्र. समाजवादी पक्षाचे १९५३ सालांतील महामंत्रि श्री. ना. ग. गोरे यांनीं "दोन शब्द" लिहिल्याबद्दल त्यांचे आभार मानतें.

मुख्यत्वेंकरून या पुस्तकांत ज्यांचा फार मोठा हात आहे, इतकेंच काय पण ज्यांच्या सहकार्याशिवाय माझें कोणतेंहि पुस्तक प्रकाशांत आलें नसतें, ते बंगालचे रहिवासी, आंतरराष्ट्रीय ख्यातिप्राप्त श्री. अजन्ता जैन, यांचे आभार मानल्याविना माझें कर्तव्य पूर्ण होणार नाहीं.

मेदिनीय ज्योतिषाला अभिमान वाटावा अशा तऱ्हेचें कार्य श्री. अजन्ता

जैन ( चित्र पृष्ठ २९३; ३१७; ३६२ ) यांनीं केलें आहे. या क्षेत्रांतील त्यांच्या कित्येक नवीन उपपत्ति उल्लेखनीय आहेत.

" तूळ रेषा " ( Libra Line ) बाबतच्या त्यांच्या उपपत्तीबद्दल यापूर्वींच्या पुस्तकांत व लेखांत सांगण्यांत आलें आहेच. पृष्ठ २०३ वर तूळ रेषेचा नकाशा पुन्हा देण्यांत आला आहे. आतां " कुंभ रेषा " ( Aquariun Line ) बाबतचे त्यांचे सिद्धांतही अगदीं मूलभूत व नवीन असून, त्या उपपत्तीच्या आधारावर या पुस्तकांत पुष्कळशीं भाकितें करण्यांत आलीं आहेत. कुंभरेषेचा नकाशा पृष्ठ ३०० वर देण्यांत आलेला आहे. कांहीं अडचणींमुळें त्यांच्या इतर अनेक उपपत्तींचे नकाशे या पुस्तकांत देणें शक्य झालें नाहीं. " वृश्चिक रेषा " ( Scorpio Line ) आणि " सिंह रेषा " ( Leo Line ) इत्यादि उपपत्तींच्या आधारावर केलेलीं कांहीं नैसर्गिक व राजकीय भविष्यें यापूर्वींच खरीं ठरलीं आहेत.

त्यांनीं इतर अनेक पद्धतींच्या व सिद्धांतांच्या केलेल्या संशोधनाबद्दल एक नवीनच पुस्तक लिहावें लागेल. कारण अशा तऱ्हेचें पुस्तक ज्योतिष-शास्त्राच्या अभ्यासूंना अत्यंत उपयुक्त ठरेल. प्राचीन भारतीय ज्योतिर्विद " वराह मिहिर " जसे जैन धर्मावलंबी होते तसे श्री. जैनहि ( अजन्ता कुमार ) दिगंबर जैन धर्मावलंबी असून सुखवस्तु घराण्यांतील आहेत.

त्यांनीं या पुस्तकाचें संपादन केलें एवढेंच नसून आम्हीं दोघांनीं मिळूनच हें पुस्तक तयार केलें असें म्हणणें अधिक योग्य ठरेल. अर्थात् त्यांचें मार्गदर्शन हेंच माझ्या दृष्टीनें अधिक महत्वाचें आहे. माझ्या लिखा-णांतील अनावश्यक वाटणाऱ्या भागाची त्यांनीं काटाकाट केलीच, पण कांहीं भागांची भरहि घातली आहे.

त्यांचा, माझ्या सर्व पुस्तकांवर संपूर्ण अधिकार आहे. जन्मपत्रिकेवरून त्यांना दीर्घायुष्य व तितकेंच मोठें कर्तृत्व लाभलेलें असल्यानें माझीं सर्व पुस्तकें भाषांतरित, पुनर्मुद्रित करण्याचे सर्वाधिकार आतां मी त्यांच्या स्वाधीन करीत आहें. यांपैकीं कांहीं पुस्तकें इतर भाषेंत भाषांतरित कर-ण्याचें त्यांनीं कबूल केलें आहे. आणि तें शक्य होईल, अशी माझी पूर्ण खात्री आहे. त्यांच्यामुळें ज्या अनेक गोष्टी मला साध्य करून घेतां आल्या त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यास माझ्याजवळ पुरेसे शब्द नाहींत.

प्रस्तुत पुस्तकांत ज्योतिषशास्त्रीय तांत्रिक बाजूचा उहापोह शक्य तितका कमी करण्याचा प्रयत्न केला आहे. कारण ज्यांना या शास्त्राची माहिती असेल त्यांना दिलेल्या तारखेवरून पत्रिका तयार करतां येतील. आणि बऱ्याच ठिकाणीं पत्रिका दिलेल्या असल्यानें त्यांची चर्चा शब्दांच्याद्वारें करण्याचें कारण उरत नाहीं असें वाटतें. ज्यांना पत्रिका कशी पहावयाची ( मेदनीय असो किंवा जातक असो ) असते, हें माहीत असतें; त्यांना कोणते ग्रह, नक्षत्र व योगायोग आहेत हें सहज पहातां येईल.

ज्योतिषाचें ज्ञान नसणाऱ्यांना, भावी घटनांची माहिती करून घेण्यास सहाय्य करणें, हाच या पुस्तकाचा मूलभूत उद्देश आहे. या कारणास्तव तांत्रिक चर्चा केलेली आढळली तरी ती स्वतंत्र लेखांत केलेली आहे. अत्यंत महत्त्वाच्या ग्रहांची जरूर असलेली माहिती मी दिलेली आहेच आणि शक्यतोंवर तंत्राचा उहापोह जास्ती केला नाहीं. तथापि माझ्या सर्व पुस्तकांत चर्चा केलेल्या सर्व गोष्टी व भाकितें यांच्या मुळाशीं ज्योतिषशास्त्राच्या शुद्ध सिद्धांताविना इतर कोणताहि आधार नाहीं, हें लक्षांत घ्यावें.

★ ★ ज्योतिषशास्त्रांतील सायन व निरीयण या दोन पद्धतींबद्दल व त्यांच्यांतील एकमेकांविरुद्ध चालू असलेल्या वादविवादाबद्दल आपण बरेंच ऐकत आहोंत. कांहीं लोकांचा असा गैरसमज झालेला आहे कीं मी कट्टर सायनवादी आहें. परंतु मला इथें स्पष्ट करावेंसें वाटतें कीं मी कोणत्याहि पद्धतीबद्दल कट्टर नाहीं. कारण सायन व निरीयण या दोन्ही पद्धति आपापल्यापरीनें विशाल असल्या तरीहि अद्यापि कांहीं अंशीं अपूर्ण आहेत. म्हणूनच या दोन्ही पद्धतींचा मी एका विशिष्ट तऱ्हेनें ( श्री. अजन्ता जैन यांच्या मार्गदर्शनाखालीं ) उपयोग करून घेत आलें आहें.

एकाच पद्धतीवर सर्वस्वी भर न देतां दोन्हीहि पद्धतींच्या उपयोगानंतर असा निष्कर्ष काढला गेला आहे कीं मेदिनीय ज्योतिषांत सायन पद्धति अधिक अचूक निर्णय घेण्यास साहाय्यभूत होते; तर व्यक्तिगत पत्रिका पहातांना निरीयण पद्धतीच्या साहाय्यानें कित्येक आश्चर्यकारक निर्णय घेतां येतात. कांहीं बाबतींत सायनपद्धतीचा दृष्टिकोण अधिक सूक्ष्म असतो. दोन्ही पद्धति उपयुक्त असल्यानें कोणत्याहि एका पद्धतीवर हल्ला चढविण्यांत कांहीं विशेष अर्थ नाहीं.......

माझ्यापुरतें मी एवढेंच म्हणेन कीं, जास्तींत जास्त अचूक व स्पष्ट निर्णय देणाऱ्या पद्धतीचा मी वेळेनुसार उपयोग करितें. परंतु शास्त्रीय पायावर अधिष्ठित नसलेल्या काल्पनिक सिद्धांतांच्या व पद्धतींच्या वाटेला मी जात नाहीं; कारण ज्योतिषशास्त्राविना दुसऱ्या कोणत्याहि मार्गानें राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय घडामोडींचें यथार्थ समालोचन व भविष्यकथन करतां येत नाहीं असा माझा विश्वास आहे. हस्तसामुद्रिकाचा उपयोग वैय-क्तिक भविष्यकथनाच्या कामीं पुष्कळ होतो, हें मला मान्य आहे.

ज्योतिषशास्त्र ही एक भाषा असून ती वाचून तिचा अर्थ लावण्याचे प्रयत्न निरनिराळ्या पद्धतींनीं होत असून, अधिकाधिक अचूक अर्थ समजण्याचा प्रयत्न * प्राचीन कालापासून आजपर्यंत ज्योतिर्विद करीत आले आहेत. मीसुद्धां या दृष्टीनें यथाशक्ति भविष्यकाल समजून घेण्याचा व तो या पुस्तकांत सांगण्याचा प्रयत्न केला आहे; त्यांत चूक होणें असंभवनीय नाहीं.

हस्तसामु क असो अथवा ज्योतिषशास्त्र असो, मेदिनीय ज्योतिष असो किंवा जातक असो, शास्त्राचें पुरेपूर ज्ञान असणें अवश्य आहे. त्याच-प्रमाणें शास्त्रीय सिद्धांताचा वापर कसा करावयाचा याचीहि चांगली माहिती व अभिज्ञता असणें जरूर आहे. आपल्या शाखेंत पारंगत असणारे ज्योतिषी व हस्तसामुद्रिक बरेच भेटतात. परंतु त्यांचा उपयोग प्रत्यक्षांत करतांना भाकितें वर्तविण्याच्या वेळीं, त्यांपैकीं बहुतेकांचा गोंधळ उडतो. अर्थातच वातावरण किंवा परिस्थिति यांच्या अनुरोधानें निष्कर्ष काढणें त्यांना बरेंच कठीण जातें, असें अनुभवानें वाटतें.

या पुस्तकांत भरपूर सुधारणा करण्याची मनीषा होती; तसे प्रयत्न करूनहि कांहीं गोंधळ राहिलाच. ऐन वेळेला कांहीं योजना बदलाव्या लागल्या, कांहीं विषय एकमेकांत गुंतून गेले. चांगली इच्छा असूनहि फारसें यश मिळवूं शकलें नाहीं हें मान्य करणें भाग आहे. आगामी काल, अनागत काल, भावी काल, मानव युग, ह्या चारी पुस्तकांचें प्रकाशन सामान्यतः एकाच धर्तीवर, एकाच योजनेखालीं झालें. आणि अनेक

अडचणींमुळें सुरळीतपणाऐवजीं थोड्याफार प्रमाणांत विस्कळीतपणा निर्माण झाला. सांगण्यासारख्या पुष्कळ गोष्टी तशाच राहिल्या व इतकें करूनहि पुस्तकाचा आकार कल्पनेपेक्षांहि वाढला, कांहीं योजना तशाच अपुऱ्या राहिल्या. अर्थात् याचें कारण मुद्रण व छपाई या तंत्राचें माझें अज्ञान ! ... यांत मी सुधारणा केल्या पाहिजेत हें मान्य आहे. कारण सबबी सांगण्यांत अर्थ नसतो....आणि बोलण्यापेक्षां कृति करणें हेंच "सत्य" असतें, अधिक चांगलें असतें. मला तरी असें वाटतें.........

**८२ वी गांधीजयन्ति** —**इन्दुमती.**
**कोल्हापूर (महाराष्ट्र)** २-१०-१९५४

**A Thought for to-day**

"Engineers and writers are most essential. Without them the country will not blossom physically and intellectually."

New Delhi, —Jawaharlal Nehru
Oct. 1st. 1954 Prime Minister of India.

# आभार

**"For a true writer, each book should be a new beginning where he tries again for something that is beyond attainment."** — *Earnest Hemingway.*

माझ्यासारख्या ज्योतिषशास्त्राच्या सामान्य विद्यार्थिनीला उदार-हृदयी व्यक्तींनीं जो मान दिला, त्यांचे मी आभार मानतें. कांहीं अनपेक्षित कारणामुळें इच्छा असूनहि ठरविलेल्या सर्व सुधारणा करणें शक्य झालें नाहीं आणि ज्या चुका राहून गेल्या त्याबद्दल क्षमायाचना करतें. पुढील पुस्तकें चांगलीं व्हावीं याबद्दल प्रयत्न करीन. ज्या लोकांचें साहाय्य व शुभेच्छेमुळें ही सुधारून वाढवलेली दुसरी आवृत्ति प्रसिद्ध होत आहे, त्यांचे आंतरिक आभार मानतें.......

**डिसेंबर १६, १९५४.** —**इन्दुमती.**




[ " राजा रात्र वैऱ्याची " ...

श्रीमती इंदुमती पंडित यांनीं आतांपर्यंत ज्योतिषविषयक ८ पुस्तकें लिहिलीं असून जवळ जवळ ४५० पर्यंत तरी लेख या विषयावर निरनिराळ्या नियतकालिकांतून लिहिलें आहेत. त्या सर्वांचा विचार केला तर त्यांचे ज्योतिषविषयक सुमारें दोन हजार अंदाज अगदीं अचूक ठरले असून कांहीं वेळा तर तारीख व वेळहि बरोबर सांगितली गेली आहे. दोन वर्षे आधीं त्यांनीं महाराष्ट्राच्या भीषण दुष्काळाबद्दल भविष्य वर्तविलें असूनहि त्याची लोकांनीं व सरकारनें दखल घेतली नाही. भारत आणि पाकिस्तान येथील यंदाच्या भयंकर पुराबद्दल त्यांनीं आधीच कितीतरी काळ इशारा दिला असतां तोहि असाच व्यर्थ गेला. आतां याहि लेखांत त्यांनी भाकरा-नांगल धरण योजनेच्या भवितव्याबद्दल लोकांना व सरकारी अधिकाऱ्यांना गंभीर इशारा दिला असून तो यावेळी तरी दक्षतापूर्वक कार्यवाहींत येईल, असा आम्हांला विश्वास वाटतो. सरकारनें तर अधिक सावधानपणें त्याकडे जागरूकतापूर्वक लक्ष द्यावें, अशी आम्ही विनंती करीत आहोंत. . .

भाकरा–नांगल सारख्या देशाला अभिमानविषयक असणाऱ्या संपन्न धरण योजनेविषयीं अशा तऱ्हेचे कटु भविष्य वर्तवितांना त्यांना काय मानसिक यातना होत आहेत, याची आम्हांला पूर्ण कल्पना आहे. पण एक देशाभिमानीं राष्ट्रीय नागरिक व ज्योतिर्विद या नात्यानें त्यांनीं आपलें कर्तव्य ह्या आगावू इशारा देऊन बजावलें आहे. दुसऱ्या कोणी तथाकथित तकलुपी ज्योतिष्यानें असलें कांहीं भरकटलें असतें तर तें प्रसिद्ध करणें राहोंच, पण आम्ही तें फाडून टाकलें असतें ! पण त्यांच्यासारख्या तज्ञ आणि अधिकारी व्यक्तीचे हें राष्ट्रीयतापूर्ण, ज्योतिषविषयक निदान जर आम्ही प्रसिद्ध केलें नाहीं तर आम्हीहि आमच्या कर्तव्याला आणि राष्ट्रीय भावनेला जागलो, असें होणार नाहीं. म्हणून त्यांनीं व्यक्त केलेल्या मतांशीं संपूर्ण सहमत होऊनच आम्हीं हें कर्तव्यबुद्धीनें प्रसिद्ध करीत आहोंत. ......]

**दीपावलि विशेषांक, नोव्हेंबर १९५४ —संपादक " माधुरी " पुणें**

\+ \+ \+

## भाकरा–नांगल योजना

पुष्कळ गोष्टी करतांना शुभ वा अशुभ, वेळेची योग्य ती दखल घ्यावी लागतें, अशी ज्योतिषशास्त्राची पूर्वापार चालत आलेली श्रद्धा आहे. उदाहरणार्थ, एखाद्या नवीन जहाजाचा जलवितरण–समारंभ अगर एखाद्या नवीन धंद्याची सुरवात अशुभ वेळीं केली तर फांसे तुमच्याविरुद्ध पडलेच म्हणून समजा. या उलट शुभ वेळेला एखाद्या नवीन कार्यास सुरवात केली तर दैवाच्या अनुकूल प्रवाहाचा चांगलाच फायदा घेतां येतो.

मागील वर्षीच्या ‘लोकशक्ति’ या लोकप्रिय दैनिकाच्या दिनांक १९ जुलै १९५३ च्या अंकांत मीं असें म्हटलें होतें कीं–‘भारत–पाक भांडणाचा निकाल लावण्यासाठीं कराचीला जाण्याची पंडित नेहरूंनीं ठरविलेली वेळ ही अशुभ व चुकीची आहे. २६ जुलै १९५३ ला ग्रहण असल्यामुळें त्यांनीं पाकिस्तानचे प्रधान मंत्रि जनाब महंमदअल्ली यांच्याशीं या वेळीं भेट घेऊन वाटाघाटी करूं नयेत. त्यांनीं वाटाघाटी केल्यास त्या निरूपयोगी होतील, आणि त्यामधून भविष्यकाळांत अधिकच गुंतागुंत निर्माण होईल अशी भीति वाटते–’

अर्थात नेहरूंची ज्योतिषशास्त्रीय सल्ला ऐकण्याची तयारी नसते, व ज्योतिर्विदांनीं अंतःकरणापासून कितीहि कळकळीनें सल्ला दिला तरी ते त्याकडे दुर्लक्ष करतील, याची मला कल्पना होती.

त्यावेळचें राजकीय वातावरण सलोख्याच्या दृष्टीनें खूपच अनुकूल असल्यानें पुष्कळ वाचकांना माझ्या या विधानांचें हंसू आलें, परंतु मला शांत राहणें भाग होतें. कारण स्वतःचें अज्ञान उघड करण्यासाठींच लोक ग्रहांच्या प्रतिक्रियांना हंसतात, परंतु त्या परिणामांत ते त्यांच्या हंसण्यानें बदल घडवून आणूं शकत नाहींत, हें मला सिद्ध करावयाचें होतें. योग्य वेळीं योग्य मार्ग अनुसरून ग्रहांच्या प्रतिक्रियेविरूद्ध इलाज करण्याऐवजीं लोक नुसते हंसतात व नंतर पश्चात्ताप करीत बसतात.

१९५३ च्या जुलैच्या शेवटच्या भागांत कराचीला नेहरू–महंमदअली भेट झाली व त्याचे सुपरिणाम पाहण्यासाठी साऱ्या भारतवर्षानें वाट पाहिली, परंतु त्यांतून कांहीहि निष्पन्न झाले नाहीं. उलट त्यानंतर कटुता अधिकच वाढून संबंध दुरावले व १९५३ च्या शेवटीं व १९५४ च्या सुरवातीस पाकिस्तानबरोबरचें वितुष्ट वाढतच गेलें.

याच प्रसंगानंतर दैनिक 'लोकशक्ति' च्या संपादकांनीं थोडेसे धाष्टर्य दाखवून २९ डिसेंबर १९५३ च्या अंकांत असें लिहिलें कीं, 'इंदुमती पंडीत यांनीं, पं. नेहरू कराचीला गेले तो दिवस अशुभ आहे असें सांगितलें होतें. त्यावेळीं ग्रहण होतें व ती भेट फलदायी ठरणार नाहीं; असें ज्योतिषी ज्ञान इषारा देत होतें. पाक–भारत संबंध ज्या मार्गावर जात आहेत हें आज जसें दिसतें, त्याउलट अपेक्षा त्या भेटीच्या वेळीं राजकीय निरीक्षक मनांत बाळगून होते !!'

अगदीं अशाच प्रकारच्या एका दुसऱ्या प्रसंगाचा मी या ठिकाणीं निर्देश करीत आहे. संबंधित अशा सर्वच लोकांच्या भावना दुखावल्या जाऊं नयेत म्हणून मी आधींच क्षमा मागते. कारण ज्योतिषशास्त्रीय सत्य सांगून त्याचा लोकांना आधीं प्रतिकार करण्याच्या दृष्टीनें उपयोग व्हावा, एवढ्यांच दृष्टीनें ही धोक्याची 'पूर्वसूचना' देत आहे. ग्रह तुम्हांला अमुक एका मार्गानें जाणें भाग पाडूं शकत नाहींत, तर ते फक्त मार्ग दर्शवितात.

प्रस्तुत लेखिकेची अशी दृढ श्रद्धा असल्यानें, या प्रसंगाचा निर्देश एवढ्याच-साठीं करतें कीं, योग्य दिशेनें योग्य वेळीं प्रयत्न केल्यास या प्रसंगीं कोणत्याहि अनिष्ट घटनांचा योग्य प्रतिकार करण्यास भारतीय जनता समर्थ होईल.

## पूर्व–इतिहास

४ मे १९४८ च्या 'पाण्याच्या संधीवर' (Water treaty) भारतीय व पाक प्रतिनिधींनी एकत्र बसून चर्चा केली व तहनामा घडवून आणला. ही घटना २३ एप्रिल व ९ मे १९४८ च्या दोन ग्रहणामधील व म्हणून अशुभ काळीं घडली. या करारान्वयें पश्चिम पंजाब सरकारला इतर साधनांचा उपयोग करून घेण्यास योग्य तो अवधि मिळवून दिला, व पूर्व पंजाब सरकारच्या, अस्तित्वांत असलेल्या कालव्यांतील पाणी हळूहळू वाढत्या प्रमाणांत घेण्याचा हक्क व्यवस्थितपणें प्रस्थापित झाला. यामुळें पाणी दुर्मिळ असलेल्या पश्चिम पंजाबमधील कमी सुधारलेल्या प्रदेशाचा प्रश्न सोडवून त्याची वाढ होण्यास संधि मिळवून देण्याचीच खटपट करण्यांत आली होती. व तो प्रदेश पूर्व बंगालमधील प्रदेशाइतका पुढें यावा असें प्रयत्न अंतर्भूत होतें.

ज्योतिषशास्त्राच्या कोणाहि अभ्यासकानें दिल्लीची ( भारतीय प्रमाण वेळेप्रमाणें १० वाजून १७ मिनिटें व ५५ सेकंद ) १ मे १९४८ ची (शेवटच्या चतुर्थ भागाची ) पत्रिका पाहिली तर अशा प्रकारचे कराननामे, महत्वाचे संधी यावर सह्या करण्याच्या दृष्टीनें हा काल शुभदायक नव्हता व त्यांचे याबाबतीत चुकलेंच आहे, असें आढळून येईल. चंद्र–हर्षल–गुरु महा केंद्र योग असें दर्शवितो कीं, ह्या करारांत कांहींहि तथ्य नसून त्यांतून कांहींहि निष्पन्न होणार नाहीं, इतकेंच नव्हें तर कराराचा मसुदा तयार करण्यांत जो वेळ व जी शक्ति गेली ती म्हणजे त्या दोहोंचा अपव्ययच होय ! अशा प्रकारचे करारमदार तयार करण्यांत आपल्या लोकांनीं आपला वेळ तर घालवूं नयेंच, पण मुळांतच ती गोष्ट टाळावी.

अर्थात त्यांच्या दृष्टिकोनाचें यथार्थत्व सिद्ध करणारे कांहीं मुद्दे आहेतच. पंजाबचा कालवे–पाटबंधाऱ्याचा अलिकडच्या कालांतील इतिहास पाहिला तर भाकरा–नांगल योजना भारताच्या विभाजनानंतरची नाहीं असें

दिसून येईल. विभाजनाची कल्पना मूर्त स्वरुपांत येण्याआधींच कित्येक वर्षे ब्रिटिश सरकारनें अविभक्त अशा संपूर्ण पंजाबच्या सुधारणेसाठीं व वाढी-साठीं हा सुधारणेचा कार्यक्रम आंखला होता, हें सिद्ध करतां येईल. पाकि-स्तानचा या योजनेला असणारा विरोध हा पायाशुद्ध नसून केवळ निरर्थक व द्वेषमूलक कसा आहे, हें यावरून सहज पटेल.

वर्ल्ड बँकेचे प्रतिनिधी मिस्टर रॉबर्ट, एल. गार्नर यांनीं १३ ऑक्टोबर ५४ रोजीं कराची येथें असें म्हटलें आहे "भारतानें पाकिस्तानचें पाणी घेतलें नाहीं. भारतानें कसलीही चूक केलेली नाहीं अशी आतां आमची खात्री झाली आहे." अशी बातमी हा लेख मुद्रित होत असतांना मिळाली आहे.

## अशुभ मुहूर्त

मे, जून व जुलैमध्यें वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झालेल्या माझ्या कित्येक लेखांतून जुलै १९५४ व त्याच्या जवळपासचा काल हा, कोणतीहि नवीन व दीर्घकाल टिकणारी गोष्ट हातीं घेण्याच्या दृष्टीनें, अशुभ आहे, असें मी वारंवार सांगितलें आहे. "आगामी काल" या पुस्तकांतसुद्धां (पृष्ठे ११०) ८ जुलै हा दिवस 'अशुभ' असल्याचा उल्लेख मी केलेला आहे. म्हणजे आतां या कालव्याच्या उद्‌घाटन समारंभानंतरच मी या मुद्यावर भर देत आहे, असें नाहीं.

अंतरिक्षांत 'कालसर्प योग' घडून येत आहे. जुलैमध्यें हर्षल व नेपच्यून यांच्यामध्यें शक्तिमान महाकेंद्र योग चालू आहे., जुलैमध्येंच 'मंगळ' हा ग्रह पृथ्वीच्या खूपच जवळ येत आहे. आणि यावर कळस म्हणजे या उद्‌घाटन समारंभाच्या आधीं व नंतर–म्हणजेच जून ३० व जुलै १६ या दिवशी उघड्या डोळ्यांनी दिसू शकणारीं दोन ग्रहणें आहेत आणि तीही अस्तंगत होणार आहेत. अशा ऐतिहासिकदृष्ट्या अत्यंत महत्वाच्या योजनेचे इतक्या अशुभ काळीं उद्‌घाटन करणें नुसते औचित्यभंगाचें आहे असें नसून भविष्यकाळांत 'संकटें' व 'कटकटी' निर्माण करणारे आहे. ज्या योजनेनें लक्षावधि लोकांना भरभराट प्राप्त व्हावी अशी अपेक्षा आहे. त्याच्या

उद्‌घाटनासाठीं निवडलेल्या अशुभ वेळेनें त्यांच्यावर संकटाचें डोंगर कोसळावेत, अशी कोणाची तरी वाईट इच्छा असेल काय ? शुभ वेळ निवडण्याची दक्षता घेऊन वाईट गोष्टी टाळणें शक्य असते, एवढेंच सर्वांच्या मनावर बिंबवावें, अशी माझी इच्छा आहे. या मोठ्या योजनेचें उद्‌घाटन करतांना अधिक योजकता दाखविली असती तर किती बरें झालें असतें !

८ जुलै १९५४ ला चंद्राच्या प्रथम चतुर्थ भागाची पत्रिका ज्योतिषशास्त्राच्या अभ्यासूंनीं पहावी अशी माझी त्यांना सूचना आहे. यावेळीं लग्नीं सिंह उदित असून, लग्नी सायन सिंहराशी असलेल्या नेहरुंच्या स्वप्नांचें तो दर्शन घडवीत आहे. पंजाब, पेप्सू आणि राजस्तानच्या रखरखीत व ओसाड प्रदेशांतील ६० लक्ष एकर जमिनीला पाणीपुरवठा करणाऱ्या जगांतील सर्वांत मोठ्या कालव्यांच्या जाळ्यांचें, नांगल येथे उद्‌घाटन करतांना नेहरु म्हणाले, " तुम्हां सर्वांच्या व माझ्या स्वतःच्या वतीनें भाकरा नांगल धरण भारतीय जनतेच्या भल्याकरितां मी अर्पण करीत आहे. " व त्यांचें हें म्हणणें त्यांना अगदीं शोभून दिसणारें आहे.

'भावी काल' या पुस्तकांत 'पंडित नेहरु हे मानवयुगाचे प्रतिनिधी आहेत, असें मी म्हटलें आहे. आणि म्हणूनच त्यांनीं जें केलें तेंच ते बोलतील, ही अपेक्षा सार्थ ठरली. अशा मोठ्या कार्याकडे ते 'मंदिरें व पूजास्थानें' या दृष्टीनें पाहातात. त्यांना मंदिर, गुरुद्वार वा मशिदी यांच्याबद्दल पूजास्थान म्हणून जें प्रेम व आदर वाटतों त्यापेक्षां कितीतरी अधिक पूजनीय असें स्थान ते या मोठ्या कार्यांच्या ठिकाणांना देतात. 'मी ज्यावेळीं असलीं मोठीं कामें पहातों, त्यावेळीं मी धार्मिक वृत्तीचा बनतो.' असें ते म्हणतात, तें अगदीं योग्य आहे. त्यांचें पुढील



उद्गारहि अगदीं यथार्थ आहेत, राष्ट्रीय उन्नतीचें हें मोठें कार्यक्रम व या योजना हातीं घेणाऱ्या आमच्या तंत्रविशारदांचें व मजुरांचें विद्यापीठ या दृष्टीनेंच मी भाकरा नांगल योजनेकडे पाहतो.' हे सर्व उद्गार मानव-युगाकडे कल दर्शवितात व या मुद्याचा मी पुरेपूर परामर्ष पूर्वीच घेंतलेला आहे.

## समर्थन करते

स्वतंत्र भारतीय संघराज्याचें प्रथम अध्यक्ष डॉ. राजेंद्रप्रसाद यांनीं या प्रसंगीं असें उद्गार काढले कीं, 'भाकरा धरण योजनेचा पहिला हप्ता पूर्ण झाला एवढ्या पुरताच आजचा समारंभ आहे. तथापि माझी अशी खात्री आहे कीं, अनेकांचीं मनें, आनंद व आशा या भावनांनीं भरून गेलेलीं असतील. या योजनेमुळें अन्नधान्याच्या बाबतींत स्वयंपूर्णता प्राप्त करून घेण्यास मदत करण्याचें नवीन युग सुरू झालें आहे, एवढेंच नव्हे, तर त्यापेक्षाहि अधिक विस्तृत प्रमाणावर भरभराट व उत्कर्ष साध्य करून घेण्याची स्फूर्ति यापासून मिळेल'—डॉ. राजेंद्रप्रसादाचें हें उद्गार तुमच्या, माझ्या, प्रत्येक भारतीयाच्या भावनाच व्यक्त करतात. खरोखरीच स्वदेशी वा परदेशी, कोठेंहि असणाऱ्या भारतीयाला अभिमान वाटावा असेंच हें कार्य आहे. आपल्या मातृभूमीला वैभवसंपन्न करूं शकणारे असें हें फार मोठें व उघड स्वरूपांत दिसणारें कार्य आहे. याच्या केवळ विचारानेंच प्रत्येक भारतीयाच्या अंतःकरणांतील आनंदाला उधाण आलें असेल, मग प्रत्यक्ष त्या योजनेच्या उद्घाटनाची बातमी ऐकून त्यांना किती आनंद झाला असेल !




परंतु ह्या महत्त्वाच्या करारनाम्यावर सही करतांना व त्यानंतर ह्या कालव्याचें उद्घाटन करतांना जर शुभ वेळ निवडली असती तर सर्वच

गोष्टी सुव्यवस्थित व सुरळीत झाल्या असत्या. आणि सुबत्ता व उत्कर्ष या बरोबरच आपणा सर्वांना शांतताहि प्राप्त झाली असती. परन्तु ८ जुलैच्या ग्रहाचें शांततेशीं क्षणभरहि जुळणार नाहीं ! या ग्रहांची स्थिती व योग हें दोन्हीहि 'भडका' उडवून देणारे आहेत व ते भारताच्या शत्रूंनां सहज चेतना देण्यास व भांडणास उद्युक्त करण्यास समर्थ आहेत. आपल्या या महत्त्वाकांक्षी व अभिमानास्पद अशा 'निधानाचा' प्रत्यक्ष सत्यानाश व्हावा अशी प्रेरणा भारताच्या शत्रूंनां हें ग्रहयोग देतील, असें भय वाटतें. आणि ग्रहांच्यापुरता व त्यांच्या निर्देशाचा व कलाचा विचार केल्यास, हें संकट पुढें वाढून ठेवलेलें दिसतें. शेजारी राष्ट्रांच्या पत्रिकेंत कडवट व द्वेषमूलक भावनांचा सुळसुळाट झालेला दिसत असून, या महत्कार्याला कोणत्याहि प्रकारचा धोका वा शत्रूंपासून 'इजा' होणार नाहीं, अशी भारतीयांनीं डोळयांत तेल घालून दक्षता घ्यावयास पाहिजे. शत्रूच्या स्थानांतील मंडळाकडून, त्यांच्या उन्मत्त भावनांची वासनापूर्ति होण्यासाठीं ते फंदफितुरीं करतील, असें दर्शविलें जात आहे. त्याचप्रमाणें 'राहू' चा मुक्कामहि शत्रुस्थानी आहे. या राहूमुळें (सर्वसाधारणपणें मुस्लिम जनतेचा व विशेषत: पाकिस्थानचा निदर्शक ग्रह आहे) पाकिस्तानची सारी नजर आतां 'त्या ठिकाणीं' केंद्रित झाली असून कोणत्याहि बऱ्यावाईट मार्गानें 'त्या'चें कांहीं नुकसान वा नाश करतां आल्यास त्यांना अत्यंत आनंद होईल.

या महत् कार्याची, लहान अथवा मोठ्या प्रमाणांत, नुकसानी किंवा मोडतोड करण्याचा कोणीहि प्रयत्न केल्यास तो 'सहन' केला जाणार नाहीं. त्यांचा योग्य तो प्रतिकार केला जाईल व अशी मोडतोड होऊं नये, यासाठीं दिवसरात्र, वर्षानुवर्षे डोळ्यात तेल घालून आपण तिकडे जागरुकतेनें लक्ष पुरविलें पाहिजे. पुढें घडून येवूं शकणाऱ्या संकटाचें दिग्दर्शन करून, ज्योतिषशास्त्र आगाऊच धोक्याची सूचना देऊं शकतें; आणि त्या 'समर प्रसंगा'-वर मात करण्यासाठीं भारतीय पुढारी व जनता, व विशेषत: पंजाबची जनता योग्य ते प्रयत्न करील तर काय होणार नाहीं ?

## आगामी कालांत

पुढील कांहीं वर्षांत, २९ एप्रिल व १३ मे १९५७ हीं दोन ग्रहणें; ६ जुलै व २० जुलै १९६३ हीं दोन ग्रहणें; ३० डिसेंबर १९६३ व १४ जानेवारी १९६४ हीं दोन ग्रहणें; त्याचप्रमाणें २४ एप्रिल व ९ मे १९६७; १६ जानेवारी १९७२ व ४ जानेवारी १९९२ इत्यादि ग्रहणांची आपणांला प्रामुख्यानें नोंद करावी लागेल. वर उल्लेखिलेल्या या ग्रहणांच्या जवळपासच्या कालांत भारताच्या आंतील किंवा बाहेरील शत्रूंच्या उन्मत्त भावना व वासना अधिकच चेतविण्याची शक्ति या ग्रहणांमध्यें आहे व त्यांची दृष्टि आपल्या मातृभूमीच्या या अभिमानास्पद 'ठेवी' वर (possession) खिळलेली असून, या योजनेचा नाश करण्यासाठीं तें कोणत्याहि वाईट साधनांचा अवलंब करण्यास मागेपुढें पाहाणार नाहींत व भावी कालांत ते प्रत्यक्षांत थोडीफार मोडतोड करतील, असेंच या ग्रहणावरून व पत्रिकावरून दर्शविले जाते.

याच काळाजवळ नैसर्गिक कारणामुळेंहि याचें कांहीं नुकसान होण्याची शक्यताहि दिसतें.

भाक्रा नानगल-योजना

JULY 8th, 1954

SAYAN MAP BY -
– इन्दुमती पंडित

अशुभ दिनीं झालेलें या योजनेचें उद्घाटन् असेंच दर्शवितें कीं, एका अतिशय चांगल्या गोष्टींस एका अतिशय अशुभ दिवशीं सुरवात झाली. आणि म्हणूनच भाकरा–नांगलच्या बाबतींत आगामी कालांत सर्वच गोष्टी सुरळीत होऊं शकणार नाहीत व आपल्याला सध्यांपेक्षांहि अधिक स्वार्थत्याग आणि 'बलिदान' करावें लागेल. आतां झालेलें सुधारता येण्याची वेळहि निघून गेलेली आहे. परंतु एका ज्योतिर्विदानें अंतःकरणापासून दिलेल्या या 'धोक्याच्या सूचनेकडे लक्ष देण्याची वेळ' मात्र अजून टळून गेलेली नाहीं. आपण आनंद व अभिमान

यांच्या जाळ्यांत गुरफटून 'आळशी' व 'सुखासीन' बनू नये व दुष्ट शत्रूच्या रक्तरंजित हातांनीं ही योजना डागळली जाऊं नये, यासाठीं डोळ्यांत तेल घालून या योजनेचें संरक्षण करावें.

माझ्याजवळ सर्वच सूक्ष्म पंचांगें नसल्यानें यावेळीं लहानसहान त्रास-दायक व चिंता निर्माण करणाऱ्या घटना केव्हां केव्हां घडतील, याच्या तारखा मी देऊं शकत नाहीं; तथापि या लेखांतील विवेचनापासून भारताचे भावी कालांतील ज्योतिषी या धोक्याच्या सूचनेचा योग्य वेळीं पुनरुच्चार करतील, अशी आशा आहे. माझ्यापुरतें बोलायचें झालें तर अत्यंत कळ-कळीनें मी माझें कर्तव्य बजावीत आहे व 'इतरांनीं' त्यांचें कर्तव्य पार पाडावें, एवढीच मी अपेक्षा करतें.

---

C/O. Nature Cure Sanitorium,
6, Tadiwala Road, POONA-1.

Though I do not believe in Astrology, I have to admit that several of the predictions made by my friends Shri Ajanta Jain and Shrimati Indumati Pandit in their astrological reports that they have been sending me have come out to be true. I don't understand this, but the fact is there.

Jayaprakash Narayan
10. 11-5-[illegible]

From-
Jaya prakash Narayan.
To,-
Ajanta Jain, &
Indoomati Pandit, B.A..

# ५० वर्षांचे पंचांग ( सायन )

प्रत्येक वर्षाचे १ जानेवारी (जा.) व १ जुलै (जु.) चे मंगळ, गुरु, राहु, शनि, हर्षल, नेपच्यून व प्लूटोचे सायन अंश व राशि येथें देण्यांत आले आहेत. इष्ट अयनांश वजा केले असतां त्याचे "निरीयण" अंश व राशी मिळेल. प्रमुख ग्रहांचें स्थूल पंचाग इ. स. १९५० पासून इ. स. २००० पर्यंतचे आहे. यांत कला व विकला देण्यांत आलेल्या नाहींत.

| वर्ष | महिना | मंगळ | गुरु | राहु | शनि | हर्षल | नेपच्यून | प्लूटो |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | राशि – अंश | राशि – अंश | राशि – अंश | राशि – अंश | राशि – अंश | राशि – अंश | राशि–अंश |
| १९५० | जा. | तूळ २ | कुंभ ७ | मेष १२ | कन्या १९ | कर्क २ | तूळ १७ | सिंह १७ |
| ,, | जु. | ,, ८ | मीन ७ | ,, ३ | ,, १४ | ,, ५ | ,, १४ | ,, १७ |
| १९५१ | जा. | कुंभ १४ | ,, ५ | मीन २३ | तूळ २ | ,, ७ | ,, १९ | ,, १९ |
| ,, | जु. | मिथुन २८ | मेष १३ | ,, १३ | कन्या २६ | ,, ९ | ,, १६ | ,, १८ |
| १९५२ | जा. | तूळ २१ | ,, ६ | ,, ४ | तूळ १४ | ,, १२ | ,, २१ | ,, २१ |
| ,, | जु. | वृश्चिक ४ | वृषभ १४ | कुंभ २४ | ,, ८ | ,, १३ | ,, १९ | ,, १९ |
| १९५३ | जा. | मीन १ | ,, ११ | ,, १४ | ,, २६ | ,, १७ | ,, २४ | ,, २३ |
| ,, | जु. | कर्क ११ | मिथुन १२ | ,, ४ | ,, २० | ,, १८ | ,, २१ | ,, २२ |
| १९५४ | जा. | वृश्चिक ७ | ,, १९ | मकर २५ | वृश्चिक ७ | ,, २१ | ,, २६ | ,, २५ |
| ,, | जु. | मकर १ | कर्क ९ | ,, १५ | ,, ३ | ,, २३ | ,, २३ | ,, २३ |
| १९५५ | जा. | मीन २० | ,, २७ | ,, ५ | ,, १९ | ,, २६ | ,, २८ | ,, २७ |
| ,, | जु. | कर्क २४ | सिंह ४ | धनु २६ | ,, १५ | ,, २७ | ,, २६ | ,, २५ |
| १९५६ | जा. | वृश्चिक २२ | कन्या १ | ,, १६ | ,, २९ | सिंह १ | वृश्चिक ० | ,, २८ |
| ,, | जु. | मीन १३ | सिंह २९ | ,, ६ | ,, २७ | ,, १ | तूळ २८ | ,, २७ |

| वर्ष | महिना | मंगळ | गुरु | राहु | शनि | हर्षल | नेपच्यून | प्लूटो |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | राशि—अंश | राशि—अंश | राशि—अंश | राशि—अंश | राशि—अंश | राशि—अंश | राशि—अंश |
| १९५७ | जा. | मेष १४ | तूळ १ | वृश्चिक २७ | धनु ९ | सिंह ६ | वृश्चिक २ | कन्या ० |
| ,, | जु. | सिंह ६ | कन्या २५ | ,, १७ | ,, ९ | ,, ६ | ,, ० | सिंह २९ |
| १९५८ | जा. | धनु ७ | तूळ २९ | ,, ७ | ,, २० | ,, ११ | ,, ४ | कन्या २ |
| ,, | जु. | मेष १७ | ,, २२ | तूळ २८ | ,, २१ | ,, १० | ,, २ | ,, ० |
| १९५९ | जा. | वृषभ १७ | वृश्चिक २४ | ,, १८ | मकर ० | ,, १६ | ,, ७ | कन्या ४ |
| ,, | जु. | सिंह १८ | ,, २३ | ,, ८ | ,, ४ | ,, १४ | ,, ४ | ,, २ |
| १९६० | जा. | धनु २१ | धनु १९ | कन्या २९ | ,, १० | ,, २१ | ,, ९ | ,, ६ |
| ,, | जु. | वृषभ ८ | ,, २७ | ,, १९ | ,, १५ | ,, १९ | ,, ७ | ,, ४ |
| १९६१ | जा. | कर्क ८ | मकर १४ | ,, ९ | ,, २० | ,, २६ | ,, ११ | ,, ८ |
| ,, | जु. | कन्या २ | कुंभ ५ | ,, ० | ,, २८ | ,, २३ | ,, ९ | ,, ६ |
| १९६२ | जा. | मकर ६ | कुंभ ११ | सिंह २० | कुंभ ० | कन्या ० | ,, १३ | ,, १० |
| ,, | जु. | वृषभ २५ | मीन १३ | ,, १० | ,, १० | सिंह २८ | ,, ११ | ,, ८ |
| १९६३ | जा. | सिंह २४ | ,, ९ | ,, १ | ,, १० | कन्या ५ | ,, १५ | ,, १२ |
| ,, | जु. | कन्या १५ | मेष १७ | कर्क २१ | ,, २२ | ,, २ | ,, १३ | ,, १० |

| वर्ष | महिना | मंगळ | गुरु | राहु | शनि | हर्षल | नेपच्यून | प्लूटो |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | राशि—अंश | राशि—अंश | राशि—अंश | राशि—अंश | राशि—अंश | राशि—अंश | राशि—अंश |
| १९६४ | जा. | मकर २१ | मेष ११ | कर्क ११ | कुंभ २० | कन्या १० | वृश्चिक १७ | कन्या १४ |
| ,, | जु. | मिथुन १० | वृषभ १८ | कर्क २ | मीन ४ | ,, ७ | ,, १५ | ,, १२ |
| १९६५ | जा. | कन्या २४ | ,, १६ | मिथुन २२ | ,, १ | ,, १५ | ,, १९ | ,, १६ |
| ,, | जु. | तूळ २ | मिथुन १६ | ,, १२ | ,, १७ | ,, १२ | ,, १७ | ,, १४ |
| १९६६ | जा. | कुंभ ७ | ,, २४ | मिथुन ३ | ,, १२ | ,, २० | ,, २१ | ,, १९ |
| ,, | जु. | मिथुन २४ | कर्क १२ | वृषभ २३ | मेष ० | ,, १६ | ,, २० | ,, १७ |
| १९६७ | जा. | तूळ १४ | सिंह २ | ,, १३ | मीन २४ | ,, २५ | ,, २४ | ,, २१ |
| ,, | जु. | ,, २२ | ,, ७ | ,, ४ | मेष १२ | ,, २१ | ,, २२ | ,, १९ |
| १९६८ | जा. | कुंभ २४ | कन्या ६ | मेष २४ | ,, ६ | ,, २९ | ,, २६ | ,, २३ |
| ,, | जु. | कर्क ७ | ,, ३ | ,, १४ | ,, २४ | ,, २६ | ,, २४ | ,, २० |
| १९६९ | जा. | वृश्चिक १ | तूळ ६ | ,, ५ | मेष १९ | तूळ ४ | ,, २८ | ,, २५ |
| ,, | जु. | धनु ३ | कन्या २८ | मीन २५ | वृषभ ७ | ,, ० | , २६ | ,, २३ |
| १९७० | जा. | मीन १३ | वृश्चिक ३ | ,, १५ | ,, २ | ,, ९ | धनु ० | ,, २७ |
| ,, | जु. | कर्क १९ | तूळ २६ | ,, ६ | ,, १९ | ,, ५ | वृश्चिक २९ | ,, २५ |

| वर्ष | महिना | मंगळ | | गुरु | | राहु | | शनि | | हर्षल | | नेपच्यून | | प्लूटो | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | राशि | अंश | राशि | अंश | राशि | अंश | राशि | अंश | राशि | अंश | राशि | अंश | राशि | अंश |
| १९७१ | जा. | वृश्चिक | १६ | वृश्चिक | २८ | कुंभ | २६ | वृषभ | १६ | तूळ | १४ | धनु | २ | तूळ | ० |
| ,, | जु. | कुंभ | २१ | ,, | २७ | ,, | १६ | मिथुन | २ | ,, | १० | ,, | १ | कन्या | २७ |
| १९७२ | जा. | मेष | ४ | धनु | २३ | ,, | ७ | ,, | ० | ,, | १८ | ,, | ४ | तूळ | २ |
| ,, | जु. | सिंह | २ | मकर | ३ | मकर | २७ | ,, | १४ | ,, | १४ | ,, | ३ | कन्या | २९ |
| १९७३ | जा. | धनु | १ | ,, | १८ | ,, | १७ | ,, | १५ | ,, | २३ | ,, | ६ | तूळ | ५ |
| ,, | जु. | मेष | ७ | कुंभ | ११ | ,, | ८ | ,, | २६ | ,, | १९ | ,, | ५ | ,, | १ |
| १९७४ | जा. | वृषभ | १ | ,, | १४ | धनु | २८ | कर्क | १ | ,, | २७ | ,, | ८ | ,, | ७ |
| ,, | जु. | सिंह | १४ | मीन | १८ | ,, | १८ | ,, | ९ | ,, | २४ | ,, | ७ | ,, | ४ |
| १९७५ | जा. | धनु | १५ | ,, | १३ | ,, | ९ | ,, | १५ | वृश्चिक | २ | ,, | १० | ,, | ९ |
| ,, | जु. | वृषभ | ० | मेष | २२ | वृश्चिक | २९ | ,, | २१ | तूळ | २८ | ,, | १० | ,, | ६ |
| १९७६ | जा. | मिथुन | १७ | ,, | १५ | ,, | १९ | सिंह | १ | वृश्चिक | ६ | ,, | १३ | ,, | १२ |
| ,, | जु. | सिंह | २७ | वृषभ | २२ | ,, | १० | ,, | ३ | ,, | ३ | ,, | १२ | ,, | ९ |
| १९७७ | जा. | मकर | ० | ,, | २१ | ,, | ० | ,, | १६ | ,, | ११ | ,, | १५ | ,, | १४ |
| ,, | जु. | वृषभ | १९ | मिथुन | २० | तूळ | २० | ,, | १५ | ,, | ८ | ,, | १४ | ,, | ११ |
| १९७८ | जा. | सिंह | ९ | कर्क | ० | ,, | ११ | कन्या | ० | ,, | १५ | ,, | १७ | ,, | १७ |
| ,, | जु. | कन्या | १० | ,, | १६ | ,, | १ | सिंह | २७ | ,, | १३ | ,, | १६ | ,, | १४ |

| वर्ष | महिना | मंगळ | गुरु | राहु | शनि | हर्षल | नेपच्यून | प्लूटो |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | राशि—अंश | राशि—अंश | राशि—अंश | राशि—अंश | राशि—अंश | राशि—अंश | राशि—अंश |
| १९७९ | जा. | मकर १५ | सिंह ७ | कन्या २१ | कन्या १४ | वृश्चिक २० | धनु १९ | तूळ १९ |
| ,, | जु. | मिथुन ४ | ,, ११ | ,, १२ | ,, १० | ,, १७ | ,, १९ | ,, १६ |
| १९८० | जा. | कन्या १४ | कन्या १० | ,, २ | ,, २७ | ,, २४ | ,, २१ | ,, २२ |
| ,, | जु. | ,, २५ | ,, ६ | सिंह २२ | ,, २२ | ,, २२ | ,, २१ | ,, १९ |
| १९८१ | जा. | कुंभ १ | तूळ १० | ,, १३ | तूळ १० | ,, २९ | ,, २३ | ,, २४ |
| ,, | जु. | मिथुन १८ | ,, २ | ,, ३ | ,, ४ | ,, २७ | ,, २३ | ,, २२ |
| १९८२ | जा. | तूळ ७ | वृश्चिक ६ | कर्क २३ | ,, २२ | धनु ३ | ,, २५ | ,, २७ |
| ,, | जु. | ,, १३ | ,, १ | ,, १४ | ,, १६ | ,, १ | ,, २५ | ,, २४ |
| १९८३ | जा. | कुंभ १७ | धनु २ | ,, ४ | वृश्चिक ३ | ,, ७ | ,, २७ | ,, २९ |
| ,, | जु. | कर्क २ | ,, २ | मिथुन २४ | तूळ २८ | ,, ६ | ,, २८ | ,, २७ |
| १९८४ | जा. | तूळ २५ | ,, २६ | ,, १५ | वृश्चिक १४ | ,, ११ | ,, २९ | वृश्चिक २ |
| ,, | जु. | वृश्चिक १३ | मकर ८ | ,, ५ | ,, ९ | ,, १० | मकर ० | तूळ २९ |
| १९८५ | जा. | मीन ६ | ,, २२ | वृषभ २५ | ,, २५ | ,, १६ | ,, २ | वृश्चिक ४ |
| ,, | जु. | कर्क १५ | कुंभ १६ | ,, १६ | ,, २२ | ,, १५ | ,, २ | ,, २ |
| १९८६ | जा. | वृश्चिक ११ | ,, १८ | ,, ६ | धनु ५ | ,, २० | ,, ४ | ,, ७ |
| ,, | जु. | मकर २० | मीन २३ | मेष २६ | ,, ४ | ,, २० | ,, ४ | ,, ४ |

| वर्ष | महिना | मंगळ | गुरु | राहु | शनि | हर्षल | नेपच्यून | प्लूटो |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | राशि–अंश | राशि–अंश | राशि–अंश | राशि–अंश | राशि–अंश | राशि–अंश | राशि-अंश |
| १९८७ | जा. | मीन २५ | मीन १८ | मेष १६ | धनु १५ | धनु २४ | मकर ७ | वृश्चिक ९ |
| ,, | जु. | कर्क २७ | मेष २६ | ,, ७ | ,, १६ | ,, २४ | ,, ७ | ,, ७ |
| १९८८ | जा. | वृश्चिक २५ | ,, २१ | मीन २७ | ,, २५ | ,, २८ | ,, ८ | ,, १२ |
| ,, | जु. | मीन २४ | वृषभ २६ | ,, १८ | ,, २८ | ,, २९ | ,, ९ | ,, १० |
| १९८९ | जा. | मेष २० | ,, २७ | ,, ८ | मकर ६ | मकर २ | ,, १० | ,, १५ |
| ,, | जु. | सिंह ९ | मिथुन २४ | कुंभ २८ | ,, ११ | ,, ३ | ,, ११ | ,, १३ |
| १९९० | जा. | धनु १० | कर्क ५ | ,, १८ | ,, १६ | ,, ६ | ,, १२ | ,, १७ |
| ,, | जु. | मेष २२ | ,, २० | ,, ९ | ,, २३ | ,, ८ | ,, १३ | ,, १५ |
| १९९१ | जा. | वृषभ २८ | सिंह १२ | मकर २९ | ,, २६ | ,, १० | ,, १४ | ,, २० |
| ,, | जु. | सिंह २१ | ,, १५ | ,, २० | कुंभ ५ | ,, १२ | ,, १६ | ,, १८ |
| १९९२ | जा. | धनु २४ | कन्या १५ | ,, १० | ,, ६ | ,, १४ | ,, १६ | ,, २२ |
| ,, | जु. | वृषभ १२ | ,, १० | ,, ० | ,, १७ | ,, १६ | ,, १८ | ,, २० |
| १९९३ | जा. | कर्क २० | तूळ १४ | धनु २० | ,, १६ | ,, १८ | ,, १९ | ,, २५ |
| ,, | जु. | कन्या ५ | ,, ६ | ,, ११ | मीन ० | ,, २१ | ,, १९ | ,, २३ |

| वर्ष | महिना | मंगळ | | गुरु | | राहु | | शनि | | हर्षल | | नेपच्यून | | प्लूटो | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | राशि | अंश | राशि | अंश | राशि | अंश | राशि | अंश | राशि | अंश | राशि | अंश | राशि | अंश |
| १९९४ | जा. | मकर | ९ | वृश्चिक | १० | धनु | १ | कुंभ | २७ | मकर | २२ | मकर | २१ | वृश्चि. | २७ |
| ,, | जु. | वृषभ | २८ | ,, | ५ | वृश्चिक | २२ | मीन | १२ | ,, | २५ | ,, | २२ | ,, | २५ |
| १९९५ | जा. | कन्या | ३ | धनु | ५ | ,, | १२ | ,, | ८ | ,, | २५ | ,, | २३ | धनु | ० |
| ,, | जु. | ,, | १९ | ,, | ७ | ,, | २ | ,, | २४ | ,, | २९ | ,, | २५ | वृश्चि. | २८ |
| १९९६ | जा. | मकर | २४ | मकर | ० | तूळ | २३ | ,, | १९ | ,, | २९ | ,, | २५ | धनु | २ |
| ,, | जु. | मिथुन | १४ | ,, | १३ | ,, | १३ | मेष | ६ | कुंभ | ४ | ,, | २७ | ,, | १ |
| १९९७ | जा. | तूळ | ० | ,, | २५ | ,, | ३ | ,, | १ | ,, | ३ | ,, | २७ | ,, | ४ |
| ,, | जु. | ,, | ६ | कुंभ | २१ | कन्या | २३ | ,, | १९ | ,, | ८ | ,, | २९ | ,, | ३ |
| १९९८ | जा. | कुंभ | ११ | ,, | २३ | ,, | १४ | ,, | १४ | ,, | ७ | ,, | २९ | धनु | ७ |
| ,, | जु. | मिथुन | २७ | मीन | २८ | ,, | ४ | वृषभ | २ | ,, | १२ | कुंभ | १ | ,, | ६ |
| १९९९ | जा. | तूळ | १९ | ,, | २२ | सिंह | २४ | मेष | २६ | ,, | ११ | ,, | १ | ,, | ९ |
| ,, | जु. | वृश्चिक | ६ | वृषभ | १ | ,, | १५ | वृषभ | १४ | ,, | १६ | ,, | ४ | ,, | ८ |
| २००० | जा. | कुंभ | २८ | मेष | २५ | ,, | ५ | ,, | १० | ,, | १५ | ,, | ३ | ,, | ११ |
| ,, | जु. | कर्क | १० | मिथुन | ० | कर्क | २५ | ,, | २७ | ,, | २० | ,, | ६ | ,, | ११ |

# श्यामा

मला असें वाटतें कीं, चित्रपटांत काम करणाऱ्या कलावंताला, मग तो नट असो वा नटी असो, फक्त बुद्धिमत्तेचा उपयोग असतो असें आपण म्हणूं शकत नाहीं. अविरत परिश्रम, आपण स्वीकारलेल्या कामाची खरीखुरी आवड यांनाहि बुद्धिमत्तेइतकेंच स्थान आहे. संकटाच्या वेळी आणि अडी-अडचणींच्या प्रसंगीं, ही कलेची आवड व "सुरुवातीलाच निम्मी लढाई जिंकण्यास" लागणारी वृत्ति या गोष्टींचें अनन्यसाधारण महत्त्व आहे. दिग्दर्शकांचें म्हणणें समजावून घेणें व अनुकरण करणें या दोन गोष्टींना फार महत्त्व असतें. आणि खुर्शिद मेरुद्दीन चौधरी किंवा सर्वसामान्यपणें 'श्यामा' या चित्रपट-रसिकांच्या परिचयाच्या असलेल्या या स्वप्नसुंदरीच्या जन्मपत्रिकेंत या दोन्ही गोष्टी प्रामुख्यानें दिसून येतात.

श्यामाच्या जन्मपत्रिकेंत मिथुन राशींत रवि व तूळ राशींत चंद्र असल्यानें तीं उपजत सीने-तारका आहे असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. असें म्हणण्यांचें कारण असें कीं, चेहेऱ्यावरील प्रत्येक भावभावनांचें, सूक्ष्म हालचालींचें कॅमेरा बारकाईनें चित्रण करतो, ही गोष्ट श्यामाच्या परिपूर्ण रीतीनें ध्यानांत असते आणि तिच्या चेहेऱ्यावर योग्य भावना अगदीं नैसर्गिकपणें प्रदर्शित होत असतात. अशा प्रकारची ग्रहमालिका असल्यामुळें अतिशय थोडया परिश्रमानें तिच्या मनांतील भावना, चेहेऱ्यावरील हालचालींच्याद्वारें ती अतिशय सुंदर रीतीनें व्यक्त करूं शकते; आणि याचमुळें अतिशय गुंतागुंतीची व अवघड भूमिका ती प्रभावीपणें करूं शकते. तिची ग्रहमालिका पाहिल्यानंतर प्रथम ही गोष्ट लक्षांत येते कीं, ती एक उच्च श्रेणींतील तारका म्हणून प्रसिद्धी मिळवीलच, परंतु त्यापेक्षांहि चित्रपटसृष्टीची स्वप्नसुंदरी म्हणून ती लोकप्रिय झाल्याविना राहणार नाहीं.

१२ जून १९३५ सालीं जन्म झालेल्या श्यामाच्या जन्मकुंडलींत लग्नीं कन्या राशीचा उदय होत असून नेपच्यून कन्येंतच आहे. तूळ राशींतील चंद्र मनाची समतोल वृत्ति दर्शवितो, व प्रथमस्थानीं असलेला मंगळ तूळ राशींत असल्यामुळें तिच्या हातून कदाचित् ज्या कांहीं चुका होण्याचा संभव निर्माण झाला असता तोहि बऱ्याच अंशीं नाहींसा करीत आहे. तूळ राशींतील चंद्राच्या प्रभावामुळेंच तिला प्रभावी व्यक्तिमत्व व त्याला योग्य असें शरीरसौष्ठव प्राप्त झालें आहे. फलज्योतिषाच्या दृष्टिकोनांतून पाहिलें तर असें दिसून येतें कीं, तूळ रास ही व्यक्तीच्या सौंदर्याशीं निगडीत असते.




श्यामाची जीवनकथा म्हणजे तिला आजपर्यंत करावे लागलेले परिश्रम व चित्रपट धंद्यांत गेलीं आठ वर्षें तिची सुरू असलेली सावकाश व व्यवस्थित प्रगति! हे परिश्रम कदाचित् दुर्लक्षिलेहि जाण्याची शक्यता होती. तिनें जवळजवळ ८० हून अधिक चित्रपटांत एक्स्ट्रॉ म्हणून काम केलें. ही गोष्ट तरी काय दर्शविते ?

परंतु तिच्या सतराव्या वाढदिवसाच्या वेळीं गुरूनें शुभस्थानीं प्रवेश केला, आणि त्याच दिवशीं एका साध्या एक्स्ट्रॉऐवजीं एक "तारका" म्हणून तिच्याशीं एका चित्रपट संस्थेनें करारनामा केला. "श्रीमतीजी" या चित्रपटानें श्यामा ही चित्रपटसृष्टींतील एक दैदीप्यमान् तारका आहे हें सिद्ध करून दाखविलें, आणि यांतूनच चित्रपटसृष्टींतील एक स्वप्नसुंदरी उदयास आली.

श्यामा ही अशा व्यक्तींपैकीं एक आहे कीं, ज्यांच्या जीवनावर सहकाऱ्यांचा आत्यंतिक परिणाम दिसून येतो. याच कारणास्तव तिचे

संबंधित कोण आहेत या घटनेला फार महत्त्व आहे. तिची प्रगति वा परागति ही तिच्या मित्रांच्यावर बऱ्याच प्रमाणांत अवलंबून आहे. या कुंडलींत शुक्र–हर्षल अशुभ योग तिच्या प्रेमी हृदयांत कांहीं विचित्र भावना निर्माण करील, आणि मंगळ–बुध अशुभ केंद्रयोग तिच्या जिव्हेंत कटुता निर्माण करतो. (मंगळ–बुध अशुभ योगाबाबत भावी काल पुस्तकांत आलोचना केली आहे.) ह्या दोन्ही योगामुळेंच, तिच्या जीवनांत जर कांहीं निराशा उत्पन्न झाली तर त्याला ती स्वतःच जबाबदार आहे, असें मला वाटतें.

तिच्या जन्मपत्रिकेंतील रवि आणि चंद्र यांच्या स्थानाकडे पाहिलें असतां असें दिसून येतें कीं, तिची कलात्मकता फार सुंदर रीतीनें वाढीला लागलेली आहे; आणि तिच्या व्यक्तिमत्त्वाला त्यामुळें एक गूढ आकर्षण लाभलेलें आहे. कांटेकोरपणें कोणतीहि गोष्ट करण्याची तिला अतिशय आवड आहे, आणि व्यवस्थित प्रगति करून घेण्याच्या बाबतीत ती नैसर्गिकपणेंच दक्ष असते. कोणत्याहि कार्यांत प्रामाणिकपणा व न्यायाची आन्तरिक आवड, या गोष्टी अचूक अंदाजामुळें व विषयग्रहणाच्या सामर्थ्यामुळें तिच्या मनोवृत्तींत बिंबलेल्या आहेत. कलात्मक रसग्रहण व कलात्मक जीवन यामध्यें ती यशस्वी होण्याचें एक प्रमुख कारण म्हणजे तिच्या जन्मपत्रिकेंतील रवि व चंद्र यांचें विशिष्ट स्थान होय.

मिथुन राशींत रवि असल्यामुळें ती मनमिळाऊ स्वभावाची, संगतिप्रिय व विश्वासार्ह आहे हें सांगण्यास आनंद वाटतो. आपल्या सहकाऱ्यांच्या विषयीं ती क्वचित् अविश्वास दर्शवील, किंवा महत्त्वाचें आणि अपरिहार्य कारण असल्याविना त्यांना त्रास देईल.

मिथुन राशींत रवि असणाऱ्या चित्रसृष्टींतील कलावंतांत नर्गिस, नूतन समर्थ, भारतभूषण, गोडार्ड, एरॉल फ्लीन यांचा प्रामुख्यानें समावेश होतो. श्यामाच्याहि जन्मपत्रिकेंत ही शुभ गोष्ट असल्यानें प्रसंगाला योग्य असें वागणें व अष्टपैलुत्व या देणग्या तिला मिळालेल्या आहेत. चित्रपटसृष्टींतील वर उल्लेखिलेल्या कलावंतांमध्यें संकटाच्या प्रसंगींहि स्थिर मनोवृत्तिची व मनोधैर्य ढळूं न देतां त्यांना गंभीरपणें तोंड देण्याचें जें सामर्थ्य आहे त्याचा अभाव श्यामामध्यें आहे. याचें कारण प्रसंगाचें क्षणिक सामर्थ्यहि

तिच्या भावनावश मनावर परिणाम करणारें ठरतें. तथापि असें दिसतें कीं, बलवत्तर ग्रहयोग असल्यामुळें ही तुलनात्मक दृष्टीनें या सर्वांपेक्षां अधिक यश मिळवील.

पुढील कांहीं महिन्यांतच एकाच वेळीं जवळजवळ ६ चित्रपटांत तिला काम करावें लागेल. १९५९ अखेर तिची एकसारखी भरभराट होत जाईल. आणि त्यापुढील काळांत ती एक वरच्या दर्जाची श्रेष्ठ अभिनेत्री म्हणून ओळखिली जाईल. एवढेंच नव्हे तर चित्रपटांची ज्या ज्या व्यक्तींना आवड असेल त्या त्या सर्वांच्या ओठांवर तिचें नांव खेळत राहील.

तिच्या सुहृदांना, मित्रांना व आप्तेष्टांना स्वप्नांतहि कल्पना नसेल असा उत्कर्ष, अशी प्रसिद्धि आणि अशी संपत्ति तिच्या पायांशीं लोळण घेत येईल. आणि म्हणून मी असें विश्वासानें म्हणूं शकतें कीं येत्या कांहीं वर्षांतच श्यामा सर्वांना इतके आश्चर्यचकित करून टाकील कीं, आपणाला नर्गिसविषयीं आज जें कांहीं वाटतें तें यापुढें त्या वेळीं कःपदार्थ भासेल.

मार्च १९५४, फेब्रुवारी १९५६, जानेवारी १९५८ व डिसेंबर १९५९ हे तिच्या आयुष्यांतील असे चार महिने आहेत कीं त्या वेळीं तिनें कोणतेंहि भलतें धाडस करण्याच्या भरीस पडूं नये, अथवा अनावश्यक जबाबदारी व जोखीम अंगावर घेऊं नये. या काळांत तिनें भावनावश होऊन कांहीं तरी नवीन करण्यापेक्षां शांतपणानें स्वस्थ रहाणें हें तिच्या दृष्टीनें अधिक फायद्याचें ठरेल.

त्याचप्रमाणें मे १९५५, एप्रिल १९५७, मार्च १९५९ हे तिन्ही महिने असें शुभ फल देणारे आहेत कीं, ज्या वेळीं कांहींतरी नवीन काम करावें अशी आंतरिक तळमळ तिला लागेल, व त्याचाच परिणाम म्हणून तिला सुयश प्राप्त होईल. या वेळीं होणारा बदल तिला अंतीं फलदायी ठरणार आहे. जन्मतःच तिला प्रवासाची आवड असल्यामुळें पुढील कांहीं वर्षांत ती परदेशांत सहलीवर जाईल; व श्यामा ही अशा प्रकारची कलावंत आहे कीं, या सहलीचा फायदा करून घेतल्याविना ती कधींहि रहाणार नाहीं. व्यक्तिगत जीवनाची सफलता या पत्रिकेंत आहे. परंतु मानव—युगांत लोकप्रिय होऊन अमरत्व प्राप्त करणें श्यामाला जमणार नाहीं.




## दोनशें वर्षांत हर्षल-नेपच्यून आणि तुम्ही




हर्षल व नेपच्यून हे सौरमंडळांतील प्रमुख व मंदगति ग्रह आहेत. यांमध्यें शुभ व अशुभ योग बऱ्याच वर्षांनीं होतात. आणि म्हणूनच त्यांचे मेदिनीय, राजकीय व व्यक्तिगत परिणामहि बराच कालपर्यंत टिकतात, व तें फार महत्त्वाचे असतात. या लेखांत हर्षल व नेपच्यून यांमध्यें अशुभ युती, अशुभ केंद्रयोग, आणि अशुभ प्रतियोग केव्हां झाले आणि त्यांचा व्यक्तिगत जीवनावर काय परिणाम होण्याचा संभव आहे; तसेंच या योगांचें वेळीं जन्मलेल्या व्यक्तींचें स्वभाववैशिष्ट्य काय आहे याविषयीं आलोचना करीत आहे. प्रथम हे योग केव्हां, कोणत्या राशींत, आणि किती अंशावर झाले, व पुन्हां केव्हां होणार आहेत हें पाहूं या. या ग्रहांचें सर्व विवेचन सायन पंचांगाप्रमाणें केलेलें आहे,—

– १ –

२२ मार्च १८२१ रोजीं मकर राशींत ३ अंशावर—
हर्षल व नेपच्यूनमध्यें युति झाली.

– २ –

मार्च १८७० मध्यें कर्केंत हर्षल व मेषेंत नेपच्यून
यांचा १८ अंशावर केंद्रयोग झाला.

– ३ –

१२ जानेवारी १९०८ रोजीं कर्केंत नेपच्यून व मकरेंत हर्षल
यांचा १३ अंशावर प्रतियोग झाला.

११ जुलै १९०८ रोजी कर्कंत नेपच्यून व मकरेंत हर्षल
यांचा १४ अंशावर प्रतियोग झाला.

२३ डिसेंबर १९०८ रोजीं कर्कंत नेपच्यून व मकरेंत हर्षल
यांचा १६ अंशावर प्रतियोग झाला.

१० ऑगस्ट १९०९ रोजीं कर्कंत नेपच्यून व मकरेंत हर्षल
यांचा १७ अंशावर प्रतियोग झाला.

२ डिसेंबर १९०९ रोजीं कर्कंत नेपच्यून व मकरेंत हर्षल
यांचा १९ अंशावर प्रतियोग झाला.

२३ सप्टेंबर १९१० रोजीं कर्कंत नेपच्यून व मकरेंत हर्षल
यांचा २१ अंशावर प्रतियोग झाला.

२८ ऑक्टोबर १९१० रोजीं कर्कंत नेपच्यून व मकरेंत हर्षल
यांचा २१ अंशावर प्रतियोग झाला.

– ४ –

सप्टेंबर १९५३ मध्यें कर्कंत हर्षल व तूळेत नेपच्यून
यांचा २२ अंशावर केंद्रयोग झाला.

१५ जुलै १९५४ रोजीं कर्कंत हर्षल व तूळेंत नेपच्यून
यांचा २३ अंशावर केंद्रयोग झाला.

२ डिसेंबर १९५४ रोजीं कर्कंत हर्षल व तूळेंत नेपच्यून
यांचा २७ अंशावर केंद्रयोग होत आहे.

११ जून १९५५ रोजीं कर्कंत हर्षल व तूळेंत नेपच्यून
यांचा २६ अंशावर केंद्रयोग होत आहे.

* ५ मे १९५६ रोजीं कर्कंत हर्षल व तूळेंत नेपच्यून
यांचा २९ अंशावर केंद्रयोग होत आहे.

– ५ –

फेब्रुवारी १९९२ मध्यें मकर राशींत १६ अंशावर हर्षल व
नेपच्यूनमध्यें युति होणार आहे.

१ फेब्रुवारी १९९३ रोजीं मकर राशींत १९ अंशावर
हर्षल व नेपच्यूनमध्यें युति होणार आहे.

५ नोव्हेंबर १९९३ रोजीं मकर राशींत १९ अंशावर
हर्षल व नेपच्यूनमध्यें युति होणार आहे.

## उदाहरण

उदा०—तारीख १५ जुलै १९५४ रोजीं सायंकाळीं ९ वाजून ५४ मिनिटांनीं या दोन प्रमुख ग्रहांमध्यें शक्तिशाली व अशुभ केंद्रयोग घडून आला. त्या वेळीं नेपच्यून तूळ राशींत २३ अंश १९ कला आणि हर्षल कर्क राशीत २३ अंश १९ कला होता. परंतु १९५४ मध्यें मे महिन्याच्या १५ तारखेस नेपच्यून २३ अंश ५५ कला आणि हर्षल २० अंश २ कला होता, म्हणजे ते अशुभ केंद्रयोगाच्या कक्षेंतच होते. २४ सप्टेंबर रोजीं नेपच्यून २४ अंश ५३ कला व हर्षल २७ अंशावर असूनहि अशुभ योगाच्या कक्षेंत होते. म्हणजे प्रत्यक्ष १५ जुलै रोजीं घडून आलेला अशुभ केंद्रयोग १५ मे पासून २४ सप्टेंबरपर्यंत संपूर्ण रीतीनें त्याचा अशुभ परिणाम दर्शवीत होता.

सन १८७० मध्यें कर्केंत हर्षल व मेषेत नेपच्यून यांचा १८ अंशावर जो केंद्रयोग झाला त्या वेळेला जन्मलेल्या व्यक्तींच्या जीवनांत या योगामुळें होणाऱ्या प्रतिक्रियेचें विशिष्ट रूप ऑगस्ट १९०९ मध्यें कर्केंत नेपच्यून व मकरेंत हर्षल यांचा १७ अंशावर जो प्रतियोग झाला त्यामुळें दिसून आलें. अर्थातच तें कांहीं एक दिवस किंवा एका आठवड्यांत अनुभवास येणारें नव्हतें; परंतु तें कित्येक महिने टिकलें. वर लिहिलेल्या काळांत, म्हणजेच अशुभ योग चालू असतांना बरेंच स्त्री आणि पुरुष जन्मलें, आणि ते स्वतःच्या जन्मपत्रिकेंतील ग्रहयोगानें दर्शविलेल्या मार्गानें आपलें आयुष्य घालवीत होते व घालवीत आहेत. ते जीवनाच्या कोणत्याहि क्षेत्रांत असोत, हें निश्चित आहे कीं त्यांच्या पत्रिकेंत हर्षल व नेपच्यून अशुभ योग आहे. अर्थातच प्रत्येकाच्या वैयक्तिक कुंडलीतींल हर्षल व नेपच्यून यांच्या स्थानमाहात्म्याला अनुसरूनच या अशुभ योगाचे परिणाम अनुभवास येणार हें सांगणें नकोच !

तथापि, या सर्वांच्या बाबतींत सामान्यपणें जें परिणाम दिसून येतात अशांचा निर्देश या ठिकाणीं करीत आहे. अनेक विचित्र व अद्‌भुत अनुभवानें जीवन व्याप्त असेल असे हें अशुभ योग दर्शवीत असून, या

अशुभ योगानें युक्त असलेल्या लोकांच्या जीवनांत त्याच्या पुनरावृत्तीमुळें अस्वास्थ निर्माण होईल, व जिवाला अस्थिरता प्राप्त झाल्याचें दिसून येईल.

या अशुभ योगयुक्त लोकांच्यामध्यें स्वप्नाळू वा शेखमहंमदी मनोवृत्ति आणि स्वत:विषयीं चुकीच्या कल्पनांचें (नेपच्यूनमुळें) प्राबल्य दिसून येईल, व त्या दृष्टीनें ते सहज त्या गोष्टींना बळी पडतील. या योगामुळें विचित्र व वाईट गोष्टींचें भाकीत, अस्पष्ट अपेक्षा व पुढील गोष्टी आगाऊ सूचित होणें, या गोष्टी घडून येऊं शकतात.

या अशुभ योगाची पुनरावृत्ति झाली म्हणजे या व्यक्तींच्या कीर्तीला, सामाजिक स्थानाला, व नांव-लौकिकाला धक्का लागावा अशा विपरीत घटना घडून येण्याची व लोकापवादापासून त्रास होण्याची शक्यता निर्माण होते. त्यांच्या जीवनांत व कार्यांत त्यांना त्रास सोसावा लागणार ही गोष्ट स्पष्ट आणि उघड आहे.




* उदाहरणार्थ, –१९५४–५५ मध्यें पाकिस्तानचे पंतप्रधान जनाब महंमदअली किंवा अमेरिकेचे कम्युनिस्ट विरोधी सिनेटर जोसेफ मॅकार्थी यांच्या पत्रिकेतील महाकेंद्र योगाची पुनरावृत्ती झाली हे आपण येथे दिलेल्या त्यांच्या पत्रिकेवरुन पाहूं शकाल.

म्हणजे मार्च, एप्रिल व जून १८७० मध्यें जन्मलेल्या व्यक्तींच्या जीवनांत १९०९; आणि १९१० सालांत जन्मलेल्या व्यक्तींच्या जीवनांत १९५३–५४–५५ सालांत अथवा १९५३–५४ सालांतील योगांच्या वेळीं जन्मलेल्या लोकांच्या जीवनांत १९९२ सालांतखूप बदल घडवून आणणार असल्याचें व त्यांच्या जीवनांत महत्त्वाचा काल निर्माण करीत असल्याचें

निर्दशित करीत आहेत. कारण हे सर्व क्रांतिकारक योग आहेत; यांच्याकडे दुर्लक्ष करून चालत नाहीं.

असें दिसतें कीं, वर उल्लेखिलेल्या वर्षांत ज्या वेळीं अशुभ योग झाले त्या काळांत जन्मलेल्या लोकांना अशुभ योग जेव्हां पुनरावृत्त होतो तेव्हां नजीक येऊन भिडत असलेल्या संकटांच्या अंधुक जाणीवेनेंच भीतिग्रस्त केलें जातें. या संकटांचीं कारणें त्यांना अज्ञात असल्यानें इच्छाशक्तीच्या जोरावर त्या संकटांच्यावर मात करणें अशक्य असल्यानें निर्माण होणारी अनिश्चितता त्यांचें मानसिक स्वास्थ्य व समाधान हिरावून घेते. खरें पाहिलें असतां, अशा प्रकारचें संकट खरोखरीच निर्माण होण्याची शक्यता नसतांनाहि भीतीच्या दडपणामुळें त्यांच्या हालचाली संशयास्पद व भित्रेपणाच्या द्योतक अशा दिसतील, व ते आपली कोणतीहि गोष्ट कोणाजवळहि उघड करणार नाहींत.

त्यांच्या या वैशिष्टयपूर्ण वागणुकीमुळें त्यांची कोणत्या तरी प्रकारें बदनामी होईल; त्याचबरोबर लोकांचें सहकार्य व सहानुभूति मिळणें बंद होऊन काल्पनिक भीतीच्या जगांतून ते वास्तव जगांत येऊन उतरतील. कोणत्याहि प्रकारची आशंका न बाळगतां मी असें म्हणेन कीं, इतरांच्याबरोबर ते ज्या विशिष्ट मार्गानें वागतील त्यामुळेंच त्यांचें स्वतःचें नुकसान होणार असून ते स्वतःच त्याला जबाबदार रहातील; आणि सरतेशेवटीं यांच्या पायाखालची वाळू बऱ्याच प्रमाणांत घसरलेली पहावयास मिळेल. बहुसंख्य लोकांच्या बाबतींत आपल्याला असें आढळून येईल कीं कांहीं प्रमाणांत या काल्पनिक भीतीच्या दडपणामुळें त्यांचें स्वास्थ्य नष्ट होत आहे. कित्येकजण हृदयक्रिया बंद पडून मृत्यु



पावतील, तर कित्येक या सतत मानसिक भीतीपासून कायमची सुटका व्हावी म्हणून आत्महत्येचा किंवा घर अथवा व्यवसाय सोडून निघून जाण्याचा मार्ग अवलंबितील.

उद्योगधंद्याच्या क्षेत्रांत अनपेक्षित असे तोटयाचे प्रसंग येऊन, त्याचबरोबर सामाजिक क्षेत्रांतहि त्यांना संकटाशीं मुकाबला करावा लागेल. या योगामुळें निर्माण झालेलें मानसिक अस्वास्थ या लोकांना साहसी व शोधक बनवील. त्याचबरोबर त्यांच्यांत चापल्य येऊन ते धंद्यांत नवीन योजनांचा अवलंब धडाडीनें करतील; व त्याचाच परिणाम म्हणून त्यांना अधिक त्रास सोसावा लागेल.

या लोकांना ज्योतिषशास्त्रीयदृष्टया असा सल्ला द्यावासा वाटतो कीं, कोणत्याहि प्रकारचें मानसिक दडपण त्यांनीं स्वतः होऊन वाढवून घेऊं नये. जीवनांतील हें " वादळ " नाहींसें होईपर्यंत आपलें चित्त शांत ठेवावें. या अशुभ योगांवर विजय मिळविण्याचा हाच एकमेव मार्ग आहे. परंतु अशुभ योगाच्या दडपणामुळें ते लोक चेतविले जाऊन अस्वस्थ झाले तर त्रास व दुःख यांना तोंड देण्याची पाळी त्यांच्यावर आल्याविना रहाणार नाहीं. याचबरोबर असें आढळून येईल कीं, या वातावरणांतून बाहेर पडण्यासाठीं कोठें तरी प्रवासास जाण्याची त्यांना तीव्र इच्छा होईल. याच योगामुळें फसवीं दडपणें निर्माण होऊन या लोकांच्या कीर्तीला काळिमा लावून त्यांना लोकापवादाला तोंड द्यावयास भाग पाडतील.

हर्षल व नेपच्यून यांसारख्या ग्रहांनीं जे अशुभ योग केले जातात त्यांमध्यें प्रत्यक्ष दिवसाला आणि त्या वेळेला फारच थोडें महत्त्व आहे. कारण ते ग्रह कोणत्याहि योगाच्या कक्षेंत कित्येक महिने आधीं येतात, आणि योग होऊन गेल्यानंतरहि कित्येक महिने कक्षेंत रहातात. म्हणजे १८२१–२२ साल, १८७०–७१; १९०८, १९०९, १९१० साल; १९५२, ५३, ५४, ५५ साल किंवा १९९२–९३ सालांत हर्षल–नेपच्यून अशुभ योग असल्यामुळें कांहींच्या जीवनांत जन्मापासून आणि कांहींच्या जीवनांत योगांच्या पुनरावृत्तीमुळें अशुभ योगांचें दडपण निर्माण होतें. योगांचीं वर दिलेलीं वर्षें राजकीय किंवा मेदिनीय क्षेत्रांतहि पुष्कळसे बदल

आणि क्रान्तिकारक घडामोडी निर्माण करतात. त्याचा विचार मी एका स्वतंत्र लेखांत करीन.

योगांच्या या दीर्घकालावधींत या लोकांनीं उत्कृष्ट वागणूक व श्रद्धापूर्ण अंत:करण यांच्या सहाय्यानेंच या संकटावर मात करण्याचा प्रयत्न करणें योग्य ठरेल. कारण ग्रह किंवा ग्रहयोग हे फक्त दिशा दाखवून देतात ते अमुक मार्गानेंच वागलें पाहिजे अशी सक्ती करीत नाहींत. वेळींच दिलेली धोक्याची पूर्वसूचना आपल्याला सावधगिरीनें वागण्याची संधि देऊन आपला धोका थोड्याफार प्रमाणांत कमी करण्यास मदत करते असा माझा दृढ विश्वास आहे.

---

# पिता व पुत्री



श्री. बाळामहाराज पंडित व लेखिका इन्दुमती

ज्योतिषशास्त्राच्या अध्ययनानंतर

# मला वाटतें—

वर्तमानपत्रांत अथवा नियतकालिकांत लिहितांना माझ्या लेखांत वाचकांचीं पत्रें लक्षांत घेऊन मी अनेक गोष्टींचा उल्लेख केला होता, त्यांपैकीं कांहीं भाग मी येथें उध्दृत करीत आहें. त्या वेळीं वाचकांच्या शंका व जिज्ञासा जशा मला समजल्या, त्यांचें निरसन मी माझ्या मति आणि स्थितीप्रमाणें करण्याचा प्रयत्न केला. हें सर्व लिखाण माझें असूनहि यांत नाना गोष्टींचा संग्रह असल्यामुळें त्यांचा एकमेकांशीं संबंध नाहीं.

\+ + +

### कशासाठीं ?

ज्योतिषशास्त्र म्हणजे काय, आणि राजकीय (मेदिनीय) ज्योतिष हें जनतेच्या व राष्ट्राच्या जीवनांत कोणती भूमिका वठवीत असतें, हें जनतेच्या निदर्शनास आणून देणें; जनतेच्या मनांत ज्योतिषशास्त्राविषयीं आपुलकीची भावना व गोडी निर्माण करणें, आणि पुराणकालीन भारतीय ऋषि-मुनींपासून चालत आलेल्या या महान् शास्त्राबद्दल लोकांचा योग्य दृष्टिकोन निर्माण करणें हें माझ्या कार्याचें उद्दिष्ट आहे. याच हेतूनें ज्योतिषशास्त्राच्या प्रसाराचें हें अंगीकृत कार्य गेल्या वर्षभर चार मराठी लोकप्रिय दैनिक वृत्तपत्रांतून (लोकशक्ति, प्रभात, सत्यवादी, नवशक्ति) सातत्यानें केलें.

आपल्या देशाच्या राज्यकर्त्यांच्या व अधिकारी व्यक्तींच्या कल्पनाशक्तीला या शास्त्रानें आवाहन केलें असूनहि, या शास्त्राचें महत्त्व त्यांना कळलें असूनहि, त्यांनीं या शास्त्राला उचित आणि यथार्थ मान्यता व उत्तेजन दिलें नाहीं. यावर उपाय म्हणून लोकमत तयार व्हावें अशी माझी आन्तरिक व एकमेव इच्छा आहे. अर्थात् यांत मी कितपत यशस्वी झालें हें सांगतां येणार नाहीं. काम करणें माझें कर्तव्य आहे, त्याचें फलाफल ईश्वराधीन !

## आमचा दृष्टिकोन !

ज्याप्रमाणें ईश्वरानें ग्रहांच्याद्वारें "चांगल्या, त्याचेबरोबर वाईट गोष्टी" आपणां सर्वांना दिलेल्या आहेत, त्याचप्रमाणें या दोन्हींतील योग्य निवड करण्याची व योग्य मार्गानें जाण्याची मुक्त इच्छाशक्ति [ Free Will ] आपणाला दिलेली आहे. कारण आपण जिवंत मानव संप्रदाय म्हणजे "ग्रहांचे गुलाम" किंवा ग्रहांच्या हातचीं बाहुलीं नव्हे ! तथापि या अनिबंध इच्छाशक्तीलाहि कांहीं "मर्यादा" आहेत. "None of us has the will to will the will" या इच्छाशक्तीच्या जोरावर आपण आपल्या जीवनांतील कांहीं घटनांना वा कांहीं कलांना [Trends] तात्पुरती कलाटणी देऊं शकतों. परंतु आपली इच्छाशक्तीच बदलण्याचें अथवा तीवरच ताबा चालविण्याचें असें दुसरें कसलेंहि सामर्थ्य आपल्यापैकीं कोणाजवळहि नसतें. तें सामर्थ्य फक्त ईश्वराच्या म्हणजेच त्याचे प्रतिनिधि जे ग्रह त्यांच्याजवळ असतें. आणि म्हणूनच ज्या ज्या वेळीं कोणीं इच्छाशक्तीलाच वळण लावण्याचा, तिच्यावर स्वामित्व गाजविण्याचा प्रयत्न केला असेल, त्या प्रत्येक वेळीं हा प्रयत्न **अयशस्वी झाल्यामुळें** शेवटीं असें प्रत्ययास येतें कीं, आपल्या या **इच्छाशक्तीवर** अधिराज्य गाजविणारी ही शक्ति म्हणजे ग्रह होत. आपण काय करावें, किंवा काय करू नये, हें जाणण्याचें सामर्थ्य देणारी अशीच ही शक्ति असते.

\+ + +

या जगांत जन्माला येणारी आपल्यापैकीं प्रत्येक व्यक्ति आपलें दैव, नशीब ( किस्मत ) व भवितव्य "बरोबर" घेऊनच आलेली असते; आणि मोठमोठी सुधारलेलीं व वाढीला लागलेलीं शास्त्रेंहि "आपल्या आधींच ठरलेल्या" मृत्यूच्या वेळेंत बदल घडवून आणूं शकत नाहींत. आपण मरेपर्यंत ईश्वरानें—त्याचे दूत ग्रह यांच्या द्वारें दाखविलेल्या भवितव्यतेची परिपूर्ति आपल्याला करावीच लागेल.

\+ + +

## ईश्वर

ईश्वराच्या आधाराशिवाय ज्योतिषशास्त्राची चर्चा व अध्ययन होत

नाहीं. ईश्वराचा पुरा अधिकार मानूनच पुढें चर्चेला सुरुवात होत असते. ईश्वराची सत्ता आपण संपूर्णपणें नाकारतों, असें कांहीं लोकांचें चुकीचें म्हणणें असतें. कदाचित् कांहीं लोकांना माझें हें मत विवाद्य वाटेल. परंतु या लेखांत " **मला स्वतःला काय वाटतें** ! " तें मी वाचकांच्यापुढें मांडण्याची अनुमति प्रथमच घेतली आहे. एखादी व्यक्ति म्हणेल कीं, " माझा ईश्वरावर वा या ग्रहांच्या कार्यांवर विश्वास नाहीं. " परंतु तिचें हें बोलणे " ग्रह अस्तित्वांत नाहींत " हें सिद्ध करूं शकत नाहीं.

कित्येक लोक डोळे झांकून घेऊन रात्र झाली असें समजतात; म्हणजे त्याचा अर्थ खरोखर रात्र झाली असा होत नाहीं. कोणाला माहीत असो वा नसो, कोणाचा विश्वास असो वा नसो, ग्रहांचा चक्रनेमिक्रम व त्यांचे परिणाम चालूच आहेत.

\+ + +

समजा, एखाद्याची जन्मतारीख व जन्मवेळ यांची नोंद केली गेली नाहीं, आणि त्यामुळें त्याची जन्मकुंडली तयार केली नाहीं; परंतु याचा अर्थ त्या व्यक्तीला जन्मकुंडली व जन्मवेळेच्या ग्रह–नक्षत्रांचे फलाफल मिळत नाहीं असा होऊं शकत नाहीं. प्रत्येकाला लिखित वा अलिखित जन्मकुंडली असतेच; पण कांहींना ती माहीत नसते, एवढेंच ! आतां हें " अज्ञान " चांगलें कां वाईट यावर टीका करण्याची माझी इच्छा नाहीं. कारण तसें पाहिलें तर जगांत कोणतीच गोष्ट चांगली वा वाईट नसून, ती पाहणाऱ्याच्या दृष्टिकोनावर अवलंबून असते.

\+ + +

आपल्या व इतर देशांतील प्राचीन ऋषिमुनींना, शास्त्रज्ञांना आणि इतरेजनांनाहि " एखाद्या गोष्टीची माहिती वा पूर्वज्ञान असणें " हें किती महत्त्वाचें आहे हें माहीत होतें. " जगत्पित्या ईश्वराची इच्छा काय आहे ? " याची अंधुक कां होईना कल्पना यावी, यासाठीं त्यांनीं प्रयत्न केले; त्यासाठीं एक माध्यम शोधून काढलें; त्यासाठीं एक " भाषा " निर्माण केली; तिलाच आपण ज्योतिषशास्त्र या नांवानें संबोधितों,

त्यानंतरच्या कालांतील "ईश्वराची इच्छा" समजून घेण्याचा, शिकण्याचा ज्योतिषशास्त्राचा हा मार्ग अनेकांनीं हाताळला. अर्थात यांत संपूर्ण यश अद्यापपावेतों कोणालाच प्राप्त करून घेतां आलेलें नाहीं. शिकण्यासारखें, समजून घेण्यासारखें अद्याप भरपूर आहे. यांतील पुष्कळसा भाग 'अंधारां'त आहे, व तो शोधून काढण्यासाठीं अविश्रान्त श्रमाची व संशोधनाची जरूरी आहे.

\+ + +

मेदिनीय ज्योतिषशास्त्रावर आधारलेल्या यापूर्वीच्या भविष्यकथनामध्यें चालू किंवा यापुढील लेखांत केल्या जाणाऱ्या भविष्यकथनामध्यें व्यावहारिक ज्ञान व तर्कशुध्द विचारसरणीवर आधारलेलीं अनुमानें यांचा वैशिष्ट्यपूर्ण भाग आहे ही गोष्ट कबूल न करणें म्हणजे अशुध्द मनोवृत्तीचें अथवा अप्रामाणिकपणाचें प्रदर्शन करणें होय! वैयक्तिक रीत्या मी स्वत: तर जागतिक राजकारण व घडामोडी यांचा नेहमींच अभ्यास केलेला आहे; आणि मला असें आढळून आलें आहे कीं, भावी कालांतील घडामोडीचें अनुमान बांधतांना अथवा भविष्यकथन करतांना जागतिक राजकारणाचें ज्ञान हें पुष्कळच उपकारक ठरतें. अर्थात् मेदनीय पत्रिकेवरून सांपडूं शकणाऱ्या निर्णयाशीं मी माझ्या स्वत:च्या मतांचीं अथवा पूर्वग्रहांची शक्यतो गल्लत होऊं देत नाहीं, आणि माझ्या वैयक्तिक मतांच्या चष्म्यांतून मी या पत्रिकेकडे पहात नसल्यानें, एक प्रकारचें समाधान मला नेहमींचा वाटतें; आणि मी स्वत:ला भाग्यवान् समजतें. कारण या अलिप्ततेमुळेंच मेदिनीय पत्रिकेंतील निर्णय बहुतेक अचूक ठरतात.

\+ + +

## विभाजन

विशेषत: राष्ट्रीय व सर्वसाधारणपणें जागतिक राजकारणामध्यें गेल्या कांहीं वर्षांत ज्या कांहीं अवाढव्य उलथापालथी व अदलाबदल होत आहेत, त्यांचा निर्णय करणें ही गोष्ट आत्यंतिक बुध्दिमत्तेच्या वा तर्कनिष्ठ विचारसरणीच्या निष्कर्षावर घासून पाहिलेल्या अनुमानांनाहि ( Anticipations) जमले नसतीं. अगदीं कारण अनिश्चित व अनपेक्षित घडा-

मोडी हें गेल्या कांहीं वर्षांतील राजकारणाचें वैशिष्टय होऊन बसलें आहे. परंतु ज्या ठिकाणीं राजकीय वा वैयक्तिक ज्ञान अयशस्वी ठरलें, तेथें मेदिनीय पत्रिकांचे निर्देश ( Indications ) यशस्वी ठरलें. याचबरोबर हेंहि कबूल करणें भाग आहें कीं, भावी काळांतील राजकारणविषयक अनुमानें बांधतांना राजकारणविषयक चालू घडामोडीचें ज्ञान १० टक्के, जागतिक इतिहासाचें ज्ञान १० टक्के, आणि भौगोलिक ज्ञान १० टक्के अत्यंत आवश्यक असतें; आणि केवळ ज्योतिषशास्त्रविषयक ज्ञान ७० टक्के असल्याशिवाय 'ज्योतिषी' या संज्ञेला पात्र असलेल्या कोणाहि ज्योतिष्याला राजकारणविषयक भविष्यकथन करतां येणार नाहीं,

\+ + +

## नवी उपपत्ति

ज्योतिषशास्त्राच्या क्षेत्रांतील संशोधनाचें कार्य अव्याहतपणें करणारा एक सुशिक्षित ऑस्ट्रियन ज्योतिषी युरोपमध्यें नुकत्याच प्रसिध्द झालेल्या त्याच्या एका लेखांत असें म्हणतो कीं, "आपल्या या पृथ्वीपासून जास्ती दूर अंतरावर असलेल्या ग्रहाचा प्रभाव, पृथ्वीपासून कमी अंतरावर असलेल्या ग्रहाइतका प्रबल असू शकत नाहीं." श्री. स्क्रीवीज या ऑस्ट्रियन फलज्योतिर्विदाचा हा विचार दुसऱ्या शब्दांत असा मांडता येईल—"मनुष्यावर किंवा राष्ट्रांवर ग्रहनक्षत्रांचे होणारे परिणाम आपण आधीं पाहूं शकतो. परंतु त्यासाठीं ग्रहविशेषांचें पृथ्वीपासून असलेलें किमान अंतर किंवा दूरी आपणाला माहिती असावयास पाहिजे; कारण ग्रहांच्या परिणामांची कमीअधिक तीव्रता त्यांच्यांतील परस्पर योगायोगा इतकीच त्यांच्या पृथ्वीपासून असणाऱ्या अंतरावरहि अवलंबून असते."

### उदाहरण—

म्हणजेच शनीच्या वृश्चिक राशींतील भ्रमणाचे परिणाम, किंवा मंगळाच्या मकर राशींतील प्रवेशाच्या परिणामाची कमीअधीक तीव्रता व सामर्थ्यं, त्याच्या पृथ्वीपासून असणाऱ्या अंतरावर बऱ्याच प्रमाणांत अवलंबून असतें. ही गोष्ट माहीत नसल्यामुळेंच कित्येक वेळेला आपलीं ज्योतिषविषयक

अनुमानें किंवा भाकितें थोडींफार चुकतात. सांगण्याचा उद्देश इतकाच कीं, केव्हां कोणता ग्रह कोणत्या राशींतून भ्रमण करतो, व कसें योगायोग करतो, याची माहिती पंचांगांतून बघणें जसें जरूर आहे, तसेंच केव्हां कोणता ग्रह आपल्या पृथ्वीपासून किती अंतरावर (Distance from the Earth) आहे हेंहि बघण्याची व नोंद करण्याची, किंवा लक्षांत घेण्याची जरूरी आहे.

## नवे पंचांग

या विषयावरतीं बऱ्याच विचारानंतर मला वाटतें कीं, श्री. स्क्रीवीजनीं बरोबर सांगितलें. माझ्या दृष्टीनें या ऑस्ट्रियन ज्योतिष्यानें ज्योतिष शास्त्रांत या उपपत्तीद्वारां एक महत्त्वाचें व प्रगतीचें पाऊल पुढें टाकलें आहे. आतां दुसरी समस्या अशी आहे कीं, पृथ्वीपासून ग्रहांच्या अंतराविषयींची माहिती कोठें मिळणार? आतांपर्यंत प्रसिध्द होणाऱ्या देशी व विदेशी कोणत्याही पंचांगांत ही माहिती देण्यांत आलेली नाहीं. आनंदाची गोष्ट अशी कीं, पृथ्वीपासून प्रत्येक ग्रहाचें अंतर दर्शविणारीं नवीन पंचांगें तयार होत आहेत. आपल्या भारतीय पंचांगकर्त्यांनीं या गोष्टीकडे जरूर लक्ष द्यावें, अशी माझी त्यांना विनंति आहे. आणि भारतीय पंचांगांत प्लूटो ग्रहाची माहितीहि जरूर द्यावी.

## आमचें मत

या नवीन उपपत्तीबद्दल माझे सहकारी श्री. अजंता जैन पुष्कळ दिवसांपासून मला कल्पना देत होते; परंतु पृथ्वी आणि ग्रह यांच्या अंतराविषयीं जरूर ती खात्रीलायक माहिती उपलब्ध नसल्यानें आम्हाला गप्प बसावें लागलें, आणि त्यामुळेंच या विषयाचें आमचें संशोधनकार्य साकार झालें नाहीं. आतां विदेशांत नवीं पंचांगें तयार होत आहेत, ही बातमी ऐकूनच या नवीन संशोधनाबाबतची माहिती मी वाचकांना प्रथमच देत आहें. मला स्वतःला तरी हा सिध्दान्त बरोबर आहे असेंच वाटतें. मेदिनीय ज्योतिषाच्या बाबतींत आम्हांला हा सिध्दान्त योग्य आहे हें यापूर्वीपासूनच वाटत होतें; तथापि वैयक्तिक व राष्ट्रीयदृष्ट्या या बाबतींत अधिक निरीक्षणाची आणि वर्गीकरणाची आवश्यकता आहे, हें कबूल केलें पाहिजे.

\+ + +

## बिचारे ज्योतिषी

एका पंचांगाचा दुसऱ्या पंचांगाशीं मेळ बसत नाहीं, आणि याला सर्वस्वी जबाबदार साहजिक पंचांगकर्तेंच होत. पंचागकर्त्यांच्या अशा चुकांचें प्रायश्चित्त आम्हां फलज्योतिष्यांना भोगावें लागतें; याचें कारण असें कीं, या वेळेच्या फरकामुळें भविष्यकथनांत फरक पडतो. आणि समजा, जर चुकीची वेळ गृहीत धरून भविष्य वर्तविलें तर तें मात्र अचूक चूक ठरतें. फलज्योतिष्याचें भाकित या पंचांगातील चुकीमुळें बरोबर आलें नाहीं याची कल्पना कोणालाहि असत नाहीं. परंतु प्रत्येकजण म्हणतो, कीं भविष्य चुकलें. ते उघडपणें ज्योतिष्याला प्रथम दोष देतात, आणि नंतर ज्योतिषशास्त्राची बदनामी करतात......बिचारे ज्योतिषी !

\+ + +

## तक्रार कां ?

ज्योतिष हें एक विशाल शास्त्र आहे. कोणाहि एका मनुष्याला त्याचें आकलन होणें शक्य नाहीं. कित्येक शतकांपासून जगांतल्या वेगवेगळ्या विभागांतील हजारों लोकांनीं या शास्त्राधारें वर्तविलेल्या आपल्या भविष्याचा पडताळा पाहण्याचा प्रयत्न केला. परंतु कोणत्याहि एखाद्या ग्रहयोगाबद्दल आतां कांहींही सांगावयाचें राहिलेलें नाहीं अशी स्थिति अद्याप आलेली नाहीं. त्यांत प्रत्यहीं अनेक सुधारणा, दुरुस्त्या करणें व नव्या उपपत्ती लावणें आवश्यक आहे.

कोणाहि एका ज्योतिर्विदानें एखादें भविष्य वर्तविलें म्हणजे तें वज्रलेप झाले असें समजणें चूक आहे, म्हणूनच ज्योतिषशास्त्रांत नित्य नवें संशोधन होणें अगत्याचें आहें.

यामुळेंच कोणत्याहि ज्योतिर्विदास दुसऱ्यास चूक म्हणतां येणार नाहीं. अत्यंत खोलवर विचार करून एखाद्या गोष्टीची योग्य उपपत्ति लावण्यावरच ज्योतिष्यांचें यश अवलंबून असतें. तेव्हां कोण बरोबर हें एकदम सांगतां येणार नाहीं. काळच तें ठरवूं शकेल. म्हणूनच एकमेकांवर टीका करण्यापेक्षां ज्योतिर्विदांनीं आधिकाधिक संशोधन केलें पाहिजे; त्यायोगेंच या शास्त्राची समृध्दि होईल.

## हे चमत्कार !

जगांतील बहुसंख्य लोकांना चमत्कृतीची (Miracle) आवड असते. ही चमत्कृति जीवनांतील वा जगांतील कोणत्याहि क्षेत्रांतील असो, लोकांना तिचे आकर्षण वाटत असतें. आणि अशा चमत्कृतींवर त्यांचा पुरेपूर विश्वास असतो. कोणत्याहि बऱ्या–वाईट मार्गानें एखाद्या माणसानें चमत्कृतीचें दर्शन घडवून आणलें तर त्याच्या भजनीं कांहीं लोक लागलेच म्हणून समजा. नुकतीच घडलेली एक घटना आपण अद्यापहि विसरलां नसाल"–कांहीं लोकांनीं एका लहान मुलाला देवाचा'–प्रेषित'–" बनविलें " आणि मनुष्यप्राण्याचा कोणताहि शारीरिक रोग बरा करण्याची वनस्पति त्याच्याजवळ असून तो ती वनस्पति लोकांना वाटीत आहे अशी भुमका उठविली. ओरिसांतील त्या मुलाच्या वास्तव्यस्थानाकडे हजारों लोकांची रीघ लागली. आणि सरतेशेवटीं दुसऱ्या कित्येक रोगांनीं व सांथींनीं जेव्हां शेकडों लोक मृत्युमुखीं पडले तेव्हां ती भोंदूगिरी चव्हाटयावर आली. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे औषध देण्याचें काम डॉक्टर, हकीम किंवा वैद्याचें आहे, सात वर्षांच्या मुलाचें नव्हे.

'धार्मिक चमत्कृति' हा एक दुसराच प्रकार आहे ! कांहीं लोकांची अशी समजूत असते कीं, आयुष्यांत जर मोठेपणा प्राप्त करून घ्यावयाचा असेल तर आपण कांहीं तरी भविष्य कथन केलेंच पाहिजे; व त्यासाठीं भावी कालाचें आपणाला कांहीं अलौकिक पूर्वज्ञान प्राप्त झालेलें आहे असें आपण इतरेजनांना भासविलें पाहिजे. जगांतील निरनिराळ्या धर्मांच्या बहुतेक धर्मग्रंथांतून अशा प्रकारची भविष्यवाणी सांगितलेली असते असें आपणांस आढळून येईल. हे धर्मगुरु (Prophets) अशा प्रकारचें भविष्यकथन कसें करतात हें कोणीच सांगूं शकणार नाहीं. परंतु हजारों लोक या धर्मगुरूंच्या भविष्यवाणीवर विश्वास ठेवतात एवढें निश्चित. ज्योतिष्यांच्या भविष्यकथनापेक्षांहि या धर्मगुरूंच्या भविष्यकथनांवर सामान्य जनांचा अधिक विश्वास बसतो.

भावी घटनांचें अनुमान सांगूं शकणारें ज्योतिष हेंच एकमेव शास्त्र आहे, आणि प्राचीन हिंदु ऋषिमुनीहि या शास्त्राचा सर्वांगीण अभ्यास करून

त्याच्या सहाय्यानें कांहीं अलौकिक भाकितें करीत असत......तथापि इतर पुष्कळ लोक असे असतात कीं, ज्यांना ज्योतिषशास्त्राचा गंधहि नसतां ते आपलें नाक त्या ठिकाणीं खुपसत असतात. " बघूं या आपल्याला हें जमतंय् का ! " असा विचार करून ते भविष्यकथन करण्याचा नसता उपद्व्याप करीत असतात. पुरातन काळीं ज्योतिषशास्त्राचा योग्य अभ्यास करूनच हिंदु ऋषिमुनि, ग्रीस–बॅबिलोनचे साधुगुरु, किंवा प्राचीन मिश्रदेशचे धर्मगुरुगण भविष्यकथन करून लोकांना चकित करीत असत. आणि भविष्यकथनाचें अनुमान बांधण्याचा तोच एकमेव मार्ग आहे. अशी त्यांची दृढ श्रद्धा होती.

---

नवशक्ति ता. ४—११—१९५४

**" मानव युग "च्या सर्व प्रती १५ दिवसांत संपल्या**

पुणें, ता. ३ :—ता. १४ ऑक्टोबर रोजीं प्रसिद्ध झालेल्या श्रीमती इंदुमति पंडित यांच्या "मानव युग" या पुस्तकाच्या सर्व प्रती ता. ३० ऑक्टोबर-पर्यंत संपल्या व प्रकाशकांकडे

LOKASHAKTI 3-11-1954 पुणें

**' मानव युग ' पुस्तकाची पहिली आवृत्ति समाप्त**

पुणें, ता. २—श्रीमति इंदुमती पंडित यांनी ता १४ ऑक्टोबर रोजीं प्रसिद्ध केलेल्या मानव युग ह्या पुस्तकाची पहिली आवृत्ति अवघ्या १५ दिवसात समाप्त झाली. गेल्या कांहीं वर्षांत मराठी पुस्तकांत हा उच्चांकच आहे. गेल्या वर्षींहि त्यांचे आगामी काल हें पुस्तक फारच चांगले खपले पण ' मानव युगा ' ने सर्व उच्चांक मोडले आहेत.

## मानव युगांतील

# नारी

मीन-कन्येच्या (धर्मयुग) प्रभावी स्वामित्वाखालीं असल्यामुळेंच अमर हिंदी कवि संत तुलसीदास यांनीं रामायण या आपल्या वंदनीय काव्यग्रंथांत एके ठिकाणीं म्हटलें आहे--

"ढोर, शूद्र, चमार, पशु, नारी,
यह सब ताडणके अधिकारी"



या सुप्रसिद्ध कवितेवरून धर्मयुगांत स्त्रियांना कशा रीतीनें वागविलें जात होतें, व त्यांच्याकडे पहाण्याचा समाजांतील साधारण वर्गाचा कोणता दृष्टिकोन होता याची कल्पना येते. धर्मयुग संपूर्णपणें संपलें नसल्यामुळें अद्यापहि कित्येक ठिकाणीं नारी–समाजाच्या बाबतींत ही म्हण चालू आहे. भाषेंत कदाचित् फरक असेल, परंतु अर्थ तोच.

फक्त स्त्रियांनाच कशाला, "ढोर, चांभार व शूद्र" या नांवानें ओळखले जाणारे सर्व लोक पशुतुल्य किंवा अस्पृश्य मानले जात असत. कोणतीहि गोष्ट माहीत करून घेण्याचा अथवा उच्च शिक्षण मिळविण्याचा त्यांना कोणताच अधिकार नव्हता. मुस्लिम जगतांतहि अशाच प्रकारचा त्रास कित्येक लोकांना सोसावा लागत असे. स्त्रिया या पुरुषांच्या हातांतील बाहुल्या बनल्या होत्या. स्त्रियांवरतीं पुरुषांचें वर्चस्व रहावें अशा प्रकारचे कायदे केले जात असत; आणि अशाच प्रकारचें धार्मिक व साहित्यिक वाङमय लिहिलें जाऊन त्याला सर्वांकडून उत्तेजन मिळत असे. बहुसंख्य जनतेचा याला पाठिंबा असे. याला कारण एकच, कीं त्या वेळेस धर्मयुग चालू होतें, व मीन–कन्येच्या दडपणाखालीं सर्वांना तसें वागणें भाग पडत होतें.

## मानवयुग

परंतु मानवयुगाच्या उषःकालाबरोबर हळूहळू पुष्कळ ठिकाणीं हा 'अंधार' नाहींसा होऊं लागला, व नारी–जातीकडे पहाण्याच्या दृष्टि-कोनांतहि बदल होऊं लागला. पुष्कळ राष्ट्रांतील पुढाऱ्यांना व समाज-शास्त्रज्ञांना असें आढळून येऊं लागलें कीं, स्त्रिया व अस्पृश्य यांच्यावर अन्याय होत असून त्यांना पशुतुल्य वागणूक देणें अथवा माणसांच्या हातां-तील बाहुलीं बनविणें व त्यांची मानवतेपासून फारकत करणें हें पूर्णपणें चुकीचें आहे......

याच वेळीं मानवयुगांतील बंगालच्या प्रख्यात कवीनें धर्मयुगाच्या लोकांना उद्देशून म्हटलें आहे—

**" सवार उपरे मानुष सत्य**
**तहार उपरे नाहि "**

**म्हणजे धर्म, शास्त्र, समाज, गुरु, भगवान् इत्यादींचा मोठेपणा असत्य आहे. खरा मोठेपणा फक्त मानवांत आहे; तोच या पृथ्वीतलावर सर्वोच्च आहे.**




धर्मयुगांत जीवनाच्या क्षेत्रांत चमकून गेलेल्या व मानमान्यता मिळविलेल्या स्त्रियांचीं दुर्मिळ उदाहरणें सांपडतील, परंतु सर्वसामान्यपणें मीन-कन्येच्या दडपणाखालीं त्यांची गळचेपीच झाली होती. मी येथें फक्त बहुसंख्य लोकांच्याविषयींच बोलत आहे. सामाजिक इतिहासांतून कांहीं उदाहरणें येथें देत बसण्यापेक्षां तें काम मी तुमच्यावरच सोपवीते. या वेळीं फक्त एक सत्य गोष्ट आपण लक्षांत घेतली पाहिजे कीं, ते सर्व धर्मग्रंथ ज्यांत बहुसंख्य मानवाच्या हातांतून त्यांचे जन्मसिध्द अधिकार काढून घेण्यात आलें, माणसानींच लिहिलेले आहेत. ते लिहिण्यासाठीं ईश्वर कांहीं पृथ्वीतलावर स्वत: आला नव्हता. परंतु त्या लिखाणाला महत्त्व यावें म्हणून मीनेच्या वर्चस्वानें तशा प्रकारचे वातावरण व दृष्टिकोन निर्माण केला.

त्यानंतर येणाऱ्या मानवयुगाच्या उषःकालांत "कूंभ-सिंहे" च्या दडपणाखालीं तुलसीदासांइतक्याच प्रसिध्द रवीन्द्रनाथ टागोरांनीं अगदीं विरुध्द मत दर्शविणारी आणि मानवयुगाची भावना विशद करणारी कविता लिहिली आहे. तुलसीदासांना लोक संत म्हणून ओळखतात, तर टागोर हे "गुरुदेव" म्हणून ओळखले जातात. गुरुवर्य टागोरांनीं लिहिलें आहे—

"मनुष्याच्या स्वार्थापासून त्यांना दररोज दूर लोटून,
तूं मानवांतील देवतेचा तिरस्कार केला आहेस,
विधात्याच्या रुद्र-रोषामुळें दुष्काळाच्या दारीं बसून,
तुला सर्वांच्याबरोबर अन्नपाण्याचे,
सारखे वांटे करून खावें लागतील.
त्यांच्याशीं तुला अपमानामध्यें समान दर्जाचें व्हावें लागेल."

## शूद्र ?

मानवयुगाच्या आगमनामुळें हळूहळू निरनिराळ्या देशांतील लेखकांना स्त्रिया आणि खालच्या थरातील लोकांवर केला जाणारा अन्याय 'टोचूं' लागला. अर्थात् त्यांतहि कांहीं दुराग्रहवादी ('भावी काल'—पृष्ठ ५१, प्रथम प्रकार) आहेत, कीं ज्यांच्या मतें शूद्र किंवा नारी यांची किंमतच तितकी. त्यांतील सत्य घटना एवढीच कीं, त्यांना शिक्षण दिलें जात नव्हतें, आणि त्यांचें मानवतेचे हक्क व ज्ञान हिरावून घेतलें जात होतें. ते तथाकथित अस्पृश्य, आणि नारी यांना जर संधि मिळाली तर "आधुनिक मनु" म्हणून ओळखले जाणारे डॉ. भिमराव आंबेडकर त्यांच्यातहि निर्माण होऊं शकतात; आणि ते गोखले किंवा टिळक यांच्यापेक्षां कोणत्याहि दृष्टीनें कमी वंदनीय ठरत नाहींत. डॉ. आंबेडकर यांच्या जीवनाची वर्तमान राजकीय बाजू जरा बाजूला ठेवली तर ते एक श्रेष्ठ व वंदनीय पुरुष आहेत असे बिनदिक्कत म्हणतां येईल. मानवयुगाच्या प्रारंभामुळें सर्व देशांत आपणाला असे डॉ. आंबेडकर भेटतील. सरोजिनी नायडू, विजयालक्ष्मी पंडित, कमलादेवी चटोपाध्याय, एमिली ग्रीन बेल्च (नोबल प्राइझ मिळविणारी) इत्यादि स्त्रियांची उदाहरणें आपणांला हेंच सांगतात.

कोणत्याहि गोष्टींवर टीका करण्याचा माझा उद्देश नाहीं. 'मीन–कन्ये'च्या बर्चस्वाखालीं कोणते बदल घडून आले, आणि मानवयुगाच्या उष:कालांत कोणते बदल घडून येत आहेत याचें फक्त दिग्दर्शन करीत आहें.

## शूद्र-युग ?

एखादा ८० वर्षांचा मृत्युमुखी वृद्ध पुरुष धर्मगुरूंच्या आशीर्वादानें १४ वर्षांच्या कोवळ्या बालिकेशीं लग्न करूं शकतो, आणि सर्वसाधारण जनता त्याच्याशीं हातमिळवणी करते. तुलसीदासासारख्या लोकांनीं लिहिलेल्या पुस्तकांत जीं कांहीं धार्मिक कृत्यें करावयास सांगितलेलीं असतात त्याप्रमाणें १५ वर्षांच्या विधवा बालिकेला आजन्म वागावें लागतें. सामाजिक नियमांनुसार एकाच वेळीं पुरुष १०–१२ स्त्रियांशीं लग्न करूं शकत असे, मग त्या स्त्रियांच्या नशिबाची पर्वा कोण करतो ? परपुरुषांकडे पहाणें हें स्त्रियांच्या बाबतींत महापाप समजलें जात होतें. स्त्रियांच्याविषयींचा हा द्वेष वाढीला लागावा म्हणून "स्त्रियश्चरित्रम् पुरुषस्य भाग्यम्, देवो न जानाति कुतो मनुष्य:" अशा म्हणी प्रचारांत आणल्या होत्या. धर्मयुगाचा प्रतिनिधिक कवि तुलसीदास याचे विचार यामुळें अधिक स्पष्ट होतात. म्हणूनच ज्याला सध्यां आम्ही मानवयुग म्हणतों त्याला मीन-कन्येच्या दडपणाखालील लोक नाक मुरडून शूद्र-युग म्हणतात. कारण त्यांच्या मतांप्रमाणें, बहुसंख्य मानवप्राणी हे 'शूद्र' असून, स्वत:ला ईश्वराचे प्रतिनिधि म्हणवून घेणारे तेवढे खरे मानवप्राणी होत. अर्थात् एका अर्थानें तेहि पण गुन्हेगार नव्हेत; आणि धर्मग्रंथांतून त्यांना अशा कांहीं गोष्टी आढळून आल्या कीं ज्यामुळें आपलें पापक्षालन होऊं शकतें अशी त्यांची खात्री झाली. थोडक्यांत ते सत्ताधीश, वंदनीय, पूजनीय इत्यादि इत्यादि रहावेत असे सर्व प्रयत्न केले जात होते; आणि म्हणूनच सहेतुकपणें "मीन-युगा" ला "धर्मयुग" असें नांव दिलें आहे.

## संयुक्त राष्ट्रसंघ

संयुक्त राष्ट्रसंघाच्या पत्रिकेंतील मध्यान्नान्तरिक्षांत ( M. C. ) शनि व वृषभ राशींतील रवि यांनींच या संघटनेला मानवसमाजांत सुधारणा घडवून आणण्यास व मानव युगाच्या दिशेनें पावलें टाकण्यास प्रवृत्त केलें आहे.

स्त्रियांना शिक्षण व राजकारण या क्षेत्रांत समानता देण्यांत आलेली आहे.




त्यांतील एका कायद्याप्रमाणें सर्वच राष्ट्रांतील स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीनें मतदानाचे हक्क मिळाले असून त्यांना सार्वजनिक निवडणुकीस उभें राहण्याची मोकळीक मिळालेली आहे. कोणत्याहि प्रकारचा भेदभाव न करतां सार्वजनिक क्षेत्रांत स्त्रियांना आतां पुरुषांच्या बरोबरीनें वावरण्याची मोकळीक मिळालेली आहे. सामाजिक व सांस्कृतिक दृष्ट्या मागासलेल्या मुस्लिम समाजानेंसुध्दां या सुधारणेला आपला पाठिंबा व्यक्त केला आहे.

## बेगमांच्या जगतांत

प्रगतीशील 'कमाल आतातुर्क' यांच्या नेतृत्वाखालीं मुस्लिम राष्ट्र तुर्कस्तानांत या गोष्टी पूर्वींच अंमलांत आल्या होत्या. परंतु कुराणांतील तत्त्वाप्रमाणें राष्ट्रघटना बनविण्याची आकांक्षा बाळगणाऱ्या पाकिस्ताननें आतां यूनोच्या तत्त्वांना मान्यता देऊन वृषभेंत रवि व वृश्चिकेंत चंद्र असतांना त्या करारावर सही केली. १९५४ सालीं अशी सही करणारें हें ३७ वें राष्ट्र होतें. त्यापूर्वींच ८ राष्ट्रांनीं या गोष्टींचा कायदेशीररीत्या स्वीकार केला आहे, हीं गोष्ट कांहीं लहानसहान नाहीं.

## नारी शिक्षण

याचप्रमाणें पृथ्वीच्या पाठीवरील निरनिराळया मानव समाजांनीं स्त्रियांना उच्च शिक्षणाचे हक्क नाकारले होते, व त्यांनीं या शृंखलांतून बाहेर पडूं नये म्हणून प्रयत्न चालविले होते. चालू काळांतहि "स्त्रियांना उच्च शिक्षण दिल्यास वैवाहिक जीवनावर त्याचा विपरीत परिणाम होतो" असें म्हणणारे कित्येक लोक आहेत. त्यामुळें "कुटुंबसंस्था कोलमडून पडेल" असें त्यांचें म्हणणें असतें. या उच्च शिक्षणामुळें स्त्रियांना "स्वतंत्र"

मार्ग चोखाळण्याची अनिवार इच्छा होते असा त्यांचा दावा आहे. परंतु या सर्व प्राचीनपंथीयांना जुन्या शास्त्रग्रंथांतील तत्त्वांच्या अभ्यासानें एका मानवी मूल्याचा, एका मानवी हक्काचा विसर पडतो.

## पदवीधर नारी

ब्रिटनमधील " पदवीधर स्त्रियां "ची आंकडेवार माहिती व अभ्यास एका ब्रिटिश राजकीय व आर्थिक नियोजन मंडळानें नुकताच केला. जवळ जवळ १००० पदवीधर स्त्रियांना प्रश्न विचारून त्यांच्याकडून ह्यांनीं जी माहिती मिळविली तिचा सारांश असा–१५ टक्के स्त्रिया संपूर्ण वेळ नोकरी करणाऱ्या, २० टक्के स्त्रिया पार्ट–टाईम नोकरी करणाऱ्या अथवा मुलें मोठीं झाल्यानंतर पुन्हां नोकरी करण्यास सुरुवात करण्याची अपेक्षा करणाऱ्या, आणि राहिलेल्या दोन–तृतीयांश स्त्रिया या कोणत्याहि प्रकारची नोकरी न करणाऱ्या अशा होत्या. ज्या देशांत पदवीधर स्त्रियांना नोकरी मिळणें सहज शक्य आहे अशा पुढारलेल्या राष्ट्रांतील ही परिस्थिति आहे. यापेक्षांहि विशेष गोष्ट अशी कीं, या नोकरी न करणाऱ्या पदवीधर स्त्रियांना ग्रहकृत्यांत दंग असण्यांत आनंद वाटतो, व आपलें विश्वविद्यालयीन शिक्षण वाया गेलें असें वाटत नाहीं. या नियोजन मंडळानें असें जाहीर केलें आहे कीं,–" विश्वविद्यालयीन शिक्षणाची किंमत ही तें शिक्षण अप्रत्यक्षरित्या सुशिक्षित मनावर जे संस्कार करतें, व राष्ट्रविषयक आणि कुटुंबविषयक दृष्टिकोनांवर जे परिणाम करतें त्यावर अवलंबून असतें. " नोकरी मिळवून देणारें स्वयंचलित साधन हा पदवी–शिक्षणाचा दृष्टिकोन आतां पूर्ण बदलून गेलेला आहे. म्हणूनच एखाद्या पदवीधर स्त्रीनें ऑफिसमध्यें सत्ता गाजविण्याऐवजीं कुटुंबावर अधिराज्य गाजविलें तर विशेष वाईट वाटत नाहीं. नियोजन मंडळानें मिळविलेल्या या माहितीवर नुकतेंच "इकॉनॉमिस्ट" या इंग्लंडच्या सनातनी वृत्तपत्रानें असें लिहिलें आहे–"मोठ्या पगाराची नोकरी मिळवून देण्याऐवजीं सुशिक्षित व सुसंस्कृत नागरिक निर्माण करण्याचें विश्वविद्यालयाचें खरें ध्येय आहे हें आपल्याला गृहकृत्यांत दंग असणाऱ्या पदवीधर मुलींच्या उदाहरणावरून कळून येईल, व हा उद्देश त्यांच्या मनांत टिकून राहील. "

## मानव युगांतील नारी

सामाजिक व धार्मिक शास्त्रग्रंथांत लिहिल्याप्रमाणें आणि सामाजिक कायद्याद्वारें लोकांच्या गळीं उतरविल्याप्रमाणें स्त्रिया आणि शूद्र यांच्यांत कांहीं तरी वाईट असतें हें मत खोडण्याचा कांहींसा प्रयत्न येथे उतारे देऊन केलेला आहे. खरें पाहिलें असतां असा विकृत दृष्टिकोन निर्माण होण्याचें कारण म्हणजे ग्रहयोग ! आणि सध्यांच्या ग्रहयोगांकडे पाहिलें असतां स्त्रियां ह्या पुरुषांच्याइतकी व त्यांच्या बरोबरीनें प्रगति करतील असें निश्चितपणें वाटतें, व मानव युगांत त्यांना संपूर्ण समान दर्जाचे हक्क मिळतील. मानवी हक्कांचा विशेषत: स्त्रिया व सर्वसाधारण सामान्य माणसाला असा संदेश आहे कीं, धर्म, वंश इत्यादि सर्व अडथळे आतां नाहींसे होऊन सर्वांना समानतेची वागणूक व संधि मिळण्याचें युग आतां सुरू झालें आहे. तुमच्यापुढें जी युगाची कुंडली मांडली आहे त्यावरून तरी हीच गोष्ट अधिक स्पष्ट होत आहे.

## पंडीता रमाबाई

२३ एप्रिल १८५८ सालीं जन्मलेल्या विख्यात भारतीय विदुषी पंडिता रमाबाई या संमिश्रीत युगाचा एक कमालीचा नमुना आहेत. त्यांच्या जन्म-पत्रिकेंत मानवयुगाचें द्योतक वृषभ-लग्न, वृषभ-रवि आणि लग्नीं हर्षल आहे. तसेंच धर्मयुगाचा द्योतक गुरु व बुध लग्नीं असून कन्येंत चंद्र आहे. पंडिता रमाबाईंचा जीवनेतिहास येथें देण्याचा मानस नाहीं. परंतु नवयुगाच्या वाऱ्यानें या विदुषीला कसकसें काम करायला लावलें तें आपण पाहूं या.

सन १८८२ सालीं पुण्यास आल्यानंतर त्यांनीं लोकांमध्यें स्त्रीशिक्षणाविषयीं जागृति उत्पन्न करण्यास आरंभ केला. पुणें येथें ' आर्य महिला समाजा 'ची स्थापना केली. हंटर कमिटीपुढें त्यांनीं असें म्हटलें होतें, " स्त्रियांचा दर्जा वाढविण्यास आजन्म कार्यमग्न रहावे असा मी निश्चय केला आहे. " पुष्कळ ग्रंथांच्या या विदुषी लेखिका स्त्रीनें, लग्नीं गुरु आणि कन्येतील चंद्रामुळें धर्मग्रंथांचा फार मोठा अभ्यास केला होता. त्यांना भागवतांतील १८००० श्लोक मुखोद्गत होते. पाणिनीचा पहिला भाग त्या उत्तम

पडल्या होत्या, त्या सुंदर, सतेज, विनयशील व दिसावयासहि हुशार होत्या. गुरु व चंद्रामुळें ईश्वरावर त्यांची दृढ श्रद्धा होती. परंतु लग्नीं हर्षलमुळें त्यांचें मन प्रगतिशील झालें, आणि धर्मपद्धतींत कांहीं बदल व्हावा, त्यांत थोडी मानवता यावी असें त्यांना वाटूं लागलें. म्हणून १८८३ सालीं सप्टेंबरमध्यें त्या ख्रिस्ती झाल्या. "भावी काल" पुस्तकांत पृष्ठ ५२ वर दिलेल्या तृतीय प्रकारच्या व्यक्तींमध्यें या स्त्रीचा समावेश होतो, परंतु अपेक्षाकृत मानवयुगाचें प्राधान्य होतें.

## सरोजिनी नायडू

कुंभेत रवि, वृश्चिकेंत चंद्र व सिंह राशीं लग्नीं उदित होत असतांना जन्मलेल्या विशशताद्बीतील अमर भारतीय नारी श्रीमती सरोजिनी नायडू स्वतःची कृति व प्रगतीशील वागणुकीमुळें स्त्री कितपत उच्चतेला पोहोचूं शकते याचें एक उदाहरण आहेत. मानवयुगाच्या व्यक्तीला आवश्यक असणारी ग्रहनक्षत्रें त्यांच्या पत्रिकेंत असल्यामुळें त्यांना मानवयुगाची पूर्ण जाणीव होती. आणि म्हणूनच त्या लोकप्रिय झाल्या.

## राजकुमारी अमृत कौर

१९५३–५४ सालीं भारतांतील मध्यवर्ती सरकारांतील स्वास्थ्य-मंत्रि राजकुमारी अमृत कौर कुंभेत रवि, आणि वृश्चिकेंत चंद्र असतांना जन्मलेल्या आहेत. शासनक्षेत्रांत स्त्री पुरुषापेक्षां कांहींही अंशी कमी नाहीं हें अमृत कौर यांनीं प्रगतिशील ग्रहनक्षत्राच्या सहाय्यानें दाखवून दिलें आहे.

## नोबेल प्राइझ

जन्मपत्रिकेंतील इतर शक्तिशाली ग्रहांमुळें आणि चंद्र कुंभेत असल्यामुळें सामाजिक सुधारणेंच्या कामांत अमेरिकन स्त्री एमिली ग्रीन बेल्च यांनीं नोबल प्राइझ मिळवून स्त्रियांची कार्यप्रवणता सिद्ध करून दाखविली आहे.

## विजयालक्ष्मी पंडित

सिंहेंत रवि असतांना जन्म झालेल्या श्रीमती विजयालक्ष्मी पंडीत यांनी राजकीय क्षेत्रांत स्त्री कितपत प्रगति करूं शकते तें सोदाहरण सिद्ध

केलें आहे. " अनागत काल " पुस्तकांत ८९ पृष्ठांवर त्यांच्या पत्रिकेचें पूर्ण विवेचन केलें असल्यामुळें येथें त्याची पुनरावृत्ति करीत नाहीं.

## सुमतिबाई गोरे

वृषभेंत रवि, सिंहेत चंद्र असतांना जन्मलेल्या श्रीमती सुमतीबाई गोरे यांनीं प्राचीन समाज-संस्कार तोडून पुन्हा लग्न करून राजकीय व सामाजिक क्षेत्रांत यशस्वी रीतीनें कार्य केलें आहे. १९५० च्या सुमारास त्या मुंबई विधिमंडळाच्या सभासद होत्या. १९५४ सालीं त्या पुणें विश्वविद्यालयाच्या बोर्डावर निवडून आलेल्या आहेत. मानवयुगाचे ग्रहयोग नसते तर सामाजिक कार्यांत पुढें येण्याची त्यांना इच्छाहि झाली नसती. त्यांची प्रकृति जर चांगली असती तर त्यांच्या हातून अधिक प्रगतिशील कार्य झालें असतें. त्याची एकुलती एक कन्या कुंभेंत रवि असतांना जन्मलेली आहे. ती कांहीं प्रगतिशील कार्य करील अशी माझी खात्री आहे.

## सिंहावलोकन

समाजांत पुढें आलेल्या पुष्कळशा स्त्रियांच्या जन्मपत्रिका माहीत नसल्यामुळें त्यांची शास्त्रीय माहिती येथें देऊं शकत नाहीं. इजिप्तमधील ज्या स्त्रिया आपल्या हक्कांसाठीं झगडत आहेत त्यांना ते लवकरच मिळतील. पूर्वी मीं हें मत मांडलें होतें तेंहि या सिद्धांताच्या आधारावरच होय. धर्म, वंश इत्यादि गोष्टीवर आधारलेली सामाजिक व्यवस्था यापुढें अमलांत आणण्याचा प्रयत्न कधींहि यशस्वी होणार नाहीं. कारण ग्रहांचें त्यांना आतां सहाय्य राहिलेलें नाहीं. बंदुकांच्या जोरावर अशी समाजव्यवस्था थोडा काळ अस्तित्वांत आलीच तरी जनतेकडून तिला हवा तो पाठिंबा मिळणार नाही हें ज्योतिषदृष्टचा माझें मत आहे. कुंभेत रवि आणि वृषभेंत चंद्र असलेली प्रजासत्ताक भारताची कुंडली भारतांत नारी–समाजाला शिक्षण, राजकारण, अर्थ इत्यादि विषयांत समानता मिळेल असें दर्शविते. या दिशेनें कांहीं प्रगतिशील पावलें टाकलीं गेलीं आहेत व पुढेंहि टाकलीं जातील हें भविष्य-कथन आहे.

## शारीरिक

कुंभ युगांतील स्त्रियांच्याबद्दल लिहितांना एका ज्योतिर्विदानें असें मत प्रतिपादन केलें होतें,—" येत्या कांहीं वर्षांत स्त्रियांच्या शारीरिक

आकारमानांत हळूहळू बदल घडून येईल, व त्या इजिप्तमधील " ममी " सारख्या दिसूं लागतील. कुंभ राशीकडे दृष्टि टाकली असतां मलाहि हें विधान पटतें. कारण त्यामुळेंच त्या पुरुषांच्या बरोबरीनें कामें करूं शकतील इरवीं कुंभ राशीकडून निर्देशित केल्या जाणाऱ्या गोष्टीला दुसरा कोणता अर्थ आहे ? अर्थात् कवि कालिदासानें वर्णिल्याप्रमाणें सुंदर दिसावे ही स्त्रियांची इच्छा त्यांना शास्त्रीय प्रसाधनानें पुरी करावी लागेल, असें दिसतें. हर्ष-लच्या स्वामित्वाखालीं येणारें शास्त्र, हेंच कुंभयुगांत महत्त्वाची भूमिका पार पाडणार आहे. मानव युगाला समता हें दुसरे नांव आहे. मग त्या स्त्रिया, शूद्र व अस्पृश्य कोणीहि असोत. त्यांना सर्वच देशांत पुरुषांच्या बरोबरीनें समान संधि मिळेल. स्वतःच्या कार्यक्षमतेनें रशियांतील स्त्रियांनीं लोकांचा त्यांच्याबद्दलचा भ्रमनिरास केला आहे.

## नारी व ज्योतिषी

आधुनिक व भावी काळांतील या ग्रहांच्या स्वामित्वाखालील ज्योतिषी या गोष्टी मान्य करतीलच; परंतु जे कांहीं सनातनी ज्योतिषी या गोष्टी अमान्य करतील त्यांना मी एवढेंच सुचवितें कीं, त्यांनीं त्यांच्या विशिष्ट मनोवृत्तीमुळें आजपर्यंत स्त्रियांच्या पत्रिकेंतील फक्त पंचम व सप्तम स्थानांचा अभ्यास केला होता. परंतु यापुढें आतां त्यांच्या पत्रिकेंतील दशम स्थानाचाहि विचार करावा लागेल, व त्यासाठीं पूर्वीच्या ज्योतिष्यांनीं त्यांच्या ज्योतिषविषयक ग्रंथांत काय विवेचन केलें आहे तें पाहावें लागेल. पुरुषांची पत्रिका पाहतांना हे ज्योतिषी जे नियम लावतात ते त्यांना स्त्रियांच्या बाबतींत निदान पहिल्या ५० वर्षांच्या कालावधींत तरी लावतां येणार नाहींत. कारण लिंगभिन्नतेबरोबरच दशमस्थानाचें विवेचनहि बदललें पाहिजे. अर्थात् ही एक सूचना आहे. मी हेंहि जाणून आहे कीं, अनेक वर्षांच्या शिक्षण आणि संस्कारामुळें व्यक्तींचीं मतें बदलणें कठीण असतें. तरीदेखील त्यांच्यापैकीं कांहीं जणांना खरेंच मार्गदर्शन व्हावें, त्यांना योग्य तो फायदा मिळावा याच दृष्टीनें ही सूचना केलेली आहे. मानव युगाचा नारी—समाजाबाबत एकच संकेत आहे तो म्हणजे, यापुढें हळूहळू स्त्रियांचें सामाजिक किंवा आर्थिक दुःख व कष्ट नाहींसे होतील.

## वर्तमान मिश्रयुगाचा—

# संघर्ष

'भावी काल' पुस्तकांत मीं हें स्पष्ट केलें आहे कीं, एकोणीस व विसाव्या शतकांत आपण धर्मयुग व मानवयुग या उभय युगांचे गुणधर्म एकत्रित असलेल्या संमिश्र युगांतून जात आहोंत. जुने व नवे असे दोन उघड प्रकार विसाव्या शतकांतील लोकांच्यांत पडलेले आहेत, असें आपणांला आढळून येतें. जुन्या गोष्टी आहेत तशाच अथवा बदलत्या स्वरूपांतहि आपणांस मान्य होत नाहींत; त्याचप्रमाणें नवीन पध्दतीचा संपूर्णपणें अंगिकार करण्याचीहि आपली मानसिक तयारी झालेली नाहीं. याचें कारण नवीन पध्दतीनें अद्याप संपूर्ण आकार धारण केलेला नाहीं; अथवा जनमताची पक्कड घेतलेली नाहीं. अर्थात् नवीन पध्दति या प्रत्येक देशांतील मानवप्राण्यावर हळूहळू पण निश्चितपणें आपली पक्कड बसवीत आहे, यांत शंका नाहीं.

गुरु आणि नेपच्यूनकडून जशी धर्मयुगाची कल्पना निर्देशित केली जाते, तशीच शनि आणि हर्षल हे मानवयुगाची कल्पना व ध्येय आपल्या-समोर मांडतात. म्हणूनच या परिस्थितींत हळूहळू घडून येणाऱ्या बदला-कडे आपण योग्य लक्ष पुरविणें जरूर आहे. या वेळीं हर्षल व नेपच्यून हे दोन निरनिराळीं युगें निर्देशित करणारे ग्रह कसे भ्रमण करीत आहेत, व कोणते योगायोग करीत आहेत, हें पहाणें जरुरी आहे. त्याचप्रमाणें शनि-नेपच्यून युतीचा अभ्यास करणें, हेंहि आवश्यक आहे. प्रत्येक युतीनंतर प्रतिकृतींची एक मालिकाच तयार होतें, व त्यामुळें बदल घडून येऊन एक नवीन व्यवस्था निर्माण होतें. या विशिष्ट ग्रहांच्या प्रमुख योगांमुळें पाया घातला जातो, परंतु इतर ग्रहांच्या योगामुळें सामान्य बदल घडून येतात. त्यांतील कांहीं ग्रहयोग एका व कांहीं दुसऱ्या प्रकारांत पडतात. त्याचप्रमाणें आपणांस ग्रहणेंहि लक्षांत घ्यावी लागतात. विशिष्ट ग्रहांच्या प्रमुख योगांकडून निर्देशित केलेल्या मोठ्या कार्याचा शेवट हे व्हान ग्रहयोग करीत असतात.

या दृष्टीनें एक दिवस अगर एक महिनाच काय, परंतु एक वर्षाचा कालहि दुर्लक्षितां येतो. उदाहरणार्थ, १९०८, १९०९, १९१० या तीन वर्षात हर्षल व नेपच्यून यांच्यांत संघर्षमय योग सात वेळां घडून आले. आणि याहिपेक्षां महत्त्वाची गोष्ट अशी कीं, हे संघर्षमय योग चालू असतांनां जन्मलेले असंख्य लोक या योगांकडून दर्शविण्यांत आलेला विरोधी ध्येयवाद व विशिष्ट कल्पना यांना बरोबर घेऊनच जन्माला आलेले असतात, व ते जीवनांत त्यांना अनसरूनच वागत असतात. उदाहरणार्थ १८२१, १८७१ व १९०८ मध्यें जन्मलेले लोक या ग्रहयोगांनीं युक्त होते, व त्यांनीं त्याला अनसरूनच आपलें भावी जीवितकार्य आखलें होतें. या संदर्भानें विचार केला असतां या ग्रहयोगांकडून आतां पेरल्या गेलेल्या कल्पना कार्यवाहींत आणण्यास यापुढील किती तरी काल लागेल, हें आपल्या लक्षांत येईलच. अशा ग्रहयोगांनीं युक्त असलेल्या लोकांप्रमाणेंच ज्या वेळीं नक्षत्रमंडळावर या ग्रहयोगांचा प्रभाव विशेष पडत असतांना जे युवकावस्थेला पोहोंचलेले असतात असे लोकहि आपली वैशिष्टयपूर्ण भूमिका पार पाडीत असतात. यासंदर्भानेंच या ग्रहयोगांचा विचार व अभ्यास केला पाहिजे. त्यामुळेंच हे योग महत्त्वाचे व सामर्थ्यशाली ठरलेले आहेत.

युगाच्या दोन भिन्न बाजूंचा निर्देश हर्षल व नेपच्यून तितक्याच प्रभावीपणें करीत असतात. "जीवनाचें अंतिम ध्येय हें आध्यात्मिक वा धार्मिक उन्नतींत आहे." असें नेपच्यून लोकांच्या मनांत ठसवीत असतो. त्यामुळेंच जीवनाच्या या विभागाचें ध्येय कवटाळून बसणारे व त्याचा पुरस्कार हिरीरीनें करणारे लोक व धर्मवेडे आपल्याला नेपच्यूनच्या प्रभावाची प्रचीति आणून देतात. याविरूध्द "जीवनाचें अंतिम ध्येय हें आर्थिक, शास्त्रीय व यान्त्रिक प्रगतीमुळें मानवी जीवन सुखी करणें असें आहे" असें हर्षल लोकांच्या मनावर बिंबवीत असतो. म्हणजेच हे दोन प्रमुख ग्रह समाजांत अध्यात्मवाद व भौतिक वाद याविषयीं संघर्ष निर्माण करीत असतात.

कुंभयुगांतील हर्षल व नेपच्यून यांच्यामध्यें १८२१ मध्यें प्रथम युति होऊन तिच्या प्रतिक्रियेला मानवी जीवनाच्या इतिहासांत सुरवात झालीं.

सौरमंडळांतील ही युति १९९२ मध्ये पुनश्च जेव्हां होईल त्या वेळीं १७१ वर्षांपूर्वीं सुरू झालेलें चक्र हे पूर्ण होईल, व त्यानंतर पुन्हा एका नवीनच प्रति-क्रियात्मक मालिकेला सुरवात होईल. १७१ वर्षांच्या या दीर्घ मालिकेची अथवा दोन युतींतील अंतर दर्शविणाऱ्या काळाची तुलना व्यक्तिगत पत्रिकें-तील अंतर्दशेशी करतां येईल. या आधारेंच १८२१ सालीं झालल्या हर्षल व नेपच्यून यांच्या युतीनें इतिहासांत नवीन प्रकारची जी क्रान्ति घडवून आणली, किंवा राष्ट्रीय जीवनांत दोन मतवादांत जो संघर्ष निर्माण केला, त्याची चर्चा करूं या !

१८२१ व १९९२ या कालखंडांत दोनदां होणाऱ्या हर्षल–नेपच्यूनच्या युतिमध्यें–१८०९–४६–८२ व १९१७–५२–८९ अशी ६ वेळां शनि-नेपच्यून युति झाली व होईल, ती त्या दोन मोठ्या युतीच्या परिणामांना मदत करील. त्याच बरोबर या कालखंडात १८०२, १८२१, १८४२, १८६१, व १९०१, १९२१, १९४०, १९६१, १९८१, व २००० या वर्षी शनि-गुरु युति झाली व होईल. त्याचा परिणाम या 'जुन्या-नव्या' च्या संघ-र्षाला मदत करणारा ठरेल. आणि यांत पुन्हां ग्रहणांची भर पडलेली आहे व पुढेंहि पडणार आहे. अर्थात् नवीन गोष्टी अस्तित्वांत येण्यास जुन्यांचा नाश तरी झाला पाहिजे, अथवा जुन्यांनाच नवें स्वरूप प्राप्त झालें पाहिजे; व तेंहि नवीन युगाशीं जुळवून घेणारे असले पाहिजे! या दृष्टीनें प्लूटो, शनि-मंगळ युति शनि-प्लूटो, व गुरु-प्लूटो यांनीं खूपच सहाय्य केलें आहे. अयोग्य अशा सर्व गोष्टींचा नायनाट करण्याचें, त्यामध्यें बदल घडवून आणण्याचें कार्य प्लूटो सातत्यानें करीत आलेला आहे; त्याचबरोबर अशक्य वाटत असणारे क्रान्तिकारक बदलहि तो घडवून आणतो. उदारहणार्थ, सिंह राशींतील प्लूटोनें राजेलोकांचें उच्चाटन केलें.

या ठिकाणीं एखाद्या विशिष्ट दिवसाला अगर तारखेला महत्त्व नाहीं; तर त्या उलट "पेरलेले" उगवण्यास लागणाऱ्या कालखंडाला व काला वधीला महत्त्व आहे, हें लक्षांत येईल. मानवी इतिहासांत असे असंख्य ग्रह-योग एकसारखें बदल घडवून आणीत आलेले आहेत. तथापि हे सर्व प्रमुख बदल व दृष्टिकोन कुंभ वा मानवयुगाकडेच निर्देश करीत आहेत, ही

गोष्ट आपण विसरूं शकत नाहीं. या द्वंद्वांत नेपच्यूनला लढाई हरावी लागणार यात संदेह नाहीं. गुरूकडे दुर्लक्ष करावें लागणार. परंतु त्याचबरोबर या दोन्ही ग्रहांनीं जुन्या कल्पना व त्यांचें अस्तित्व टिकवून धरण्यासाठीं प्लूटोबरोबर जोरदार लढाई दिलेली आहे, व त्यामुळेंच सध्याचा संघर्ष चालू आहे. थोडक्यांत जीवनासाठीं जो संघर्ष चालू असतो व ज्याच्यावर जगाचा एक मूलभूत सिद्धान्त अधिष्ठित आहे, त्याचाच हा एक भाग आहे. यापैकीं सर्व गोष्टींची आपल्यापैकीं कोणालाच संपूर्ण कल्पना नाहीं, व अद्याप बरीच माहिती व्हावयाची आहे.

उदाहरणार्थ, प्राणीजीवनाची आपणाला संपूर्ण माहिती नाहीं. तें फक्त प्राण्यांचेंच जीवन जगतात, कीं त्यांच्यांतहि कांहीं सुधारणा व संस्कृति आहे यांची आपणाला कल्पना नाहीं. प्राणी-जीवनांत कोणते बदल घडून येतात याची फक्त आम्हां ज्योतिर्विदांनाच कल्पना नाहीं असें नसून शास्त्रज्ञ वा इतिहासकारहि या बाबतींत बरेंच "अंधारां"त आहेत. जेवढ्या गोष्टींची आपल्याला माहिती आहे, व ज्या गोष्टी आपल्याला उकलून दाखविणें शक्य आहे अशाच गोष्टींची आपण चर्चा करूं शकतो.

शनि-नेपच्यून युतीचा पाठिंबा असलेल्या हर्षल-नेपच्यून युतिच्या प्रभावाखालीं १९ व्या शतकांतील लोकांना कायम वा टिकाऊ स्वरूपाची कोणतीहि गोष्ट प्रभावीपणें समाजांत प्रसृत करणें अगदींच अशक्य होतें. सामाजिक वा राजकीय सुधारणांचीं मुळें खोलवर रुजलीं जाणें कठीण होऊन बसलें होतें. यापेक्षांहि मनुष्यप्राण्याची बुद्धिमत्ता अनेक संकटांतून, अडथळ्यांतून एका नव्याच ध्येयाप्रत मार्ग आक्रमण करूं पहात होती. मालमत्तेचे शास्त्र ( वृषभ ) हे स्वातंत्र्य आणि सामाजिक न्याय यांचा पाया म्हणून उपयोगांत आणणें, चलन शास्त्र ( currency ) हें आर्थिक माध्यम म्हणून परिणामकारक रीतीनें उपयोगांत आणणें, सर्वांचे एकत्रित संबंध एकतानतेनें राखले जावेत यासाठीं राज्य वा शासनशास्त्र, आणि सामुदायिक कृति ( कुंभ ) यांचा उपयोग करून घेणें, जागतिक राजकारणाच्या शास्त्राचा अवलंब, वंश लोक व राष्ट्रें यांच्यांत संहारक युध्दें थांबवून नाश कमी करण्यासाठीं उपयोगांत आणणें, व त्याचबरोबर संपूर्ण मानवजातीचे समान

मानवी हक्क व हितसंबंध एका नियत्रणाखालीं आणून त्याच्याच जोडीला जागतिक पायावर आधारलेली शिक्षणपध्दति अंमलांत आणून मानवी साहसाला सुसंघटित स्वरूप देऊन मानवाचे हितसंबंध सुरक्षित राखणें– या गोष्टींत मानवाची बुध्दिमत्ता संचार करूं लागली.

## यंत्र–युग

या शतकांत नानाविध लोकांचें एकत्रित ज्ञान, आणि त्यांना एका-पाठीमागून एक मिळालेल्या यशामुळें आलेला आत्मविश्वास यामुळें शास्त्रांच्या वाढीला फळें येऊं लागली, व त्याचा आस्वाद सामान्य लोकांनाहि घेतां येऊं लागला. अगदीं अलीकडचें उघड दिसणारें उदाहरण म्हणजे "स्टीम एंजिन." ग्लासगो येथील गणितज्ञ व यंत्रज्ञ "जेम्स वॅट" यानें या एंजिनाचा शोध लावून मशिनरीसाठीं त्याचा उपयोग करण्याचे श्रेय मिळविलें. १८०४ सालीं त्रेविथिकनें 'वॅट' च्या एंजिनाचा उपयोग प्रवासासाठीं करून घेतला व पहिलें लोकोमोटिव्ह म्हणजेच रेल्वेचें एंजिन तयार केलें. १८२५ मध्यें प्रवासासाठीं स्टॉकटन् ते डार्लिंगटन् ही पहिली इंग्लंडमधील रेल्वे-वाहतूक सुरू झाली. १९ व्या शतकाच्या मध्यास सर्व युरोपभर रेल्वे-वाहतुकीचें जाळें पसरलें.

मानवी जीवनाला जें एक संकुचित स्वरूप प्राप्त झालें होतें, त्याला जी एक अचल स्थिति प्राप्त झाली होती, तिच्यांत हर्षल-नेपच्यूनच्या या युतीमुळें एकदम बदल घडून आला, व जमिनीवरील वाहतुकींतील या गतिमानतेनें सुधारणेचें गाडेंहि जोरांत पुढें ढकललें गेलें. आगगाडीमुळें प्रवासाला लागणाऱ्या वेळांत बचत झाली. एक नियंत्रित राजसभेंतील अडचणी बऱ्याच कमी झाल्या, व तिचा विस्तार या वाहतुकीच्या साधनांनीं वाढविला गेला. एका नियंणत्रखालीं मोठ्या प्रदेशांवर राज्यकारभार चालविणें सोपें झालें. पूर्वींपेक्षां दसपट विस्ताराच्या प्रदेशांवर सुरळीतपणें राज्यकारभार चालविणें आज शक्य झालें आहे. युरोपमध्यें या गोष्टीचें पूर्ण महत्त्व जाणून त्याचा उपयोग करून घेण्यांत आलेला नाहीं, परंतु अमेरिकेनें आज त्याचा भरपूर उपयोग करून घेतला. संपूर्ण देशभर पसरत गेलेला रेल्वेमार्ग हा वॉशिंग्टनशीं संबंध जोडणारा व देशांत एकता प्रस्थापित

करणारा ठरून त्यांनीं अशक्य वाटणाऱ्या गोष्टी आज प्रत्यक्षांत आणून दाखविल्या आहेत. १८०७ मध्यें 'फॉल्टन्' नामक अमेरिकनानें ब्रिटन-मध्यें तयार झालेल्या एंजिनच्या साहाय्यानें 'क्लेअरमाउंट' नांवाची एक बोट तयार केली, व ती न्यूयॉर्कजवळील हडसन नदीवर उपयोगांत आणली. समुद्रावर वाफेच्या साहाय्यानें चालणारी 'फोनिक्स' नांवाची एक मोठी बोट बांधण्याचें कामहि एका अमेरिकनानेंच केलें. या बोटीचा पहिला प्रवास न्यूयॉर्क ते फिलाडेल्फिया असा झाला. मानवा-मानवांतील संबंध वाढविण्याचें व त्यांच्यातील अंतर कमी करण्याचें कार्य 'व्होल्टा', 'गॅल्व्हनी', व 'फॅरॅडे' या शास्त्रज्ञांच्या संशोधनामुळें सहज सुलभ झालें. कारण इलेक्ट्रिकच्या शोधामुळें जमीन व समुद्र यांच्यावरील वाहतूक सोपी व सुखकारक झाली. १८३५ मध्यें इलेक्ट्रिक टेलिग्राफ अस्तित्वांत आला. १८५१ मध्यें फ्रान्स व इंग्लंड यांच्यामध्यें समुद्राच्या तळाशीं तार टाकून संदेश वाहतुकीची सोय करण्यांत आली. व थोड्याच दिवसांत सुसंस्कृत जगांत टेलिग्राफचें जाळें पसरलें. त्या वेळीं एखादी बातमी एका ठिकाणा-हून दुसऱ्या ठिकाणीं पोंचण्यास बराच वेळ लागत असे. परंतु सध्यांच्या काळांत या नवीन शोधामुळें कोणतीहि बातमी पृथ्वीच्या पाठीवर कोठेंहि एकाच वेळीं मिळूं शकते.

१९ व्या शतकांतील लोकांच्या बुद्धिमत्तेला चालना देणारीं व क्रान्ति घडवून आणणारीं हीं संशोधनें, ( स्टीम-एंजिन, आगगाडी, व इलेक्ट्रिक टेलिग्राफ ) शास्त्राचा निदर्शक जो हर्षल, याच्या स्वामित्वाखालीं घडून आली. अर्थात् अतिशय गुंतागुंतीचें व महत्त्वाचें असें हें फळ दीर्घकालीन तान्त्रिक ज्ञानानें साध्य झालें आहे. याच्याच जोडीला पूर्वीच्या कोणत्याहि युगापेक्षां तान्त्रिक ज्ञान व कौशल्य यांच्या बाबतींत अधिक वेगानें वाढ झालीं. मानवांचें भवितव्य काय याची कल्पना कुंभ राशि आणि हर्षल ग्रह हें आपणांस देत आहेत. १९०९ मध्यें प्रथम विमान तयार झालें. पृथ्वीवरील एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाण्यास लागणारा काल व अंतर यांच्यामध्यें पुन्हा प्रगति करण्यांत आली. हे सर्व शोध मनुष्याच्या कर्तृत्वशक्तीचा व्याप-विस्तार दाखवितात. ह्या नवीन शोधामुळें आपल्या

सामाजिक, राजकीय व आर्थिक पद्धतीमध्ये फार मोठ्या प्रमाणांत जुळवा-जुळव करून घेण्यांत आली, यापुढेंहि अद्याप यान्त्रिक प्रगति फार मोठ्या प्रमाणांवर होईल. भावी काळांत होणाऱ्या फार मोठ्या यान्त्रिक क्रान्तिची ही सुरवातीची पायरी आहे. हर्षलनें पूर्ण सामर्थ्यानें आपल्या कार्याला सुरुवात केली व माझ्या पूर्वीच्या पुस्तकांत सांगितल्याप्रमाणें कुंभयुगांतील ग्रहांचें प्राबल्य असणाऱ्या व्यक्तिद्वारें त्यानें जगांतील मानव समाजासमोर एव नवीनच प्रकाश आणला. ज्याप्रमाणें देवांनीं त्यांचीं भक्ति करणारांना तें नास्तिकांच्यापेक्षां श्रेष्ठ आहेत असें सिद्ध करण्यांस सहाय्य केलें त्याचप्रमाणें हर्षलनें त्याच्या प्रावल्याखालीं असलेल्या लोकांना मनुष्य स्वतःच स्वतःच्या सामर्थ्यानें या पृथ्वितलावरील जीवन अधिक सुखी करूं शकतो आणि त्या दृष्टीनेंच आपण प्रयत्न केले पाहिजेत असें सिद्ध करण्यास मदत केली. ईश्वर आणि राजा यांच्या भीतीनें मीन-युगातींल लोकांनीं टोळ्यांच्या पुढची पायरी म्हणजेच समाज-संस्था निर्माण केल्या. मानव समाज-संस्थेच्या दृष्टीनें एक नवीन दृष्टिकोन निर्माण करण्यांत आला. प्रमुख अशा ऐतिहासिक प्रयोगामध्यें मँचेस्टरचा एक विणकरी ' रॉबर्ट ओवेन ' यांचें प्रयोग आणि कल्पना फार महत्त्वाच्या आहेत. सध्यांच्या समाजसत्तावादाचा पाया त्यानीं घातला; त्यांच्याच कार्यामुळें समाजसत्तावाद हा शब्द प्रथम १८३५ च्या सुमारांस अस्तित्वांत आला.

नवीन युगाचें बीजारोपण करण्याचें हर्षलचे कार्य चालू असतांना नेपच्यूनेंहि आपलें कार्य चालूच ठेवलें होतें. नेपच्यूननें पश्चिम युरोपांतील बुद्धिमत्तेचा प्रवाह यान्त्रिक कल्पना व नवीन शोध यांच्याकडें वळवून त्यांना एक नवीनच दिशा दाखवून दिली. सामाजिक संघटनेची कल्पना नवीन युरोपियन जगतांत फार मोठ्या प्रमाणावर प्रसृत करणाऱ्या ह्या नेपच्यूनला आपण धन्यवाद दिलें पाहिजेत. राजकीय सत्ता याच्यापूर्वी इतकी एकत्रित झाली नव्हती. आणि त्यामुळें सामर्थ्यशाली लोकांनीं श्रीमंत होण्याच्या इच्छेनें आपली शक्ति दुसरीकडे केंद्रित केली. म्हणजेच त्यांनीं गुलाम किंवा मजुरांच्या टोळ्या यांच्यापेक्षां यंत्रे व यांत्रिक शक्ति याच्याकडे आपला मोर्चा वळविला. हर्षलनें असें स्पष्टपणें दाखवून दिलें कीं,

मनुष्यानें यंत्राप्रमाणें केलेल्या कामापेक्षां तें यंत्राच्या साहाय्यानें केल्यास अधिक जलद व चांगलें होऊं शकतें. मनुष्यप्राणी हा 'मनुष्यप्राणी' म्हणूनच वावरला पाहिजे असें हर्षलनें लोकाना वाटावयास लावलें. हर्षल उच्चीचा व तोहि लग्नी असल्यामुळें अमेरिकेनें नव्या युगाला मार्गदर्शन केलें. रोमन संस्कृति ही कमी दर्जाच्या व नैतिक दृष्ट्याहि खालच्या पातळीवरील लोकांच्यावर आधारलेली होती; परंतु हर्षलच्या स्वामित्वाखालीं आधुनिक संस्कृति ही स्वस्त यांत्रिक शक्तिवर उभारण्यांत आली आहे. या नवीन पद्धतीमुळें यांत्रिक शक्ति स्वस्त होऊन मानवी शक्ति जास्त महत्त्वाची ठरली: आणि याचसाठीं मजूर संघटनेची जरूरी भासून त्या अस्तित्वांत आल्या.

१९ वें शतक सुरू झालें, आणि बुद्धिमान लोकांना कळून चुकलें कीं, शनीकडून निर्देशित केलेली सामान्य जनता ही पूर्वीच्या शूद्रांच्याप्रमाणें अथवा गुलामाप्रमाणें यापुढेंहि वेठीस धरतां येणार नांहीं. सिंहेच्या स्वामित्वाखालीं सामान्य माणसाला औद्योगिक कार्यक्षमता मिळावयाची असेल तर त्यांना सुशिक्षित केलें पाहिजे असें त्यांना वाटूं लागलें. आपण कोण होतो व आपली किंमत काय आहे, तसेंच आपण शूद्र किंवा गुलाम नसून मानवप्राणी आहोत आणि या जगतावरतीं इतरांच्या इतकीच आपलीहि सत्ता आहे हें त्यांना पटविण्यांसाठीं त्यांना योग्य तें शिक्षण दिलें पाहिजे असें बुद्धिमान लोकांना वाटूं लागलें.

१९ व्या शतकाच्या मध्यास अतिशय बुद्धिमान् जर्मन ज्यू कार्ल मार्क्सनें (१८१८–१८८३) पूर्वीची अतिशय गुंतागुंतीची अशी समाजरचना (धर्मयुग) जाऊन त्या ठिकाणीं भांडवलशाही आणि मजूरवर्ग अशी समाजरचना निर्माण होऊं लागली आहे असें दाखवून दिलें आहे. वृषभेत रवि, चंद्र आणि कुंभ लग्न असलेल्या या व्यक्तीविषयीं पूर्वीं लिहिलेच आहे. ( भावी काल पृष्ठ ५५ ) सिंहेच्या स्वामित्वाखालीं होणारा ज्ञानाचा प्रसार आणि स्वस्त वाङ्मयनिर्मिति पाहिली म्हणजे मानवयुगाचा हा सिद्धान्त स्वीकारणीय आहे असें अधिकाधिक वाटूं लागतें. नेपच्यूनच्या स्वामित्वाखालील लोकांनीं या गोष्टी सहजपणें स्वीकारल्या नाहींत; त्याविरुद्ध त्यांनीं आपला आवाज

उठविला. कार्ल मार्क्स हा पहिलाच युगप्रवर्तक असल्यामुळें त्यानें कित्येक गोष्टी मांडतांना बराच निष्काळजीपणा दाखविला. त्याच्या कल्पना त्याच्या भाषेपेक्षां चांगल्या होत्या. परंतु कांहीं असलें तरी त्यामुळें १८२१ ते १९१७चा काळ समजून घेणें बरेंच सोपें होईल.

१९१७ सालीं शनि-नेपच्यून युती झाली, आणि रशियांत मानव-युगाच्या द्योतक शासनपद्धतीनें, कांहीं विकृत रूपानें पृथ्वीवर पाय टाकला. शनि-नेपच्यून युतीच्या प्रतिक्रियेच्या आंदोलनांत भारतांत महात्मा गांधींनीं हळूहळू मानवयुगाचा संदेश देशाच्या कोनांकोपऱ्यांत पोहोंचवून मानव-समाजांत जागृति निर्माण केली. याच काळांत प्रथम विश्वयुद्ध संपल्यामुळें इतर क्षेत्रांत कित्येक परिवर्तनें घडून आलीं. १९१७ सालांतील शनि-नेपच्यून युति आणि तिच्या परिणामांबाबत आणि १९५२–५३ सालीं तूळेंत झालेल्या शनि-नेपच्यून युतीच्या परिणामांबाबत व पुढील प्रतिक्रियेबाबत माझ्या 'अनागत काल' या मागील पुस्तकांत २८ पृष्ठावर सविस्तर रीतीनें "युगप्रवर्तक शनि-नेपच्यून युती" या शीर्षकाखालीं लिहिले आहेच. त्याची पुनरावृत्ति करून येथें जागा अडविण्याची इच्छा नाहीं. या ठिकाणीं एक गोष्ट नमूद करावीशीं वाटतें कीं १९५२–५३ सालीं शनि-नेपच्यून युति झाली तर ५४–५५ सालीं हर्षल-नेपच्यून महाकेंद्रयोग होत आहे, आणि तोहि कांहीं कमी महत्वाचा नाहीं. ही युति आणि हा केंद्रयोग यांनीं मानवयुगांतील संघर्ष प्रामुख्यानें पुढें आणला, आणि भारत, आशियाई आणि आफ्रिकेंतील इतर राज्यांतील मानवी मनांत व शासन-पद्धतींस एक क्रान्तिकारक जोम दिला आहे आणि याचा प्रत्यक्ष परिणाम हळूहळू आपल्यालां दिसून येईल याबद्दल मला संदेह नाहीं.

१९५३ ची युति आणि १९५४ चा केंद्रयोग, व मार्च १९८९ ची शनि–नेपच्यून युति व फेब्रुवारी १९९३ ची हर्षल-नेपच्यून युति या दोहोंमधील ४० वर्षांचा काळ मानवी जीवनांत व शासनपद्धतींत एक असंभवनीय असें परिवर्तन घडवून आणणारा असा ठरेल. मानवाकरितां, सार्वजनिक सुख व समृद्धिकरितां, जें सामुहिक परिवर्तन घडून येईल तें पूर्वीच्या इतिहासाचीं बरींच पानें झाकून टाकील. शिक्षणक्षेत्रांत प्रगति

आरोग्य उपचारासाठीं व्यवस्था व औषधें, वैज्ञानिक क्षेत्रांत नवीन शोध, इत्यादि सर्व गोष्टींत या कालांत क्रान्तिकारक स्वरूपाची वाढ होईल. धर्मयुगाकडे पाहणारे लोक व व्यवस्था नाहींशीं होणार नाहींत, परंतु ते स्वतःचा मान राखूनहि, नवीन युगाचा कल पाहून आपल्या तत्त्वाला मुरड घालतील.

असेंहि दिसतें कीं, ज्या ज्या वेळीं नेपच्यूनचा हर्षल व शनीशीं संघर्ष होतो त्या वेळीं धार्मिक प्रवृत्तीच्या तसेंच धर्मवेड्या लोकांना तो चेतना देतो. १९५४ सालीं व्हॅटिकन (रोम) येथें रोमन कॅथॉलिकांचा उत्सव व आणि रंगून (बर्मा) येथें बौद्धधर्मीयांचें संमेलन इत्यादि गोष्टी आपलें लक्ष वेधून घेतात. अशा संघर्षाचें वेळीं आपलें अस्तित्व सिद्ध करण्यासाठीं हजारों लोक धार्मिक संस्था स्थापन करतांना आढळतात. म्हणूनच रोमचा पोप कांहीं विशिष्ट समाजामध्यें लोकप्रिय राहूं शकला भारत व ब्रम्हदेशांतहि धार्मिक प्रवृत्तींचें पुनरुज्जीवन व त्याला नवीन रक्ताचा पुरवठा होतांना दिसून येतो.

जगाच्या इतिहासाकडे नजर टाकली असतां हा संघर्ष दीर्घकाळ चालू असून आपापल्या प्रातिनिधिक ग्रहांच्या स्वामित्वाखालीं वेगवेगळ्या मतप्रणालीच्या लोकांनीं त्या काळांत लोकप्रियता संपादन केली असें दिसून येतें. परंतु इतिहासकार व राजकारणतज्ज्ञ लोक एक गोष्ट विसरतात ती अशी कीं, सध्यांच्या समाजाचा कल मानवयुगाकढे झुकलेला आहे, आणि म्हणूनच जनरल फ्रँको, राधाकृष्णन्, विनोबा भावे यांच्यासारख्यांकडून निर्देशित केला जाणारा पक्ष कितीहि वैशिष्ट्यपूर्ण असो, दुसऱ्या पक्षाचा म्हणजेंच मानवयुगाच्या कल्पनांचाच जय होणार हें निश्चित आहे. भूमिदान किंवा संपत्तिदान करून अहिंसामार्गानें आर्थिक जगांत एक प्रकारची समता आणण्याचा आचार्य विनोबा भावे जोंपर्यंत प्रयत्न करीत आहेत, तोंपर्यंत ते लोकप्रिय राहतील; परंतु ते जर यांत्रिक युगाच्या प्रगतीविरुद्ध बोलत राहतील (त्यांचें पुस्तक "जीवनदृष्टि" यांत त्यांनीं असा रोख दर्शविला आहे) तर ते थोड्याच काळांत अनादरास पात्र झाल्याविना राहणार नाहींत. कारण व्यक्तीला

महत्त्व नसून काळाला व ग्रहांनीं निर्माण केलेली पोकळी व्यवस्थित भरून काढणाराला महत्त्व आहे. या ठिकाणीं एक गोष्ट नमूद करावीशीं वाटतें कीं, विनोबाची कन्या-रवि व्यक्ति आहेत, आणि डॉ. राधाकृष्णन्‌हि कन्या-रवि व कन्या-चंद्र व्यक्ति आहेत. हे दोघे कितीहि मोठे पुरुष असले तरीं मानवयुगाची पूर्णपणें कल्पना ते करूं शकणार नाहींत. किंतु सिंह-लग्न, लग्नी मंगळ, शनि-चंद्र युति असलेले श्री. जयप्रकाश नारायण यांनीं "जीवदान" यज्ञाची नांदी करून विनोबांच्या कार्याची अपूर्ण राहिलेली बाजू पूर्ण केली. त्यांनीं अनुसरलेला हा मार्ग आदर्श असा असून अनेकांना त्यामुळें मार्गदर्शन होऊं शकेल.

इतिहासाच्या अवलोकनावरून आपणाला असें दिसून आलें असेल कीं मोठमोठ्या व्यक्ति आल्या व गेल्या, पण कल्पना मात्र टिकून राहिल्या, व त्या कल्पना वाजवी असतील तर ग्रहांच्या सहाय्यानें भावी पिढ्यांतहि त्या टिकून रहातात. ज्योतिषशास्त्राचा हाच महत्त्वाचा विषय आहे. संघर्ष चालूच आहे. कल्पनांचा तात्पुरता जय अथवा पराजय इतिहासांत आढळून येतो. परंतु शक्तिशाली ग्रह मात्र अढळ आहेत. यामुळें मानवयुगाचें अस्तित्व सर्वांगपरिपूर्णपणें कळण्यास मदत होईल.

हर्षल—नेपच्यून अथवा शनि-नेपच्यून यांनीं निर्माण केलेला संघर्ष चालूच आहे. १९५०—२००० या पुढच्या कालांत पंचांगांतील ग्रहस्थिति कशी आहे हें आपण पाहूं. त्यासाठीं या पुस्तकांत इतरत्र आगामी ५० वर्षांचे प्रमुख ग्रहांचें पंचांग दिलेलें आहे; बदल व सुधारणा घडवून आणण्याचें कार्य प्लूटो त्या काळापर्यंत कसें करील हेंहि बघण्यासारखें आहे. यासाठीं शनि, नेपच्यून, हर्षल व प्लूटो यांची स्थिति व भ्रमणें यांची माहिती अत्यावश्यक आहे. व ती मी इतरत्र देत आहें.

आपण हा लेख "भावी काल" या पुस्तकांत युगासंबंधीं जो सिद्धात मांडला आहे त्या आधारें वाचावा. ग्रहांच्या या भ्रमणावर व योगावर पुढील भविष्यकथनें आधारलेलीं आहेत. परंतु शेवटची व सर्वांत महत्त्वाची लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे आपण मानवयुगाच्या दिशेनें आगेकूच करीत आहोंत.

---

आपले भविष्य, परंतु

# आपली रास कोणती !

प्रत्येक व्यक्तीच्या जन्मकालीं रवि ज्या राशींत असेल त्याला अनुसरून पुढील लेखांत " राशि-भविष्य " लिहिलें जात आहे. आपल्या देशांत साधारणपणें ज्या पद्धतींनें राशि-भविष्यें लिहिलीं जातात त्यापेक्षां ही पद्धत निराळीं आहे.

साधारणपणें आपण ज्या वेळीं आपल्या राशीबद्दल बोलतों त्या वेळीं आपल्या जन्मकालीं चंद्र कोणत्या राशींत होता हें लक्षांत घेऊनच आपण बोलत असतों. उदाहरणार्थ ३–९–१९२३ रोजीं जन्मलेला मनुष्य " माझी रास वृषभ आहे " असें म्हणेल याचा अर्थ ३ सप्टेंबर रोजीं निरियन चंद्र सौरमंडळाच्या दुसऱ्या राशींत म्हणजे वृषभेंत होता. परंतु त्या दिवशीं त्या व्यक्तीचा सायन रवि कन्येंत होता, म्हणून ती " कन्या–रवि व्यक्ति " होय.

साधारणपणें आपण दैनिक अथवा इतर वृत्तपत्रांत जीं राशि-भविष्यें वाचतों तीं जन्माच्या वेळीं चंद्र ज्या राशींत असतो त्यावर अथवा जन्म पत्रिकेंतील लग्नावर आधारलेलीं असतात.

परंतु मी पुढें चर्चा करीत असलेलें राशि-भविष्य हें आपल्या जन्मकालीं सायन–रवि ज्या राशींत असेल त्यावर आधारलेलें आहे. असें करण्याचीं कांहीं कारणें आहेत. दोन्हीहि पद्धतींचा तुलनात्मक अभ्यास करून कांहीं निष्कर्ष काढले आहेत. म्हणजेच व्यक्तीच्या जन्मकालीन चंद्रावर ग्रहांच्या भ्रमणामुळें होणारे परिणाम आणि जन्मपत्रिकेंतील रवीच्या राशीवर इतर प्रमुख ग्रहांच्या भ्रमणामुळें होणारे परिणाम यांच्या निरीक्षणानंतर मी असें निश्चितपणें म्हणूं शकतें कीं, जर चंद्राच्या राशीवरून १५ टक्के योग्य निर्णय प्राप्त होत असतील तर जन्मकालीन रवीच्या राशीवरून २५ टक्के अचूक निर्णय प्राप्त होतात. खरें पाहिलें असतां या दोन्ही पद्धति सर्वसामान्य विधानें करूं शकतात.

आपणाला आपल्या जीवनांतील भावी प्रसंगांची अचूक माहिती हवी असेल तर त्यासाठीं जन्मकुंडलीच पाहिजे. अर्थात् जन्मकुंडलीच पाहिल्यानंतर

ज्योतिषांना त्या पत्रिकेवर इतर प्रमुख ग्रहांचे परिणाम लक्षांत घ्यावे लागतात. ही गोष्ट त्यांच्या दृष्टीनेंहि उपयुक्त आहे. त्यांच्यापासून आपणाला जरी सर्वसामान्य दृष्टीकोन कळतो तरीसुद्धा त्यांची नोंद करणें तितकेंच महत्त्वाचें व जरूरीचें असतें.

थोड्या लोकांना ज्योतिष कळतें; पण त्यांच्यापेक्षांहि कमी लोकांना स्वतःची पत्रिका संपूर्णपणें माहित असते. असें असूनहि प्रत्येकाला आपल्या जीवनांत भावी कालांत ग्रहांच्याकडून कोणता कल दर्शविला जात आहे हें जाणून घेण्याचें आकर्षण असतें. म्हणूनच वर्तमानपत्रांत दैनिक, साप्तहिक, किंवा वार्षिक राशि-भविष्य अतिशय लोकप्रिय झालें आहे. एकाद्या व्यक्तीला आपली खरी राशि माहिती नसेल तर आपल्या नांवाच्या अद्याक्षरावरून आपली अमुक एक रास आहे असें मानण्यांत येऊं लागलें. परंतु जन्म वेळींच्या चंद्राच्या राशीला धरूनच 'नांव' ठेवतात असें निश्चित नसल्यामुळें तें भविष्यकथन अविश्वासार्ह ठरतें. असें असलें तरीहि लोकांना औत्सुक्य आणि आकर्षण असतेंच.

पुढें दिलेलें भविष्य वाचतांना वाचकाला आपली पत्रिका अथवा जन्म पत्रिकेंत रवि कोठें होता याची माहिती नसली तरीहि चालेल. इंग्लिश कॅलेंडरप्रमाणें आपली जन्मतारीख व महिना याची माहिती असली म्हणजे झालें.

कारण प्रत्येक वर्षी एका विशिष्ट तारखेपासून दुसऱ्या एकाद्या विशिष्ट तारखेपर्यंत, सायन पंचागांत, रवि ग्रह एका विशिष्ट राशींत असतो, किंवा भ्रमण करतो. आणि म्हणूनच इंग्रजी जन्म तारीख आणि महिना माहिती असला कीं रवि कोठें होता किंवा कोणत्या राशींत होता हें सहज समजतें. हें सायन पंचागाप्रमाणें झालें परंतु हिंदु पंचांगाप्रमाणें लिहिलेली पत्रिका उघडून रवि त्या राशींत नाहीं असें कोणी म्हणू नये व आपली पत्रिका केतकी किंवा टिळक पंचांगाप्रमाणें तयार केली असणें शक्य आहे हें विसरूं नये. सर्वांनीं हें ध्यानांत ठेवावें कीं फक्त जन्म तारखेवरून निर्देशित केली गेलेली रवीची राशि, या लेखांत सायन पंचागाप्रमाणें अगदीं बरोबर असून त्याच्याच आधारें या ठिकाणीं राशि-भविष्य लिहिलें आहे. आर्थिक भविष्य किंवा तुम्हांला द्रव्यलाभ केव्हां होणार ह्या बाबतींतील भाकितें-

सुद्धां याच पद्धतीनें केलेलीं आहेत. १९५५ चें आर्थिक भविष्य 'अनागत काल' पुस्तकांत दिलें गेलें असल्यामुळें या पुस्तकांत साल १९५६ पासूनच द्रव्यलाभाचें भविष्य देण्यात आलें आहे. आणि ज्या पंचांगावर तें आधारलेलें आहे तें पंचांगहि ह्या पुस्तकांत इतर ठिकाणीं देण्यांत आलेले आहे.

भविष्यकालांतील कांहीं प्रमुख ग्रहांच्या भ्रमणामुळें आपल्यावर होणारे परिणाम यापुढें दिलेल्या भविष्यकथनामध्यें आहेत. ज्या वर्षांमध्यें बिकट परिस्थितीचें निदर्शन केलेलें असेल तो काल आपल्या जीवनांतील योजनांच्या दृष्टीनें सावधगिरीचा समजला जावा.

त्याचप्रमाणें ज्या कालांत आपणाला अनुकूल असें कल दिसत असतील, तो काल आपल्या योजना सफल होतील अशा दृष्टीनें विचारांत घ्यावा, व त्याचप्रमाणें कृति करावी. यापेक्षां अधिक बारीकसारीक माहिती मी भविष्यकथनामध्यें दिलेली नाहीं, व तशी अपेक्षाहि कोणी करू नये. भविष्यकथनांत दर्शविलेले कल हे पोलादी चौकटींत बसविलेले नाहींत. आपण एकादी कृति केल्यानंतर तें कल अजिबात बदलणार नाहींत असें नाहीं. कोणीहि स्वतःच्या इच्छाशक्तिच्या जोरावर त्यांवर आपल्या व्यक्तित्वाचा ठसा उमटवूं शकेल. आपल्या जीवनाला स्वरूप देण्याचें अथवा त्यावर नियंत्रण ठेवण्याचें आपल्याच हातांत आहे. या भविष्यकथनांत दर्शविलेले ग्रहांचे कल हे त्या बाबतींत आपल्याला अधिक सामर्थ्यवान् करतील.

या लेखांत ज्या गोष्टी दर्शविलेल्या नाहींत असे अनेक प्रसंगहि आपल्या आयुष्यांत घडतील. त्या सर्व गोष्टी येथें देतां येत नाहींत. कारण प्रत्येक जन्मतारखेवरून अति सूक्ष्म भाकितें वर्तविणें या पुस्तकाच्या आकाराला पेलण्यासारखें नाहीं. तें जन्मपत्रिकेवरून सांगतां येईल. तथापि या ठिकाणीं वर्तविलेले ग्रहांचे कल तुम्हांला प्रभावीपणें अनुभवास येतील, आणि येथें काढलेले निष्कर्ष तुम्हांला मार्गदर्शक म्हणून उपयोगी पडतील अशा खात्रीनेंच लिहिलेले आहेत. यासाठीं तुम्हीं त्याच्यावर योग्य तो विश्वास ठेऊन त्यांना आपल्या जीवनांतील योजनेला अनुरूप अशा रीतीनें उपयोगांत आणलें पाहिजे




## आपली रास

पहिल्या प्रथम तुमच्या जन्मकालीं रवि कोणत्या राशीत होता किंवा भ्रमण करीत होता हें पाहूं या--

### ( १ ) मेष--रवि

कोणत्याहि वर्षाच्या २२ मार्च ते २० एप्रिल या दरम्यान तुम्ही जन्मलां असाल तर त्या वेळी रवि मेष राशींत असल्यामुळें तुम्ही मेष रवि व्यक्ति आहांत.

### ( २ ) वृषभ--रवि

कोणत्याहि वर्षाच्या २१ एप्रिल ते २१ मे या दरम्यान जन्मलां असाल तर त्या वेळीं रवि वृषभ राशींत असल्यामुळें तुम्ही वृषभ--रवि व्यक्ति आहांत.

### ( ३ ) मिथुन--रवि

कोणत्याहि वर्षाच्या २२ मे ते २१ जून या दरम्यान जन्मलां असाल तर त्या वेळीं रवि मिथुन राशींत असल्यामुळें तुम्ही मिथुन--रवि व्यक्ति आहांत.

### ( ४ ) कर्क--रवि

कोणत्याहि वर्षाच्या २२ जून ते २३ जुलै या दरम्यान जन्मलां असाल तर त्या वेळीं रवि कर्क राशींत असल्यामुळें तुम्ही कर्क--रवि व्यक्ति आहांत.

## ( ५ ) सिंह–रवि

कोणत्याहि वर्षांच्या २४ जुलै ते २३ ऑगस्ट या दरम्यान जन्मलां असाल तर त्या वेळीं रवि सिंह राशींत असल्यामुळें तुम्ही सिंह–रवि व्यक्ति आहांत.

## ( ६ ) कन्या–रवि

कोणत्याहि वर्षांच्या २४ ऑगस्ट ते २३ सप्टेंबर या दरम्यान जन्मला असाल तर त्या वेळीं रवि कन्या राशींत असल्यामुळें तुम्ही कन्या–रवि आहांत.

## ( ७ ) तूळ–रवि

कोणत्याहि वर्षांच्या २४ सप्टेंबर ते २३ ऑक्टोबर या दरम्यान जन्मलां असाल तर त्या वेळीं रवि तूळ राशींत असल्यामुळें तुम्ही तूळ-रवि व्यक्ति आहांत.

## ( ८ ) वृश्चिक–रवि

कोणत्याहि वर्षांच्या २४ ऑक्टोबर ते २२ नोव्हेंबर या दरम्यान जन्मलां असाल तर त्या वेळीं रवि वृश्चिक राशींत असल्यामुळें तुम्ही वृश्चिक–रवि व्यक्ति आहांत.

## ( ९ ) धनु–रवि

कोणत्याहि वर्षांच्या २३ नोव्हेंबर ते २२ डिसेंबर या दरम्यान जन्मलां असाल तर त्या वेळीं रवि धनु राशींत असल्यामुळें तुम्ही धनु–रवि व्यक्ति आहांत.

## ( १० ) मकर–रवि

कोणत्याहि वर्षांच्या २३ डिसेंबर ते २० जानेवारी या दरम्यान जन्मलां असाल तर त्या वेळीं रवि मकर राशींत असल्यामुळें तुम्ही मकर–रवि व्यक्ति आहांत.

## ( ११ ) कुंभ–रवि

कोणत्याहि वर्षांच्या २१ जानेवारी ते १९ फेब्रुवारी या दरम्यान जन्मलां असाल तर त्या वेळीं रवि कुंभ राशींत असल्यामुळें तुम्ही कुंभ–रवि व्यक्ति आहांत.

## ( १२ ) मीन–रवि

कोणत्याहि वर्षांच्या २० फेब्रुवारी ते २१ मार्च या दरम्यान जन्मलां असाल तर त्या वेळीं रवि मीन राशींत असल्यामुळें तुम्ही मीन–रवि व्यक्ति आहांत.

---

आगामी २५ वर्षांतील

# तुमचें भविष्य



## मेष-रवि

( कोणत्याहि वर्षांतील २१ मार्च ते २० एप्रिल या दरम्यान जन्मलेले लोक )

### आर्थिक भविष्य

मेष-रवि व्यक्तींच्या जवळ संपत्ति मिळविण्यास लागणारी शक्ति, जोम, उत्साह, ध्येयाची एकाग्रता, आणि आत्मविश्वास हे गुण प्रकर्षानें आढळून येतात. धंद्यामध्यें हे ठार होण्याची भाषा बोलणेंच कठीण. उद्योग हा या व्यक्तींचा प्रधान गुण आहे. ते जन्मतःच पुढारी, लोकनायक वा म्होरके आणि धाडसी असतात. आपल्या नशिबाचे शिल्पकार बनून उत्तम घडीव मूर्ति बनविण्याचें मनोधैर्य, उत्साह, जोम, आणि ताकद हे गुण यांच्यामध्यें असतात. जवळजवळ शत्रुत्व निर्माण करण्याइतपत अग्रेसरवृत्ति यांच्यामध्यें असते. आतां आगामी २५ वर्षांत मेष-रवि लोकांना

द्रव्यलाभ होण्याचे योग केव्हां आहेत हें पाहूं या. विशेष स्पष्टपणें मार्गदर्शन उपलब्ध होण्यासाठीं मेष-रवीचे तीन सूक्ष्म भाग पाडीत आहें.

कोणत्याहि वर्षाच्या २२ मार्च ते १ एप्रिल या काळांत जन्मलेल्या लोकांना पैशाच्या दृष्टीनें १९५९ सालांतील मार्च, एप्रिल व नोव्हेंबर हे ३ महिने. १९६३ सालांतील एप्रिल व मे हे दोन महिने. १९६६ सालांतील ऑक्टोबर व नोव्हेंबर हे दोन महिने. १९७१ सालांतील फेब्रुवारी ते जून, आणि ऑक्टोबर. एप्रिल १९७५ ; सप्टेंबर ते डिसेंबर १९७८; जानेवारी, फेब्रुवारी, मे जून, १९७९; जानेवारी, फेब्रुवारी, जून ते ऑक्टोबर १९८३; हा कालावधि अतिशय सुदैवी व भाग्याचा आहे.

कोणत्याहि वर्षाच्या २ एप्रिल ते ११ एप्रिल या कालावधींत जन्मलेल्या लोकांना डिसेंबर १९५९; जानेवारी १९६०; जून ते डिसेंबर १९६३; जानेवारी व फेब्रुवारी १९६४; ऑगस्ट १९६७; नोव्हेंबर, डिसेंबर १९७१; मे, जून, ऑक्टोबर ते डिसेंबर १९७५; जानेवारी १९७६; जुलै, ऑगस्ट १९७९; मार्च, एप्रिल, मे, नोव्हेंबर, डिसेंबर १९८३ हा कालावधि आर्थिक-दृष्टया अतिशय भाग्याचा असेल.

कोणत्याहि वर्षाच्या १२ एप्रिल ते २० एप्रिल या काळांत तुमचा जन्म झालेला असेल तर खालीं उल्लेखिलेल्या महिन्यांत तुम्हीं निश्चितपणें पैसा कमवाल. त्या दृष्टीनें फेब्रुवारी ते जुलै १९५६; फेब्रुवारी, व जुलै ते ऑक्टोबर १९६०; मार्च व एप्रिल १९६४; सप्टेंबर व ऑक्टोबर १९६७; एप्रिल ते जून १९६८; जानेवारी, फेब्रुवारी, ऑगस्ट, व सप्टेंबर १९७२; जुलै ते सप्टेंबर १९७५; फेब्रुवारी, मार्च १९७६; ऑगस्ट, सप्टेंबर १९७९; डिसेंबर १९८३; जानेवारी १९८४ हे महिने अतिशय लाभदायक आहेत.

## संकटाची व समाधानाची वेळ

मेष–रवि व्यक्तींना फेब्रुवारी १९५५, जानेवारी १९५७; जुलै १९५८; व जून १९६० हे महिने सुदैवाचे व भाग्याचे आहेत. व या वेळीं तुम्ही तुमच्या योजना समाधानकारपणें अंमलांत आणूं शकाल, याउलट मे १९५५, ऑक्टोबर १९५७, व ऑक्टोबर १९५९ हे महिने तुमच्या विरूद्ध परिस्थिति निर्माण करणारे असून तुमची सत्व-परीक्षा घेणारे आहेत. या

काळांत एखाद्या नवीन गोष्टीस प्रारंभ करण्याऐवजीं शान्त बसणें शहाणपणाचें ठरेल.

अर्थातच १९६० पर्यंत तुमच्या घराण्याची प्रतिष्ठा व प्रगति यांमध्यें सर्वसाधारणपणें सुधारणाच होणार आहे. भविष्याच्या दृष्टीनें पाहिलें तर यापूर्वीच्या काळांत संकटें व अडचणी यांना तोंड द्यावें लागलेल्या लोकांना येथून पुढें परिस्थितींत सुधारणा होत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येईल.

मे १९६२; एप्रिल १९६४; मार्च-एप्रिल १९६६; मार्च १९६८; फेब्रुवारी १९७०; जानेवारी १९७२; जुलै, नोव्हेंबर १९७३; जून १९७५; मे १९७७; एप्रिल, मे १९७९; एप्रिल १९८१ हे महिने तुमच्या दृष्टीनें सुदैवाचे असून, तुमच्या मनाला समाधान मिळेल अशा तऱ्हेचें कार्य करण्याचें सामर्थ्य व उत्साह प्राप्त होण्याच्या दृष्टीनें आदर्श आहेत. कांहीं तरी यशमाप पदरीं पाडून घ्यावें अशा तऱ्हेचा हा शुभयोगी काळ आहे.

याउलट जुलै १९६५; जानेवारी–फेब्रुवारी १९६७; डिसेंबर १९६८; नोव्हेंबर १९७०; ऑक्टोबर १९७२; सप्टेंबर मध्यापासून ऑक्टोबर अखेर १९७४; सप्टेंबर १९७६; ऑगस्ट, सप्टेंबर १९७८; जुलै, ऑगस्ट १९८० हे महिने कोणत्याहि मोठ्या योजना अथवा कार्यक्रम आंखण्याच्या दृष्टीनें अशुभ असून तुमच्या संबंधितांच्याकडून उपद्रव पोंचेल असें दर्शविणारे आहेत.

## विविध

१९५५ मध्यें हर्षलचा सिंह राशींत होणारा प्रवेश हा मेषेंत रवि असतांना जन्म झालेल्या लोकांच्या प्रेमाच्या बाबतींत आश्चर्यकारक परिणाम घडवून आणील. या व्यक्ति स्वभावतःच साहसप्रिय असल्या तरी अंतःकरणांतून त्या नैतिकदृष्टया रूढीप्रिय व सनातनी मताच्या असतात. म्हणूनच तुमच्यापैकीं पुष्कळ जणांची वागणूकहि विचित्र पद्धतीची वाटेल व तुमचे इतरांशीं असणारे संबंधही पुढील ३–४ वर्षांच्या काळांत तरी विविध प्रकारचे असतील.

परंतु तुमचें जर लग्न झालें असेल तर तुम्हांला कांहीं आश्चर्यकारक व सुखदायक अनुभव येतील. कारण सिंह राशींतील हर्षलचें भ्रमण हें १९५५

नंतर थोड्याच काळांत तुमच्या कुटुंबांतील तरुण माणसांच्या बाबतींत कांहीं सुखदायक घडामोडी घडवून आणील. ह्या घडामोडी अकल्पित असल्यानें तुम्हांला जास्तीच आनंद होईल. १९५७ मध्यें तुळेंत गुरूचा होणारा प्रवेश तुम्हांला धोक्याची सूचना देऊन असें सांगेल कीं, तुम्ही कांहीं तरी "शिल्लक" टाकलीच पाहिजे. कारण त्यामुळें त्या वर्षामध्यें नवीन योजना हातीं घेऊन त्या स्वतंत्रपणें व आत्मविश्वासानें तडीस न्याल. परंतु तुमच्यापैकीं जे लोक धंदा करतात त्यांनीं या धोक्याच्या इशाऱ्याकडे दुर्लक्ष करूं नये. १९५६–५७ मध्यें धंद्यांतील भागीदारांच्या युक्त्या-प्रयुक्त्यांमुळें तुमच्यावर गोत्यांत येण्याचा प्रसंग येईल. म्हणूनच या काळांत इतर लोकांची आर्थिक जबाबदारी घेणें किंवा इतरांच्यातर्फें आर्थिक व्यवहाराच्या भानगडींत लक्ष घालणें या गोष्टी तुम्हीं कटाक्षानें टाळल्या पाहिजेत.

जेव्हां प्रसंग असतो तेव्हां त्याला तोंड देण्याची तुमच्या मनाची तयारीं नेहमींच असते. परंतु १९६१ सालच्या शेवटच्या भागांत, विशेषत: सप्टेंबर आणि ऑक्टोबर महिन्यांत परिस्थितीवर विजय मिळविणें कठीण जाईल. कारण मोठ्या प्रमाणांतील आणि फायदेशीर वाटणाऱ्या अशा कायदेशीर भानगडींत गोवले जाण्याची भीति आहे. एकाद्या मृत्युपत्राच्या बाबतींत कोर्टाकडे धांव घेण्याचा उतावीळपणा करूं नका. त्या मोहापासून परावृत्त व्हा. नातेवाईकांशीं संबंधीत अशा कोर्ट-खटल्याच्या कामांत स्वत:ला गुंतवून घेऊं नका; कारण त्यापासून फायदा होणार नाहीं. उलट इतरांच्या मनांत तुमच्याविषयीं कटु भावना निर्माण होऊन त्यामुळें पुढील काळांत वैयक्तिक नुकसानच होईल. १९६१ सालचे पहिले पांच महिने सामाजिक दृष्ट्या आनंदाचे गेले तरी ते अतिशय खर्चिक ठरतील. तुमच्या भावनांवर नियंत्रण घाला, नाहीं तर त्यानंतरच्या जीवनांत तुमच्या पदरी निराशा पडेल.

१९६३ मधील जागतिक वातावरण अतिशय तंगीचें असेल. या वेळीं सर्व राष्ट्रांतील शांततेला धोका उत्पन्न होईल. अर्थात् जगांतलें वातावरण कांहीं असलें तरी १९६३ व ६४ या दोन वर्षांत मेष–रवि व्यक्तींना त्याचें कांहींच सुखदु:ख वाटणार नाहीं. जगांतील बदल, दैवघटित फेरफार, युद्ध

आणि शांतता यांचा त्यांच्यावर प्रत्यक्ष कांहींच परिणाम होणार नाहीं. आणि त्यांच्या शेजाऱ्यांना जे कांहीं विचित्र अनुभव येतील त्यांचा यांना फक्त दुरूनच अनुभव येईल. तुमची भरभराट होणार आहे. 'मेष–रवि' व्यक्तींना युद्ध कधींच भीति घालूं शकत नाहीं. उलट युद्धकाळांत त्यांची भरभराट होत असते. परंतु मेष–रवि व्यक्तींनीं फारच आशावादी बनूं नये. कांहीं वर्षांनंतर येणाऱ्या गुंतागुंतीच्या काळासाठीं व अवघड प्रसंगासाठीं आतांच थोडीबहुत माया जमवून ठेवा, आणि कांहीं तरी ध्येय निश्चित करून तुमचें स्थान निश्चित करा. १९६३ च्या ऑगस्ट महिन्यांत-तुम्ही अतिशय आनंदी व उत्साही असाल. परंतु तुमच्या या भरभराटीच्या काळांत धंद्यांत कोणालाहि भागीदार करून घेऊं नका. १९६३ मध्यें भागीदार घेऊन जर एखादा नवीन धंदा सुरू केलांत तर, तो १९६७ च्या शेवटापर्यंतसुद्धां टिकणार नाहीं. कारण एप्रिल ते ऑगस्ट १९६७ मध्यें तुमचे भागीदार व तुम्ही एकमेकांचे गैरसमजामुळें कोर्टांत जाल, आणि तुमचे भागीदार जो कट करतील त्या कटांत तुम्ही अडकून पडाल. हे महिने प्रतिकूल असून धंद्यामध्यें जुळवाजुळव करणें, योजना बदलणें, आणि नवीन वैयक्तिक संबंध जोडणें असल्या गोष्टी तुमच्या हातून होतील. तुम्हांला आशादायक वाटणाऱ्या अशा एखाद्या गोष्टींत अपयश येईल. म्हणजेच भरंवशाच्या म्हशीनें टोणगा दिल्यासारखें होईल. या वेळेला तुम्ही पुष्कळ पैसा व आपली शक्ती खर्च करून बसाल.

सर्वसाधारणपणें बोलावयाचें झालें तर १९६३ पासून १९६७ अखेरचा काल हा तुम्हांला आर्थिक व सामाजिकदृष्ट्या चांगला जाणार असून, तुमचें तुम्हांला आश्चर्य वाटावें इतकी भरपूर प्रगति कराल. परंतु १९६७ नंतर शनि जेव्हां मेष राशींत प्रवेश करील तेव्हां तुमच्या जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत निराशा, अडथळे व विलंब यांचें प्राबल्य माजलेलें आढळून येईल. एका बाजूला प्रकृति बिघडूं लागेल, तर दुसरीकडे "आपण आपलें नोकरीचें गांव अथवा धंदाच बदलावा" असें तुम्हांस वाटूं लागेल. म्हणूनच १९६७ ते १९६९ या काळांत व्यक्तिमत्त्वाचें जें प्रकर्षत्व जरूर असतें तें तुम्हांला मिळेल, व त्यावरून तुम्हांला आपलें 'स्वतःचें जीवन' घडवितां

येईल. कोणत्याहि प्रकारची गुंतागुंत निर्माण न करतां तुमचे आप्तेष्ट अथवा प्रियजन यांच्यापासून हलके हलके दूर होण्याचा हीं वर्षे म्हणजे अत्यंत योग्य समय आहे. या वर्षांत नवीन मित्र जोडण्याच्या बाबतींत तर अगदींच अलिप्त रहा. शक्य असेल तर या बाबी कटाक्षानें टाळा, आणि मग तुमच्याविषयीं प्रेमानें व सहानुभूतीनें विचार करणाऱ्याच्या मनांत जरी द्वेष व तिरस्कार निर्माण झाला तरी चालेल.

१९६९ ते १९७४ या ६ वर्षांच्या कालांत तूळेंतून भ्रमण करणारा हर्षल हा तुमच्या जीवनाशीं अनेक प्रकारें निगडित आहे. सामर्थ्य व व्यक्तिमत्व, याबद्दल हर्षल सुप्रसिद्ध आहे. जुने संबंध तोडणें, नवीन निर्माण करणें, नवीन गोष्टींविषयीं आवड उत्पन्न होणें, नवीन कार्यक्रम हातीं घ्यावेसे वाटणें, इत्यादि इच्छा मनांत निर्माण करून, मनाला अस्वस्थ करण्याचें काम हर्षल करीत असतो. तुमच्या घरगुती व मित्रत्वाच्या संबंधामध्यें अस्थिरता निर्माण करण्याचें कार्य हर्षल करील; आणि या सहा वर्षांत बहुसंख्य मेष–रवि व्यक्तींच्या वैयक्तिक जीवनांत घोटाळे व गुंतागुंत निर्माण होईल कीं काय अशी साधार भीति वाटते. अर्थात तुमची जन्मतारीख मार्चच्या शेवटीं येते का एप्रिलच्या मध्यावर येते, यावर प्रत्यक्ष वेळ अवलंबून आहे. तथापि बहुतेक सर्व मेष–रवि व्यक्तींना मोठ्या प्रमाणांत उलथापालथ होऊन घरगुती वातावरण बदलण्याचें व कामधंद्यांतहि बदल झाल्याचें आढळून येईल.

१९७५ मध्यें गुरूनें मेष राशींत प्रवेश केल्यावर, व नेपच्यूनचें धनु राशींतून भ्रमण सुरू झाल्यानंतर तुमच्याभोंवतीं सुखी, समाधानी, व आनंदी वातावरण पसरलें असल्याचें अनुभवास येईल. १९७५ व त्यापुढील कांहीं वर्षे अतिशय उत्साही व कर्तृत्वशक्तीनें परिपूर्ण अवस्थेंत असाल. कोणत्याहि क्षेत्रांत तुम्ही मागें राहणार नाहीं. शोधक वृत्तीची जरूरी असणाऱ्या कार्यासाठींच तुमचा जन्म झालेला असून, त्या व त्यापुढील कांहीं वर्षांत जीवनांतील महत्वाकांक्षा सफल झाल्याचा आनंद तुम्ही उपभोगाल, याचवेळीं समाजांत तुम्हीं तुमचें 'मानाचें पान' सहजगत्या मिळवाल. भरपूर प्रमाणांत पैसाच तेवढा तुमच्याकडे येईल असें

नसून, निराशेच्या काळांत स्वतःला मार्गदर्शन मिळावें म्हणून लोक तुमच्याकडे सल्ला मागण्यासाठीं, तुम्हांला नेतृत्व स्वीकारण्याची विनंती करण्यासाठीं म्हणून येतील. १९७५ सालापासून प्रगतीच्या मार्गावर असलेल्या, व सुखी लोकांच्या यादींत तुमचें नांव सर्वांत वर असेल. आणि जर नेतृत्व करण्याचे, स्वतः होऊन पुढाकार घेण्याचे गुण तुमच्या अंगीं असतील तर यश तुमच्या हातांत आहे. कोणत्या गोष्टीची जरूर आहे, हें तुमचें तुम्हीं ठरवावयाचें आहे. मुख्य गोष्ट ही आहे कीं, ज्या गोष्टी पार पाडण्याचें सामर्थ्य तुमच्या अंगीं असेल त्या सर्वांत यश मिळेल. *तुमचा रवि मेषेंत असल्यानें, हें नेहमींच लक्षांत ठेवावें कीं, मेष-रवीचें निदर्शक चिन्ह (पौराणिक कालांतील वा व्यवहारांत आपल्या सामर्थ्यानें पुढें जाण्याची शक्ति असलेला) प्रसिद्ध 'मेंढा' आहे. या राशीच्या पद्धति वा मार्ग नेहमींच सौम्य स्वरूपाचे असतील असें नाहीं. सहजगत्या अथवा रुबाबांत एखाद्याचें मन वळविलें जाईल अथवा मार्गदर्शन केलें जाईल अथवा तो शरणागति पत्करील हें असंभवनीय आहे—परंतु तो 'तेथें पोहोंचेल—' आणि तें सुद्धां मार्गांत आडवे आलेल्यांना, अथवा सकटांना झुंज देऊन, दोन हात करून, प्रतिकार करूनच !!

---



# वृषभ–रवि

(कोणत्याहि वर्षांतील २१ एप्रिल ते २१ मे या काळांत जन्मलेले लोक)

## आर्थिक भविष्य

वृषभ–रवि व्यक्तींच्या बाबतींत आतां एक गोष्ट सिद्ध झाली आहे; ती ही कीं, त्यांना धंद्याला लागणारी बुद्धिमत्ता चांगलीच लाभलेली असते. त्याचे त्या क्षेत्रांतले अंदाज क्वचितच चुकतात. अर्थशास्त्रव्याप्त अशा या जगांत जर वृषभ–रवि व्यक्ति नसत्या, तर जिकडे तिकडे अव्यवस्था व गोंधळ माजलेला आहे, असें दृष्टीस पडलें असतें. धंदेवाईक बुद्धिमत्ता लाभलेल्यांनाहि आपल्या या शक्तीचें फल आपणांस केव्हां मिळूं शकेल हें माहीत असणें अत्यावश्यक असतें, ही एक गोष्ट ज्योतिषशास्त्रीय सत्य आहे. या ठिकाणीं मी तुम्हांला कांहीं महत्त्वाचे कालविभाग निर्देशित करीत आहें आणि त्या कालविभागांत तुम्ही जे कांहीं योग्य प्रयत्न कराल, त्याला सुदैवाचें साहाय्य झाल्याविना राहणार नाहीं. आणि तुम्ही त्यावर पूर्णपणें श्रद्धा ठेवून जर तुमचें सामर्थ्य व प्रयत्न पणाला लावलेत तर तुम्ही ‘खोऱ्या’नें पैसा ओढूं शकाल यांत संदेह नाहीं. वृषभ–रवि व्यक्तींच्यांत कालाविभागानुसार मी आणखी कांहीं सूक्ष्म भेद पाडीत आहें, त्यावरून तुम्हांला विशेष स्पष्टपणें मार्गदर्शन उपलब्ध होईल. ग्रहांचें फेरफारात्मक असें जे सामर्थ्य असतें, त्यावरून द्रव्यलाभाच्या दृष्टीनें तुम्हांला सुदैवी दिवस कोणते हें कळून येईल.

कोणत्याहि वर्षाच्या २१ एप्रिल ते १ मे पर्यंतच्या काळांत जर तुमचा जन्म झालेला असेल तर अधिक पैसा मिळविण्याची तुमची महत्वाकांक्षा खालीं दिलेल्या महिन्यांत सफल होईल. ते महिने म्हणजे जानेवारी व ऑगस्ट १९५६; मार्च ते जून आणि नोव्हेंबर व डिसेंबर १९६०; मे १९६४; नोव्हेंबर व डिसेंबर १९६७; जानेवारी व फेब्रुवारी १९६८;

जुलै व ऑगस्ट १९६८; मार्च ते जुलै व ऑक्टोबर–नोव्हेंबर १९७२; एप्रिल व मे १९७६; ऑक्टोबर, नोव्हेंबर, डिसेंबर १९७९; जानेवारी ते जुलै १९८०.

कोणत्याहि वर्षांच्या २ मे ते ११ मे च्या दरम्यान जर तुमचा जन्म झालेला असेल तर द्रव्यलाभाच्या दृष्टीनें खालील महिने तुम्हांस लाभदायक आहेत. ते महिने म्हणजे—सप्टेंबर व ऑक्टोबर १९५६; जानेवारी १९६१; जून, जुलै व डिसेंबर १९६४; जानेवारी व फेब्रुवारी १९६५; सप्टेंबर १९६८; डिसेंबर १९७२; जानेवारी १९७३; जून १९७६; ऑगस्ट सप्टेंबर १९८०.

कोणत्याहि वर्षांच्या १२ मे ते २१ मे या काळांत तुमचा जन्म झालेला असेल तर, तुमचे सर्व प्रयत्न यशस्वी होऊन तुम्हांला द्रव्यलाभ होईल, असें दर्शविणारे महिने खालीं दिलेले आहेत. ते म्हणजे—नोव्हेंबर, डिसेंबर १९५६; मार्च ते ऑगस्ट १९५७; फेब्रुवारी, मार्च, सप्टेंबर व ऑक्टोबर १९६१, ऑगस्ट ते नोव्हेंबर १९६४; मार्च व एप्रिल १९६५; ऑक्टोबर व नोव्हेंबर १९६८; मे ते जुलै १९६९; जानेवारी व फेब्रुवारी १९७३; जुलै, ऑगस्ट, नोव्हेंबर व डिसेंबर १९७६; जानेवारी ते मार्च १९७७; सप्टेंबर, आक्टोबर १९८०.

## संकटाची व समाधानाची वेळ

मार्च १९५५, फेब्रुवारी १९५७, १९५८ चा शरदृऋतु आणि १९५९ चा वसंतऋतु हा काल या आगामी वर्षांतील नवीन योजना हातीं घेण्याच्या दृष्टीनें व त्यासाठीं विशेष परिश्रम घेण्याच्या दृष्टीनें आदर्श आहे. परंतु डिसेंबर १९५५, डिसेंबर १९५७, आणि नोव्हेंबर १९५९ या महिन्यांतील परिस्थिति प्रतिकूल असल्यामुळें व ती तुमच्यापुढें अनेक अडचणी निर्माण करणारी असल्यामुळें, कोणतेंहि नवीन साहस करूं नये अशी सूचना करावीशी वाटते. वर उल्लेखिलेल्या महिन्यांत तुमची प्रकृतिसुद्धां खालावण्याचा योग आहे.

१९५७ मध्यें जेव्हां नेपच्यून वृश्चिकेंत प्रवेश करील तेव्हां तो तुमच्या वैयक्तिक जीवनांत गुंतागुंत निर्माण करील. विशेषतः १९५९ ते १९६१ च्या

आसपास मोठ्या 'प्रमाणावर एकमेकांविरुद्ध निष्ठा दाखविण्याचे प्रसंग तुम्ही शक्य तो टाळावेत.

१९६२ नंतरच्या कालांत तुम्ही जें कांहीं हातीं घ्याल तें तडीस जात असल्याचें दृष्टीस पडण्याचा आदर्श काल तुमच्या जीवनांत येत आहे. या कालांत स्वतःच्या ज़ीवनाच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाच्या अशा कांहीं नवीन कार्यक्रमांची वा योजनांची सुरुवात करावी असें तुम्हांस वाटूं लागेल. ज्या वेळेला ज्योतिषी शुभ वेळ समजतात, अथवा योग्य गोष्ट योग्य व शुभ वेळेला सुरू व्हावी असें आपल्याला वाटत असतांना आपण ज्या वेळेची वाट पहात असतों, अशी आदर्श शुभ वेळ वा शुभ कालखंड या ठिकाणीं दिलेले आहेत. ते म्हणजे—जून १९६२, मे व जून १९६४, मे १९६६, एप्रिल १९६८, मार्चचा मध्य ते एप्रिलचा मध्य १९७०, फेब्रुवारीचा मध्य ते मार्चचा मध्य १९७२, सप्टेंबर व ऑक्टोबर १९७३, जानेवारी व फेब्रुवारी १९७४, जुलै व ऑगस्ट १९७५. जून, जुलै १९७७; जून १९७९ मे १९८१. या ठिकाणीं तुम्हांला एप्रिल १९६८ च्या आसपासच्या काळाविषयीं थोडीशी महत्त्वाची पूर्व–सूचना करावीशी वाटते. या वेळीं तुम्ही कायद्याच्या चक्रांत अडकले जाण्याचा संभव असून त्याचे निकालहि तुम्हांला अनुकूल लागण्याचा संभव अगदींच कमी आहे. या गोष्टींत जुळतें घेणें हा सर्वोत्तम व शहाणपणाचा मार्ग ठरेल.

या उलट पुढील वर्षांत तुमच्या आप्तेष्टांकडून व मित्रमंडळींकडून विरोध केला जाणारे, तुम्हांला अडचणींत लोटणारे असे कांहीं कालखंड आहेत. या कालखंडांना ज्योतिषशास्त्रदृष्ट्या अशुभ वेळ असें मानण्यांत येतें. या वेळीं महत्त्वाच्या अशा कोणत्याहि नवीन कार्यास प्रारंभ न करणें हें शहाणपणाचें ठरेल. कारण त्या कार्यांपासून इच्छित फलप्राप्ति कधींहि होणार नाहीं. या काळांत कोणत्याहि महत्त्वाच्या कृति शक्य तों टाळा, आणि हे कालखंड तुम्हांला विश्रांति व स्वास्थ्य घेण्यास जरी उपयोगी ठरले तरी तुम्ही स्वतःस 'बुद्धिमान्' व हुशार समजण्यास हरकत नाहीं. खालील कालविभाग तुम्हीं नीट नमूद केले पाहिजेत—

**ऑक्टोबर १९६३; सप्टेंबर १९६५; मार्च व ऑगस्ट १९६७; जाने-**

वारी व फेब्रुवारी १९६९; डिसेंबर १९७०; जानेवारी १९७१ चा कांहीं काल, डिसेंबर १९७२; नोव्हेंबर १९७४, नोव्हेंबर १९७६, ऑक्टोबर १९७८; सप्टेंबर, ऑक्टोबर १९८०; सप्टेंबर १९८२. या कालविभागांविषयीं धोक्याची पूर्वसूचना देणें हें मी माझें कर्तव्य समजतें. ऑगस्ट १९६७ च्या आसपास कुटुंब व पैसा या बाबतीतील भांडणतंट्यांत तुम्ही गोंवले जाऊन, तुमच्या कल्पना व विचार हे योग्य रीतीनें आंखले असतांहि, तुमचें परिस्थितीवरील नियंत्रण सुटलेलें आहे असें अगदीं अनिच्छेनें पहाण्याचें तुमच्या नशिबीं येईल. १९६७ च्या आसपास तुमची प्रकृति खालावण्याचा धोका आहे हें लक्षांत घ्या, व " वेळींच मारलेला एक टांका पुढचे नऊ टांके वांचवितो " या अर्थाची इंग्रजी म्हण ध्यानांत ठेवा.

## विविध

१९५५ मध्यें वृश्चिकेंतून शनीचें होणारें भ्रमण हें कुटुंब व घरगुती गोष्टी यांच्या दृष्टीनें महत्त्वाच्या घडामोडींचें दिग्दर्शन करीत आहे. घरगुती वातावरणांत बदल घडवून आणण्याची जास्तींत जास्त शक्यता निर्माण होत आहे. अर्थात् याचें कारण, तुम्ही वृषभ–रवि व्यक्ति असल्यामुळें धंद्यांतील अटकळी माहीत असतात; व हा काल तुम्हांस मालमत्ता घेण्यास योग्य आहे हें तुम्ही ओळखूं शकाल. घरांतील इतर मंडळीच्यामुळें, अशा कांहीं घटना घडतील कीं ज्यांच्यामुळें कांहीं घरगुती अडी-अडचणी निर्माण होतील. नातेवाईकांची तुमच्यावर जबाबदारी पडण्याचा संभवहि आहे.

वृषभ–रवि व्यक्तींच्या अंतर्गत मनांत सुरक्षिततेची व स्थाइक होण्याची अतिशय तीव्र इच्छा असते. पुढील कांहीं वर्षांत तुमची ही इच्छा थोडयाफार प्रमाणांत पुरविली जाईल. याचा जरी तुम्हांला फारसा उपयोग करून घेतां आला नाहीं तरी तुम्हां वृषभ–रवि व्यक्तीना अधूनमधून डोकें वर काढण्यास त्याचा चांगलांच उपयोग होणार आहे. आणि तुमच्यापैकीं ज्या कांहीं व्यक्तींना कांहीं गोष्टींत पहिला क्रमांक पटकाविणें जमतें त्यांना असा सल्ला द्यावासा वाटतो कीं, तुम्ही स्वतःच्या इच्छेनुसार कांहीं नवीन योजना हाताळाव्यात, म्हणजे तुमची कर्तृत्वशक्ति गंजून जाणार नाहीं. कारण शनि वृश्चिकेंत असतांना तुमचे पाय ओढण्याचा कोणी तरी

प्रयत्न करील, व प्रगति व्हावी म्हणून तुम्ही जरुरीपेक्षांहि अधिक परिश्रम घ्याल; अर्थात् या वेळेला तुमची प्रगति आणखी चांगली झालेली असेल.

१९५५ ते ५८ या काळांत तुमच्या धंद्याचें वातावरण बिघडेल, व विशेषत: १९५७ मध्यें तुम्हांला बराच त्रास होईल, आणि १९५८ मध्यें जे कांहीं बदल घडून येतील, ते तुम्हीं असमाधानी झाल्यामुळें तुम्हांला भविष्य काळाविषयीं बऱ्याच प्रमाणांत निराशावादी बनवितील.

१९५८पासून जवळ जवळ १९७० पर्यंत, अतिशय गूढ ग्रहांतील एक ग्रह नेपच्यून, वृश्चिक राशींतून भ्रमण करील; व त्याचा परिणाम म्हणजे गोंधळाचें वातावरण निर्माण करणारे अथवा गुंतागुंतीचे व संभ्रमांत पाडणारे संबंध जोडले जातील. १९६९ व १९७० हीं वर्षें तर या दृष्टीनें अधिक गोंधळांचीं व अव्यवस्थेचीं आहेत. अर्थात् कांहींहीं असलें तरी तुमच्या जीवनांतील हीं १२ वर्षें तुमच्या मनांत "जनतेची सेवा करावी व त्यांच्या-मध्यें मिसळून जावें" अशी ज्वलंत इच्छा निर्माण करतील. परंतु जनतेंतील सर्वांचा तुमच्याविषयीं सर्वकाल चांगला ग्रह राहील असें जरी नसलें, तरी तुमच्या एकूण सेवेपैकीं बरीच सेवा लोकांकडून मानसन्मानास पात्र होईल. तुमच्या बऱ्याच योजना यशस्वी होतील. तुमच्या सेवेचें फल तुम्हांस १९६४–६५ मध्यें मिळण्याचा दाट संभव आहे.

तुम्ही ज्या कळकळीनें व आत्मीयतेनें नवीन संबंधितांविषयीं विचार करतां, तितके ते नवीन संबंधित त्याला पात्र ठरत नाहींत. विशेषत: तुम्हांला अतिशय जवळचे वाटणारे तुमचे नातेवाईक व जिवलग मित्र, आणि त्यांतूनहि तुमच्या जीवनांत नव्यानेंच प्रवेश करणाऱ्या भिन्न–लिंगाच्या व्यक्ति १९६२ सालांतील शेवटचे तीन महिने, १९६३ सालांतील शेवटचा महिना, १९६६ सालांतील पहिले तीन महिने, सप्टेंबर १९६८, नोव्हेंबर १९६९, आणि १९७० सालांतील शेवटचे तीन महिने, तुमच्याबरोबर प्रणयाचे खेळ खेळून तुम्हांला शेवटीं फसवतील. एवढेंच नव्हे, तर तुमच्या सामाजिक नांवलौकिकाला कलंक लावतील, व समाजांत तुम्हाला जी मानमान्यता मिळत असते तिला धोका उत्पन्न करतील. या काळांत भावनेच्या दृष्टीनें गोंधळलेल्या मन:स्थितींत तुम्ही

सांपडाल, आणि वृषभ-रवि व्यक्ति असल्यामुळें अंतःकरणापासून सनातनीपणा व निष्ठा हे तुमचे आवडते गुण असले तरी तुमचें सामाजिक कार्य तुमच्या नातेवाइकांना व मित्रांना पसंत पडत नाहीं असें तुम्हांला आढळून येईल. तुमच्या जीवनांत नव्यानेंच प्रवेश करणाऱ्या, व तुम्ही ज्यांच्यावर अतोनात प्रेम करतां अशा व्यक्तींमुळें तुमच्या नातेवाइकांना व पूर्वीच्या मित्रांना तुमच्याबरोबर संबंध ठेवणें वाईट आहे असें वाटूं लागलेलें आहे, असें तुम्हांस या काळांत दिसून येईल.

याच काळांत तुमच्या वैयक्तिक वा धंद्याच्या क्षेत्रांत अशी एखादी व्यक्ति येईल कीं, जिला आपण आपली जन्माची जोडीदार करावें, अशी इच्छा तुमच्या मनांत तीव्रतेनें निर्माण होईल, अशी दाट शक्यता आहे. परंतु ज्योतिषशास्त्रदृष्ट्या या काळांत जन्माचा जोडीदार निवडण्याच्या बाबतींतली तुमची घाई चुकीची ठरणार आहे, व तुम्हांला त्रासदायक ठरणार आहे. निदान सामाजिक दृष्ट्या तरी तें व्यवहार्य ठरणार नसून क्रान्तिकारक ठरणार आहे. प्रत्येक वृषभ-रवि व्यक्ति ही मनानें खंबीर असल्याकारणानें जीवनाचा साथीदार निवडण्याच्या बाबतींतील भावना व स्वप्नें यांच्यावर नियंत्रण ठेवण्याचें मनःसामर्थ्य तुमच्याजवळ आहे, त्याचा तुम्ही पूर्ण उपयोग करा. त्यापुढील वर्षांत तुमचें जीवन या संबंधामुळें सुखी व समाधानी जावें असें वाटत असेल, तर तुम्हीं, मीं आतां वर सांगितलेल्या गोष्टींची योग्य ती दखल घेतली पाहिजे असें पुनः पुन्हां सांगावेंसें वाटतें. तुमच्याजवळ व्यवहारज्ञानाला उपयुक्त असा मेंदु आहे, व त्याचा उपयोग करण्याचा हा काळ आहे, नुसत्या भावनेच्या आहारीं जाऊं नका !

१९६१ ते १९६७ च्या काळांत आन्तरराष्ट्रीय क्षेत्रांत जी कांहीं अव्यवस्था व अशांतता निर्माण होईल, त्यामध्यें तुम्हांला फार मोठी व महत्त्वाची भूमिका पार पाडावी लागेल; आणि तुम्हांला असें आढळून येईल कीं, जेथें इतरांना अपशय पत्करावें लागत आहे, तेथें तुम्ही मात्र विजय संपादन करीत आहांत. विशेषतः १९६४ व १९६५ या सालीं तुमच्या योजना तुम्हांला फक्त आर्थिक व आध्यात्मिकदृष्ट्या यश मिळवून देतील असें नसून,—तुम्ही जें जें कांहीं कराल त्यांत तुम्ही यशस्वी व्हाल.

एखादें नवीन ' साहस ' केल्यास तुम्हांला त्यांत हमखास यश मिळेल; तथापि ही प्रगति अतिशय वेगवान असणार नाहीं. १९६९ च्या मध्यापर्यंत या जगांत तुम्ही एकसारखी समाधानकारक प्रगति करीत रहाल; व समाजांतसुद्धां तुम्हांला आदराचें स्थान प्राप्त होईल. या पांच वर्षांत तुम्ही आर्थिक दृष्टया जी प्रगति करून घ्याल त्यामुळें त्यापुढील संकटकालांत त्या द्रव्याचा उपयोग होऊन, तुम्ही तुमचें जीवन सुखमय करूं शकाल. कारण १९६९ मध्यें शनि वृषभ राशींत प्रवेश करीत असून, तो १९७१ च्या मध्यापर्यंत तेथेंच ठाण मांडून राहणार आहे. या वेळीं प्रगति थांबेल; एवढेंच नव्हे तर यापूर्वीच्या काळांत तुम्ही जें कांहीं मिळविलेलें असेल त्याच्यावरच तुम्हांला तुमचा चरितार्थ कांहीं काल चालवावा लागेल. विशेषत: १९७० साल तुमच्या प्रयत्नांचा व परिश्रमांचा अंत पाहील. १९७० सालीं तुमची प्रकृतीहि बिघडेल व तुम्हांला विश्रान्तीची आवश्यकता वाटेल.

१९७०–७१ सालीं द्रव्याची टंचाई भासूं लागेल व आर्थिक परिस्थिति खालीं गेल्याचें तुमच्या लक्षांत येईल. आणि पैशाचा अपव्यय व गळती थांबविण्याकडे जर तुम्हीं शहाणपणानें लक्ष दिलें नाहीं तर संपत्तीच्या बाबतींत सामान्यपणें तुम्हीं जो नांवलौकिक कमावलेला असेल तो टिकवून धरणें तुम्हांला कठीण जाईल. कारण वृषभ–रवि व्यक्ति, दिसतात त्यापेक्षां अधिक संपत्तिमान आहेत, अशी सामान्य समजूत असते. लोकांच्या या समजुतीबद्दल तुम्हांला स्वतःचा अभिमान वाटायलाहि हरकत नाहीं. परंतु या समजुतीला ' धक्का ' लागणार नाहीं, व तुमच्याविषयींचा आदर कमी होणार नाहीं याविषयीं १९७० व १९७१ मध्यें चांगली काळजी घ्या. १९७१ च्या सुरुवातीच्या काळांत आपलें सामर्थ्य कमी होत चाललें असल्याची जाणीव तुम्हांला होईल. खरें पहातां तुमचें ' कमी ' झालेलें ' नांव ' व ' स्थान ' दीर्घ प्रयत्नानें व सुदैवाच्या सहाय्यानें १९७२ व १९७३ मध्यें तुम्ही पुनश्च मिळवूं शकाल.

१९७६ मध्यें तुम्ही पुन्हा पूर्वीच्याच उत्साहानें ' उभे ' रहाल. त्यानंतरच्या ४–५ वर्षांत तुम्हांला मानसिक व आर्थिक शांतता व सुख प्राप्त होईल, आणि तुम्हांला तुमच्या दूरदृष्टीचें व दीर्घ परिश्रमांचें योग्य

तें बक्षीस मिळालें आहे असेंच आढळून येईल. तुमचा जन्म ज्या 'स्थानासाठीं' झालेला आहे तें ' स्थान ' तुम्हांला मिळाल्याचें जगाला दिसून येईल.

परंतु हा काल संपूर्णपणें निर्विवाद व निर्विरोध जाईल असें दिसत नाहीं. कारण १९७६–१९७८ च्या काळांत असे कांहीं प्रमुख ग्रहयोग होत आहेत कीं, जे तुमच्या घरीं आणि कुटुंबांत तऱ्हेवाईक परिस्थिति निर्माण करतील. सुखांत आणि शांततेंत पारिवारिक जीवन व्यतीत करण्यांत खंड पडेल. या कालीं धंद्यांतील अथवा आयुष्याचा जोडीदार तुमच्या योजना समजूं न शकल्यामुळें विरोध करील किंवा मोडता घालण्याचा प्रयत्न करील. त्या वेळीं तुमच्या कामांत ढवळाढवळ न करतां तुमच्या कामाचे व योजनांचे भावी परिणाम पहावे असें सुचविणेंच हिताचें ठरेल. कारण १९७७–७८ सालीं हातीं घेतलेल्या कामाचा शेवट समाधानकारक व मनपसंतच होईल. तुम्हांला धंदेवाईक बुद्धिमत्ता व अचूक अंदाज वर्तविण्याची अटकळ प्राप्त झालेली आहे, हें लक्षांत घ्या. फक्त तुम्हीं या शक्तीचा, वा दैवी देणगीचा उपयोग करून घेण्याची जरूरी आहे.

१९७८ च्या अखेरच्या तीन महिन्यांत जोडीदार खूष झालेले आहेत, आणि तुमच्या सामर्थ्यावर त्यांचा विश्वास बसला आहे असें उघडपणें दिसून येईल. या काळीं वृषभ–रवि तरुण व तरुणी यांच्या मनांत लग्न करून आयुष्याला स्थिरता आणण्याची प्रबळ इच्छा दिसून येईल. १९७९ आणि १९८० मध्यें तुमचे नवीन व तऱ्हेवाईक भागीदार तुमच्या योजना व कार्यक्रम बदलावयास भाग पाडतील. त्यांची वागणूक व प्रचारामुळें समाजांतील तुमच्या कीर्तीस व मानास काळिमा लागण्याची भीति दिसते. १९८० च्या उत्तरार्धांत नाइलाज होऊन तुम्हाला तुमच्या कार्यक्रमांत व व्यक्तिगत संबंधांत कांहीं फेरफार पत्करावे लागतील.

परंतु या फेरबदलामुळें तुमच्या आर्थिक किंवा आधिभौतिक प्रगतीवर विशेष वाईट परिणाम होणार नाहीं. १९८० सालीं कांहीं कारणामुळें स्थान परिवर्तन करण्याची जरूरी वाटेल; अथवा मुलांचे शिक्षणासाठीं कांहीं नवीन बंदोबस्त करावा लागेल. कांहीं झालें तरी १९८० सालांतील शेवटच्या तीन महिन्यांत धंद्यांत किंवा नोकरींत उन्नति होत आहे असें दिसून येईल.

---

# मिथुन–रवि

( कोणत्याहि वर्षांच्या २२ मे ते २१ जून या काळांत जन्मलेले लोक )

## आर्थिक भविष्य

द्रव्याकडे पाहण्याचा प्रत्येकाचा दृष्टिकोन निराळा असतो. प्रत्येकाच्या कल्पना निराळ्या असतात. मिथुन–रवि व्यक्ति जरी लागलीच द्रव्याच्या बाबतींत आकर्षित होत असल्या, द्रव्यवश होत असल्या तरी द्रव्याचें मूल्य-मापन या व्यक्ति अगदींच अलिप्ततेनें व निराळ्याच पद्धतीनें करतात. लोकांनीं आपणांस श्रीमंत म्हणावें म्हणून द्रव्यसंचय करण्याचें मिथुन–रवि व्यक्तींच्या स्वप्नांतहि येत नाहीं. ते पैसे मिळवितात, पण आपण श्रीमंत आहोंत हें दाखविण्यासाठीं ते पैसे हे लोक खर्चहि करतात. जीवनाला उप-योगी पडणारें एक साधन, यापलीकडे ते पैशाचा कधींहि विचार करीत नाहींत. परंतु ही अत्यंत जरूरीची गोष्ट जेव्हां मिळणें शक्य असतें, तेव्हां अधिक श्रीमंत होण्यास साहाय्यभूत असे शुभग्रहयोग केव्हां घडून येतात, याची माहिती असणें अवश्य ठरतें; व म्हणूनच तें श्रीमंतीचें स्वप्न साकार करणारे शुभ कालखंड या ठिकाणीं निर्देशित करीत आहें. तुम्हीं जर लक्ष पुरविलेंत तर तुमची अधिक द्रव्य मिळविण्याची इच्छा अधिक सहजरीत्या सफल होईल, एवढेंच या ठिकाणीं सांगूं इच्छितें.

कोणत्याहि वर्षांतील २२ मे ते १ जून या दरम्यान तुमचा जन्म झालेला असेल तर खालील कालविभाग तुम्हांला शुभयोगी ठरतील. जानेवारी व फेब्रुवारी १९५७; सप्टेंबर १९५७; एप्रिल ते ऑगस्ट व नोव्हेंबर–डिसेंबर १९६१; मे १९६५; डिसेंबर १९६८; जानेवारी ते एप्रिल व ऑगस्ट १९६९; मार्च, ; ऑगस्ट ते डिसेंबर १९७३; सप्टेंबर–ऑक्टोबर १९७६; एप्रिल–मे १९७७; नोव्हेंबर–डिसेंबर १९८०.

कोणत्याहि वर्षांतील २ जून ते ११ जून या दरम्यान तुमचा जन्म

झालेला असेल तर द्रव्याच्या दृष्टीनें तुमच्या योजना पुढील कालविभागांत यशस्वी होतील:—ऑक्टोबर-नोव्हेंबर १९५७; जानेवारी-फेब्रुवारी १९६२; जुलै १९६५; सप्टेंबर-ऑक्टोबर १९६९; मे ते जुलै १९७३; जानेवारी १९७४; जून १९७७.

आणि जर तुमचा जन्म कोणत्याहि वर्षाच्या १२ जून ते २१ जूनच्या दरम्यान झालेला असेल तर द्रव्याच्या दृष्टीनें खालील कालविभागांत तुमच्या योजना यशस्वी होतील:—डिसेंबर १९५७; जानेवारी, एप्रिल तें सप्टेंबर १९५८; मार्च १९६२; ऑगस्ट, सप्टेंबर व डिसेंबर १९६५; जानेवारी ते एप्रिल १९६६; नोव्हेंबर-डिसेंबर १९६९; जून ते ऑगस्ट १९७०; फेब्रुवारी--मार्च १९७४; जुलै--ऑगस्ट १९७७; फेब्रुवारी—मार्च १९७८.

## संकटाची व समाधानानची वेळ

नवीन कल्पनांच्याशीं अगदीं जलद जुळवून घेण्याच्या सामर्थ्यामुळें मिथुन--रवि व्यक्ति ह्या उत्साही असल्यानें व त्यांच्या अंगीं तडफ असणें साहजिक आहे. पुढील वर्षांत मे १९५५ भोंवतीं त्यांच्या जीवनांतील सुदैवी काळ केंद्रित झालेला आहे. त्याचप्रमाणें एप्रिल १९५७ व मार्च १९५९ हे महिनेसुद्धां महत्त्वाचे व सुदैवी आहेत. या काळांत कांहीं तरी नवीन आणि कठिण गोष्ट पार पाडण्याची स्फूर्ति त्यांना प्राप्त होईल. आणि ती इतकी प्रभावी असेल की, त्यामध्यें त्यांना हमखास यश प्राप्त होईल. या वेळीं नवीन बदल व सुधारणा घडून येतील.

मिथुन--रवि व्यक्ति जितक्या सहजपणें अथवा भारदस्तपणें एखादी गोष्ट करतात तितक्या सहजपणें वा भारदस्तपणें ती दुसऱ्या कोणालाहि जमत नाहीं, हें एक ज्योतिषशास्त्रीय सत्य आहे. परंतु पुढें जे कांहीं कालखंड दिलेले आहेत, त्या वेळीं तुमचें 'दुधारी' मन सदैव तत्पर ठेवणें जरूर आहे. एकाच शरीरांत तुम्हांला दोन मनें असल्यानें त्या दोहोंच्यासाठीं तुम्हीं असे निरनिराळे मार्ग शोधले पाहिजेत कीं, जे शेवटीं तुमचें इच्छित ध्येय मिळवून देतील व तेथेंच एकत्र येतील. तुम्हांला संधि मिळवून देणारे असे हे कालखंड आहेत, व या वेळीं जर योग्य प्रयत्न अगदीं योग्य वेळीं केले

तर त्यापासून तुम्हांला इच्छित फलप्राप्ति होईल. कारण या काळांत दैव तुम्हांला अनुकूल असेल. पुढील वर्षांतील शुभकारक व फलदायी अशा या कालखंडाची तुम्ही जरूर नोंद करून ठेवावी. जुलै (मध्य) ते ऑगस्ट (मध्य) १९६२; जुलै १९६४; जून, व जुलै ( कांहीं भाग ) १९६६; मे (मध्य) ते जून (मध्य) १९६८; मे १९७०; एप्रिल १९७२; मार्च–एप्रिल १९७४; सप्टेंबर, ऑक्टोबर, डिसेंबर १९७५; जानेवारी ते मार्च १९७६; जुलै (मध्य) ते ऑगस्ट (मध्य) १९७७; जुलै १९७९. या ठिकाणीं तुम्हीं एक गोष्ट विशेषत्वानें नमूद करून ठेवावी ती अशी कीं, १९७६ सालांतील पहिल्या तीन महिन्यांत तुमच्या योजना अकल्पितपणें आणि आश्चर्यकारक रीतीनें पार पडलेल्या व त्यापासून तुमचा कांहीं तरी फायदा झालेला आहे असें दिसून येईल. या वेळेचा, व या संधीचा तुम्हीं योग्य तो उपयोग करून घेतला नाहीं तर ती तुमच्या आयुष्यांतील एक फार मोठी चूक समजावी लागेल. कारण "बैल गेला नि झोंपा केला" ही म्हण तुम्हांला लागू पडण्यासारखे तुम्हीं लोक असतां. तुमच्या या स्वभावामुळेंच मी ही गोष्ट वारंवार बजावून सांगितलेली आहे.

अर्थात् गुंतागुंतीचे प्रश्न व अडचणी निर्माण करणाऱ्या दुर्दैवाचा कांहींसा कालखंड तुमच्या वांट्याला येणारच; त्या वेळीं अशी विरोधी परिस्थिति निर्माण होईल कीं, तुमच्या दृष्टिकोनांत व कार्यपद्धतींत निश्चित बदल घडून येईल. फेब्रुवारी १९५६, जानेवारी १९५८ आणि डिसेंबर १९५९ हे तीन महिने अशा प्रकारचे आहेत. व या वेळीं कोणत्याहि प्रकारचें साहस न करणें शहाणपणाचें ठरेल. कोणताहि नवीन उपक्रम हातीं घेण्याच्याऐवजीं चळवळ्या प्रकृतीच्या तुम्ही लोकांनीं आपल्या योजनांना लगाम घालणें हितकारक ठरेल.

कांहींहि झालें तरी, मिथुन राशींत रवि असतांना तुमचा जन्म झालेला असल्यामुळें, तुमचें सामर्थ्य तुम्हीं अनेक ठिकाणीं उपयोगांत आणाल, हें साहजिक आहे. आणि माझा असा विश्वास आहे कीं, तें तुमच्या बऱ्यासाठींच घडणार असून, तुमच्याशीं संबंधित आणि तुमच्यावर अवलंबून असणाऱ्यांचेंहि त्यांत भलेंच होणार आहे. पुढें दिलेल्या वर्षांत विचारपूर्वक

आंखलेल्या तुमच्या योजनामुळें तुमचें मानसिक अस्वास्थ्य तुम्हीं नाहींसें करूं शकाल. कारण या काळांत तुम्हीं भांडणामध्यें अगदीं सहज ओढले जाल, व त्यामुळें तुम्ही नेहमींपेक्षां अधिक प्रवास कराल, भटकाल; व अशा तऱ्हेनें विनाकारण पैशाचा अपव्यय कराल. त्याचबरोबर तात्पुरत्या अथवा कायम स्वरूपाचे जवळचे संबंध तुमच्यांत व तुमच्या एखाद्या नातलगांत निर्माण होतील. आणि म्हणून कोणत्याहि तऱ्हेचें भांडण टाळण्याच्या दृष्टीनें व शक्य तेवढे मानवी प्रयत्न करण्याच्या दृष्टीनें तुम्हीं पुढें दिलेले कालखंड नमूद करून ठेवणें इष्ट आहे.– डिसेंबर १९६१; नोव्हेंबर–डिसेंबर १९६३; ऑक्टोबर १९६५; आक्टोबर १९६७; मार्च ते सप्टेंबर १९६९; फेब्रुवारी १९७१; जानेवारी व फेब्रुवारीचा कांहीं काल १९७३; जानेवारी १९७५; डिसेंबर १९७६; नोव्हेंबर १९७८; तुमच्या जीवनाच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाचें कार्य हातीं घेण्याचें साहस करण्याचें निदान या कालखंडांत तरी शक्य तों टाळा. कारण वर दिलेल्या कालखंडांत सुरू केलेल्या कामापासून जें समाधान हवें असतें तें कधींच मिळणार नाहीं.

## विविध

१९६० पर्यंतच्या कालांत मिथुन रवि व्यक्तीचें आयुष्य हें विचित्र प्रकारचें व चित्तवेधक असेल. एका गोष्टीकडून दुसऱ्या गोष्टीकडे क्षणार्धांत आकर्षित होणें, एका जागेहून दुसऱ्या जागीं जाण्याची आवड निर्माण होणें, ही त्यांची मनोवृत्ति भूतकाळाप्रमाणेंच भविष्यकाळांतहि दिसून येईल. १९५७, १९५८ व १९६० या तीन वर्षांच्या सभोंवतीं तुमचें सुदैव गुंफलें गेलेले आहे.

मिथुन–रवि व्यक्तींच्यावर त्यांच्या मित्रांचा फार मोठा परिणाम घडून येतो. म्हणूनच त्यांचे संबंधित कोण, किंवा त्यांचे जीवन–साथी कोण या गोष्टीला फार महत्त्व असतें. त्यांचें जीवन तयार करणें अथवा त्याचा नाश करणें हें बऱ्याच अंशीं त्यांच्या मित्रांच्या हातीं असतें. १९५६ ते ५८ या काळांत त्यांची जबाबदार अशा वृद्ध व्यक्तींच्याशीं किंवा निराशावादी वृत्तीच्या लोकांच्याशीं मैत्री घडून येईल.

अर्थात् १९५५ नंतर एका जागीं स्थिर होण्याची त्यांना ओढ लागेल.

वस्तुत: १९५६–५७ मध्यें त्यांना एकाच प्रकारच्या जीवनाचा वीट येईल. याची प्रतिक्रिया १९५७–५८ मध्यें दिसून येईल. त्या वेळीं त्यांच्यात महत्त्वाचा बदल व जीवनांत बरीच उलथापालथ होईल. प्रवासाची त्यांची इच्छा अधिक अनिवार होईल. आणि पुष्कळ मिथुन–रवि व्यक्ति लांबच्या प्रवासावर व विशेषत: समुद्रमार्गें प्रवासास निघतील. ज्यांना आर्थिक दृष्ट्या किंवा दुसऱ्या कांहीं कारणांमुळें ही गोष्ट जमणार नाहीं ते राहातें घर बदलणें अथवा धंदा बदलणें या गोष्टी करतील. अर्थात् कौटुंबिक बंधनावर या गोष्टी अवलंबून राहतील. हीं बंधनें जर दृढ असतील तर १९५७–५८ च्या सुमारास अशा कांहीं घटना घडतील कीं, कुटुंबांतील इतर व्यक्तीसुद्धां त्यांत गुंफल्या जातील, आणि त्याचा तुमच्या जीवनावर आणि कार्यावर परिणाम होईल. कौटुंबिक बाबतींत एक अध्याय संपलेला आहे, असें जर तुम्हांला आढळून आलें तर तुम्हीं आश्चर्यचकित होऊं नका.

१९५७–५८ मध्यें धंद्यात व घरगुती बाबतींत तुमच्यावर पडणारी जबाबदारी शिखराला पोंचेल. आपलें जीवन मर्यादित व एकाच प्रकारचें होत नाहीं याबद्दल तुम्हांला काळजी घ्यावी लागेल. या काळांत तुमचें सामाजिक कार्यक्षेत्र तुम्ही शक्य तेवढें विस्तृत करावें व एकलकोंडेपणाचें जीवन निश्चयपूर्वक टाळावें.

आधिभौतिकदृष्ट्या १९६० व १९६१ हीं दोन वर्षें महत्त्वाचीं आहेत. या काळांत आर्थिक परिस्थितीमुळें पुष्कळ मिथुन–रवि व्यक्तींचें दैव बऱ्याच प्रमाणांत बिघडेल, आणि जर दूरदर्शीपणाचा अभाव असेल तर धंद्यांत व आर्थिक बाबतींत तोटा होईल. दूरदृष्टीनें पाहिलें तर १९५९-६० या वर्षांत कोणत्याहि प्रकारची महत्त्वाची जबाबदारी अंगावर न घेण्याची सावधगिरी बाळगणें शहाणपणाचें ठरेल.

१९६१ पासून १९८१ पर्यंत अनेक गमतीदार वर्षांतून तुम्हांला आपला जीवनरथ हांकावयाचा आहे. १९६१ ते १९७१ या कालांत गुरूचें अतिशय महत्त्वाचें भ्रमण तुम्हांला अनुकूल होणार आहे,–आणि तें म्हणजे १९६५ व १९६६ चा कांहीं भाग, या कालांत ! या कालांत तुमचे पूर्वीचें मनोरथ बऱ्याच अंशीं साध्य झाले आहेत, महत्त्वाकांक्षा सफल झालेल्या आहेत, असें अनुभवास येईल.

१९६१ पासून होणाऱ्या व १९७१ च्या मध्यास संपणाऱ्या, जवळ जवळ १० वर्षांच्या या कालांत सुदैवाची मालिका व भरभराट या गोष्टी तुमच्या नशिबांत लिहिल्या आहेत. १० वर्षांच्या या दीर्घ कालांत तुम्हीं खूपच प्रगति कराल. विशेषत: बहुसंख्य मिथुन–रवि व्यक्तींना १९६२ साल हें द्रव्यलाभाच्या दृष्टीनें व सर्वसाधारण प्रगतीच्या दृष्टीनें चांगलेंच भरभराटीचें जाणार आहे; व याच वेळीं घरगुती वातावरणहि समाधान-कारक व सुखाचें राहणार आहे. परंतु कोणत्याहि वर्षाच्या १० जून ते २० जून या कालांत जन्मलेल्यांना १९६३ साल हें खडतर व त्रासदायक जाणार आहे. या वेळीं या लोकांना, जो पैसा मिळेल असें खात्रीनें वाटतें, तो मिळाला नाहीं असें अनुभवास येईल. या लोकांच्याविषयीं या कालांत गैरसमज निर्माण होऊन त्यांच्या चांगल्या नांवाला काळिमा लावण्याची भीति निर्माण होईल.

अर्थात् १९६४ हें साल त्यांना चांगलें जाईल. तसेंच १९६५ व ६६ हीं वर्षें भरपूर भाग्यदायक व लाभदायक आहेत, असें मी आधींच सांगितलें असल्यानें त्याची जास्त चर्चा करण्याची जरूरी नाहीं. १९६७ मध्यें सामा-जिक प्रतिष्ठी व मानमान्यता मिळवून देणाऱ्या कार्यांत उतरण्याकडे तुमच्या मनाचा कल झुकेल. लोक तुमच्या सल्ल्याला फार मोठी किंमत देतील, व तुम्हाला बहुमानाची अशी एखादी जागाहि देऊं केली जाईल. तथापि तिचा मोह टाळून, तिला नकार देणें हेंच शेवटीं फायद्याचें ठरेल.

१९७१ पर्यंत प्रगतीचा हा जोर हळू हळू मंद होत जाईल, आणि कोठें तरी स्थाइक होण्याचे विचार तुमच्या डोक्यांत घोळूं लागतील. तथापि आर्थिक व आध्यात्मिक दृष्टया तुमची प्रगति अजूनहि समाधानकारकरीत्या चालूच राहील. १९७१ च्या मध्यापासून ते १९७४ च्या मध्यापर्यंत तुम्हीं तीन वर्षांच्या चक्रामध्में ( Cycle ) प्रवेश कराल, व या वेळीं तुम्हाला घरांतील लोकांकडून पैशाच्या प्रश्नांवर होणाऱ्या जोरदार विरोधास तोंड द्यावें लागेल. परंतु आर्थिक प्रश्नांत सर्वच कुटुंबियांचे हितसंबंध गुंतले असले तरी तुम्हीं या विरोधाला वाजवीपेक्षां जास्त किंमत देण्याचें कारण नाहीं.— निदान १९७३ च्या शेवटापर्यंत तरी ! कारण त्यानंतर परिस्थिति बऱ्याच अंशीं सुधारेल. या तीन वर्षांच्या कालांत तुम्ही गुंतागुंतींत अथवा गोंधळांत

सांपडलेले आहांत असें तुम्हांस दिसून येईल. तुमची आर्थिक परिस्थिति खूपच 'खालीं' जाईल. पैशाच्या पाठबळा अभावीं तुमच्या कित्येक योजना मनांतच राहतील. आणि यापूर्वींच्या कालांत तुम्हांला अतिशय प्रिय वाटणारे नातेवाईक वा मित्र यांच्यापैकीं कांहींच्या बरोबरचे तुमचे संबंध तुटतील, व तुमचें त्यांचें एकमत होणार नाहीं.

१९७४ च्या मध्यापासून ते जवळ जवळ १९७८ च्या मध्यापर्यंत एकंदरींत एक असा भरभराटीचा काल मिथुन–रवि व्यक्तींच्या जीवनांत येईल कीं जेव्हां नुकसानीपेक्षां लाभ जास्ती होईल. या कालांत कोठें तरी कायमचें स्थाइक होणें शक्य दिसतें.

१९७८ चे मध्यानंतर ते १९८० च्या अखेरपर्यंत प्रमुख ग्रह असे कांहीं प्रबल योग करीत आहेत, कीं ज्या कारणानें गृहसौख्याला बाध येण्याची व शांति नष्ट होण्याची शक्यता आहे. आयुष्याच्या जोडीदाराचें, किंवा कोणा प्रमुख साथीची गूढ वागणूक आणि अव्यावहारिक मतामुळें पारिवारिक किंवा व्यावहारिक सुखसंबंधांत बाध येऊन १९८० च्या पहिल्या तीन महिन्यांत कांहीं जुने संबंध व व्यवस्था तुटण्याची शक्यता आहे. घरदार सोडून मनःशांतीकरितां कोठें तरी निघून जाण्याची इच्छा उत्पन्न होईल. कांहीं झालें तरी किंवा कोठेंहि गेलें तरी १९८१ पर्यंत बाह्य अवस्थेमुळें आंतरिक शांति मिळूं शकेल असें वाटत नाहीं. सोडण्यापेक्षां सहन करणें हाच उत्तम मार्ग ठरेल.

---



# कर्क-रवि

( कोणत्याहि वर्षाच्या २२ जून ते २३ जुलै या काळांत जन्मलेले लोक )

## आर्थिक भविष्य

तुम्ही संपत्तिमान् असण्याची इच्छा करतां, परंतु त्यांतहि त्याचा प्रत्यक्ष उपयोग तुम्ही स्वतःचें महत्त्व वाढविण्याकरितां न करतां दुसऱ्या कांहीं कारणासाठीं करतां. अतिशय सुखी व समाधानी कौटुंबिक जीवनाची ओढ तुमच्या मनांत द्रव्यप्राप्तीची तीव्र इच्छा निर्माण करते; आणि तुमच्या नेहमींच्या एकतानतेनें मन एकाग्र करून तुम्ही जर योग्य मार्गानें प्रयत्न केलेत तर तुमची ही इच्छा खालीं दिलेल्या कालविभागांत सफल होईल.

कोणत्याहि वर्षाच्या २२ जून ते १ जुलैचे दरम्यान तुमचा जन्म झालेला असेल तर तुमच्या प्रयत्नांना यश येऊन, समाधानकारक रीतीनें द्रव्यप्राप्ति करून घेण्यास पुढील काळ अनुकूल आहे.—फेब्रुवारी, मार्च व ऑक्टोबर १९५८; एप्रिल, मे, सप्टेंबर ते डिसेंबर १९६२; जानेवारी १९६३; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९६५; जून १९६६; जानेवारी ते मे, व सप्टेंबर, ऑक्टोबर १९७०; एप्रिल, व नोव्हेंबर १९७४; सप्टेंबर ते डिसेंबर १९७७; मे १९७८; डिसेंबर १९८१.

कोणत्याहि वर्षाच्या २ जुलै ते १२ जुलैचे दरम्यान तुमचा जन्म झालेला असेल तर द्रव्याच्या बाबतींत तुमच्या यशोभाग्यास पुढील कालखंड सहाय्यभूत होईल:—नोव्हेंबर, डिसेंबर १९५८; जून ते ऑगस्ट १९६२; फेब्रुवारी १९६३; जुलै १९६६; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९७०; मे ते ऑक्टोबर १९७४; जानेवारी १९७५; जुलै १९७८.

कोणत्याहि वर्षाच्या १३ जुलै ते २३ जुलैचे दरम्यान जर तुमचा जन्म झालेला असेल तर द्रव्यदात्या लक्ष्मीची तुमच्यावर कृपादृष्टी वळण्याचे कालखंड खालील आहेत:—जानेवारी ते जून १९५५; जानेवारी फेब्रुवारी, मे ते ऑक्टोबर १९५९ मार्च १९६३; ऑगस्ट–सप्टेंबर

१९६६; फेब्रुवारी ते मे १९६७; डिसेंबर १९७०; जानेवारी १९७१; जुलै, ऑगस्ट १९७१; फेब्रुवारी, मार्च १९७५; ऑगस्ट १९७८; एप्रिल १९७९.

## संकटाची व समाधानाची वेळ

सर्वसामान्य सिद्धान्त काढावयाचा तर मी असें म्हणेन कीं, पुढील पावसाळे अतिशय सुदैवाचे आहेत. विशेषतः १९५५; १९५७; १९५९ या वर्षातील पावसाळ्यांत ही गोष्ट अनुभवास येईल. फलज्योतिषशास्त्रीय परंपरे-प्रमाणें कर्क-रवि व्यक्ति दोन वर्षाचें "चक्र" अनुसरतात. म्हणूनच बहुतेक कर्क-रवि व्यक्तीनीं आपल्या सुदैवाची म्हणजे समाधानाची मार्गप्रतीक्षा करावी. जून १९५५; जून १९५७; मे १९५९; ऑक्टोबर ते डिसेंबर १९६०; जानेवारी ते एप्रिल १९६१; सप्टेंबर, आक्टोबर १९६२; ऑगस्ट, सप्टेंबर १९६४; जुलै, ऑगस्ट १९६६; जुलै, ऑगस्ट १९६८; जून, जुलै १९७०; मे, जून १९७२; मे, जून १९७४; एप्रिल, मे १९७६; सप्टेंबर, ऑक्टोबर १९७७; फेब्रुवारी, मार्च १९७८; ऑगस्ट, सप्टेंबर १९७९; ऑगस्ट १९८१.

याविरुद्ध दुर्दैवाचा तडाखा पुढील वर्षांच्या या महिन्यांत बसेल. या काळांत क्षुल्लक अडचणी आणि प्रश्न यांची रास जमूं लागल्याचें दिसेल. अर्थात् आगामी पंचवीस वर्षांत खालीं दिलेल्या काळांत दीर्घकालिन स्वरूपाचे व गुंतागुंतीचे प्रश्न भेडसावूं लागतील, म्हणजे ही संकटाची वेंळ होय. मार्च, एप्रिल १९५६; फेब्रुवारी, मार्च १९५८; जानेवारी, फेब्रुवारी १९६०; जानेवारी १९६२; डिसेंबर १९६३; जानेवारी १९६४; नोव्हेंबर, डिसेंबर १९६५; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९६७; ऑक्टोबर १९६९; मार्च, एप्रिल, मे १९७१; फेब्रुवारी, मार्च १९७३; जानेवारी, फेब्रुवारी १९७५. जानेवारी, फेब्रुवारी १९७७; डिसेंबर १९७८; जनेवारी १९७९; डिसेंबर १९८०; नोव्हेंबर, डिसेंबर १९८२; या सर्व कालांत कोणत्याहि प्रकारचें साहस न करणें शहाणपणाचें ठरेल. कोणताहि उपक्रम हातीं घेण्याऐवजीं आपल्या योजनांना लगाम घालणें हितकारक ठरेल.

## विविध

तुम्ही शहाणें असाल तर १९५४ मधील अनुकूल ग्रहांच्या सहाय्याचा

तुम्हीं अत्युत्तम उपयोग करून घेतला असेल. नाहीं तर त्यापुढील दोनतीन वर्षांत प्रगति मंद होण्याची लक्षणें आहेत. १९५९ आणि १९६० मध्यें ज्या वेळीं शनि आणि गुरु जवळ जवळ येतील त्या वेळीं कर्क–रवि व्यक्तींची सत्त्वपरीक्षा पाहिली जाईल, आणि त्यांना विरोधी परिस्थितीशीं झगडावें लागेल, असें त्यांचे ग्रहयोग दर्शवितात. त्या वर्षांतील दिवस आनंदांत जावेत असें वाटत असेल तर आतांच दूरवर विचार, आणि काळजीपूर्वक योजना यांची फार जरूर आहे.

अर्थात् १९५९–६० मध्यें निर्माण होणारे प्रश्न संपूर्णपणें आतांच पहाणें कठीण आहे. थोडयाफार प्रमाणांत त्यांत दैवाचा भाग असेल, कांहीं प्रमाणांत नातेवाईक व मित्र यांच्यामुळें निर्माण होणाऱ्या प्रसंगाचा त्यांत हात असेल. यामुळें जबाबदारी वाढेल, आणि मर्यादित दडपणहि पडेल. कांहीं सामाजिक व आर्थिक बदल हे कांहीं कर्क–रवि व्यक्तींच्या मनाचा तोल नाहींसा करतील. तथापि १९६०–६१ या काळांत दैव फारसें अनुकूल नसल्यामुळें सगळयाच गोष्टीं दैवाच्या व संधीच्या हातीं सोपविणें चुकीचें ठरेल हें मुख्यत: लक्षांत घेतलें पाहिजे.

कर्क–रवि व्यक्तींना घराची व कुटुंबाची फार ओढ असते हें सुप्रसिद्ध असल्यानें त्याचा पुनरुच्चार करण्यांत अर्थ नाहीं. तथापि त्यांच्या रवीवरून हर्शलचें अद्यापहि भ्रमण होत असल्यानें स्वतंत्र जीवनाची मौज चाखण्यासाठीं ते १९५५ मध्यें प्रयत्न करतील. अर्थात् यांत त्यांचा फायदाच आहे. परंतु १९५९–६० मध्यें त्यांना आपल्या कौटुंबिक जीवनाची पुन्हां एकदां ओढ लागेल. परंतु त्यांनीं ही गोष्ट टाळावी. कारण त्यामुळें त्यांना सुख मिळणार नाहीं.

१९५८ मध्यें नेपच्यूनचा वृश्चिकेंतील प्रवेश हा भावनात्मक दृष्टया अव्यवस्था निर्माण करणारा आहे. आणि म्हणूनच आपलें मानसिक स्वास्थ्य बिघडविणाऱ्या घटना टाळण्यासाठीं डोळयांत तेल घालून दक्ष असलें पाहिजे.

१९६१ साल मात्र तुम्हांला धोक्याची पूर्वसूचना देत आहे. तुम्हीं कौटुंबिक कटकटींच्या व आर्थिक गोंधळाच्या वातावरणांत या वर्षीं खेचले

जाल, व तुम्हांला असें आढळून येईल कीं, जो पैसा निश्चितपणें आपल्याला मिळेल अशी तुम्हांला खात्री वाटत होती तो मिळाला नाहीं. त्याचबरोबर तुमच्या अतिशय जवळच्या व प्रिय व्यक्तीच्या मृत्यूच्या दु:खद प्रसंगाला तुम्हांला तोंड द्यावें लागेल. परंतु १९६२ च्या द्वितीयार्धापासून परिस्थितीमध्यें समाधानकारक बदल घडून येऊं लागेल, व दूरच्या प्रवासास निघण्याची उत्कट इच्छा तुमच्या मनांत बळावूं लागेल. जानेवारी महिन्यांत दम धरण्याचें व घाई न करतां निरीक्षण करण्याचें धोरण तुम्हांला लाभदायक ठरेल. तो महिना विशेष कांहीं न करतांच जाऊं द्या, मग त्यानंतर तुमच्या जन्मतारखेच्या आसपास कांहीं तरी महत्त्वाचें कार्य करण्याचें चैतन्य व स्फूर्ति तुम्हांला प्राप्त होईल, आणि त्यापासून समाधानकारक फलप्राप्तीहि होईल.

जुन्या कार्यपद्धतीचें उच्चाटन करावयाचें तुम्हीं ठरविलेलें असेल. या गोष्टींनीं १९६२ सालांत तुमच्या जन्मतारखेच्या आसपास तुम्हांला चांगलीच डोकेदुखी निर्माण केली असेल. १९६३ मध्यें तुम्हीं सावकाश व समाधानकारक रीतीनें प्रगति कराल, पण विशेष महत्त्वाचें असें कांहींहि घडणार नाहीं. १९६३ चा शेवटचा महिना चांगलीच 'परीक्षा' पाहील; आणि या डिसेंबर महिन्यांत जर एखादें महत्त्वाचें कार्य अंगावर घेतलें तर त्याबद्दल त्यानंतरच्या काळांत पश्चात्ताप करावा लागेल. १९६४ मधील ग्रहस्थिति ही कमीअधिक स्वरूपांत शुभ—अशुभ योगांचें मिश्रण असलेली अशी आहे. या वेळीं कोठेंतरी एका जागीं स्थिर होऊन, आयुष्यांतील मौज उपभोगावी असें वाटेल. पण तुमचा एखादा सहकारी तुम्हांला एखाद्या दूरच्या सहलीला नेण्यासाठीं म्हणून तुम्हांला अक्षरश: घराच्याबाहेर काढील. ही सहल अर्थातच आनंदवर्धक व भावी आयुष्यांत उपयोगी व लाभदायक ठरणारी अशीच असेल. किंवा घरगुती वातावरण तुमच्यांत, कसला तरी 'बदल' हवा, अशी मन:प्रवृत्ति निर्माण करील. या वर्षी आपल्या नोकरीधंद्यामध्यें बदल करावा असें तुम्हांला निश्चितपणें वाटूं लागेल. हा गंभीर विचार तुमच्या मनांत चांगलीच बळावेल.

१९६५ सालीं चांगलें अथवा वाईट असें महत्त्वाचें कांहींच घडणार

नाहीं. परंतु १९६६ सालीं मात्र निश्चितपणें तुमची परिस्थिति खूपच सुधारल्याचें, व तुमची प्रगति होत असून, तुम्ही ज्या सुखी, समाधानी घरगुती जीवनाची इतकी तीव्रतेनें इच्छा करीत होतां, तें प्राप्त झाल्याची प्रचीति तुम्हांला येईल. १९६६ सालीं तुम्हीं तुमच्या जीवनाच्या उत्कर्षाच्या काळांत वावरत असाल, व तुमची योग्यता असेल तेवढें सर्व तुम्हांला मिळेल. जुलै व ऑगस्ट महिन्यांत तुमच्या कर्तृत्वशक्तीला भर येईल. या दोन महिन्यांत तुम्ही अशा कांहीं महत्वाकांक्षी योजना आंखाल कीं ज्यांच्यापासून तुम्हांला समाधानकारक फलप्राप्ति होईल. १९६६ मध्यें तुम्हांला जी गोष्ट मिळवितां आली नाहीं ती मिळवण्याविषयीं पुढील कांहीं वर्षांत मुळींच प्रयत्न करूं नका.

१९६७ च्या मध्यापासून तुमच्या प्रगतीचा वेग मंद होऊं लागेल. नोव्हेंबर महिन्यांत द्रव्यविषयक भांडणतंटचांत तुम्हीं गोवले जाल. मग हें भांडण कुटुंबांतील व्यक्तीबरोबर असेल अथवा तुमच्याच एखाद्या सहकाऱ्या-बरोबर असेल! परंतु तुम्हीं एवढें समाधान बाळगण्यास हरकत नाहीं, कीं निकाल तुमच्या बाजूनें लागून, तुमचाच विजय होणार आहे. १९६८ सालीं तुमच्या धंद्यांत किंवा नोकरींत कांहीं अडचणी निर्माण होतील; तो धंदा बदलण्याचा तुमचा विचार असेल तर तसें करण्यास उत्तम काळ म्हणजे जुलै व ऑगस्ट. या वेळीं तुम्हीं बदल केलांत तर तुम्हांला समाधानकारक निर्णयाप्रत येऊन पोंचल्याचा आनंद मिळेल.

१९६९ च्या सुरवातीलाच तुम्ही थोडीफार प्रगति साध्य करून घ्याल ——मग ही प्रगति किती का मंद असेना——या वेळीं म्हणजेच ऑक्टोबर १९६९ च्या आसपास कायद्याच्या चक्रांत गोंवले जाण्याचा प्रसंग तुमच्यावर येण्याचा दाट संभव आहे. पैसा व मालमत्ता या बाबतींत भांडणतंटे होण्याची फार मोठी शक्यता असून कोर्टाची पायरी चढून त्याचा निकाल लावण्यापेक्षां शांततेनें, समजुतीनें व समझोत्यानें या प्रश्नांचा निकाल लावणें अधिक फायद्याचें ठरेल.

१९७० सालांतील जून व जुलै महिन्यांत तुमच्यापुढें अडचणींचे डोंगर उभे राहिले तरीसुद्धां तुम्ही त्यांतून समाधानकारक रीतीनें पार

पडाल. थोडींशीं भांडणें झालीं तरी तुम्ही उसने वा कर्जाऊ दिलेले पैसे तुम्हांला परत मिळतील. १९७० सालांत तुमच्या कल्पनेइतकी द्रव्यप्राप्ती तुम्हाला होऊं शकली नाहीं तरीसुद्धां तुम्हांला पैशाची चणचण भासणार नाहीं. ज्याच्याबद्दल तुमच्या मनांत अत्यादराची भावना आहे अशी एखादी वृद्ध व्यक्ति तुमच्या सहाय्यार्थ धांवून येईल व तुम्हांला आर्थिक गोंधळांतून व पैशाच्या अडचणींतून बाहेर काढील.

१९७१ मध्यें नेपच्यून जेव्हां धनुमध्यें प्रवेश करील व शनि मिथुनेंत प्रवेश करील; तेव्हां तुमच्या शत्रूकडून तुमच्याविरुद्ध जोरदार हालचालींना सुरुवात होईल, अशी हे दोन्ही ग्रह धोक्याची सूचना देत आहेत. आणि हे शत्रु छुपे असतील, तुमचे तुम्हांलाहि माहीत असणार नाहींत. कोणत्याहि महत्त्वाच्या कामास नव्यानें सुरुवात न करणें, व शुभदायक असें कोणतेंहि काम एप्रिल १९७१ मध्यें हातीं न घेणें हें अंतिम फायद्याचें असल्यानें, कटाक्षानें या गोष्टी पाळणें हिताचें ठरेल. कारण सर्वसाधारणपणें संपूर्ण एप्रिल महिना तुमची ‘ परीक्षा ’ पाहणारा असा आहे.

१९७२ चा जून महिना हा तुमच्या दृष्टीनें आनंददायक वार्तांनीं भरलेला व महत्त्वाचा असला, तरी १९७३ चे शेवटचे तीन महिने व पहिले तीन महिने मात्र अनिश्चिततेचें व अव्यवस्थेचें वातावरण निर्माण करणारे ठरतील. १९७३ चे पहिले तीन महिने व विशेषतः फेब्रुवारी महिना या काळांत तुम्ही दीर्घ परिश्रम करीत रहाल. आजपर्यंत ज्या गोष्टी आपल्या हातच्या आहेत असें तुम्हांला वाटत होतें, पण ज्यांच्यावर तुमचें नियंत्रण राहिलें नाहीं, त्या गोष्टी सुरळीत मार्गाला लागाव्यात म्हणून तुमची धड-पड चालू असेल. फेब्रुवारी १९७३ मध्यें कोणतेंहि महत्त्वाचें कार्य अंगीकृत न करणें बरें.

१९७४ सालीं शनीनें कर्केंत व गुरूनें मीनेंत प्रवेश केला म्हणजे तुमच्या आयुष्यांतील संकटांच्या व त्याचबरोबर गमतीच्या कालखंडास सुरुवात होते. संकटाच्या, निराशेच्या काळ्याकुट्ट ढगांनीं जरी वातावरण भरून गेलेलें असलें, तरी मे व जूनमध्यें या ढगांच्या भोंवतीं असलेल्या रुपेरी कडांनीं तुमचें मन उल्हसित होईल. कांहीं गोष्टींचे निर्णय तुमच्याच

बाजूनें लागणार आहेत याविषयीं खात्री बाळगा. आणि कांहीं पूर्वग्रहदूषित मनोवृत्तीमुळें तुमच्या योजना तुम्हांला बदलाव्या लागल्या तरी हा बदल वाइटाकरितां नसून तुमच्या भल्याकरतांच आहे अशी श्रद्धा बाळगा.

१९७५ सालांतील जानेवारी, फेब्रुवारी व मार्च या तीनहि महिन्यांत तुमची प्रकृति फार मोठ्या प्रमाणावर ढांसळेल, आणि आशादायक भाग एवढाच कीं त्याच वर्षांच्या नोव्हेंबर महिन्यांत तुम्हीं त्या दुखण्यांतून पूर्णपणें बरे व्हाल. या वेळीं तुम्हीं उत्साहानें आपली जीवननौका हाकारण्यास सुरुवात कराल. १९७४–७५ मध्यें अपचन व भूक न लागणें असल्या दुखण्यांनीं तुम्ही वारंवार हैराण व्हाल. तथापि नोव्हेंबर १९७५ मध्यें तुमच्या मनांत जी योजना घोळत असेल तिचें पर्यवसान सुखांत व फायद्यांत होईल, एवढें समाधान माना.

१९७६ मध्यें हर्षल वृश्चिकेंतून भ्रमण करण्यास सुरुवात करतो व शनि सिंहेंत प्रवेश करतो. या दोन्हीमुळें व्यापारपेठेंत आर्थिक अस्थिरता व द्रव्याचा गोंधळ निर्माण होईल. आणि म्हणूनच तुम्हांला जरी सट्टा खेळण्याचा मोह अनावर झाला तरी त्यापासून १९७६–७७ मध्यें अलिप्त रहावें असाच सल्ला मी देतें. या दोन वर्षांत आर्थिक जगांत तुम्हांला जोराचा टोला बसण्याचा संभव आहे, परंतु तुम्ही एप्रिल १९७३ मध्यें जी योजना आखली असेल त्याला अनुसरूनच वागणें हिताचें ठरेल. अर्थात् १९७७ च्या जानेवारी महिन्यांत कोणतीहि महत्त्वाची योजना आंखणें किंवा सुरू करणें फायद्याचें ठरणार नाहीं.

एकंदरींत मंद प्रगतीचा काल असूनहि १९७७ ते १९८१ मध्यें १९७८–१९७९ हीं दोन वर्षें वैयक्तिक व आर्थिक समाधानाचीं असून, १९८० साल शिक्षण क्षेत्रांत प्रगतिकारक ठरेल. भावी कालांत संतोष व सुख देणारें प्रेमप्रकरण या वर्षीं घडेल.

---

# सिंह–रवि

(कोणत्याहि वर्षाच्या २४ जुलै ते २३ ऑगस्ट या काळांत जन्मलेले लोक)

## आर्थिक भविष्य

सिंह–रवि व्यक्तींना द्रव्याविषयीं प्रेम वाटत नाहीं, अथवा त्या त्या बाबतींत उदासीन असतात असें म्हणणें चुकीचें ठरेल. उलट द्रव्याला त्यांच्या जीवनांत फार वरचें, मानाचें स्थान असतें. त्याच्या साहाय्यानेंच आपलें वर्चस्व व वजन पाडण्याचा त्यांचा हेतु असतो. निरनिराळ्या मार्गांनीं हे लोक द्रव्यसंचय करतात. अर्थात् यशस्वी रीतीनें व सुलभतेनें ते द्रव्यप्राप्ति करूं शकतील असे कांहीं कालखंड आहेत. ज्या वेळीं त्यांच्या पाठीशीं ग्रह उभे असतील, अशा वेळीं त्यांनीं द्रव्य मिळविण्याच्या बाबतींत योग्य ते प्रयत्न करून ‘पुढाकार’ घेतला, तर त्यांचें जीवन अधिक रमणीय होईल. म्हणूनच द्रव्यसंचयांत भर टाकण्याचे, ग्रह अनुकूल असणारे व संधि प्राप्त करून देणारे कालखंड कोणते, यांचें सूक्ष्म ज्ञान करून देण्यासाठीं सिंह–रवि व्यक्तींचे मी तीन विभाग करीत आहें. या वेळा नमूद करून, या लोकांनीं ‘संधि’ हातची न घालवितां, तिचा योग्य तो उपयोग करून घ्यावा एवढीच माझी इच्छा आहे.

कोणत्याहि वर्षांतील २४ जुलै ते १ ऑगस्टच्या दरम्यान तुमचा जन्म झालेला असेल तर द्रव्याच्या बाबतींत लाभदायक असणारे कालखंड पुढीलप्रमाणें आहेत:—जुलै १९५५; मार्च, एप्रिल व नोव्हेंबर १९५९; एप्रिल–मे १९६३; ऑक्टोबर ते डिसेंबर १९६६; जानेवारी व जून १९६७; फेब्रुवारी ते जून, आणि ऑक्टोबर १९७१; एप्रिल १९७५; ऑक्टोबर ते डिसेंबर १९७८; जानेवारी ते मार्च १९७९; मे, जून १९७९; जानेवारी, फेब्रुवारी, आणि जून ते ऑक्टोबर १९८३.

कोणत्याहि वर्षांतील २ ऑगस्ट ते १२ ऑगस्टच्या दरम्यान तुमचा

जन्म झालेला असेल तर पुढें दिलेल्या कालखंडांत तुमचें "आर्थिक दैव" निश्चितपणें उजाडेल:—ऑगस्ट, सप्टेंबर १९५५; डिसेंबर १९५९; जानेवारी १९६०; जून ते डिसेंबर १९६३; जानेवारी, फेब्रुवारी १९६४; ऑगस्ट १९६७; नोव्हेंबर, डिसेंबर १९७१; मे, जून आणि नोव्हेंबर—डिसेंबर १९७५; जानेवारी १९७६; जुलै, ऑगस्ट १९७९; मार्च, एप्रिल, आणि नोव्हेंबर १९८३.

कोणत्याहि वर्षांतील १३ ऑगस्ट ते २३ ऑगस्टच्या दरम्यान तुमचा जन्म झालेला असेल तर तुमच्या संपत्तींत भर पडण्याचे कालखंड पुढीलप्रमाणें आहेत:—ऑक्टोबर, नोव्हेंबर १९५५; फेब्रुवारी ते जुलै १९५६; फेब्रुवारी व जुलै ते ऑक्टोबर १९६०; मार्च, एप्रिल १९६४; सप्टेंबर, ऑक्टोबर १९६७; एप्रिल ते जून १९६८; जानेवारी व ऑगस्ट, सप्टेंबर १९७२; जुलै ते ऑक्टोबर १९७५; फेब्रुवारी, मार्च १९७६; ऑगस्ट, सप्टेंबर १९७९; डिसेंबर १९८३; जानेवारी १९८४.

## संकटाची व समाधानाची वेळ

उदार व उदात्त स्वभाव आणि विशेषतः संघटना-कौशल्य, यामुळेंच इतरांना मार्गदर्शन करतां येईल अशा प्रकारचें कार्य सिंह–रवि व्यक्ति उत्साहानें हातीं घेतील. कांहीं तरी नवीन आणि महत्त्वाचें कार्य करण्याची उत्कट इच्छा, व हा बदल घडवून आणीत असतांना मिळणारें यश या दृष्टीनें पाहूं गेलें असतां पुढील कालखंड उत्कृष्ट आहेत:—ऑगस्ट १९५५; जुलै १९५७; जून १९५९; मे, जून १९६१; नोव्हेंबर, डिसेंबर १९६२; जानेवारी ते जून १९६३; ऑक्टोबर १९६४; सप्टेंबर १९६६; ऑगस्ट, सप्टेंबर १९६८; ऑगस्ट १९७०; जुलै १९७२; जून, जुलै १९७४; जून १९७६; नोव्हेंबर, डिसेंबर १९७७; जानेवारी, व मे १९७८; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९७९; एप्रिल १९८०; सप्टेंबर, ऑक्टोबर १९८१.

अर्थातच, अपरिहार्यपणें दुर्दैव तुमच्या मार्गांत अडचणी व संकटें निर्माण करणार, व तुमचा दृष्टिकोन आणि योजना बदलाव्यात असें वातावरण निर्माण करणार; असे कालखंड देऊन तुम्हाला धोक्याची पूर्वसूचना देणें मी माझें कर्तव्य समजतें. पुढें दिलेल्या कालांत कोणतेंहि

भलतें 'साहस' न करणें बरें. भावनेच्या आहारीं जाऊन नवीन कार्य हातीं घेण्यापेक्षां 'वाट' पहाणें शहाणपणाचें ठरेल. ते कालखंड हे होत.—मे १९५६; एप्रिल १९५८; मार्च १९६०; फेब्रुवारी, मार्च १९६२, हा काळ तुमची परीक्षा घेणारा ठरेल. जानेवारी, फेब्रुवारी १९६४; जानेवारी १९६६; डिसेंबर १९६७; नोव्हेंबर, डिसेंबर १९६९; मे ते नोव्हेंबर १९७१; एप्रिल, मे १९७३; फेब्रुवारी १९७४; मार्च व एप्रिल १९७५; फेब्रुवारी, मार्च १९७७; फेब्रुवारी १९७९; जानेवारी १९८१.

## विविध

'रवि'च्या स्वतःच्या राशींत, म्हणजेच 'सिंहेंत' रवि असतांना जन्मलेले लोक खरोखरच अति भाग्यवान्! कारण ही रास मुळांतच सर्वश्रेष्ठ व सरदारी थाटाची! सिंह–रवि व्यक्ति ह्या कोठेंहि व कोणत्याहि परिस्थितींत आणि वातावरणांत जन्मलेल्या असोत, जीवनांत व समाजांत त्यांचें एकंदर वागणें हें थाटाचें असतें! स्वभावतःच हे लोक बादशाही वृत्तीचे असतात. तिसऱ्या महायुद्धाच्या आधींच, म्हणजे सुमारें १९६२ पर्यन्त ज्योतिषशास्त्रदृष्टया अनुकूल घटनांची एक अखंड मालिकाच सिंह–रवि व्यक्तींच्या जीवनांत येत असल्यामुळें सर्वच सिंह–रवि व्यक्तींनीं भविष्यकाळाकडे योग्य त्या आत्मविश्वासानें व आशेनें पाहण्यास प्रत्यवाय नाहीं.

१९५५ मध्यें गुरूचा सिंहेंतील प्रवेश तुमच्या योजनांना व कार्यक्रमांना एक नावीन्यपूर्ण व भाग्यदायक अशी चेतना देत आहे. गुरूच्या ह्या भ्रमणानें तुम्ही तुमच्या जीवनांतील वैभवाच्या अत्युच्च शिखरावर आरूढ व्हाल. एवढेंच नव्हे तर अशी संधि व वातावरण प्राप्त होईल कीं जें तुम्हाला सर्वथैव अनुकूल असेल. तुम्ही जर महत्त्वाकांक्षी असाल, तर १९५५ साल तुम्हाला कोणताहि नवीन धंदा सुरू करण्याच्या दृष्टीनें वा नवीन योजना कार्यवाहींत आणण्याच्या दृष्टींनें सर्वांत अधिक अनुकूल व यशोदायी आहे. विशेषतः १९५५ चा शरदृऋतु, ऑक्टोबर-नोव्हेंबर हा अत्यंत सुदैव व नमूद करण्यासारखाच आहे!

नेतृत्व स्वीकारण्याचा उपजत व दैवी गुण सिंह–रवि व्यक्तींच्या

ठायीं असतो, पुढील कांहीं वर्षांत पुष्कळ सिंह–रवि व्यक्ति त्यांच्या त्यांच्या जीवनक्षेत्रांत पुढारीपद मिळवतील, असें निश्चितपणें दिसतें. हें दृष्टीसमोर ठेवूनच या लोकांनीं पुढील पावलें टाकावींत. स्वतःच्या मोठेपणाच्या व बडे-जावाच्या नादांत गुंतल्यामुळें, आपलें असामान्य कर्तृत्व जगाला दाखविण्याचा १९५६–५७ हा बहुमोल काल व सुसंधि या लोकांनीं हातची घालवूं नये !

१९५६ मध्यें गुरु सिंह राशींतून बाहेर पडतो, व त्यानंतर लगेच हर्षल त्या ठिकाणीं प्रवेश करतो. हर्षलच्या सिंह राशींतील भ्रमणाचे सिंह–रवि व्यक्तींवर होणारे परिणाम, व विशेषतः जुलैच्या उत्तरार्धांत जन्मलेल्या व्यक्तींवर होणारे परिणाम हे " पाहण्यासारखे " आहेत. हर्षल हा " खड-बडून जागें करणारा ग्रह " म्हणून प्रसिद्ध आहे. हर्षलचा सिंह–रवि व्यक्तींच्या जीवनावर फार मोठा परिणाम होणार असल्यानें, १९५६ ते १९६१ या कालांत परिस्थितीशीं जुळवून घेण्याचें व निरनिराळ्या क्षेत्रांत आपल्या मानसिक शक्तीचा विकास घडवून आणण्याचें कार्य सिंह–रवि व्यक्तींना करावें लागेल असें वाटतें..

याच कालांत नवीन संबंध प्रस्थापित करण्यासाठीं जुने व परिचित संबंध तोडून टाकण्याकडे मनाचा कल झुकूं लागेल. नवीन कार्यक्रम, नवीन योजना, नवीन मैत्री, व नवें वातावरण याचें जोरदार आकर्षण वाटूं लागेल. अर्थात् याचा जोर जास्त केव्हां जाणवूं लागेल, हें निश्चित जन्मतारखेवर अवलंबून राहील. जुलैच्या शेवटास जन्म झालेल्या सिंह–रवि व्यक्तींना याची जाणीव १९५६–५७ मध्यें होईल. ऑगस्टच्या मध्याच्या सुमारास जन्म झालेल्यांना याचा अनुभव १९६०–६१ च्या सुमारास येईल.

परंतु धोक्याची एक पूर्वसूचना उपयोगी पडेल, व तुम्ही वेळींच सावध व्हाल अशा आशेनें मी ही सूचना करीत आहें. सिंह–रवि व्यक्तींचें व्यक्तिस्वातंत्र्यावर व व्यक्तिमत्त्वावर किती अलोट प्रेम असतें हें नव्यानें सांगणें नकोच ! कृति व उक्ति या बाबतींत स्वातंत्र्य म्हणजे त्यांना प्राणाइतकेंच प्रिय ! ! हर्षलच्या दडपणामुळें हें प्रेम अतिरेक स्वरूप धारण करील. याचाच अटळ परिणाम म्हणजे, स्वतःच्याच मतांचा पाठ-

पुरावा करणाऱ्या कांहीं सिंह–रवि व्यक्ति स्वतःच्या पायावर स्वतःच धोंडा पाडून घेण्याची चूक या वृत्तीमुळें करण्याची शक्यता आहे.

सर्वसाधारण कल धंद्याकडे राहील. व तुमचे इतरांशीं असणारे स्नेह-संबंधहि ' स्थिर ' पायावर असतील. १९५५ ते १९६० चे दरम्यान खाजगी व धंदेवाईक जीवनांत उपयोगी पडणारे असे नवीन मित्र लाभतील. पुष्कळ सिंह–रवि व्यक्ति अशा प्रकारच्या नवीन स्नेहसंबंधाच्या जोरावर यश व भरभराट प्राप्त करून घेतील.

सिंह–रवि व्यक्तींना कौटुंबिक गोष्टींचा त्रास क्वचितच होतो. १९६० पर्यंत तरी निदान घरगुती वा कौटुंबिक परिस्थितीची चिंता कर-ण्याचें तुम्हांला कारण पडणार नाहीं.

परंतु १९६१–६३ पर्यंत बहुतेक सर्व प्रमुख ग्रहांनीं सिंह राशि ओलांडलेली असून १९७६ मध्यें फक्त ' शनि'च काय तो प्रवेश करणार असल्यामुळें, विशेष बदल घडवून न आणतां, कुरकूर न करतां, सिंह–रवि व्यक्ति राष्ट्रांतील आणि समाजांतील त्यांच्या योग्य जागीं स्थानापन्न होतील. ते मुळांतच कर्तृत्ववान व समर्थ असल्यानें, विशेषत: १९६६–६७ मध्यें गुरु सिंहेंतून भ्रमण करीत असतांना, या प्रभावी गुरूच्या साहाय्यानें हे लोक उच्च स्थान प्राप्त करून घेतील असें दिसतें. १९६६–६७ सालाच्या जगाच्या इतिहासांतील पानांवर असें नमूद केलेलें आढळेल कीं, स्पष्ट कल्पना व योजना यांनीं युक्त असलेले पुढारी बव्हंशीं सिंह-प्रधान लोकच होते. आणि ज्या सिंह–रवि व्यक्तींच्या पत्रिकेंत कित्येक अशुभ योग आहेत, तेसुद्धां त्यांच्या क्षेत्रांत व जीवनांत ' पुढें ' येत आहेत, महत्त्व पावत आहेत, यश मिळवीत आहेत असें या कालांत दिसून येईल. कारण १९६६–६७ मध्यें सर्वच सिंह–रवि व्यक्तींना सर्वांगीण यश व भरभराट, विकास व सुख लाभणार आहे. त्यानंतर १० वर्षे म्हणजे १९७६ पर्यंत किरकोळ गोष्टी व बदल सोडले तर सावकाश व मंद प्रगति करीत राहतील व याला कार-णीभूत सामान्य ग्रह असतील.

१९६१ सालांतील कांहीं काल आणि १९६२ सालांतील कांहीं प्रमुख ग्रहांची भ्रमणें तुम्हांला समाजांत मानमान्यता व प्रसिद्धि मिळवून देतील.

तुमचे नातेवाईकांबरोबरचे संबंधहि विशिष्ट प्रकारचे बनतील. फेब्रुवारी व मार्च १९६२ मध्यें तुम्हीं 'विभक्त' होणें फायदेशीर ठरणार नाहीं यापूर्वीच्या काळांत तुम्हांला मदत करणारे व तुमचे उपकारकर्ते यांचे व तुमचे संबंध तुटण्याचा दाट संभव आहे. या दोन महिन्यांत तुम्हीं ज्यांच्याशीं नव्यानें स्नेहसंबंध जोडला असेल ते तुम्हांस मदत करतील अशी जरी तुम्हांला आशा वाटत असली, तरी ते दीर्घकाल टिकणारे मित्र नव्हेत व तितकेसे विश्वासूहि असणार नाहींत, हें लक्षांत घेणें हिताचें ठरेल.

१९६२–६३ सालांत व १९६४ सालांतील कांहीं महिन्यांत तुमच्या दांभिक मित्रांच्यामुळें, तुम्ही कांहीं सामाजिक कार्यात पुढाकार घ्याल, परंतु त्यामुळें तुम्हांला त्रास होईल; व नसत्या कटकटी मागें लागल्यामुळें तुमचें मानसिक स्वास्थ्य बिघडेल. तुम्ही स्वतः प्रत्यक्ष जबाबदार नसलांत तरी तुमच्या मागें लागलेल्या या कटकटींतून व गोंधळांतून बाहेर पडण्यास तुम्हाला दोन वर्षें लागतील, परंतु चुकीच्या माणसांशीं स्नेहसंबंध जोडले गेले कीं त्यांची किंमत द्यावी लागणारच! १९६२–६३ मध्यें तुम्हांला द्रव्याच्या बाबतींत भासणारी चणचण ही तुम्हांला आर्थिक क्षेत्रांत कांहीं अचाट व अनावश्यक उलाढाली करावयास भाग पाडील. अशा वेळीं कांहीं वृद्ध व्यक्ति तुमच्या जीवनांत प्रवेश करतील; व त्यांच्या अनुभवाचा फायदा घेऊन, भलत्या मार्गाला न लागण्याबद्दल ते तुमच्यावर दडपण आणतील. १९६२ च्या सुरुवातीच्या काळांत भिन्नलिंगीय व्यक्ति तुम्हांला मदत करण्याकरितां झटेल व तिचा प्रभाव तुमच्या जीवनावर १९६२ च्या अखेरपर्यंत राहील. परंतु यापेक्षां अधिक काल त्या व्यक्तीच्या दडपणाखालीं राहणें तुम्हांला पुढें अहितकारक ठरेल. १९६५ मध्येंच, शनि मीनेकडे जाण्यासाठीं म्हणून जेव्हां बाहेर पडेल; त्या वेळीं तुमचें जीवन निराशमय करून टाकणारे हे दुःखद काळे 'ढग' हळूहळू पांगू लागतील, आणि मग १९६५ ज्या जुलै महिन्यांत नवीन स्नेहसंबंध, जीवनांतील नवीन क्षितिजें दिसत असल्याचा आनंद, व रोमांचकारी जीवन सुरू होत असल्याची जाणीव या गोष्टींनीं तुम्हीं सुखी व्हाल. १९६६ मध्यें तुमच्या कांही स्नेहांचीं तुमच्या पूर्वीच्या कार्यक्रमांबद्दल व योजनाबद्दल नापसंतीदर्शक बोलणी तूमच्या कानीं येतील.

परंतु तुमच्या योजनांत व जीवनाच्या दिशेत बदल करण्याबद्दलच्या त्यांच्या सल्ल्याला किंमत न देतां, तुम्ही स्वतःच्या योजनेप्रमाणें व विचाराप्रमाणें वागावे यांतच तुमचें कल्याण आहे.

१९६६ मध्यें तुमच्या जन्मतारखेनंतर तुम्ही जीवनाकडे आर्थिक दृष्टींतून जास्त प्रमाणांत पाहूं लागाल, आणि तुम्हीं योग्य मार्गांवर आहांत असेंच तुम्हांला दिसून येईल. येथून पुढें तुमचें जीवन अधिक रोमहर्षक बनत जाईल, कौटुंबिक वातावरण सुधारून, तुम्हांला त्या वातावरणांत सुख वाटूं लागेल. आणि तुम्ही नुकत्यांच ज्या योजना आंखल्या होत्या, त्या कल्पनेपेक्षां अधिक फलदायक ठरत आहेत असें तुम्हांस आढळून येईल. १९६७ मध्यें जून, जुलै व ऑगस्ट महिन्यांत, तुम्हीं जें 'पेरलेलें' होतें तें आतां 'उगवलेलें' असून त्याचीं सुंदर व मधुर फळें तुमच्या हातांत आलीं आहेत या आनंदांत तुम्ही असाल. आणि त्यानंतर १९७५ अखेरपर्यंत कोणत्याहि प्रकारचीं विशेष संकटें किंवा अडथळे न येतां एका विशिष्ट वरच्या पातळीवरून तुमचा जीवनप्रवाह संथपणें वहात असल्याचें जगाला दिसेल.

१९७६ मध्यें शनि, सिंह राशींत प्रवेश करून हर्षलशीं दूषित योग करतो; तथापि नेपच्यून तुम्हांला अनुकूल आहे, ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट आहे. १९७७ च्या प्रथमार्धांत धंद्यांतील तुमच्या भागिदारांकडून, सहकाऱ्यांकडून, अथवा तुमच्या नातेवाइकांकडून तुमच्यावर कोर्ट–खटल्याचे प्रसंग आणले जातील; त्यांचे निकाल तुम्हांला अनुकूल व समाधानकारक लागणार नाहींत; परंतु नेपच्यूनमुळें तुम्ही या काळांत अधिक भावनाप्रधान बनत असल्यामुळें, आपली संपत्ति व समाजांतील स्थान ढळत चाललें आहे या गोष्टीकडे तुमचा कानाडोळा होईल.

ज्यांच्याशीं तुम्ही चांगले वागलांत, त्यांनींच तुम्हांला फसविलें आहे, लुटलें आहे, असेंच तुमच्या प्रत्ययास येईल. तुमच्या प्रियजनांपैकीं एखाद्याच्या विरहानें किंवा मृत्यूनें तुमची प्रकृति बऱ्याच प्रमाणांत खालावेल. अर्थात् १९७७ मधील दगदगीनें, काळजीनें तुमच्या शरीरप्रकृतीवर आधींच अनिष्ट परिणाम झालेले असणार, त्यांत ही नवीन भर! तथापि १९७७ च्या अखेरच्या २ महिन्यांत तुमची प्रकृति सुधारूं लागेल. १९७८ च्या मे व

जून महिन्यांत तुम्ही नवीन व यशोदायी योजना हातीं घ्याल, व त्यामुळें तुमचा भविष्यकाळ उज्ज्वल होईल. जुलै महिन्यांत तुमच्या कुटुंबांतील संख्येंत एका नवीन व्यक्तीची भर पडेल. ही नवीन व्यक्ति मदत ठरून तुम्हांला सुख देईल. १९७८ पासून तुम्ही निश्चित प्रगति कराल; आणि ती १९७९ सालांतहि चालू राहून तुमची सामाजिक प्रतिष्ठा वाढेल, व आर्थिक भरभराट होईल. १९८० मध्येंहि नमूद करून ठेवण्यासारख्या अडचणी व संकटें क्वचितच आढळतील. खरें बोलायचें तर १९७९ ते १९८३ या कालांत तुमच्या सर्व योजना यशस्वी होतील. कौटुंबिक जीवनांत तुम्हांला सुख लाभेल, सामाजिक जीवनांत आदरणीय स्थान प्राप्त होईल, आणि आध्यात्मिकदृष्टया तुमची प्रगति होईल. १९७९ पासून तुम्ही जे बोलाल तें घडेल अशी परिस्थिति असल्यानें तुम्ही तुमच्या क्षेत्रांत 'पुढारीपद' मिळवाल, व पुढील कांहीं वर्षें तरी लोकांच्या आदरास पात्र रहाल. तुम्ही पुढारी होण्यासाठीं जन्मास आलेले असतां, व या कालांत तुम्ही कोणत्याहि क्षेत्रांत असलांत तरी पुढारी म्हणून जीवन जगत आहांत असेंच जगाला दिसूत येईल.

## सिंहावलोकन

जगांतील घडामोडी व त्यांचे परिणाम कांहीं असोत, सिंह–रवि व्यक्तींच्या बाबतींत एक शाश्वत सत्य हें आहे कीं, त्यांचें नेहमींचें ध्येय म्हणजे सामान्य मनुष्यप्राण्यापेक्षां असामान्य म्हणून जगावयाचें. म्हणूनच नैसर्गिकरीत्या त्यांचे स्नेहसंबंध व धागेदोरे हे प्रभावी व्यक्तींच्याशीं निगडित असलेले दिसतात. जोंपर्यंत एखाद्याजवळ व्यक्तिमत्त्व व कर्तृत्वशक्ति आहे, तोंपर्यंत त्याच्या हातून कितीहि चुका झाल्या तरी सिंह–रवि व्यक्ति त्याला क्षमाच करतांना दिसतील.




२० व्या शतकांत सिंह राशीला तीन महत्त्वाचे ग्रह स्पर्श करीत आहेत. ते म्हणजे, क्रमशः नेपच्यून, प्लूटो व हर्षल ! यामुळें या राशींतच एक मुलभूत बदल होत आहे. या राशीबाबतचा दृष्टिकोन बदलावा लागत आहे. १९६१ नंतर सिंह राशींत जन्मलेल्यांच्या अंगीं वर उल्लेखिलेले सर्व गुणधर्म चांगलेच दिसून येतील. परंतु ही नवीन पिढी १९८५ पर्यंत तरी जीव-

नांत आघाडीवर येऊं शकणार नाहीं. सामाजिक, आर्थिक, राजकीय, व तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत ही मंडळी आपलें नेतेपद मिळवूं शकणार नाहींत. म्हणून यासाठीं इतर ग्रहांचें प्रभुत्व असलेले सिंह–रवि नेते आपणाला हुडकून काढण्याची पाळी येईल.

१९१५ ते १९२९ पर्यंत नेपच्यून सिंह राशींतून भ्रमण करीत होता, त्यामुळें या कालांत जन्मलेल्या, सिंह राशींत रवि असलेल्या व्यक्तींच्या मनांत व अंतःकरणांत धार्मिक व तत्त्वज्ञानात्मक वृत्तीचें प्राबल्य होतें. जीवनाच्या नवीन तत्त्वज्ञानाचे ते निःसीम पूजक बनल्याचें, व लोकशाही प्रधान जीवन–तत्त्वज्ञानाचें आकर्षण त्यांना वाटत असल्याचें आपणांस स्पष्ट दिसून येतें.

१९३८–३९ ते १९५६–५७ च्या कालांत बदल घडवून आणणारा व विनाशक कार्य करणारा प्लूटो ग्रह सिंह राशींतून भ्रमण करीत असल्याचें आढळेल. या कालांत रवि सिंह राशींतून भ्रमण करीत असतांना जन्मलेल्या लोकांचा. जीवनविषयक दृष्टिकोन व मनःप्रवृत्ति ही एका निराळ्याच प्रकारची आहे, असें दिसून येईल. राजे किंवा राण्या लोकांच्यावर सत्ता गाजवीत आहेत, हें दृश्यच मुळीं यांना सहन होणार नाहीं. करमणुकीच्या क्षेत्रांतील, चित्रपट, आकाशवाणी, नाटकें, इत्यादींत हे लोकच बदल घडवून आणतील. कारण तें त्यांचें आवडतें क्षेत्र आहे. सिंह–रवि व्यक्तींना प्लूटोचें सहाय्य असलें कीं करमणुकीच्या क्षेत्रांतील जुन्या निरुपयोगी पद्धतीचें व कल्पनांचे उच्चाटन करून, त्या जागीं नवीन पद्धति निर्मिण्याचें, व त्या अंमलांत आणण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं येतें.

१९५६ ते जवळ जवळ १९६२ अखेर हर्षल, सिंह राशींतून भ्रमण करणार आहे. त्याचा परिणाम म्हणून जगांत नवीन तऱ्हेचा सामाजिक बदल करण्याच्या ‘ कल्पना ’ घेऊन नवीन नेते या जगांत जन्म घेतील ! या कालांत जन्म घेतलेले सिंह–रवि लोक अधिक चांगल्या प्रकारची क्रांति घडवून आणतील. लोकहि राष्ट्रीय समाजवादाच्या तत्त्वानुसार वागूं लागतील. ते ‘ डावे ’ (Leftist) बनतील, अथवा तो दृष्टिकोन स्वीकारतील हे निःसंशय ! शक्तिमान् रवीनें युक्त असा त्यांचा जन्म असल्यानें राष्ट्रांचे हे भावी पुढारी राज्ययंत्रणेंत बदल घडवून आणतील. मजूर संघटना व त्यांसारख्या राजकीय समजल्या जाणाऱ्या इतर क्षेत्रांतहि ते पालट घडवून आणतील.

---

# कन्या—रवि

(कोणत्याहि वर्षातील २४ ऑगस्ट ते २३सप्टेंबर या कालांत जन्मलेले लोक)

## द्रव्यलाभ

पैशावरील प्रेम हें सर्व व दु:खांचें दुष्कृत्यांचें मूळ असेल, तर दारिद्रय हें अंत:करणांतील आनंदावर कृष्णछाया पसरणाऱ्या झाडाप्रमाणें आहे असें पुष्कळ लोकांचें मत आहे. या जगांत जगण्यासाठीं पैसा लागतो, आणि तो आपल्या नशिबांत जे ग्रह लिहितील त्यांचे आपण आभारच मानूं. परंतु कन्या—रवि व्यक्तींना व्यावहारिक गोष्टी शिकण्याची, व संपत्तिसंचया-बद्दल फार सूक्ष्मतेनें न बघणें हें शिकण्याची जरूरी आहे. त्यांच्या या दोषा-मुळेंच अधिक द्रव्य कसें जमवावें ही गोष्ट त्यांना उमजत नाहीं. परंतु खालीं दिलेल्या कालांत पैशाविषयींचा पूर्वग्रहदूषित दृष्टिकोन बाजूला ठेवून त्यांनीं शहाणपणानें शक्य तेवढे प्रयत्न करावेत. मग पैसे रोख मिळोत वा दुसऱ्या कोणत्याहि तऱ्हेनें मिळोत ! कारण या वेळीं सांठविलेला पैसाच त्यांना भावी जीवनांतील सुस्थिर व सुखी आयुष्यासाठीं, व त्यांच्या ज्ञाना-र्जनाच्या आवडीचें समाधान करण्यासाठीं उपयोगी पडेल. म्हणून पैसा हें संकटाचें मूळ आहे, असें असलें तरीसुद्धां त्यांनीं त्या विचारांत फार गुर-फटून राहूं नये. माझें म्हणणें स्पष्ट व्हावें, म्हणून कन्या—रवि व्यक्तींचें मी तीन विभागांत वर्गीकरण करीत आहें, व त्यापुढें त्यांना द्रव्यदृष्टया सुदैवी काल देत आहें.

कोणत्याहि वर्षाच्या २४ ऑगस्ट ते २ सप्टेंबरच्या दरम्यान तुमचा जन्म झालेला असेल तर पुढील कालांत तुम्हांला द्रव्यप्राप्ति करून घेण्यास दैव अनुकूल असेल:— डिसेंबर १९५५; जानेवारी व ऑगस्ट १९५६; मार्च ते जून, व नोव्हेंबर—डिसेंबर १९६०; मे १९६४; नोव्हेंबर डिसेंबर १९६७; जानेवारी, फेब्रुवारी, व जुलै १९६८; मार्च ते जुलै, व

ऑक्टोबर-नोव्हेंबर १९७२; एप्रिल १९७६; ऑक्टोबर-नोव्हेंबर १९७९; जानेवारी ते जुलै १९८०; फेब्रुवारी, व जुलै ते ऑक्टोबर १९८४.

कोणत्याहि वर्षाच्या ३ सप्टेंबर ते १२ सप्टेंबरच्या दरम्यान तुमचा जन्म झालेला असेल तर पैसा मिळविण्याचे तुमचे यत्न पुढील कालांत फलदायी होतील:—सप्टेंबर–ऑक्टोबर १९५६; जानेवारी १९६१; जून-जुलै, व डिसेंबर १९६४; जानेवारी-फेब्रुवारी १९६५; ऑगस्ट-सप्टेंबर१९६८; डिसेंबर १९७२; मे-जून १९७६; ऑगस्ट १९८०; एप्रिल ते जून, व नोव्हेंबर डिसेंबर १९८४.

कोणत्याहि वर्षाच्या १३ सप्टेंबर ते २३ सप्टेंबरच्या दरम्यान तुमचा जन्म झालेला असेल तर पुढील वर्षांतील भाग्यदायक कालखंड खालील-प्रमाणें आहेत:— नोव्हेंबर-डिसेंबर १९५६; मार्च ते ऑगस्ट १९५७; फेब्रुवारी, मार्च व सप्टेंबर–ऑक्टोबर १९६१; ऑगस्ट ते नोव्हेंबर १९६४; मार्च–एप्रिल १९६५; ऑक्टोबर–नोव्हेंबर १९६८; मे–जून १९६९; जानेवारी–फेबुवारी १९७३; जुलै–ऑगस्ट, व नोव्हेंबर–डिसेंबर १९७६; जानेवारी ते मार्च १९७७; सप्टेंबर–ऑक्टोबर १९८०; जानेवारी–फेब्रुवारी १९८५.

## संकटाची व समाधानाची वेळ

तुम्हीं हें अनुभवलेंच असेल कीं, अशुभ दिवशीं सुरू केलेलें शुभ कार्य इच्छित फल देऊं शकत नाहीं, तर योग्य वेळीं व शुभ दिनीं सुरू केलेलें कार्यच शुभ व चांगलें फल देऊं शकतें. तुमच्या योजना कार्यवाहींत आणण्या-सारखी उत्तम मनःस्थिति व सामर्थ्य असण्याचे व त्यामुळेंच चांगलें मिळविण्याचे कांहीं कालखंड येथें देत आहें. ज्योतिषशास्त्रदृष्ट्या अनुकूल असलेल्या या कालाचा तुम्हांला पुरेपूर फायदा करून घ्यावयाचा असेल तर, म्हणजेच नवीन कार्यास सुरुवात करण्याच्या दृष्टीनें करारपत्रावर 'सही' करण्यास योग्य, निश्चित निर्णय घेण्याच्या दृष्टीनें पुढील काल योग्य आहे:— सप्टेंबर १९५५; सप्टेंबर १९५७; ऑगस्ट १९५९; जुलै, ऑगस्ट १९६१; जून, जुलै, सप्टेंबर १९६३; नोव्हेंबर, डिसेंबर १९६४, जानेवारी ते जून १९६५; नोव्हेंबर १९६६; ऑक्टोबर १९६८; सप्टेंबर, ऑक्टोबर १९७०; ऑगस्ट,

सप्टेंबर १९७२; ऑगस्ट, सप्टेंबर १९७४; जुलै, ऑगस्ट १९७६; जुलै १९७८; डिसेंबर १९७९; जानेवारी ते मार्च, व मे ते जुलै १९८०; नोव्हेंबर, डिसेंबर १९८१; ऑक्टोबर १९८३; सप्टेंबर, ऑक्टोबर, १९८५.

पुनश्च; धंद्याशीं व आर्थिक बाबींशीं निगडित असे निर्णय घेण्याच्या दृष्टीनें विशेषतः १९५५; चा सप्टेंबर महिना अतिशय चांगला आहे हें लक्षांत असूं द्या. आणि १९६५; च्या प्रथमार्धांत अनपेक्षित पण आश्चर्यकारक व अनुकूल बदल घडून येतील. सप्टेंबर, ऑक्टोबर, १९७०; हा काल तुमची प्रतिष्ठा व समाजांतील दर्जा वाढविण्याच्या दृष्टीनें चांगला आहे. जानेवारी ते मार्च, आणि मे ते जुलै १९८०; या कालांत निराशेच्या अंधकारांत तुम्हांला आशेचे किरण दाखवून तुमचे प्रयत्न यशस्वी करण्याचें कार्य कांहीं प्रमुख ग्रह करतील. ऑक्टोबर, नोव्हेंबर १९८३; मध्यें तुमच्या सुखी व समाधानी जीवनांत अस्थिरता व गोंधळांचें वातावरण निर्माण होत असून, त्यांतून मार्ग काढण्याचा विशेष प्रयत्न करावा लागेल, आणि अखेर तुम्हांला यश मिळेल ही समाधानाची गोष्ट होय.

अर्थातच पुढील कांहीं वर्षांत अडचणी व त्रासदायक प्रश्न निर्माण होण्यासारखे कांहीं काल आहेतच. ज्या वेळीं तुमच्या सामर्थ्यशाली मनाच्या विरुद्ध कांहीं घटना घडणाचा संभव आहे. संकटें एकटीं कधींच येत नाहींत, अशी एक जुनी म्हण आहे, ती ज्योतिषशास्त्राला धरूनच आहे. पुढें दिलेले महिने तुमच्या सुखी जीवनापासून तुम्हांला दुःखाच्या खाईंत नेऊन लोटणारे, आंखलेल्या योजना उधळून लावणारे, स्नेहीसोबती तुम्हांला संकटांत असतांना सोडून जाणारे, भांडणतंटे निर्माण करणारे, इतरांशीं असणारे तुमचे संबंध तोडावयास लावणारे, असे संकटमय ठरण्याचा बराच संभव आहे; तो काल पुढीलप्रमाणें आहेः— जून ते डिसेंबर १९५६; मे १९५८; एप्रिल १९६०; मार्च, एप्रिल १९६२; मार्च १९६४; फेब्रुवारी, मार्च १९६६; जानेवारी, फेब्रुवारी १९६८; जानेवारी १९७०; नोव्हेंबर, डिसेंबर १९७१; मे, जून १९७३; एप्रिल, मे १९७५; एप्रिल १९७७; मार्च, एप्रिल १९७९; फेब्रुवारी, मार्च १९८१; फेब्रुवारी १९८३; जानेवारी १९८५. सर्वसाधारण काळ जरी अनुकूल असला तरी विशेषतः

१९५६ चा द्वितीयार्ध म्हणजेच जून ते डिसेंबरपर्यंतचा काल तुम्हांला चिंतेंत लोटणारा, तापदायक व असह्य अडचणींनीं भरलेला असेल. अपरिचित व्यक्ति व वातावरण यांच्याशीं मिळवून घ्यावें लागणार असल्यानें या अडचणी उद्‌भवतील.

## विविध

अधिक पैसा केव्हां मिळवितां येईल, नवीन कार्य केव्हां सुरू करणें फायद्याचें होईल, संकटांना तोंड देण्याची पाळी केव्हां येईल, इत्यादि गोष्टींची माहिती देणाऱ्या कालांचा निर्देश येथपर्यंत करण्यांत आला. आतां १९५५ ते १९८५ पर्यंतच्या कालांतील एकंदर गोष्टींचा कल कसा आहे, याची सर्वसाधारण चर्चा येथून पुढें केलेली आहे.

कर्तव्य व जबाबदारी या भावनांनींच कन्या–रवि व्यक्तींचा दृष्टिकोन नियंत्रित केलेला असतो. द्वितीय महायुद्धापूर्वीच्या कालांतील जीवन–पद्धतिप्रमाणेंच, यापुढील कालांतहि आनंददायक व अधिक सुखमय जीवन जगण्याचें भाग्य बहुसंख्य कन्या–रवींच्या वांटयास येणार आहे. परंतु त्याबरोबरच, वातावरणाबरोबर वहात जाण्याचें टाळण्याची काळजी घेणें आवश्यक आहे. असामान्य गोष्टींत यश मिळविण्याचें सामर्थ्य व कर्तृत्व अंगीं असूनहि, शांततेनें जीवन कंठावयास मिळतें म्हणून कित्येक कन्या–रवि व्यक्ति फारसे प्रयत्न न करतां ‘ आळशी ’ पणानें दिवस गमावतील अशी भीति वाटते.

१९४८ ते १९५१ च्या दरम्यान ज्या अडचणींना आणि संकटांना तोंड द्यावें लागलें असेल, तशा तऱ्हेच्या अडचणी व संकटें भावी कालांत कांहीं वर्षें तरी डोकें वर काढणार नाहींत एवढें निश्चित. तुम्हांला अनुकूल अशी सुदैवाची, भरतीची लाटच तुमच्या जीवनप्रवाहांत येत आहे, तिच्या स्वागताची तयारी असूं द्या !

सांगण्याचा मुद्दा असा कीं, आर्थिकदृष्टया १९५५ मध्यें नवीन घर घेणें, रहातें घर बदलणें हें हिताचें व भाग्याचें ठरेल असे ग्रहयोग आहेत. या वर्षीं सुखी व आनंदी कौटुंबिक जीवनाच्या पार्श्वभूमीवर तुमचें जीवन सुखाचें जाईल. आतां, म्हणजे १९५६ पूर्वीं उपयुक्त असे अनुभव तुम्हीं

मिळविलेत व पुढील कार्याचा ‘पाया’ तयार केलांत तर त्याचा फायदा १९५६ व नंतर तुम्हांस घेतां येईल. म्हणूनच आतांपासून ‘प्रयत्न’ करण्यास सुरुवात करणें अतिशय फायद्याचें धोरण ठरेल.

स्पष्ट शब्दांत बोलायचें तर १९५६ सालांत गुरूचें भ्रमण कन्या–रवि व्यक्तींना त्यापुढील कांहीं वर्षें समाधानकारक प्रगतीचीं व तुलनात्मकदृष्ट्या शांततेचीं व स्थैर्याचीं जाणार आहेत असेंच सुचवितें. तुमच्या मूळ स्वभावाला व मनोधर्माला ही गोष्ट मानवण्यासारखी असल्यानें तक्रार करण्यासारखें तसें कांहीं तुम्हांला आढळून येणार नाहीं. धंद्याच्या व आर्थिक क्षेत्रांत १९५६ सालांतील गुरूचें भ्रमण अतिशय उपयुक्त व लाभदायक आहे. बढती होण्याची संधि, मिळकतींत वाढ, तसेंच नवीन धंद्यास सुरुवात करण्याच्या दृष्टीनें हा काल अतिशय योग्य आहे. ग्रहांच्या गोचर भ्रमणांच्या दृष्टीनें १९५६ ते १९६० पर्यंतचा काल तुमच्या जीवनांत एकंदरींत सुबत्तेचा काळ आहे. या वेळीं तुम्ही स्वतःचे स्वतःच भाग्यविधाते ठरणार आहांत. कोणत्या दिशेनें जावयाचें तें तुमचें तुम्हीच ठरवा.

रवि, कन्या राशींत असल्याकारणानें बुध्दिमत्ता व ज्ञानाच्या योगानें प्राप्त झालेलें सामर्थ्य दाखविण्याची आणि त्याचा ‘प्रसाद’ इतरांना देण्याची तीव्रतम इच्छा तुमच्या अंगीं असते. कारण तुम्ही बुद्धिमान् असून प्रामाणिक व सत्याभिमानी असतां. तुमच्या ज्ञानामध्यें वाढ करण्याची संधि आणून देणारे बहुमोल अनुभव तुम्हांला १९६०—६१ मध्यें मिळण्याची शक्यता आहे.

१९६१ च्या शेवटीं शेवटीं हर्षल कन्येंत प्रवेश करतो, व १९६८ च्या शेवटीं तो तेथून बाहेर पडतो. १९६७ ते १९७० पर्यंत प्लूटो कन्येंतून भ्रमण करणार आहे. या दोन प्रमुख ग्रहांचीं हीं भ्रमणें तुमचा जीवनविषयक व इतरांशीं कशा प्रकारचे संबंध ठेवावेत याबद्दलचा दृष्टिकोन पार बदलून टाकतील. हे परिणाम लवकर घडतील कीं उशिरा, हें तुम्हीं कन्येच्या कोणत्या विभागांत जन्मलां आहांत त्यावर अवलंबून राहील. परंतु एक गोष्ट निश्चित आहे कीं, चालू परिस्थितींत व तुमच्या इतरांबरोबरच्या स्नेहसंबंधांत तुम्ही बदल घडवून आणण्याचें निश्चितपणें ठरवाल, व

१९६२ ते ६८ या कालांत स्वतःचा वेगळा व स्वतंत्र जीवनमार्ग आंखाल. याचा परिणाम म्हणजे १९६७ ते १९६९ पर्यंत तुमच्या इच्छा पूर्ण होतील, व तुम्ही जे कांहीं बदल घडवून आणलेले असतील त्यांपासून समाधानकारक फलप्राप्ति होईल असें ग्रहयोगावरून दिसत आहे.

परंतु १९६४ च्या मध्यास तुम्हांला बऱ्याच कठीण कालास तोंड द्यावें लागेल. १९६२–६३ मध्यें द्रव्याची चणचण भासूं लागेल, व याचा परिणाम म्हणून संबंधितांचे व नातेवाइकांचे संबंध तोडून वेगळें राहण्याची प्रबळ इच्छा होईल. १९६४–६५ मध्यें विश्वास ठेवण्यासारखे मित्र व नातेवाईक दुर्मिळ आहेत असा कटु अनुभव तुम्हांला येईल. जग हें वाटतें त्यापेक्षां अधिक स्वार्थी आहे असें तुमचें या वेळीं निश्चित मत होईल. ज्यांच्या संकटप्रसंगीं तुम्हीं आत्मीयतेनें व उदार बुद्धीनें मदत केली ते एकामागून एक तुमच्याविरुद्ध उभे राहिल्याचें दृष्टीस पडेल. हीं दोन वर्षे अशीं आहेत ! आणि १९६५ च्या प्रथमार्धांत तुमच्या सामर्थ्याची तुम्हांस जाणीव होईल, व तुम्हीं या गोंधळांतून स्वतःच्या हिंमतीवर मार्ग काढाल. तथापि हें नवें वातावरण १९६६ च्या मध्यापर्यंत अनुकूल वाटणार नाहीं.

सामर्थ्याचा दुराग्रही अभिमान फारच थोड्या कन्या–रवि व्यक्तींना असतो. बहुधा ‘ पडद्या ’ पाठीमागें रहाण्यांतच त्यांना समाधान वाटतें. परंतु १९६६–६७ च्या सुमारास त्यांच्या या वृत्तीत बराच मोठा बदल होईल. यश व पैसा यामुळें आलेली सत्ता व सामर्थ्य यामुळें बुजऱ्या वृत्तीच्या कन्या-रवि व्यक्ति या तत्त्वाला चिकटून राहण्याचें खंबीर धोरण दाखविणाऱ्या व खंबीर मनोवृत्तीच्या दिसून येतील.

शांततामय जीवनाचें आकर्षण व प्रेम असणाऱ्या कन्या-रवि व्यक्तींना १९६८–६९ मधील घटनामुळें तसलें जीवन १९७०–७१ मध्ये अनुभवावयास मिळेल. कायमचें कोठें तरी स्थिर होण्याचे विचार व इच्छा त्यांच्या मनांत १९७१ च्या शेवटी प्रबल होतील. १९७२ मध्यें सुखी आणि समाधानकारक कौटुंबिक वातावरण व नवीन सुखसोयी त्यांना प्राप्त होऊन दूरवर प्रवासाची त्यांची इच्छाहि या कालांत सफल होईल.

१९७३ च्या मध्यास आणि १९७४ चे सुरवातीस जर कन्या–रवि

व्यक्तींना नोकरी लागली तर त्यांना उज्वल भविष्यकाल, प्रगति व सुधारणा या गोष्टींबद्दल खात्री बाळगतां येईल. परंतु १९७४ च्या शेवटीं द्रव्याची तारांबळ उडेल. याला आर्थिक कारणाबरोबरच या लोकांचें स्वातंत्र्यप्रेम कारणीभूत असेल. १९७४ च्या शेवटीं व १९७५ च्या सुरवातीस जुने स्नेहसंबंध तुटल्याचें त्यांना पहावें लागेल. दूरवरच्या प्रवासाचे विचार तुमच्या मनांत घोळत असल्यास १९७६ मध्यें ती वेळ आली आहे असें समजा. अथवा या कालांत स्वतःचें नांव कमावण्याच्या व सामाजिक कार्यांत तुम्हीं दंग असाल असें आढळून येईल.

कन्येंत रवि असतांना जन्म घेणाऱ्या व्यक्ति लाजाळू परंतु मनमिळाऊ वृत्तीच्या आणि चिरस्थायी मैत्री करणाऱ्या असतात. १९७६ मध्यें जे तुमचे खरे मित्र व उपकारकर्ते असतील त्यांची मैत्री तोडणें हें मूर्खपणाचें ठरेल. १९७७ मध्ये धंदा चांगला भरभराटीस येईल, व १९७७–७८ मध्यें आवक चागलीच वाढेल. तुमच्या मित्रांच्या व नातेवाईकांच्या इच्छेविरुद्ध तुम्हीं एखादें नवीन 'साहस' १९७८ मध्यें हातीं घेतलें असेल तर त्याचें इच्छित फल जरी १९७८-७९ मध्यें दिसलें नाहीं तरी १९७९ चे मध्यानंतर, तुम्हींच 'बरोबर' होतां, असें जगास दिसून येईल.

१९८० नंतर मात्र तुम्ही खरोखरच उत्तम प्रगति साधाल. १९७९–८० मध्यें आपलें कार्य पार पाडण्याचा मानसिक उत्साह जरी वाटत असला तरी तुमची प्रकृति थोड्याफार प्रमाणांत बिघडेल. १९८१ सालीं मंद रीतीनें प्रगति कराल. या वेळीं द्रव्याची चिंता वाटणार नाहीं, व नातेवाईकांच्या मनांत तुमच्याविषयीं आदर निर्माण होऊन, तुम्ही सर्वांना हवेहवेसे वाटाल. पूर्वी जे स्नेहसंबंध तुटले असतील ते या कालांत पूर्ववत् सुरू होतील.

१९८१–८२ सालांत वैयक्तिक जीवन विचारांत घेतां नातेवाइकांशीं संबंधित अथवा पूर्वींच्या प्रेमप्रकरणांशी संबंधित असे कांहीं प्रश्न निर्माण होतील, या प्रश्नाचे समाधानकारक निकाल लावण्याचे मार्ग १९८२ मध्यें सांपडतील व त्या कटकटीतून मुक्तता होईल. असलीं 'ओझीं' कोणत्याहि तऱ्हेची कुरकूर न करतां वाहण्यास तुमची कर्तव्यबुद्धि व सदसद्विवेकबुद्धि

तुम्हांला १९८२ च्या शेवटीं मदत करील. १९८३ मध्यें स्वतःचें स्वतंत्र घरकुल स्थिर पायावर तुम्हांस उभें करणें शक्य होईल. १९८३ च्या शेवटीं व १९८४ मध्यें सुखी व समाधानी कौटुंबिक वातावरणाचा आस्वाद घेण्याचें भाग्य तुम्हांला लाभेल. याच वेळीं तुमच्या घरांत एका "नवीन व्यक्ती" ची भर तुमचें जीवन अधिकच सुखी करील, याची पक्की खात्री बाळगा.

बुधाच्या स्वामित्वाखालीं असलेल्या बौद्धिक राशि कन्येंत जन्म घेणाऱ्या व्यक्ति बुद्धिमान् असतांत; आणि म्हणूनच कन्याप्रधान व्यक्ति चांगले सल्लागार, उपदेशक, शिक्षक, डॉक्टर, वकील, आणि विश्लेषणकारी होतात. स्वतः सत्ता गाजविण्यापेक्षां अधिकारी व्यक्तींना नीट मार्गदर्शन व सल्ला देण्याची आवड या व्यक्तींना विशेष असते.

---



श्री दादामहाराज पंडित.
लक्ष्मीबाग, कुन्नूर



श्री राजाराम कालिया.
अगस्त कुंड, बनारस

# तूळ–रवि

(कोणत्याहि वर्षांतील २४ सप्टेंबर ते २३ ऑक्टोबर या कालांत जन्मलेले लोक)

## आर्थिक भविष्य

स्वतःच्या समाधानासाठीं अथवा मानमान्यतेसाठीं तूळ–रवि व्यक्तींना "पैसा जवळ असावा" असें वाटतें, परंतु द्रव्यसंचयाला ते भलतेंच महत्त्व देत नाहींत. जीवनाच्या कोणत्याहि क्षेत्रांत तूळ–रवि व्यक्ति असल्या तरी, संपत्तीमध्यें वाढ करून घेण्याचें निदान ग्रह अनुकूल असतांना तरी त्यांनीं ठरविलें पाहिजे. पुढील वर्षांत तूळ–रवि व्यक्तींच्या खालील घटकांना पुढें दिलेल्या कालांत द्रव्यप्राप्ति करून घेतां येईल. अर्थात् दैवाच्या या अनुकूलतेला त्यांनीं योग्य दिशेनें प्रयत्न करून साथ दिली तर त्यांना समाधानकारक निर्णय व यश मिळेल.

कोणत्याहि वर्षांतील २३ सप्टेंबर ते २ ऑक्टोबरचे दरम्यान तुमचा जन्म झाला असल्यास द्रव्याच्या दृष्टीनें पुढील कालखंड सुदैवी ठरतील:— जानेवारी, फेब्रुवारी व सप्टेंबर १९५७; एप्रिल ते ऑगस्ट, नोव्हेंबर, व डिसेंबर १९६१; मे, जून १९६५; डिसेंबर १९६८; जानेवारी ते मार्च व ऑगस्ट सप्टेंबर १९६९; मार्च–एप्रिल व ऑगस्ट ते डिसेंबर १९७३; सप्टेंबर–ऑक्टोबर १९७६; एप्रिल–मे १९७७; नोव्हेंबर–डिसेंबर १९८०; जानेवारी ते ऑगस्ट १९८१; मार्च, व सप्टेंबर ते नोव्हेंबर १९८५.

पण तुमचा जन्म ३ ऑक्टोबर ते १२ आक्टोबरच्या दरम्यान झालेला असेल तर तुमच्या संपत्तींत वाढ होत असल्याचें निदर्शनास येण्याचे कालखंड पुढीलप्रमाणें आहेत:— ऑक्टोबर–नोव्हेंबर १९५७; जानेवारी–फेब्रुवारी १९६२; जुलै १९६५; ऑक्टोबर १९६९; मे ते जुलै १९७३; जानेवारी १९७४; जून १९७७; सप्टेंबर–ऑक्टोबर १९८१; एप्रिल ते ऑगस्ट, व डिसेंबर १९८५; जानेवारी १९८६.

तुमचा जन्म कोणत्याहि वर्षाच्या १३ ते २३ ऑक्टोबरच्या दरम्यान झाला असेल तर तुमच्यावर लक्ष्मीचा वरदहस्त पुढील कालांत राहील:– डिसेंबर १९५७; जानेवारी, व एप्रिल ते सप्टेंबर १९५८; मार्च १९६२; ऑगस्ट, सप्टेंबर, व डिसेंबर १९६५; जानेवारी ते मे १९६६; नोव्हेंबर, डिसेंबर १९६९; जून ते ऑगस्ट १९७०; फेब्रुवारी, मार्च १९७४; जुलै, ऑगस्ट १९७७; फेब्रुवारी ते एप्रिल १९७८; नोव्हेंबर १९८१; फेब्रुवारी १९८६.

## संकटाची व समाधानाची वेळ

पुढील २५ वर्षांत असा कांहीं काल आहे कीं, ज्या वेळीं तुमच्या आयुष्यांतील सुदैवी व प्रगतीशील वेळ आल्याचे आढळून येईल. महत्त्वाचें कार्य हातीं घेण्यास, धंदेवाईक व घरगुती वातावरणांत बदल करण्यास, अथवा नवीन जबाबदारीचीं कामे स्वीकारण्यास, किंवा नेहमींच्या कंटाळ-वाण्या जीवनांतून बाहेर निघून कांहीं तरी नवीन गोष्टी करावयास मदत करणारी ती वेळ म्हणजे, ऑक्टोबर, नोव्हेंबर १९५५; ऑक्टोबर १९५७; सप्टेंबर, ऑक्टोबर १९५८; सप्टेंबर १९६१; ऑगस्ट १९६३; जुलै, ऑगस्ट १९६५; डिसेंबर १९६६; जानेवारी, फेब्रुवारी, एप्रिल ते जुलै १९६७; डिसेंबर १९६९; नोव्हेंबर १९७०; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९७२; ऑक्टोबर, १९७४; सप्टेंबर १९७६; ऑगस्ट, सप्टेंबर १९७८; जुलै, ऑगस्ट १९८०; जानेवारी ते जुलै १९८२; डिसेंबर १९८३.

कित्येक असे कालहि आहेत कीं, जेव्हां तुमचे इतरांशीं असलेले संबंध बिघडत आहेत, किंवा परिस्थिति सुधारावी म्हणून आंखलेल्या योजना अयशस्वी होत आहेत असें दिसून येईल. चांगलें फल प्राप्त व्हावें अशा इच्छेनें महत्त्वाकांक्षी योजना हाती घेण्यास हें कालखंड इतके उपयोगी नाहींत. म्हणून खालीं दिलेल्या कालांत नवीन कार्य सुरू करणें असमाधान-कारी ठरण्याची शक्यता आहे. ती वेळ म्हणजे, फेब्रुवारी १९५५; जानेवारी १९५७; जुलै १९५८; मे १९६२; एप्रिल १९६४; मार्च, एप्रिल १९६६; मार्च १९६८; फेब्रुवारी १९७०; जून १९७२; जुलै, ऑगस्ट, व नोव्हेंबर डिसेंबर १९७३; जून १९७५; मे १९७७; एप्रिल, मे १९७९; एप्रिल १९८१; मार्च १९८३.

## विविध

आमचा असा विश्वास आहे कीं, त्रास नसलेलें जीवनच माणसाला चांगलें जगतां येत नाहीं; परंतु कष्टमय जीवन मात्र तो चांगल्या रीतीनें जगूं शकतो. ज्या वेळीं परिस्थिति सरळ असेल, त्रास नसेल, संकटें नसतील, त्या वेळीं माणसाचें तेज पडत नाहीं, परंतु संकटाशीं झुंज घेतांना मात्र त्यांचें सर्व गुण उजळलेल्या स्वरूपांत पहावयास मिळतात. विरुद्ध परिस्थितीशीं सामना करण्यास वीरांची आवश्यकता असते, व असे वीरच आयुष्याच्या रणक्षेत्रांतून सहिसलामत बाहेर येतात. सहनशीलता व नम्रपणा यांबद्दल तूळ-रवि-व्यक्ति प्रसिद्ध असल्या तरी जीवनाच्या संग्रामास आत्मीयतेनें झुंज देण्यांत त्यांची बरोबरी इतर कोणीहि करूं शकणार नाहीं.

१९५२ ते १९५६ या कालांत तूळ राशीला प्रतिकूल परिस्थिति निर्माण करणारे अशुभ ग्रहयोग पाहिले असतां मनाला एक प्रकारचा धक्का बसतो. अशा प्रकारच्या, प्रमुख ग्रहांच्या अशुभ योगांच्या, चिरडून टाकणाऱ्या दडपणाखालीं कोणीहि व्यक्ति सहज आत्महत्या करील; अथवा मनाचा तोल जाऊन धुळीला मिळेल. परंतु या वरील कालांत संग्रामांत गुंतलेल्या तूळ-रविव्यक्तींमध्यें आपल्याला त्या मानानें फारच थोड्या व्यक्ति 'शिकार' झालेल्या दिसून येतील. या चार वर्षांच्या कालावधींत या लोकांना आपल्या जीवनांत बरेच फेरबदल करावे लागले असतील, आणि परिस्थितीशीं मिळवून घ्यावें लागलें असेल. यापुढें मात्र १९५६ पासून १९६८ पर्यंतच्या कालांत पूर्वीसारखी गंभीर परिस्थिति निर्माण होणार नाहीं; आणि याबद्दल या लोकांनीं ग्रहांचे आभार मानले पाहिजेत.

१९५७ मध्यें शुभयोगी ग्रह गुरु हा तूळेंत प्रवेश करीत आहे, व यामुळें बहुसंख्य तूळ रवींचें भाग्य उदयास येत आहे. पूर्वीच्या सात वर्षांतील कार्यक्रम व आवडीनिवडींची जी वाढ झालेली असेल त्यांचा फायदा करून घेणें शक्य होईल. किंवा नवीन पद्धतीवर धंदा सुरू करणेंहि लाभदायक ठरेल. १९५७ ते १९५९ या कालांत कित्येक तूळ–रवि व्यक्ति जगांत अत्युच्च स्थानीं विराजमान झाल्याचें दृष्टीस पडेल.

स्वतःचें जीवन स्वतंत्रपणें जगणें व स्वतःच्या मार्गानें जीवन व्यतीत

करणें तूळ–रवींना फारच कठीण जातें. त्यांचा ज्यांच्याशीं स्नेहसंबंध घडून येतो त्याप्रमाणें त्यांचें जीवन घडविलें अथवा बिघडविलें जातें. १९५५–५६ मधील एक वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट अशी कीं, त्यांचे समलिंगी मित्राबरोबर जोडलेले संबंध त्यांना नवीनच अनुभव आणून देतील. स्त्री वा पुरुष यांच्या बरोबरच जोडलेले संबंध, आत्यंतिक वैयक्तिक वा व्यक्तिगत स्वरूपाचे असतील. यांचा फायदेशीर परिणाम म्हणजे जीवनाकडे व इतर लोकांच्याकडे पाहण्याचा स्वतंत्र दृष्टीकोन यांना लाभेल.

१९५७ पासून पैशाचे व्यवहार संभाळण्याकडे अधिक काळजीपूर्वक लक्ष पुरवावें लागेल. कारण १९५७ पासून नेपच्यून वृश्चिकेंतून भ्रमण करीत असल्यानें आर्थिक बाबतींत कांहीं गैरव्यवस्थेचीं चिन्हें दिसून येतील. सांगण्याचा उद्देश इतकाच कीं, आर्थिक बाबतींतील गैरव्यवस्थेचा परिणाम त्यांच्या इतर कार्यक्षेत्रावर होऊं नये. कारण १९६० ते १९७० या दहा वर्षांच्या कालांत एकंदरींत कोणत्याहि तऱ्हेच्या महत्त्वाच्या व मोठ्या अडचणी न येतां त्यांचें जीवन सुरळीत चालेल. लक्षांत ठेवण्यासारखी दुसरी एक प्रमुख गोष्ट अशीं कीं, १९६० पूर्वीं अथवा १९६९ नंतर पुन्हा इतकें सुखी व समाधानी जीवन तुम्हांला मिळण्याची शक्यता कमी आहे. तेव्हां या कालाचा पुरेपूर उपयोग करून घेणें हाच योग्य मार्ग होय.

१९५८ सालीं प्रमुख ग्रहांचा कल, जुने संबंध पुन्हां नवीन करण्याकडे दिसत आहे. १९५९ सालीं आर्थिक उन्नतीकडे आणि नातेवाईकांकडून मदत मिळण्याकडे एकूण कल दिसत आहे. १९६० सालीं कित्येक घरगुती प्रश्न वर डोकें करतील; परंतु सामर्थ्यशाली तूळ–रवि व्यक्ति त्यांना धैर्यानें तोंड देऊं शकतील, परंतु याच वर्षीं मे, जून, जुलै या तीन महिन्यांत कित्येक प्रश्न मानसिक त्रास निर्माण करतील, आणि घरगुती प्रश्न व जुने कांहीं संबंध याच कांही आठवड्यांत इतकें उग्र स्वरूप धारण करतील कीं, एकदोन चांगले जुने संबंध तुटण्याची शक्यता दिसून येत आहे. या गोष्टीची माहिती पूर्वींच असल्यामुळें या तीन महिन्यापूर्वींच त्याविषयीं कांहीं विधायक निर्णय घेणें किंवा पावलें टाकणें फायदेशीर ठरेल. याच वर्षीं स्थानपरिवर्तन अथवा नवीन घर घेण्याचे योग आहेत.

विशेषत: १९६१-६२ मध्यें दैवाचे फांसे तुमच्या बाजूनें वारंवार पडत असल्याचें दिसून येईल. दुसऱ्यांशीं असणाऱ्या स्नेहसंबंधाच्या दृष्टीनें विचार केल्यास, सामाजिक जीवनाच्या दृष्टीनें १९६७–६८ व १९६९ चा कांहीं भाग हा काल निराशेचा जाईल. या अडीच वर्षांच्या कालांत, सर्वसामान्यत: कायदेशीर गोष्टींतून व खटल्यातून म्हणजे वकीलामार्फतच आपला फायदा होऊं शकतो, हें लक्षांत ठेवणें इष्ट ठरेल. एप्रिल ते जून १९६७, किंवा मार्च १९६८ च्या आसपास याचा विशेष प्रत्यय येईल. शांतता व विश्व-बंधुत्व यांवर प्रेम करण्याची तुमची वृत्ती असल्यानें इतरांशीं असलेले संबंध तोडण्याचें शक्य तो टाळावें.

परिस्थितीचें यथार्थ ज्ञान करून घेण्याची अंत:शक्ति तुमच्याजवळ असल्यामुळें १९६३ च्या उत्तरार्धात व १९६४ च्या प्रथमार्धात लोकांना मार्गदर्शन करण्याचें व त्यांचें पुढारीपण पत्करण्याचें सामर्थ्यं तुम्हांला प्राप्त होईल. तुमच्या कायमच्या सहवासानें व मैत्रीनें इतर लोक आपलीं मतें अगदीं टोंकाला नेऊन भांडणतंटे करण्यापासून अलिप्त राहतील, व हें तुमचें कार्य संस्मरणीय होऊन राहील. शक्तीचा व वेळेचा हा अपव्यय नाहीं, हें लक्षांत ठेवा. उलट लोकांत तुमची प्रतिष्ठा वाढेल, व तुमच्या स्नेह्यांत मोठ्या प्रमाणांत वाढ होऊन त्यापुढील कालांत तुम्हांला समाजांत महत्त्वाचें स्थान प्राप्त करून घेण्यास त्याची मोठी मदत होईल. सदसद्विवेक बुद्धि व न्याय–अन्याय यांतील फरक जाणण्याचें कौशल्य तुमच्याजवळ असून आपल्या शहाणपणाचा व बुद्धिमत्तेचा फायदा इतरांना देण्यांत मागेंपुढें पाहूं नका. आणि तुम्ही इतरांना जेव्हां कांहीं तरी देतां तेव्हां त्याची परतफेड निश्चित होत असते, हें लक्षांत घ्या.

१९६९ ते १९७४ पर्यंत परिस्थितींत व वातावरणांत आमूलाग्र बदल करावा अशी आत्यंतिक इच्छा तुमच्या मनांत उत्पन्न होईल. १९६९-७० मध्यें तुम्ही जे कांहीं बदल घडवून आणाल त्याचे शुभदायी परिणाम पुढें दिसून येतील. कांहीं असलें तरी १९६९–७० हीं दोन वर्षे तुमच्या जीवनांत बदल घडवून आणणारीं व सुधारणा साधणारीं ठरतील. तुमच्या प्रयत्नाचें इच्छित फल प्राप्त झाल्याचे दिसून येण्याचा हा काल असून, तुम्ही तुमच्या कार्यपद्धतीला चिकटून राहण्यांतच तुमचें हित आहे.

१९७२ मध्यें तूळेंत प्रवेश करणाऱ्या प्लूटोचा तुमच्या जीवनाशीं घनिष्ट संबंध येत आहे. तुमच्या धंद्यांत व जीवनांत खूपच बदल व जुळवा-जुळव करण्याचा प्रसंग त्याच्यामुळें येणार आहे; आणि यांत तुमच्या समाधानाला फारच थोडी जागा आहे. कारण तुमचे आप्तस्वकीय व स्नेहीसोबती यांच्याबरोबरचे संबंध तुटावेत अशा तऱ्हेचे बदल तुमच्या मनोवृत्तींत होणार आहेत. सतत बदल व गोंधळ यांनीं भरलेलीं अशीं हीं वर्षें जातील. तुम्हांला अगदींच संकटांत लोटणारीं हीं वर्षें नसलीं तरी शांतताप्रिय असल्यानें बदलत्या परिस्थितीशीं जुळवून घेणें तुम्हांला त्रास-दायक व कष्टाचें वाटेल.

तथापि १९७३ व १९७४ च्या कांहीं भागांत परिस्थितीमध्यें अनुकूल बदल व सुधारणा झाल्याचे समाधानकारक अनुभव तुम्हांला येतील. १९७२ मध्यें एखादी नावीन्यपूर्ण योजना हातीं घेतांच आश्चर्यकारक व आनंददायी फल त्यापासून प्राप्त झाल्याचे आढळून येईल. परंतु १९७४ व १९७५ च्या शेवटच्या विभागांत तुमचे सहकारी तुमच्या योजनांना विरोध करतील किंवा तुमच्याबरोबरचे संबंध तोडतील. यामुळें धंद्यांतील प्रगति मंदावत जाऊन, तुम्हाला कठीण काळाला तोंड द्यावें लागेल. तथापि १९७६ मधील वेगवान सुधारणा व प्रगतीबरोबर, तुम्हाला अनेक मार्ग सांपडून व कंटकमय मार्गाचा त्रास सहज विसरतां येईल. १९७५ मधील द्रव्याचा ओहोटीचा काळ जाऊन १९७६ च्या प्रथमार्धानंतर भरतीला सुरवात होईल. विशेषत: कोणी तरी वयस्कर मनुष्य तुमच्या या गोंधळातून तुम्हांला बाहेर काढील व मोठी मदत करील. १९७७–१९७८ मध्यें धंद्यात चांगलीच सुधारणा व प्रगति होऊन आवक वाढेल. या वेळीं तुमच्यावर कांहीं नवीन जबाबदाऱ्या पडतील, पण त्यामुळें तुमच्या कर्तृत्वशक्तीचें क्षेत्र विस्तृत होईल. खरोखरच यांत तुमचा भरपूर फायदा असून प्रगतीहि चांगल्या रीतीनें चालू राहील. १९७९ मध्यें तुम्ही ज्या नवीन कार्यांना सुरवात केली असेल त्याचे समाधानकारक फल १९८० च्या उत्तरार्धांत व १९८१ मध्यें मिळूं लागेल. यानंतर तुमच्या बिघडलेल्या शरीरप्रकृतीमुळें तुमच्या प्रगतींत अधुनमधून अडथळे आले तरी ही प्रगति समाधानकारकरीत्या अशीच कांहीं वर्षें पुढें चालू राहील. परंतु यावेळीं तुमच्या दृष्टिकोनांत खूपच बदल होईल हें

नाकारण्यांत अर्थ नाहीं. १९७२ मधील तूळ–रवि व्यक्ति ही १९८२ मधील तूळ–रवि व्यक्तीहून अगदींच निराळी असेल. अर्थात् हा बदल चांगला आहे हें येथें सांगणें इष्ट ठरेल!

## सिंहावलोकन

जुनी व्यवस्था टिकवून धरण्यासाठीं धडपडणाऱ्या मीन–कन्या–धनु–मिथून या राशि, व नवीन कल्पनांचें साम्राज्य निर्माण करूं पाहणाऱ्या कुंभ-सिंह–वृश्चिक–वृषभ या राशि, यांच्यामध्यें चाललेल्या युगसंघर्षामुळें फार मोठ्या प्रमाणांवर युद्ध माजलें असतें. (लहान प्रमाणावर हे झगडे चालूच आहेत;) परंतु मेष–तूळ–मकर–कर्क या राशींच्या मध्यस्तीमुळें हा धोका टळलेला आहे......समतोल वृत्ति, गोष्टींचें यथार्थ मूल्यमापन करण्याचें कौशल्य, आणि परिस्थितीचें गांभीर्य ओळखण्याची शक्ति, यामुळें तूळेनें फार महत्त्वाची भूमिका वठविली आहे. घर, समाज, राष्ट्र इत्यादि क्षेत्रांत अहिंसक मार्गांनें क्रांति झालेली दिसली तर ती तूळेमुळेंच होय हें ओळखावें. सनातन्यांनीं कशाचा त्याग करावा, आणि सुधारकांनीं भलत्याच नावीन्याचा मोह कसा टाळावा, हें तूळाच दाखवूं शकते.

'जुनें तेवढें सर्व वाईट, अथवा नवीन तेवढें सगळें चांगलें' असें म्हणणें किंवा समजणें बरोबर नाहीं. 'आणि आपला माल तेवढा सर्वोत्कृष्ट आहे' असें व्यापारी म्हणतोच...अशा वेळीं दोन्ही पक्षांतील लोकांचीं मतें लक्षांत घेऊन सर्वांनाच स्वीकारणीय असतील अशा चांगल्या गोष्टींची निवड करण्याचें कार्य तिऱ्हाइतालाच करावें लागतें. यासाठीं प्रामाणिक मध्यस्थांची आवश्यकता असते. हिंसक मार्गानें क्रांति होऊं नये, यासाठीं सुवर्णमध्य व दोन्ही पक्षप्रवर्तकांचें समाधान करणें हा मार्ग मध्यस्थांना अवलंबावा लागतो. २० व्या शतकांत भारतांत महात्मा गांधींनीं अशा प्रकारचा मार्ग दाखवून लोकांना सुखप्राप्ति करून दिली. स्वतःच्या शक्ती-नुसार शांततेला हातभार लावणारे असे अनेक लोक या शतकांत दिसून येतात. त्यांचें हें कृत्य असें आहे कीं, त्यांची जाणीव आपल्याला झाल्याविना रहात नाहीं. तूळ–मेष–कर्क–मकर या व्यक्तींनीं सत्तेचा समतोलपणा राखला जावा यासाठी इतिहासांत नमूद करून ठेवण्यासारखी

ही जी कामगिरी केली आहे, तिच्याकडे आपण दुर्लक्ष करूं शकत नाहीं.

२० व्या शतकांत हे सर्वच लोक नेहमींच "राजमार्गा" वरून वाटचाल करीत होते असें म्हणतां येत नाहीं. ग्रहांच्या महत्त्वपूर्ण भ्रमणामुळें त्यांना अधूनमधून जरा बाजूनें वाटचाल करावी लागली, हें लक्षांत घ्यावें.

१९४२ ते १९५७ याकालांत नेपच्यून तूळेंतून भ्रमण करीत असल्यानें तूळ राशि किंचित् 'उजवी'कडे झुकलेली आहे. १९६८ शेवटच्या तीन महिन्यांपासून ते १९७५ च्या मध्यापर्यंत ती 'डावी'कडे झुकेल व सुधारणावादी वृत्तीकडे कल दर्शवील. हर्षलच्या या भ्रमणामुळें त्यांच्या स्वतःच्याच जीवनावर परिणाम होणार असल्यानें जुनी व्यवस्था नाहींशी होण्यासाठीं सुधारणेचा अंगीकार केला पाहिजे, असें त्यांना आढळून येईल. १९७२ ते १९८३ च्या अखेरपर्यंत प्लूटो तूळेंतून भ्रमण करील. त्यामुळें मेष व तूळ यांच्यावर फार महत्त्वाचे 'परिणाम' घडून येतील. या वेळीं आपलें कर्तव्य पार पाडणें या लोकांना अशक्यप्राय होईल. त्यांची दृष्टि गोंधळून जाईल; वयामुळें प्रामाणिक मध्यस्थांची उणीव जगाला भासेल एकमेकांशीं युद्ध करण्याच्या तयारीनें उभ्या राहणाऱ्या दोन पक्षांत सलोखा व शांतता निर्माण करण्यास तूळेऐवजीं या कालांत मकर व कर्क राशि पुढें येतील.

१९८३–८४ मध्यें मेष–तूळ या दोन्ही राशि आपल्या पूर्वीच्या स्थानीं स्थानापन्न होतील. समाजांत, कुटुंबांत, वा राष्ट्रांत त्यांना "पूर्वीचें स्थान" मिळेल; व त्यानंतर या शतकाच्या अखेरपर्यंत त्यांची प्रगति होत राहील, आणि जनता त्यांच्या नेतृत्वाखालीं राहील.

---






# वृश्चिक–रवि

(कोणत्याहि वर्षांच्या २४ ऑक्टोबर ते २२ नोव्हेंबर या काळांत जन्मलेले लोक)

---

## आर्थिक भविष्य

वृश्चिक–रवि व्यक्तींचें पैशाविषयींचें बोलणें कित्येकांना निष्ठुरपणाचें वाटलें तरी त्याचें कारण त्यांना संपत्ति–संचयाची आवड असूनहि ती प्रसंगोपातच मिळते हें होय. पैसा मिळविण्याच्या हेतूनेंच ते इतरांची उत्कृष्ट चाकरी बजावितात. इतरांच्या दृष्टीनें वृश्चिक–रवींना पैसा हाताळण्याचें तंत्र माहीत नसल्यानेंच त्यांची बदनामी होते, असा माझा विश्वास आहे. तथापि 'द्रव्य' त्यांच्या आवडीचें असल्यानें, अधिक प्रमाणांत द्रव्यप्राप्ति होण्याचा काल कोणता याची चिकित्सा करूं या. अधिक अचूक निर्णयासाठीं वृश्चिक-रवींची विभागणी तीन गटांत करणें श्रेयस्कर ठरेल.

कोणत्याहि वर्षातील २४ ऑक्टोबर ते २ नोव्हेंबरचे दरम्यान जन्मलेल्यांना, पुढील वर्षांतील खालील कालखंड द्रव्याच्या दृष्टीनें लाभदायक आहेतः—फेब्रुवारी, मार्च, ऑक्टोबर १९५८; एप्रिल, मे, सप्टेंबर ते डिसेंबर १९६२; जानेवारी १९६३; सप्टेंबर, ऑक्टोबर १९६५; जून १९६६; जानेवारी ते एप्रिल व सप्टेंबर १९७०; एप्रिल, नोव्हेंबर, डिसेंबर १९७४; सप्टेंबर ते डिसेंबर १९७७; जानेवारी व मे १९७८; डिसेंबर १९८१; जानेवारी ते सप्टेंबर १९८२.

कोणत्याहि वर्षातील ३ नोव्हेंबर ते १२ नोव्हेंबरचे दरम्यान जन्मलेल्यांना पुढें दिलेल्या वर्षांतील महिने धनलाभदायक ठरतीलः— नोव्हेंबर, डिसेंबर १९५८; जून ते ऑगस्ट १९६२; फेब्रुवारी १९६३; जुलै १९६६; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९७०; मे ते ऑक्टोबर १९७४; जानेवारी १९७५; जून, जुलै १९७८; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९८२.

कोणत्याहि वर्षातील १३ ते २२ नोव्हेंबरपर्यंतच्या दरम्यान जन्मले-

त्यांना पुढील कालांत खात्रीलायक रीत्या द्रव्यलाभाचा योग आहे:— जानेवारी ते जून १९५५; जानेवारी, फेब्रुवारी, मे ते ऑक्टोबर १९५९; मार्च १९६३; ऑगस्ट, सप्टेंबर १९६६; फेब्रुवारी ते मे १९६७; डिसेंबर १९७०; जानेवारी, जुलै, ऑगस्ट १९७१; फेब्रुवारी, मार्च १९७५; ऑगस्ट १९७८; मार्च १९७९; नोव्हेंबर, डिसेंबर १९८२.

## संकटाची व समाधानाची वेळ

डिसेंबर १९५५; नोव्हेंबर, डिसेंबर १९५७; नोव्हेंबर १९५९; ऑक्टोबर १९६१; ऑक्टोबर १९६३; सप्टेंबर १९६५; मार्च व ऑगस्ट १९६७; जानेवारी, फेब्रुवारी १९६९; जानेवारी १९७१; डिसेंबर १९७२; नोव्हेंबर १९७४; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९७६; ऑक्टोबर १९७८; सप्टेंबर १९८०; ऑगस्ट, सप्टेंबर १९८२; जानेवारी ते ऑगस्ट १९८४ या सर्व कालांत तुम्हांला उत्तम प्रकारें यश व धन मिळण्याचे सुयोग असून कोणतीहि वैशिष्ट्यपूर्ण वा नवीन कामें सुरू करण्यास अथवा ' बदल ' घडवून आणण्यास अनुकूलता प्राप्त होईल.

या उलट, मार्च, एप्रिल १९५५; फेब्रुवारी, मार्च १९५७; ऑगस्ट व नोव्हेंबर १९५८; जुलै १९६०; जून १९६२; मे, जून १९६४; मे १९६६; एप्रिल, मे १९६८; मार्च, एप्रिल १९७०; फेब्रुवारी, मार्च १९७२; ऑगस्ट ते ऑक्टोबर १९७३; जानेवारी, फेब्रुवारी १९७४; जुलै, ऑगस्ट १९७५; जून, जुलै १९७७; जून १९७९; मे १९८१; एप्रिल, मे १९८३ या सर्व कालांत बहुतेक वृश्चिक—रवि व्यक्तींना दुर्दैवानें विरुद्ध दिशेनें वारा वहात असल्याची प्रचीति येईल. महत्त्वाच्या बाबतींत दुर्दैव पाठपुरवणी करणार असल्यानें मानसिक अस्वास्थ्य व तंग वातावरण यांना तोंड देण्याचा प्रसंग येईल. कोणतीहि नवीन गोष्ट करण्यास हा काल प्रतिकूल आहे.

## विविध

बहुसंख्य वृश्चिक—रवींच्या जीवनांवर जाणवणारे परिणाम घडवून आणण्याची ' करामत ' १९५५ मधील चालू राहणाऱ्या वृश्चिकेंतील 'शनि' च्या भ्रमणाकडून केली जाईल.

शनीच्या या भ्रमणाच्या परिणामांकडे क्वचितच दुर्लक्ष करितां येईल.

मानसदृष्ट्या, मनाच्या शक्तींचें केंद्रीकरण करणें, भावनांच्या तीव्रतेंत वाढ करणें, आणि लहानसहान बाबतींतहि तितक्याच सामर्थ्यानें वागणें इत्यादि कामें यापुढें साध्य होतील. प्रतिकूल दृष्टीनें विचार केला तर मनावर निराशेचा पगडा बसेल. शनि जेव्हां वर्चस्व गाजवीत असतो तेव्हां सामर्थ्य-हीन माणसाना निराशेचे चटके चांगलेच जाणवत असतात.

व्यवहाराच्या दृष्टीनें पाहिलें तर आत्यंतिक कष्ट, जबाबदारी, आणि मंद प्रगति या गोष्टी शनीमुळें घडून येतात. सामान्यतः संकटें आणि अड-थळे, व प्रत्येक कामांत दिरंगाई हे त्याचे दृश्य परिणाम होत.

शनीचा घर व कुटुंब यांच्याशीं संबंध असल्यानें, तो कौटुंबिक संबंध आणि घरांतील घडामोडी या बाबतींत मूलभूत बदल घडवून आणतो. म्हणूच १९५५ मध्यें एखादा वयस्कर नातेवाईक आपणांला कायम सोडून गेल्याचें बहुसंख्य वृश्चिक–रवि व्यक्तींना दिसून येईल. असमाधान व गोंधळाचें वातावरण यांमुळें राहतें घर बदलावें असें वाटूं लागेल. बहुतांशीं १९५५ च्या शेवटीं या गोष्टी साकार होतील.

सुदैवाची पूर्ण लाट तुमच्या आयुष्यांत १९५८ च्या सुमारास येईल. या वेळीं नेपच्यून आणि गुरु वृश्चिकेंत प्रवेश करतील, आणि त्यांचे अनुकूल ब लाभदायक परिणाम दिसून येतील. १९५७ च्या शेवटीं किंवा १९५८ च्या सुरुवातीस आर्थिक क्षेत्रांत उन्नति करून घेण्यास सुसंधि प्राप्त होईल, व त्यानंतर तुलनात्मकदृष्ट्या भरभराटीच्या कालास सुरुवात होईल.

ताबडतोब मिळणाऱ्या फलाकडे अथवा फायद्याकडे दृष्टि न ठेवतां दूरवरची योजना आंखून व अनुभवाची शिदोरी बांधून त्याचा भविष्य कालांत उपयोग होईल याकडे लक्ष पुरवावें.

मे १९५७ व मे १९५९ यांमध्यें बहुसंख्य वृश्चिक–रवि व्यक्तींना नवीन मित्र लाभतील, व त्यामुळें त्यांचें जीवन सुखी होईल.

मे १९५९ ते ऑगस्ट १९६२ या कालांत अनेक व्यक्तींना जीवनांतले नवीन अनुभव कठीण मार्गानें घ्यावे लागतील. जरी हे अनुभव सुखकारक नसले तरी ते भावी कालांत फारच उपयोगी पडतील. हा फारसा सुदैवाचा काल नसला तरी तुमच्या प्रगतींत अडथळे येतील वा संकटें येतील असा

त्याचा अर्थ नाहीं. तथापि वर उल्लेखिलेल्या कालांत भरपूर कष्ट, जबाबदारी आणि त्रास हा सोसावा लागणारच.

वृश्चिक–रवि व्यक्ति या उदार मतवादी, सुधारक, व विधायक वृत्तीच्या असतात. १९६२ ते १९७० या कालांत पुष्कळ वृश्चिक–रवि व्यक्ति, स्वप्नाळू मनोवृत्ती, आध्यात्मिक व गूढवाद यांकडे आकर्षिल्या जातील. धार्मिक वा आध्यात्मिक गोष्टींशीं संबंधित अशा सामाजिक चळवळींत तुम्हीं भाग घेतलेला असेल तर १९६६–६७ मध्यें व विशेषत: १९६६ च्या सुरवातीच्या भागांत तुमचा उत्कर्ष होऊन मानमान्यताहि प्राप्त होईल. १९६६ च्या उत्तरार्धात व १९६७ च्या सुरवातीस या गोष्टींशीं संबंधित अशा दूरच्या प्रवासाचा योग आहे.

तुमच्या बाबतींत एक वैशिष्ठ प्रामुख्यानें दिसून येतें, तें म्हणजे भावनेच्या दृष्टीनें तुमचें आयुष्य कधींच निरस असत नाहीं. त्या दृष्टीनें तुम्ही अत्युच्च शिखरावर तरी असाल, किंवा निराशेच्या खोल दरींत तरी असाल; अथवा अत्युत्कट भावनांशीं सामना करीत आयुष्याचा मार्ग क्रमीत असाल.

१९६३ आणि १९६४ मध्यें नोकरी असलेल्यांना निराळ्या प्रकारचेंच काम पत्करावें लागेल; अथवा नवीन धंद्यास सुरुवात करावी लागेल. या दोनहि क्षेत्रांत सुदैव तुमच्याच पाठीशीं आहे.

१९६० ते १९६४ या कालांत आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत तंग वातावरण राहील. या कालांतील घटनांत भाग घेण्याची स्फूर्ति वृश्चिक राशीच्या स्फोटक गुणांमुळें प्राप्त होईल. युद्धाच्या धमक्यांमुळें वृश्चिक–रवींना त्रास होईल असें मला वाटत नाहीं. उलट बहुसंख्याकांना भरपूर द्रव्यलाभ व नांव कमावतां येईल. कारण संकट आणि तंग वातावरणाच्या वेळीं वृश्चिकरवींच्या कर्तृत्वशक्तीला बहर येतो.

१९६७ चा द्वितीयार्ध ते १९६८ चा शेवट हा तुमच्या सुदैवाचा काळ असून, धंदा व आर्थिक क्षेत्र यांत तुमची भरभराट होईल. या दीड वर्षाच्या कालांत अनुकूल वातावरण, भागीदारांचें सहकार्य, आणि द्रव्यप्राप्ती या गोष्टी सुलभ होतील. गुंतून पडलेला पैसा हातीं खेळूं लागेल.

१९६९ च्या प्रथमार्धांत तुमच्या प्रगतीच्या मार्गांत एक मोठा अडथळा निर्माण होईल, व तोहि एका 'स्त्री'कडून! या वर्षाच्या जानेवारी व फेब्रुवारी महिन्यांत आंखलेल्या योजना, तुम्ही ज्यांच्यावर विश्वास टाकीत आहांत त्यांनीं विश्वासघात केल्यामुळें फलदायी होणार नाहींत.

सहकाऱ्यांनीं अडथळे आणले तरी १९७० मध्यें तुमच्या योजना यशस्वी होतील. जीवनांतील वा धंद्यांतील जोडीदारांकडून निर्माण केलेल्या प्रश्नांतून जानेवारी १९७१ पर्यंत तुम्हांला समाधानकारकरीत्या मार्ग काढतां येणार नाहीं. १९७१ च्या मध्यानंतर घरगुती प्रकरणांत अधिक लक्ष घालावें लागलें, मोठ्या प्रमाणांत फेरफार करावे लागले, व अतिशय कष्ट पडले तरी सामान्यतः १९७१ साल हें द्रव्यदृष्टचा भरभराटीचें व प्रगतीचें जाईल. १९७२ मध्यें मात्र अनेक चढउतार निर्माण होतील, आणि तुम्हांला खंबीर मनोवृत्ति दाखवावी लागेल. दीर्घकाल चालू असलेलें भांडण मिटविण्यासाठीं मार्च १९७२ च्या सुमारास प्रवास करावा लागेल. कौटुंबिक अडचणींमुळें व चिंताजनक गोष्टींमुळें तुम्हांला जुलै आणि ऑगस्ट १९७२ मध्यें बराच पैसा खर्च करावा लागेल.

तथापि १९७३ मध्यें मंद प्रगति ही इष्टच ठरेल. सप्टेंबर व ऑक्टो-बरमध्यें धंद्यांत बदल करण्याची जरूरी भासेल, किंवा भागीदारांशीं मत-भेद होतील. राहतें घर बदलणें लाभदायक ठरेल. मालमत्तेच्या अथवा पैशाच्या बाबतींत १९७४ च्या सुरवातीस भांडणें निर्माण होतील, त्याचा अनुकूल निकाल वर्षाच्या शेवटीं लागेल. बौद्धिक क्षेत्रांतील प्रगतीबरोबरच कुटुंबांत एका नवीन माणसाची भर पडेल. १९७५ मध्यें हर्षल वृश्चिकेंत प्रवेश करीत असून १९८१ पर्यंत तेथेंच राहत आहे, आणि त्यामुळें वृश्चिक–रवि व्यक्तींच्या जीवनांत एका नवीनच कालचक्राला सुरुवात होईल.

सात वर्षांच्या या कालांत वृश्चिक–रवि व्यक्तींच्या जीवनांत विचित्र, नवीन, असामान्य, व अगदींच अपरिचित अनुभवांची रेलचेल होईल. वृश्चिक–रवि व्यक्तींचें लक्ष निश्चित कोणीकडे वळेल हें सांगणें कठीण असलें तरी एप्रिल १९७६ ते एप्रिल १९७७ या कालांत कोणताहि मार्ग अनुसरला तरी त्यांना संकटें व विरोध यांना तोंड द्यावें लागेल, व या

अविरत विरोधामुळें जीवनप्रवाह बदलून अगदीं नवीनच प्रकारच्या जीवनास सुरुवात करावी लागेल.

एप्रिल १९७७ नंतर तुमच्या जीवनसाथीकडून अथवा वृद्ध नातेवाइकांकडून द्रव्यप्राप्ति होईल. सप्टेंबर १९७७ ते जवळजवळ १९८० अखेरपर्यंत तुम्ही स्वतंत्रपणें स्वतःची प्रगति साधाल. नोकरी करीत असल्यास १९७९ च्या मध्यास बढतीची शक्यता आहे. संपत्ति मिळण्याच्या बाबतींत विलंब लागला तरी तिची प्राप्ति हमखास आहे. आणि १९८० साल संपण्यापूर्वी तुमच्या जीवनांत व कार्यक्रमांत भरपूर बदल होतील. थोडक्यांत निष्कर्ष असा कीं, १९८० मधील कांहीं कालांत विजेसारख्या चमकून जाणाऱ्या सुवर्णसंधीचा तुम्हीं बरोबर उपयोग करून घेतला पाहिजे. याचा अनुभव विशेषतः नोव्हेंबर–डिसेंबरमध्यें येईल. १९८१ मधील तुमच्या जन्मतारखेच्या आसपास प्रगति व आर्थिक भरभराट यांचें भाग्यदायक चक्र सुरू होऊन १९८३ च्या मध्यापर्यंत चालू राहील. भूतकालांतील कित्येक वर्षें ज्या भाग्यदायक कालाची वाट पाहत होतां तोच हा काल होय.

## सिंहावलोकन

कोणाहि व्यक्तीच्या आधिभौतिक जीवनाचा विचार केला असतां, तिच्या पत्रिकेवरून आपणांपैकीं प्रत्येकास प्रत्यक्ष व उघड स्वरूपांत दिसूं शकतील अशा अनेक गोष्टी असतात; व त्या कोणीहि नाकारूं शकत नाहीं. परंतु त्याबरोबरच अशा कांहीं बाजू आहेत कीं, ज्या दिसूं शकत नाहींत परंतु त्यांची जाणीव मात्र होते.




एखाद्या व्यक्तीचें आधिभौतिक क्षेत्रांतील स्थान कांहींहि असेल, पण त्याला दुसरी एक महत्त्वाची बाजू आहे. ही बाजू म्हणजे देशावर अथवा समाजांतील विशिष्ट गटांवर या व्यक्तीकडून प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणें केली जाणारी प्रतिक्रिया ही होय. अशी प्रतिक्रिया कधींकधीं समाजांतील नेत्यांच्या द्वारें उघड स्वरूपांत प्रकट होते. म्हणून या व्यक्तीचें अस्तित्व व स्थानमाहात्म्य याचें मूल्य याचवरून ठरविणें महत्त्वाचें ठरतें.

वृश्चिक राशि ही उत्साह, मोठ्या प्रमाणांतील संघटनाकौशल्य व नेतृत्व यांची निदर्शक आहे. एखादा सार्वजनिक समारंभ असो, अथवा संस्थेकडून साजरा केला जाणारा उत्सव असो, वृश्चिकप्रधान व्यक्तींचें त्यांत महत्त्वाचें अंग असतें असें अनुभवास येतें. कसल्याहि प्रकारच्या समारंभात त्यांनीं प्रकट वा अप्रकट—कोणत्याहि स्वरूपांत भाग घेतला असला तरी तो समारंभ ते यशस्वी करून दाखवितात. त्यांचें अस्तित्व प्रत्यक्षांत नसलें तरी अप्रत्यक्षरीत्या तें भासल्याविना रहाणार नाहीं.

एखाद्या कुटुंबांत, खेडेगांवांत, शहरांत, अथवा राष्ट्रांत ऐक्यभावना निर्माण करण्यांत या लोकांचा पुढाकार असें सतोअ इतिहासाचें अवलोकन करणाऱ्यांना सहज समजून येईल. परंतु यामुळेंच या लोकांना आधिभौतिक प्रगति करून घेतां येत नाहीं. त्यासाठीं वेळ खर्च करणें त्यांना शक्य होत नाहीं. म्हणूनच या राशींतील बहुसंख्य व्यक्ति श्रीमंतींत वा ऐश्वर्यांत लोळतांना दिसत नाहींत. तथापि संघटक, नेते, सामाजिक कार्यकर्ते, राज्यकारभारनिपुण या दृष्टींनीं त्यांनीं चांगलीच प्रगति करून घेतली आहे.

कोणतीहि नवीन कल्पना किंवा मत यांचा प्रसार करतांना वृश्चिक-रवि लोकांच्यासारखे अनुयायीं मिळणें कठीण असाच अनुभव येतो. स्वतःच्या वैयक्तिक फायद्याकडे पूर्णपणें दुर्लक्ष करून एखाद्या सैनिकाप्रमाणें त्या नवीन मतांसाठीं किंवा कल्पनेसाठीं ते शेवटपर्यंत झगडत राहतील. या संदर्भांतून पाहिलें असतां मोठ्या लोकांच्या जीवनांत, अथवा कुटुंब, समाज व राष्ट्र यांच्या जीवनांत ‘मंगळ’ ग्रहाचे अदृश्य वा दृश्य हात किती दूरवर गुंतलेले असतात हें लक्षांत येईल. मंगळ हा ग्रह विधायक प्रवृत्ति, सामर्थ्य व उत्साह यांचा निदर्शक आहे हें नव्यानें सांगणें नकोच !

मानवी समाजांत नवीन चालीरीति प्रचारांत आणण्यासाठीं गेल्या दोनशें वर्षांत जो मोठा संघर्ष चाललेला आहे, त्यांत प्रामुख्यानें चार राशींनीं फार मोठी कामगिरी बजावलेली आहे. त्यामुळें जगानें त्यांचें ऋण नेहमींच मान्य केलें पाहिजे. या व्यक्तींनीं आपली आर्थिक उन्नति करून घेतली कीं नाहीं या गोष्टीला फारच थोडें महत्त्व आहे. समाजाच्या दृष्टिकोनांत थोड्याफार प्रमाणांत बदल घडवून आणण्याचें महाकठीण कार्य

त्यांच्याकडून सुलभतेनें पार पाडलें गेलें आहे; आणि म्हणूनच, या दृष्टीनें मानवयुगाचे चार आधारस्तंभ म्हणूनच या चार राशींकडे पहावें लागेल. आपल्या सामर्थ्यांनुसार कुंभ–सिंह–वृश्चिक–वृषभ या चार राशींनीं मानव युगाच्या निर्मितीला हातभार लावलेला आहे.




शास्त्रीय दृष्टिकोन, कोणत्याही गोष्टीचा निर्णय घेतांना दिसून येणारी माणुसकी, आणि सर्वांशींच बंधुभावानें वागण्याची प्रवृत्ति, याबद्दल कुंभ राशि प्रसिद्ध आहे. आणि कुंभ राशींत जन्मलेल्या लोकांचेच मित्रमंडळ मोठें असतें, ही गोष्टहि सर्वांना नव्यानें सांगावयाची जरूरी नाहीं. ( कुंभ राशि पाहा. )

उदार अंतःकरण, विशाल दृष्टिकोन, दरबारी थाटानें वागण्याची पद्धत, इतरांना आश्रय देण्याचें औदार्य, आणि भव्य प्रकारच्या नेतृत्वाची आवड, या गोष्टींबद्दल वाटणाऱ्या शुद्ध आंतरिक प्रेमामुळें साधारण जनता 'सिंहे'ला नेतृत्व देऊन त्यांच्या कल्पनांचें अनुकरण करते.

योजनाबद्धता, सुसूत्रीकरण, रचनाकौशल्य, आणि देशांतील व समाजांतील अर्थव्यवस्थेचें सूक्ष्म निरीक्षण करण्याची आवड यांबद्दल वृषभ राशि प्रसिद्ध आहे. वृषभ राशि स्वतःच या गोष्टी करते, कीं दुसऱ्या कोणा व्यक्तीमार्फत आपल्या कल्पना कार्यवाहीत आणते, हें पाहण्यापेक्षां

योजना आखण्यांत आणि त्यांतहि अचूकपणा आणण्यांत वृषभ राशीचे स्वतंत्रता व मौलिकता हे गुण महत्त्वाचें असतात, हें आपण लक्षांत घेतलें पाहिजे. सनातन तत्त्वांकडे असणारा ओढा व ग्राम्यतेचा तिटकारा या गुणांमुळें वृषभ राशीनें इतिहासामध्यें फार महत्त्वाची जागा व्यापलेली आहे.

आतां आपण वृश्चिकेचा विचार करूं. मानव युगाच्या पत्रिकेंत वृश्चिक राशी दशम स्थानीं आहे; म्हणूनच हे लोक उत्कृष्ट व्यवस्थापक बनूं शकले. सौर मंडळाचा सेनापति जो मंगळ, हा भांडणतंट्याच्या मनोवृत्तींबद्दल, सूड उगवण्याबद्दल, व सामर्थ्यहीन आणि काय करावें हें न समजणाऱ्या, भांबावलेल्या भित्र्यांना वृश्चिकेच्या साहाय्यानें धीट व शूर बनविण्याबद्दल सुप्रसिद्ध आहे. अंतःकरणापासून वृश्चिक–रवि–व्यक्तीबद्दल कोणाला प्रेम वाटत नसलें तरी सैन्याधिपतिप्रमाणेंच लोक मनांतून त्यांना घाबरतात हें निश्चित! त्यांच्या या सामर्थ्यांमुळेंच त्यांना महत्त्वाचें स्थान प्राप्त होतें, व म्हणूनच आपल्या समाजावर पडणाऱ्या त्यांच्या प्रभावाकडे दुर्लक्ष करणें अशक्य ठरतें.

वृश्चिक-रवि व्यक्ति मोजकेच शब्द बोलतात, पण ते शब्द भरपूर सामर्थ्यवान् व इतरांचीं मनें हलवून सोडणारे असतात. लोकांच्या अंतःकरणांत उत्साह निर्माण करण्याची या लोकांची हातोटीहि वाखाणण्यासारखी असते. चांगल्या वा वाईट, विधायक वा विघातक गोष्टींना आकार देण्याचें सामर्थ्य वृश्चिकेजवळच तेवढें आढळतें. वृश्चिकेच्या बाबतींतील दुसरी एक गोष्ट म्हणजे, त्यांच्या कल्पना स्वतंत्र नसतात. परंतु एखाद्या कल्पनेला वा मताला चिकटून राहणारे उत्कृष्ट अनुयायी म्हणून त्यांचा उल्लेख करतां येईल. एखादा सेनापति राजाच्या हुकुमांचें पालन ज्याप्रमाणें अखेरपर्यंत करतो, तसेंच वृश्चिक रवींच्या बाबतींतहि असतें. मग या 'लढाई'त मृत्यु आला तरी त्यांना त्याची पर्वा वाटत नाहीं. अशी ही सामर्थ्यशाली वृश्चिक–राशि आहे.

१९ व्या शतकच्या उत्तरार्धापासून २० व्या शतकाच्या प्रथमार्धापर्यंत वृश्चिक राशीला दाबून धरणारे प्रमुख ग्रहयोगच नव्हते. त्यामुळें व्यापक दूरदृष्टि, निर्णय घेण्याचें सामर्थ्य व स्वतःचें स्थान प्राप्त करून घेण्यासाठीं लागणारें सामर्थ्य, या दृष्टींनीं त्यांना कालप्रवाह अनुकूलच होता.

परंतु आतां मात्र अशा प्रकारचे ग्रहयोग दिसतात कीं, त्यांच्याकडे दुर्लक्ष करणें अंतीं स्वतःच्या नाशास कारणीभूत ठरेल. म्हणूनच संदर्भासह सर्व गोष्टी स्पष्ट व्हाव्यात या हेतूनें मीं इतकें सविस्तर विवेचन केलें आहे.

गेल्या शतकांत इ. स. १८०० पासून प्लूटोनें वृश्चिकेंत पुन्हां प्रवेश केलेला नाहीं. आतां १९८४ मध्यें तो जेव्हां प्रवेश करील, त्या वेळीं विधायक प्रवृत्तीऐवजीं विघातक प्रवृत्तींचा जोर होऊन वृश्चिकेचा दृष्टिकोन बदलून टाकण्यांत प्लूटो यशस्वी होईल. १९९५ अखेरपर्यंत प्लूटो वृश्चिकेंत रहाणार असून, या प्रदीर्घ कालांत वृश्चिक राशींतील नेत्यांना आपणांस मुकावें लागणार आहे.

गेल्या शतकांत १८०६ मध्यें नेपच्यून जो वृश्चिकेंतून बाहेर पडला, तो अजून त्यानें पुन्हां प्रवेश केला नसून १९५६ पर्यंत त्यासाठीं वाट पहावी लागेल. १९५६ मध्यें त्यानें वृश्चिकेंत प्रवेश केला कीं मात्र १९७० पर्यंत तो तिथेंच राहणार आहे. सनातनी व आध्यात्मिक मतांचें स्तोम माजविणारा हा ग्रह वृश्चिक-रवींच्या मनावर फार मोठें दडपण आणणार आहे. आणि या लोकांचा दृष्टिकोन फार मोठ्या प्रमाणांत बदलल्यामुळें इतर लोकांना त्यांचीं मतें, त्यांच्या कल्पना, अस्वीकरणीय वाटूं लागतील; या शतकांतील प्रथमार्धापेक्षां एक निराळेंच दृश्य दिसूं लागेल. या शतकांतील सर्वांत वाईट असें हें नेपच्यूनचें भ्रमण आहे आणि त्यामुळें वृश्चिक–रविव्यक्ति आपला मार्ग सोडून जरा भलत्याच दिशेनें चालूं लागतील.

प्रगतिशील सामाजिक कार्यकर्त्यांचा व नेत्यांचा सतत पुरवठा करणाऱ्या वृश्चिक राशीवर प्रतिकूल परिणाम झाल्यामुळें, या 'नेपच्यूनमुळें' या शतकांतील उदारमतवादी नेतृत्वाला मानवजात मुकेल; आणि त्यामुळेंच एक मोठी उणीव निर्माण होईल.

गेल्या शतकांत १८९७ मध्यें वृश्चिकेंतून बाहेर पडलेला हर्षल पुनश्च एकदां १९७५ मध्यें प्रवेश करील, व जवळ जवळ १९८० च्या अखेरपर्यंत वृश्चिकेंत आपलें आसन स्थिर ठेवील. या कालांत वृश्चिक राशींत पुन्हा एकदां 'नेते' निर्मितीचे कार्य सुरू होईल. व या नव्या नेत्यांनीं २१ व्या शतकांत आपलें "स्थान" पुन्हां मिळविलें आहे असें दिसून येईल. आज, २० व्या

शतकांत, जगाच्या, राष्ट्राच्या अथवा समाजाच्या घडामोडींत वृश्चिक-प्रधान व्यक्ति फार मोठ्या प्रमाणांत दडपण आणीत आहेत असें आढळून येतें. वृश्चिकेंत हर्षल उच्चीचा होत असल्यानें वृश्चिक राशीकडे हा मैत्रीच्या भावनेनें पाहूं लागतो. परंतु सध्या हयात असलेल्या वृश्चिक-रवि व्यक्तींच्य वैयक्तिक जीवनांत मात्र तो प्रतिकूल परिणाम घडवून आणणार आहे.

सामर्थ्यवान् व 'चळवळया' वृश्चिक राशीमधील या प्रमुख ग्रहांचीं १९५९ नंतर होणारीं हीं भ्रमणें, पुढारलेल्या जगांत विश्वास निर्माण करूं शकणाऱ्या, नेतृत्व पुरवणाऱ्या वृश्चिकप्रधान व्यक्तींची उणीव भासवतील हें आतां स्पष्ट झालें असेलच.

मनाचे अदृश्य भागांत संकुचित व ईर्षाळू मनोवृत्ति ठेवूनहि, उघड-पणें, धाडसी व उदारमतवाद दाखवून, सामाजिक व राजकारणी वृश्चिक-रवि व्यक्तींनीं, गेल्या व चालू शतकांत कमालीची सामाजिक प्रगति व सुधारणा घडवून आणली आहे. हा बदल घडवून आणतांना लागणारें 'राक्षसी' धैर्य, मनाचा खंबीरपणा, धाडस इत्यादि गोष्टी या लोकांत फार मोठ्या प्रमाणांत आढळून येतात, जन्मकुंडलींत दर्शविलेल्या आपा-पल्या शक्ति, सामर्थ्यं, व परिस्थितीनुसार वृश्चिकप्रधान स्त्री-पुरुषांनीं साधारण भित्र्या, किंवा रूढीवादांत बदल करतांना घाबरून जाणाऱ्या भेद-रट लोकांत एक प्रकारचा विश्वास व धाडस निर्माण करण्याचें कार्य केले, हें आपण विसरूं शकत नाहीं.

म्हणूनच मानवसमाजाच्या प्रगतींत मोलाची भर टाकणाऱ्या या धाडसी लोकांच्या शूर वृत्तीला मानाचा मुजरा देणें आपलें कर्तव्य ठरतें. आतां वाईट इतकेंच वाटतें कीं, चालू विसाव्या शतकाच्या उत्तरार्धात त्यांच्या या गुणाचा, सेनापतीसारख्या मार्गदर्शनाचा फायदा साधारण जनतेला मिळणार नाहीं. आणि त्याचें कारण वर दिलेल्या कित्येक अशुभ ग्रहांची छाया हेंच होय. अर्थातच वृश्चिक-वृषभ याऐवजीं मानव-युगाच्या नेतृत्वाचा भार या कालांत कुंभ-सिंहेवर पडणार आहे.

---

# धनु–रवि

(कोणत्याहि वर्षांतील २३ नोव्हेंबर ते २२ डिसेंबरचे या कालांत जन्मलेले लोक)



## आर्थिक भविष्य

जुन्या भांडवलशाहीप्रधान समाजरचनेचे साहाय्यकारी वा पाठीराखे या नात्यानें धनु–रवि व्यक्ति प्रसिद्ध असल्या तरी, जगांतील श्रीमंत माणसांच्या यादींत धनु–रवि व्यक्ति अल्पसंख्यच आहेत हें आश्चर्य नव्हे काय? सर्वसामान्य धनु–रवि व्यक्तींना स्वस्थतेचें जीवन कसें उपभोगावयाचें याचें शिक्षणच घ्यावें लागेल. कारण पैशाविषयींचें त्यांचें प्रेम हें तुरळक प्रमाणांत व अधूनमधून उद्भवणारें असतें. आणि पैसा मिळविण्याचा त्यांचा मार्गहि योग्य प्रकारच्या स्पर्धेवरच आधारलेला असतो. सट्टेबाजीच्या दृष्टीनें धनु–रवींच्या अंतःकरणांत आशेची ज्वलंत ज्योत नेहमींच जागती असते. जन्मजातच जुगारीचें त्यांना मनापासून वेड असतें; आणि परिस्थिति अनुकूल असली तर कोणत्याहि प्रकारच्या जुगारावर पैसे कमावण्याची त्यांना फार आवड असते. विजयी कोण होणार हें शोधून काढण्याचे गुण, हा त्यांच्या मनोधर्माचाच एक भाग असल्यामुळें त्यांचे अंदाज सहसा चुकत नाहींत.

जुगाऱ्याचें दैव असणें अथवा पैसा मिळविण्याची इच्छा पुरी करणें यासाठीं अनुकूल ग्रहांचा पाठिंबा जरूर असतो. खालील परिच्छेदांमध्यें अशा कांहीं कालखंडांचा निर्देश करीत आहें. या कालांत धनु–रवि व्यक्तींना अचुक निर्णयाप्राप्त येण्यासाठीं व द्रव्यप्राप्तीच्या दृष्टीनें अधिक सुदैवी काळ कोणता हे शोधण्यासाठीं या व्यक्तींचे मी तीन विभागांत वर्गीकरण करीत आहे—

कोणत्याहि वर्षाच्या २३ नोव्हेंबर ते २ डिसेंबरच्या दरम्यान जन्मलेल्यांना पुढील वर्षांतील पुढें दिलेल्या कालांत द्रव्यलाभाचा योग आहे:— जुलै १९५५; मार्च, एप्रिल व नोव्हेंबर १९५९; एप्रिल, मे १९६३; ऑक्टो-

बर ते डिसेंबर १९६६; जानेवारी व जून, जुलै १९६७; फेब्रुवारी ते मे व ऑक्टोबर, नोव्हेंबर १९७१; एप्रिल १९७५; ऑक्टोबर ते डिसेंबर १९७८; जानेवारी, फेब्रुवारी व मे–जून १९७९; जानेवारी, फेब्रुवारी, व जून ते ऑक्टोबर १९८३.

कोणत्याहि वर्षाच्या ३ ते १२ डिसेंबरचे दरम्यान जन्मलेल्यांना द्रव्य-दृष्टया अत्यंत सुदैवाचा काल म्हणजे;—ऑगस्ट व सप्टेंबर १९५५; डिसेंबर १९५९; जानेवारी १९६०; जून ते डिसेंबर १९६३, जानेवारी, फेब्रुवारी १९६४; ऑगस्ट १९६७; नोव्हेंबर, डिसेंबर १९७१; मे व ऑक्टोबर ते डिसेंबर १९७५; जानेवारी १९७६; जुलै १९७९; मार्च, एप्रिल व नोव्हेंबर १९८३.

कोणत्याहि वर्षाच्या १३ ते २२ डिसेंबरच्या दरम्यान जन्मलेल्यांना पुढील कांहीं वर्षांतील निर्दिष्ट केलेल्या महिन्यांत निश्चितपणें द्रव्यलाभाचे योग आहेत;–ऑक्टोबर, नोव्हेंबर १९५५; फेब्रुवारी ते जुलै १९५६; फेब्रु-वारी, जुलै ते ऑक्टोबर १९६० मार्च, एप्रिल १९६४; सप्टेंबर–ऑक्टोबर १९६७; मार्च ते जून १९६८;जानेवारी, फेब्रुवारी, ऑगस्ट, सप्टेंबर १९७२; जून ते सप्टेंबर १९७५; फेब्रुवारी, मार्च १९७६; ऑगस्ट, सप्टेंबर १९७९; डिसेंबर १९८३; जानेवारी १९८४.

## संकटाची व समाधानाची वेळ

सामर्थ्यशाली ग्रहांच्या भावी कालांतील भ्रमणांकडे पाहिलें असतां पुढील कांहीं वर्षांचा काल सर्वसाधारणपणें शांततेचा व समाधानाचा जाणार असला तरी दुसऱ्या बाजूचा विचार केला असतां कांहीं कालखंडांत संकटें व अडचणी आपलें तोंड वर काढणारच हें निश्चित आहे.

सुदैवाचा काल म्हणून ज्याच्याकडे ज्योतिषशास्त्र बोट दाखवूं शकेल असे महिने म्हणजे; फेब्रुवारी १९५६; जानेवारी १९५८; डिसेंबर १९५९; डिसेंबर १९६१; नोव्हेंबर १९६३; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९६५; ऑक्टोबर १९६७; मार्च ते सप्टेंबर १९६९; फेब्रुवारी, मार्च १९७१; जानेवारी, फेब्रुवारी १९७३; डिसेंबर १९७४; जानेवारी १९७५; डिसेंबर १९७६;

नोव्हेंबर, डिसेंबर १९७८; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९८०; ऑक्टोबर १९८२; सप्टेंबर १९८४.

याउलट, धोक्याची पूर्वसूचना देणारा कालखंड पुढील महिन्यांत एकवटलेला दिसून येईल—मे १९५५; एप्रिल १९५७; मार्च १९५९; जुलै, ऑगस्ट १९६२; जुलै १९६४; जून, जुलै १९६६; मे, जून १९६८; मे १९७०; एप्रिल, मे १९७२; मार्च, एप्रिल १९७४; सप्टेंबर, ऑक्टोबर, डिसेंबर १९७५; जानेवारी ते मार्च १९७६; ऑगस्ट १९७७; जुलै १९७९; जून, जुलै १९८१; जून १९८३ हे महिने प्रतिकूल असून, ज्याच्यापासून मोठ्या फलाची आशा करावी अशा नवीन कार्यास प्रारंभ न करणें अंतिम फायद्याचें ठरणार आहे.

## विविध

पुढील कांहीं वर्षांचा काल हा धनु–रवि व्यक्तींना बरेच चढ–उतार पार करावे लागणार असें दर्शविणारा असून, १९५८ नंतर मात्र त्यांच्या जीवनप्रवाहास एक प्रकारचा संथपणा व गंभीरपणा प्राप्त होईल. धनूंत रवि असतांना जन्मलेल्या लोकांच्या दृष्टीनें पुढील कांहीं वर्षांत शनीच्या, एका महत्त्वाच्या ग्रहाच्या भ्रमणाचा आपल्या जीवनाशी फार निगडित संबंध आहे असें दिसून येईल. १९५६ ते १९५८ या कालांतच हें भ्रमण घडून येणार असून कोणत्याहि कार्यात गडबड न करणें व दिरंगाई झाली तरी खेद न मानणें हेंच शहाणपणाचें ठरेल. म्हणूनच १९५६ नंतर पुष्कळ धनु–रवि व्यक्ती जीवनांतील एकाच चाकोरींत सांपडल्याकारणानें कंटाळून जाण्याची शक्यता आहे, व त्यामुळेंच नको हें जीवन असें त्यांना वाटूं लागेल.

प्रमुख ग्रह–शनीच्या या भ्रमणाच्या कालांत कौटुंबिक व घरगुती क्षेत्रांत बऱ्याच घडामोडी घडून येतील. याचाच परिपाक म्हणजे त्यांपुढील तीन चार वर्षांच्या कालांत कुटुंबांतील व्यक्तींचें तुमच्यावर ‘ दडपण ’ पडेल घरगुती त्रासदायक घडामोडींबरोबरच, एखाद्या वृद्ध नातेवाईकाचीं जबाबदारी शिरावर घ्यावी लागेल. तथापि यापेक्षांहि या भ्रमणाकडून जी महत्त्वाची धोक्याची पूर्वसूचना मिळत आहे, ती अशी कीं, १९५६ ते १९५८ या कालांत अधिक योजनाबद्ध व काळजीपूर्वक रीतीनें जीवन-

मार्गाची आखणी करणें अंतिम फायद्याचें ठरेल, एरव्हीं एकाच प्रकारच्या कामांत अडकल्यानें येणारा कंटाळा व त्रास यांबरोबरच, त्या कामांत घ्याव्या लागणाऱ्या जबाबदारींतून सुटका होणार नाहीं; व जीवनांतील ' मौज ' उपभोगावयाची संधि मर्यादित स्वरूपांत प्राप्त होईल.

१९५९-१९६० मध्यें आणखीं एक महत्त्वाचें ग्रह-भ्रमण असून, बहु-संख्य धनु-रवींना तें अनुकूल आहे; व त्यामुळें त्यांच्या बहुतेक योजना परिणामीं फलदायक ठरतील असा सुयोग आहे. धनु-रवींना या कालांत दूरच्या प्रवासाचे योग आहेत; आणि प्रवासांत या लोकांना जी ' मौज ' वाटते, तिची तुलना इतर कशाशीं करतां येणार? स्वतःच्या घरांत व प्रदेशांत असतील त्याहून अधिक सुखी व समाधानी वृत्ति दूरच्या प्रवासांत त्यांना लाभते. १९५६ ते १९५८ या कालांत दूरच्या प्रवासाला निघण्याची तीव्र इच्छा निर्माण होईल, बऱ्याच धनु-रवि व्यक्ति अशा प्रवासास निघतील, त्यांच्या योजना यशस्वीरीत्या पार पडतील.

१९५६ पर्यंत ग्रहमान अनुकूल कल दर्शवीत असून ' प्रकृती 'च्या बाबतींत स्वास्थ्य लाभेल, पण त्यानंतरची तीन वर्षें मात्र प्रकृति-अस्वास्थ्य निर्माण करणारीं असल्यानें ' काळजी ' घ्यावी लागणार आहे. १९५६ ते १९५८ या कालांत निराशवादी, संकुचित मनोवृत्तीच्या, वयोवृद्ध लोकांशीं संबंध जोडावेत अशी भावना प्रबल होईल. तथापि पुढील वर्षांतील, १९५८ च्या प्रथम विभागांत व १९५९ च्या शेवटच्या कालांत भावनात्मक असें सुखकारक अनुभव बहुसंख्य धनु-रवींना घेतां येतील.

१९६१ ते १९७१ या दहा वर्षांचे कालांत एक ग्रहचक्र या लोकांना प्राप्त होत असून, या कालांत प्रगति वा परागति या बाबतींत मोठ्या प्रमाणांवर फेरफार होण्याचा संभव कमी आहे. तथापि १९६१ मध्यें फार मोठ्या प्रमाणांवर आर्थिक जगतांत मंदीच्या लाटेचा तडाखा बसणार आहे, याची नोंद करून ठेवावी. ही लाट चांगलीच ओसरणार नसली तरी १९६२-६३ मध्यें धंद्यांतील चढ-उतारामुळें थोडीफार द्रव्य-प्राप्ति होईल. १९६४-६५-६६ या कालांत मात्र आर्थिक मंदीचा दुसरा मोठा तडाखा जगांतील सर्वच राष्ट्रांतील लोकांना चांगलाच जाणवणार

आहे. यासाठींच पैसा जतन करून ठेवणें अथवा जमीनजुमल्यांत गुंतविणें हें फायद्याचें ठरेल. १९६४–६५ मध्यें 'पैसा' हा डोकेदुखीचा प्रश्न होऊन बसेल. या कालांत सट्टा वा जुगार यांत पैसा घालणें हें ग्रहमान अनुकूल नसल्यानें टाळावें; उलट अधिक मिळणारा सर्वच पैसा दीर्घ मुदतीनें कोठें-तरी सुरक्षित स्थळीं गुंतवावा, असाच माझा सल्ला आहे.

कोणत्याहि अपूर्व व्यक्तींशीं, प्रसंगाशीं अथवा संकटाशीं झुंज देण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं असल्याचा तुम्हांला अभिमान वाटतो, व तें नैसर्गिकच आहे. मार्च ते सप्टेंबर १९६५ व त्या आसपासच्या कालांत आयुष्यांतील "पानिपतच्या लढाई" स तोंड देण्याचा प्रसंग बहुसंख्य धनु–रवि व्यक्तींवर येईल. योग्य सहकार्य न देतां उलट कुरापत काढणाऱ्या असहकारी व्यक्तीं-बरोबर काम करण्याचें तुमच्या नशिबीं येईल. त्यांतूनहि तुम्ही वरिष्ठ अधिकारी असाल तर अशा वृत्तीच्या नोकरांना सांभाळून घेण्याचा प्रसंग आल्याविना राहणार नाहीं. १९६५ मध्यें येणारे अनुभव तुमचें 'सत्व' पाहण्यासाठींच येतील, व तुमची ही 'परीक्षा' संपल्यानंतरच घरगुती व धंदेवाईक क्षेत्रांतील व्यक्ति, प्रसंग अथवा संकटें यांना 'तोंड' देण्याच्या स्वतःच्या कर्तृत्वशक्तीबद्दलच्या कल्पनांचें तुम्हांला पुन्हा एकदां परीक्षण करावें लागेल.

एक गोष्ट लक्षांत घ्या ती अशी कीं, या कालांत महत्त्वाच्या व्यक्तींशीं असणारे संबंध तोडणें जसें अशक्य तसेंच अनिष्ट ठरेल; आणि या व्यक्तींच्या स्वभावानें आणि वागणुकीनें, १९६४ च्या जून ते ऑगस्टपर्यंतच्या कालांत तुम्ही काळजींत पडाल; कांहीं काल ही परिस्थिति दूर लोटण्याचा प्रयत्न केलांत तरी तीच डोकेदुखी पुन्हा १९६५ च्या मे, जून महिन्यांत पुन्हा डोकेवर काढील. ऑक्टोबर–नोव्हेंबर नंतर मात्र तुमच्या प्रतिस्पर्ध्यांची सहज रेवडी उडविण्याचें सामर्थ्य प्राप्त होऊन ग्रह अनुकूल राहिल्यानें तुम्ही आपलें घोडें पुढें दामटाल.

भाऊ बहिणी अथवा जवळचे नातेवाईक यांच्याशीं तुम्ही जितक्या प्रेमानें व आत्मीयतेनें वागतां आणि स्नेहसंबंध ठेवतां, तेवढा आई-वडिलांशीं ठेवीत नाहीं. १९६५–६६ मध्यें धंद्याच्या क्षेत्रांत तुमचे हितसंबंध

दूरच्या नातेवाइकांशीं जोडले गेले आहेत, असें वारंवार प्रत्ययास येईल. घरगुती वातावरण असमाधानाचें असल्यानें कोठेंतरी ‘ स्थिर ’ व्हावें, अथवा ‘ स्वतःचें घर ’ असावें अशी भावना प्रबल होईल. यांत १९६७ च्या शेवटच्या दोन महिन्यांत थोडेंफार यश मिळण्याची शक्यताहि बरीच दिसते.

१९६७ पासून पुढें मात्र शुभ ग्रह तुमच्या पाठीशीं उभे रहाणार असल्यानें, तुमच्या बहुतेक योजना समाधानकारकरीत्या फलद्रूप होतील. १९६७–६८ मध्यें पाठीशीं उभ्या राहणाऱ्या या शुभ ग्रहांचा पूर्ण उपयोग करून घ्या. कारण त्यापुढील कालांतील संकटांना तोंड देण्यास या वर्षांतील कार्यच उपयोगी पडेल. १९६९–१९७० मध्यें धंद्याच्या क्षेत्रांतील परिस्थिति अनुकूल राहून, थोडीफार प्रगति करतां येईल, कार्यक्षेत्र विस्तृत करतां येईल. नोकरी करणाऱ्यांना ‘ बढती ’ चा योगहि याच वेळीं येत आहे. आपलें स्थान व माहात्म्य वाढवून, उत्कर्ष साधण्याचा काल एप्रिल ते ऑगस्ट १९६९ हा आहे. अनपेक्षित घटना या कालांत घडतील व त्या सर्व दृष्टींनीं सहाय्यकारक ठरून तुम्हांस उत्कर्ष व भरभराट साधतां येईल. प्रयत्नांची पराकाष्ठा करून, परिस्थितीवर मात करण्याचा व आपला फायदा करून घेण्याचा हाच काल आहे !

तुमच्या प्रयत्नांना ‘ खो ’ देण्याचा दुष्टावा साधण्याचें कार्य १९७० साल पार पाडील. खेळता पैसा हातीं ठेवणें, अथवा पैसा शिल्लक टाकणें फार कठीण जाईल. कुटुंबांत तुमच्यावर अवलंबून असणारीं माणसें असलीं तर त्यांचा पालनपोषणाचा खर्च अपेक्षेपेक्षां अधिक येत असल्याचें अनुभवास येईल.

१९७० च्या पहिल्या व शेवटच्या कांहीं महिन्यांत राष्ट्रीय स्वरूपाचे जे बदल होतील–विशेषतः पुनर्वसाहतीच्या दृष्टीनें ज्या योजना आंखल्या जातील त्यांचा तुमच्यावर प्रत्यक्ष परिणाम होणार आहे. १९७० मधील धंद्याच्या क्षेत्रांतील मंदी, अथवा १९७० च्या पहिल्या व शेवटच्या कांहीं महिन्यांत निर्माण होणारी राष्ट्रीय आर्थिक मंदी यांचा तडाखा जाणवल्याविना राहणार नाहीं. तुमच्या घराला व मालमत्तेला चोरट्यांकडून उपद्रव पोंचणें, अथवा अशाच प्रकारचे इतर प्रसंग तुम्हांला अस्वस्थ

करतील. वैयक्तिक दृष्टयाहि तुमच्याविरुद्ध गढूळ वातावरण निर्माण होईल. तुमच्या जीवनाचा बराच काल व्यापलेल्या व्यक्तीच तुम्हांला "विचार" करावयास भाग पाडणाऱ्या भानगडी करतील; व त्यामुळें तुमची कर्तृत्व-शक्ति व 'येईल त्याला खेळकरपणें तोंड देण्या'ची मनःप्रवृत्ति यासुद्धां क्षणभर स्तंभित होऊन जातील.

१९७१ च्या सुरुवातीच्या कालांत जवळ जवळ चार प्रमुख ग्रह तुमच्या राशींतून भ्रमण करीत आहेत. यांपैकीं कांहीं अनुकूल व कांहीं प्रतिकूल आहेत. आणि तें ठरविणें हें तुमच्या जीवितविषयक दृष्टिकोनावर अवलंबून राहील. सामाजिक, धार्मिक या गोष्टींना तुमच्या जीवनांत प्रमुख स्थान असेल तर जीवनाच्या उत्कर्ष–कालाला सुरुवात झाली आहे असें समजावें. यापूर्वीच्या कालांत ज्यांची कल्पनाहि नसेल अशा घटना घडतील. तुमचें कार्य व ध्येय यामुळें सभोंवतालच्या लोकांचा तुमच्याविषयींचा आदर द्विगुणित होईल, व तुमच्या कार्याची, यशाची, व कर्तृत्वशक्तीची प्रशंसाच केली जाईल.

१९७१ च्या सुरवातीपासून ते १९७२ च्या पहिल्या तीन महिन्यां-पर्यंत तुम्हांला अनुकूल रीतीनें वहाणारा सुदैवाचा प्रवाह हा तुमच्या जीव-नांतील सर्वात अधिक सहाय्यकारी ठरेल. तथापि कोणात्याहि वर्षाच्या २३ नोव्हेंबर ते १ डिसेंबरच्या दरम्यान जन्मलेल्यांना १९७१ च्या शेवटच्या तीन महिन्यांत गैरसमज, निराशा, व वैयक्तिक स्नेहसंबंधांत निर्माण होणाऱ्या अडचणी इत्यादि गोष्टींना तोंड द्यावें लागेल. ह्या गोष्टी व्यावहारिक व भावनात्मक स्वरूपाच्या असूं शकतील, तथापि सावधानतेचा इषारा मुद्दामच देत आहें. या वर्षाच्या शेवटच्या भागांत तुमच्याविरुद्ध कांहीं लोकांनीं उठाव केलेला आढळून येईल, तथापि सरतेशेवटीं विजयश्रीची माला तुमच्याच गळ्यांत पडेल याविषयीं संदेह नाहीं.

दोन दरडींवर कसरत करण्याचा तुमचा स्वभाव पुरातन कालापासून प्रसिद्ध आहे. या वृत्तीची तीव्रता १९७२–१९७३ या कालांत चांगलीच प्रचीतीला येईल. विशेषतः राजकीय पक्ष बदलण्यांत या लोकांनीं आघाडी मारलेली असेल.

परंतु १९७३ मध्यें देशांतील आर्थिक परिस्थिति पूर्ववत् सुधारेल, व बाजारांत प्रगति, तेजी व स्थैर्य दृष्टीस पडेल, त्या वेळीं प्रवासास निघण्याची व अनुभवांचीं नवीं क्षितिजें शोधण्याची तीव्रतम इच्छा तुमच्या मनांत निर्माण होईल.

१९७४ च्या प्रथमार्धांत कोठें तरी विचारपूर्वक पैसा गुंतविला तर ती एक कायमची उत्पन्नाची बाब ठरणार आहे; आणि त्यानंतर दीर्घकाल पत्रव्यवहार करून कोठें तरी कायमचें स्थिर होण्याची तुमची महत्त्वाकांक्षा फलद्रूप होईल. पूर्वीच्या कालांतील जुनीं भांडणें व हेवेदावे नाहींसें होऊन, आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत शांतता व स्थैर्य प्रस्थापित झालेलें असल्यामुळें ' खिलाडू ' वृत्ति दाखविण्याची तुमची इच्छाहि फलद्रूप होईल. कारण इतर कोणत्याहि राशींत तुमच्याइतकीं खिलाडू वृत्तीचीं माणसें आढळत नाहींत. कसलीहि क्षुल्लक स्पर्धा असो, अथवा शारीरिक व आध्यात्मिक क्षेत्रांतील चढाओढ असो, बव्हंशीं धनु–रवि व्यक्ति प्रत्येक क्षेत्रांत पहिला क्रमांक पटकावितात. या दृष्टीनें १९७४ चा शेवटचा भाग व १९७५ मधील कांहीं काल हा अत्युत्कृष्ट व समाधानकारक असाच आहे.

१९७४ च्या मध्यापासून ते १९७७ च्या सुरुवातीपर्यंत, सुदैव व प्रगतीच्या अनुकूल कालांत तुम्ही विहार करीत असाल; आणि या वेळीं दिवस व महिनेच काय पण वर्षेंसुद्धां किती लवकर संपलीं हें तुमचें तुम्हांलाच आनंदांत व सुखांत असल्यानें कळणार नाहीं... परंतु १९७७ च्या पहिल्या तीन महिन्यांनंतर तुम्हांला फार मोठा ' धक्का ' बसणार आहे; हें आधींच सांगण्याचें कारण म्हणजे तुम्हीं त्या दृष्टीनें पूर्वयोजना आंखाव्यात. तेव्हां आतां हें वाचल्यानंतर तरी १९७७ मधील संकटकाळीं उपयोगी पडावें म्हणून त्याची कांहीं तरी आधींच तरतूद करून ठेवाल अशी आशा आहे. निदान द्रव्यसंचय करून पुढें त्याची तरी चणचण भासणार नाहीं याबद्दल दक्षता घेतलेली बरी. १९७७ च्या उत्तरार्धात पैशाचा तुटवडा भासण्यापेक्षां वा त्यामुळें त्रास सोसण्यापेक्षां आधींच आपल्या खर्चांत कपात करून बचत करणें शहाणपणाचें ठरेल.

या वर्षीं पुष्कळ धनु–रवि व्यक्तींचीं लग्नें झाल्याचें पाहावयास सांपडेल.

धनु–रवि व्यक्तींचीं लग्नें साधारणतः लहान वयांत होत असल्यानें,

सरासरीनें हा आंकडा नेहमींपेक्षां किती तरी अधिक असेल. १९७८ च्या मध्यानंतर जीवनांत जास्त खिलाडू वृत्ति व रंगेलपणा हा मारक ठरणारा असतो, याचा अनुभव येईल. त्याचबरोबर घराकडे लक्ष देणें जीवनांत किती अगत्याचें असतें याचाहि प्रत्यय येईल. धंद्याच्या क्षेत्रांत विरोधाला तोंड द्यावें लागणार असलें तरी १९७९ ते १९८१ या कालांत ताठरपणा-ऐवजीं विनयशील वृत्ति व इतरांच्या म्हणण्याला विरोध न करण्याची वृत्तीच शेवटीं फायदेशीर ठरेल. १९७९ च्या मध्यापासून तें १९८० च्या शेवटा-पर्यंत तुम्हांला अतिशय कठीण परिस्थितीशीं झगडावें लागेल. आणि पुनः एकदां इतरांनीं निर्माण केलेल्या परिस्थितीवर मात करतांना तुमच्यांतील उत्कृष्ट गुणांची इतरांना प्रचीति येईल. तुम्ही उदार, भव्य, आनंदी, व सहनशील मनोवृत्तीचे असल्यामुळें, आणि तुमची बुद्धिमत्ताहि इतरांनीं हेवा करावी अशी असल्यामुळें, तुमच्या या जन्मजात गुणांचा इतर लोक द्वेष व हेवा करतात.

जगाला तुमच्याबद्दल काय म्हणावयाचें आहे तें म्हणूं द्या. तथापि ज्योतिर्विदांना तुम्ही उदार व खिलाडू वृत्तीचे असतां हें पूर्णपणें माहीत असतें. तुमचें प्रेम घरापेक्षां बाहेरील क्षेत्रांतच अधिक गुंतलेलें असतें. निसर्ग व प्राणिमात्र यांच्यावरहि तुमचें प्रेम असतें. तुम्हीं परोपकारी वृत्तीचे असतां असें म्हणण्यास हरकत नाहीं. जीवनांत हरएक गोष्टींत जी स्पर्धा चाललेली असते त्यांत तुम्हीं सावकाशपणें व निश्चितपणें विजयी व्हाल, याविषयीं संदेह वाटत नाहीं.

* * * *



# मकर–रवि व्यक्ति

(कोणत्याहि वर्षांतील २३ डिसेंबर ते २० जानेवारीचे या कालांत जन्मलेले लोक)

## आर्थिक भविष्य

स्थिर पायावरील व्यापार कसा करावा याचें तंत्र व मंत्र माहीत असल्यानें, आणि पैसा हा धंद्याचें सारसर्वस्व आहे हें पूर्णपणें माहीत असल्यानें मकर–रवि व्यक्ति या धंद्याच्या क्षेत्रांत चांगल्याच वाकबगार ठरतात. अर्थात् भाग्यलक्ष्मीची कृपा झाल्याशिवाय धंद्यांत किंवा जीवनाच्या इतर, कोणत्याहि क्षेत्रांत चांगली फलप्राप्ती होऊं शकत नाहीं. नुसतें सामर्थ्य, कर्तृत्व व कौशल्य हें अपुरेंच पडतें याची या लोकांना जाणीव असते. म्हणूनच भाग्यलक्ष्मीची कृपा केव्हां होईल, अथवा योग्य दिशेनें प्रयत्न केल्यास द्रव्याप्राप्ती केव्हां होईल हें अचूक कळावें यासाठीं मकर–रवि व्यक्तींचें तीन विभागांत वर्गीकरण करणें इष्ट ठरतें.

कोणत्याहि वर्षाच्या २३ डिसेंबर ते १ जानेवारीचे दरम्यान जन्मलेल्यांना पुढील वर्षांतील पुढें दिलेले महिने द्रव्यदृष्टया लाभदायक ठरतील– डिसेंबर १९५५; जानेवारी, ऑगस्ट १९५६; मार्च ते जून व नोव्हेंबर, डिसेंबर १९६०; मे १९६४; नोव्हेंबर, डिसेंबर १९६७; जानेवारी, फेब्रुवारी व जुलै १९६८; फेब्रुवारी ते जुलै, ऑक्टोबर, नोव्हेंबर १९७२; एप्रिल १९७६; ऑक्टोबर ते डिसेंबर १९७९; जानेवारी ते जुलै १९८०; फेब्रुवारी, मार्च, जुलै ते ऑक्टोबर १९८४.

कोणत्याहि वर्षाच्या २ ते १० जानेवारीचे दरम्यान जन्मलेल्यांना आर्थिकदृष्टया अत्यंत अनुकूल असा काल म्हणजे पुढें दिलेल्या वर्षांतील पुढील महिने होत;–सप्टेंबर, ऑक्टोबर १९५६; जानेवारी १९६१; जून, जुलै व डिसेंबर १९६४; जानेवारी, फेब्रुवारी १९६५; ऑगस्ट व सप्टेंबर १९६८; डिसेंबर १९७२; जानेवारी १९७३; मे, जून १९७६; ऑगस्ट, सप्टेंबर १९८०; एप्रिल ते जून व नोव्हेंबर, डिसेंबर १९८४.

कोणत्याहि वर्षाच्या ११ ते २० जानेवारीचे दरम्यान जन्मलेल्यांना पुढें दिलेल्या कालांत आपल्या प्रयत्नांन यश येऊन द्रव्यप्राप्ती होत असल्याचें आढळून येईल;— नोव्हेंबर, डिसेंबर १९५६; मार्च ते ऑगस्ट १९५७; फेब्रुवारी, मार्च व सप्टेंबर, ऑक्टोबर १९६१; ऑगस्ट ते नोव्हेंबर १९६४; मार्च, एप्रिल १९६५; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९६८; एप्रिल ते जुलै १९६९; जानेवारी, फेब्रुवारी १९७३; जुलै, ऑगस्ट व नोव्हेंबर, डिसेंबर १९७६; जानेवारी ते मार्च १९७७; सप्टेंबर, ऑक्टोबर १९८०; जानेवारी, फेब्रुवारी १९८५.

## संकटाची व समाधानाची वेळ

वर्षाचे बाराहि महिने कोणीहि व्यक्ति सारख्याच उत्साहानें व सामर्थ्यानें एखादें काम करूं शकेल असें म्हणणें चुकीचें ठरेल. तुमच्या जीवनांतहि दैवाच्या अशा फेऱ्यांचा तुम्हांला अनुभव आला असेलच. कांहीं वेळां मात्र सर्व गोष्टी सुरळीत चाललेल्या असतात. पुढील पंचवीस वर्षांचा विचार केला असतां प्रत्येक गोष्टींत पुढाकार घेऊन आत्मविश्वासानें, तुम्ही उत्साहानें जर एखाद्या कार्यांत लक्ष घातलें तर तुम्हांला यश मिळेल व तुमचा उत्कर्ष आणि प्रगति होईल, अशा प्रकारचे कालखंड पुढें दिलेले आहेत:— मार्च, एप्रिल १९५६; फेब्रुवारी, मार्च १९५८; जानेवारी ते मार्च १९६०; जानेवारी १९६२; डिसेंबर १९६३; जानेवारी १९६४; नोव्हेंबर, डिसेंबर १९६५; नोव्हेंबर १९६७; ऑक्टोबर १९६९; मार्च, एप्रिल १९७१; फेब्रुवारी, मार्च १९७३; फेब्रुवारी १९७५; जानेवारी १९७७; डिसेंबर १९७८; जानेवारी १९७९; डिसेंबर १९८०; नोव्हेंबर १९८२.

याउलट, पुढील कांहीं वर्षांत इतर कांहीं ग्रहांचीं भ्रमणें तुम्हांला अनुकूल नसून अशुभ आहेत. या कालांत तुम्हांला अत्यंत परिश्रम करावे लागतील; व बिघडलेल्या परिस्थितीला खंबीरपणें तोंड देण्यासाठीं प्रयत्नांची पराकाष्ठा करावी लागेल. अर्थात् तुम्हीं थोड्या काळजीपूर्वक व दूरदर्शीपणानें योजना आंखल्यात तर जीवन त्या मानानें कमी त्रासदायक होईल. म्हणूनच या पुढील कालखंडांची नोंद करून ठेवणें फायद्याचें ठरेल.-जून, जुलै १९५५;

मे, जून १९५७; एप्रिल, मे १९५९; ऑक्टोबर ते डिसेंबर १९६०; जानेवारी ते मे १९६१; सप्टेंबर, ऑक्टोबर १९६२; ऑगस्ट, सप्टेंबर १९६४; ऑगस्ट, सप्टेंबर १९६६; जुलै १९६८; जून, जुलै १९७०; मे, जून १९७२; एप्रिल, मे १९७४; नोव्हेंबर १९७५; एप्रिल, मे १९७६; सप्टेंबर, ऑक्टोबर १९७७; फेब्रुवारी, मार्च १९७८; ऑगस्ट, सप्टेंबर १९७९; ऑगस्ट १९८१; जुलै, ऑगस्ट १९८३.

## विविध

मकर राशींत रवि असतांना जन्मास येणें म्हणजेच असामान्य संयम व धिमेपणा यांची ईश्वरी देणगी घेऊनच जीवनास सुरुवात करणें होय ! अंतःकरणापासून मकर–रवि व्यक्ति महत्त्वाकांक्षी असलेल्या दिसतील; आणि त्याचबरोबर या महत्त्वाकांक्षेच्या पूर्ततेसाठीं कित्येक वर्षे अविरत प्रयत्न व चिंतन करण्याचें सामर्थ्यहि त्यांच्या अंगीं असतें. १९५५ च्या आधींच्या कांहीं वर्षांचा काल या लोकांना संकटाचा व त्रासाचा गेलेला असणार ! तथापि कार्य व जीवनमार्ग यांत आलेले हे अडथळे म्हणजे पुढील कालांतील यशस्वी जीवनाचा पाया बांधण्याच्या दृष्टीनें एक प्रकारचें उपयुक्त शिक्षणच आहे, असें समजणें योग्य ठरेल. ऑक्टोबर १९५५ नंतर १९५८ अखेरपर्यंतचा काल हा विश्रांतीचा व सुखाचा जाणार असून, त्यापूर्वींच्या कालांतील अडचणी व संकटें यांचा मागमूसहि या वेळीं राहणार नाहीं. अव्यवस्था व गोंधळ यांनीं भरलेल्या वातावरणापेक्षां स्थिर व शांत वातावरणांत तुमचें जीवन अधिक सुखी असतें याचें कारण अंगीं असलेला धूर्तपणा व व्यवहारीपणा हें सांगणें नकोच !

१९५५ च्या शेवटच्या भागापासून १९५८ च्या अखेरपर्यंत बहुसंख्य मकर–रवि व्यक्ति सुदैवी कालांतून संथपणें व समाधानानें जीवनमार्ग आक्रमीत असतील; आणि आपण भक्कम पायावर उभें राहण्यांत यशस्वी होत आहोंत असेंहि वाटल्याविना राहणार नाहीं. पूर्वीचें सर्व नुकसान भरून काढण्याचा, व शारीरिक, आर्थिक आणि सामाजिकदृष्ट्या उन्नति साधण्याचा हा काल असून, त्याचा उपयोग त्यापुढील कालांत पुनश्च निर्माण होणाऱ्या 'गंभीर' परिस्थितीला धैर्यानें तोंड देण्यास करून घेतां येईल.

वारसाहक्कामुळें मिळकत मिळण्याचा संभव असलेल्यांना १९५६ ते १९६१ हीं वर्षें भाग्यदायक आहेत. धंद्यांत नवीन भागीदारी व वाढ होऊन जवळच्या नातेवाईकांचें किंवा संबंधितांचें भाग्य उदयाला येण्याच्या दृष्टीनें या वर्षांत महत्त्वाच्या घटना घडतील. १९५९ च्या मध्यापासून ते १९६१ अखेरपर्यंतचा काल सामाजिकदृष्ट्या महत्वाचा असून, बहुसंख्य मकर–रवि व्यक्तींच्या जीवनांत मोठ्या प्रमाणावर व प्रगमनशील फेरफार होतील, व त्याचा परिणाम घर व कुटुंबांतील मंडळी या दोहोंवर झाल्याविना राहणार नाहीं. जीवनेतिहासाचें एक पर्व संपून दुसऱ्या पर्वाला सुरुवात होण्याचींच हीं लक्षणें आहेत. अर्थात् हे मोठ्या प्रमाणावर होणारे परिणाम शारीरिक व मानसिक ताणहि चांगलाच पाडतील! किचकट परिस्थितींत सांपडल्या-मुळें जी असमाधानी वृत्ति निर्माण होते त्यांतच या फेरफाराचें मूळ शोधतां येईल.

१९६२ मध्यें स्वैर परंतु विचारांना व भावनांना योग्य तऱ्हेनें प्रकट करतां येणें कठीण आहे असें अनुभवास येईल. म्हणजेच भावनेच्या क्षेत्रांतील मोडविण्यास कठीण अशा प्रश्नांची जीवनांत रेलचेल होईल. हे प्रश्न या आधींच्या कालांतच निर्माण झाले असले तरी आतां मात्र त्यांची संख्या फुगलेली असेल. व्यावहारिक जीवनांतील अडीअडचणींना तुम्ही सहज तोंड देऊं शकतां, याचा अनुभव विशेषत: १९६३ मध्यें येईल. धंद्यांत प्रगति व भरभराट, अथवा नोकरींत बढती, किंवा नातेवाईक अथवा मित्र यांच्या साहाय्यानें नवीन धंद्याचें उद्‌घाटन—या प्रकारच्या जीवनांत चैतन्य व आनंद निर्मिणाऱ्या घटना या कालांत घडतील.

१९६४ मध्यें कुटुंबांतील सर्व व्यक्ति एकोप्यानें वागूं लागतील; आणि निर्माण होणाऱ्या अडचणींना व संकटांना पराभूत करावयास हा एकोपा 'समर्थ' ठरेल. कौटुंबिक व सुखी–समाधानी वातावरणाच्या पार्श्वभूमीवर स्वत:वरील विश्वास दृढतर बनून सुरक्षितता व स्थैर्य यांबद्दल चिंता करावी लागणार नाहीं. कौटुंबिक कर्तव्यांच्या बाबतींत दक्ष असणारे व स्वभावत:च घराची ओढ असणारे लोक, म्हणून तुमचा ज्योतिषशास्त्र-दृष्ट्या चांगला लौकिक आहे. थोडक्यांत, जगांत कोणत्याहि व कसल्याहि

बऱ्यावाईट घटना घडल्या तरी १९६४ साल तुम्हांला सुखमय असेंच जाईल. कुटुंबांत एका नवीन ' व्यक्ती 'ची भर पडून तिचें आगमन सर्वांना सुख व आनंद देणारें ठरेल.

१९६५ चा प्रथमार्ध सुखकारक भावनेंत व्यतीत केला जाऊन, त्याबरोबर कांहीं तरी चांगली " कमाई " हि केली जाण्याची दाट शक्यता आहे. सध्या जे विद्यार्थीदशेंत असतील त्यांची पुढें चांगलीच प्रगति होईल. शरीरप्रकृतीनें तुम्ही दणकट नसलांत व " काडी पैलवानां"त जमा होण्यासारखी परिस्थिति असली तरी, आत्यंतिक कष्ट करण्यांत तुमचा हात कोणीच धरूं शकणार नाहीं. १९६५ च्या व १९६६ च्या उत्तरार्धांत प्रकृतीला अपाय होण्याइतपत कष्ट घ्यावे लागण्याची शक्यता असल्यानें नेहमीपेक्षां अधिक चपळ व ताकतवान राहण्याची खबरदारी घेतलेली बरी. बहुसंख्य मकर–रवि व्यक्ति या कल्याणप्रद गोष्टींशीं संबंधित कार्याकडे १९६६ च्या सुरवातीच्या कालांत अधिक लक्ष घालून, स्वतःच्या दृष्टिकोनांत व द्रव्यप्राप्तींत वाढ करतील अशी खात्री वाटते.

आर्थिकदृष्टचा जून ते सप्टेंबर १९६६ या कालांत फारशी प्रगति साधतां येणार नाहीं; आणि ' आवक ' एकदम वाढावी असेंहि कांहीं घडणार नाहीं. तथापि सार्वजनिक कामें करण्याची व प्रसिद्धीची ' हौस ' असलेल्यांना ' नांव ' कमविण्याचा नवीन मार्ग मोकळा होईल. यशस्वीतेबरोबरच, लोकांकडून केली गेलेली प्रशंसा, आनंद द्विगुणित करील. परंतु १९६७ मध्यें मात्र कठीण परिस्थितीशीं दोन हात करण्याची तयारी करावी लागेल; अर्थात् याहि परिस्थितींतून दूरदर्शीपणा, योजनाबद्धता आणि योग्य निर्णय घेणारी बुद्धिमत्ता यांच्या सहाय्यानें मार्ग काढतां येणार आहे. विशेषतः १९६७ मध्यें तुमचे मित्रच ' संकटकाळचे साहाय्यक ' ठरून, या परिस्थितींतून तुम्हांला बाहेर काढतील...

सर्वसामान्य सिद्धान्ताच्या भाषेंत सांगावयाचें झाल्यास मकर–रवि व्यक्तींना प्रवासाची आत्यंतिक वा अनिवार आवड नसते. परंतु ज्या वेळीं दूरच्या प्रवासाला जाण्याची संधि मिळते, त्या वेळींसुद्धां धंद्यासाठीं म्हणून अथवा कर्तव्य म्हणूनच ते प्रवास करतात, प्रवासांतील मौज उपभोगणें

हा त्यांतील प्रधान हेतु असत नाहीं. तथापि १९६७ च्या मध्यास मात्र धंदा, प्रवास, व सुख या तिन्हींचें एकत्रिकरण साधलें जाण्याची शक्यता ( तुमच्यापैकीं बऱ्याच जणांच्या बाबतींत ) निर्माण होत असून या प्रवासांत सुखाबरोबरच फायदाहि साधतां येईल. जन्मस्थानापासून उत्तरेकडे प्रवास करणें सर्वच दृष्टींनीं फायदेशीर ठरेल. उत्तर गोलार्धांतील कोणत्याहि भागाची प्रवासासाठीं निवड करावी. जून ते ऑगस्ट १९६७ मध्यें अनेक लहान लहान प्रवासाचे योग जुळून येतील व त्याचा परिणाम योजना व दृष्टिकोन बदलण्यांत होईल. आजपर्यंत उपयोगी पडलेला एखादा नातेवाईक वा स्नेही याच्याबरोबरचे संबंध तुटल्यामुळें पुन्हा जुळवाजुळव करावी लागेल.

१९६८ सालीं नवीन सुवर्णसंधि प्राप्त होत असून, नवीन योजना आंखून त्या यशस्वी करण्यांत साहाय्यभूत ठरणारे मवीन मित्र व सहकारी यांचाहि लाभ या कालांत होईल. परंतु कौटुंबिक वातावरण मात्र इतकें बिघडेल कीं त्यामुळें त्रासलेलें मन कांहीं काळ 'घर' सोडून दूर जावें, असा विचार करूं लागेल; म्हणून घरगुती बाबींकडे अधिक लक्ष देणें हिताचें ठरेल. कुटुंबांतील एखाद्या वृद्धाचें निधन, अथवा तुमचें तरुण वय यामुळें या अडचणी व गोंधळ निर्माण होऊन, त्यांतून मार्ग काढावयास बराच काल घालवावा लागेल.

आणि घरांत तुमच्यावर अवलंबून असणारीं माणसें असलीं तर तुमच्या चिंतेंत भर पाडण्याचें कार्य १९६९–१९७० या दोन वर्षांत केलें जाईल. तुमच्यावर अवलंबून असणारीं मुलें व माणसें यांच्या कल्याणाकडे अधिक लक्ष द्यावें लागल्यानें मानसिक त्रासांत भरच पडेल. अंथरूण पाहून पाय पसरावेत असें मनांत असूनहि, जमाखर्चाची तोंडमिळवणी करणें कठीण जाईल. तथापि सर्व घटनांचा शेवट मात्र सुखांतच होईल. १९६७ च्या पहिल्या महिन्यांत, लग्न झालेल्या मकर–रवि स्त्रियांच्या घरीं पाहुण्यांची वर्दळ चांगलीच वाढेल, व त्याचा परिणाम पैसा पाण्यासारखा खर्च होण्यांत होईल. १९७० मध्येंहि पुन्हां एकवार याच प्रकारच्या प्रसंगांना तुम्हांला तोंड द्यावें लागेल...... इतिहासाची पुनरावृत्ति होते याचा अनुभव येईल !

१९७१ मध्यें विशेष महत्त्वाच्या घटना घडणार नसल्या तरी १९७२

मध्यें सुदैवाचा व भाग्याचा काल सुरू होत असून, तुमच्या अंगचे गुण इतरांना प्रकर्षानें पहावयास मिळतील. या वेळीं नेहमींच्या दूरदर्शीपणानें योजना आंखल्या तर १९७३ च्या मध्यास सर्व योजना सुयशस्वी झाल्याचें पहावयास मिळेल, व आत्यंतिक सुदैवाच्या पाठिंब्यामुळें अकल्पित आनंद देणाऱ्या घटना घडतील... या कालांत तुम्हांला घरच्या नोकरांकडून त्रास होण्याचा संभव आहे; व जर यदाकदाचित् चोरीच झाली तर इतर कोणाचाहि संशय न घेतां, नोकरांनींच हा उपद्व्याप केला असेल, अशी खात्री बाळगण्यास हरकत नाहीं.

एप्रिल १९७४ ते जून १९७६ हा काल मात्र कष्टाचा व संकटाचा असून ज्यांच्यावर आजपर्यंत विश्वास ठेवलेला असेल अशाच लोकांच्याकडून वाटेंत कांटे पसरल्याचें निदर्शनास येईल......पुष्कळ जुन्या मित्रांची मैत्री तोडण्याचा क्लेशदायक प्रसंग येईल, तथापि याभुळें नुकसान कमी होईल. यांतसुद्धां तुमची तीव्र बुद्धिमत्ताच उपयोगी पडून तुमचें नुकसान होणार नाहीं. या कालांत जुन्या मित्रांची जागा नवीन हितसंबंधी भरून काढतील. वर उल्लेखिलेल्या कालांत मानसिक अस्वास्थ्याचे अनेक प्रसंग वारंवार घडतील, आणि त्यांतून सामाजिक व राजकीय क्षेत्रांत काम करणाऱ्यांना विरोधाला तोंड देण्याचे प्रसंग बरेच येतील. या वेळीं एक पाऊल मागें घेतलें तर पुढें तुम्हाला चार पाउलें लांब उडी घेतां येईल. म्हणूनच पुढें पाऊल टाकून पुन्हा मागें सरकण्यापेक्षां प्रथमच सावध रहावें, असा माझा सल्ला आहे. अर्थात् ऑगस्ट १९७६ ते सप्टेंबर १९७७ पर्यंत परिस्थिति तुमच्या आटोक्याबाहेर जाणार नाहीं. परंतु ऑक्टोबर १९७७ ते नोव्हेंबर १९७८ पर्यंत मात्र पुन्हा एकदां पूर्वींप्रमाणेंच विरोधाला तोंड देण्याचे प्रसंग येतील. आणि पूर्वीं दिल्या गेलेल्या वचनाची पूर्तता न झाल्यानें धंद्यांतील भागीदार व सहकारी तुमच्यावर इतके चिडतील कीं, कोर्टांत खेंचण्यासारख्या मार्गाचा अवलंब करण्यासहि ते मागेंपुढें पाहणार नाहींत. यांतहि प्रथम त्रास झाला तरी अंतीं जय तुमचाच होणार आहे. हें सत्य असूनहि या झगडयांत सारसर्वस्व गमवावें लागणार असल्यानें हा विजयमुकुट पाहून तुमची स्तुति करण्यास कोण पुढें येणार !

नोव्हेंबर १९७८ पासून १९८६ च्या अखेरपर्यंतचा काल हा मंद परंतु निश्चित प्रगतीचा असाच आहे. जीवनांतील सर्वच क्षेत्रांत सावकाशपणें परंतु निश्चितपणें प्रगति होईल. १९८६ मध्यें मनावर घेतल्यास कोणत्याहि कार्यांत सुयश प्राप्त करून घेतां येईल. ग्रह–भ्रमणाच्या दृष्टीनें यापेक्षां अधिक महत्वाचें सांगण्यासारखें कांहीं दिसत नाहीं. मकर ही भारताची राशि असल्यानें, भारतांत राहणाऱ्या मकर–रवि व्यक्तींना आपलीं ध्येयें व महत्त्वाकांक्षा पूर्णपणें सिद्धीस नेतां येतात. व सरकारकडून कोणत्याहि प्रकारची बरीवाईट परिस्थिति निर्माण केली गेली तरी त्याला तोंड देण्यांत व्यावहारिक बुद्धिमत्ता व महत्त्वाकांक्षा सहाय्यकारकच ठरतात.

* * * *

Russia's Premier,
Georgy. M. MALENKOV.
मालेन्कॉव्ह
6th January 1902
Sayan Map-
Prepared by-
—इन्दुमती

मीन
कर्क-३
कन्या
बुध-२१
शनि-२८
रवि-१७

# कुंभ–रवि व्यक्ति

(कोणत्याहि वर्षांतील २१ जानेवारी ते १९ फेब्रुवारीचे या कालांत जन्मलेले लोक)

## आर्थिक भविष्य

कुंभ–रवि व्यक्तींना पैशाचा तिटकारा वाटतो हें म्हणणें सयुक्तिक नाहीं. या ‘वर्गा’त पडणाऱ्या लोकांतहि बरेच श्रीमंत लोक आढळतात. त्यांना पैशाची तीव्र लालसा नसली तरी जीवनांतील सुसूत्रता राखण्यासाठीं व समाधानी जीवन जगण्यासाठीं त्यांनाहि पैसा हवासा वाटतोच. इतर अनेकांच्याप्रमाणेंच पैसा मिळविण्यासाठीं प्रामुख्यानें तीन गुणांची आवश्यकता असते, असें या लोकांनाहि वाटतें. ते गुण म्हणजे— भरपूर सामर्थ्य व उत्साह. जी गोष्ट मिळविण्याचा प्रयत्न करावयाचा त्या गोष्टीवर संपूर्ण लक्ष केंद्रित करणें, व स्वसामर्थ्यावरील अढळ असा विश्वास! हे गुण अंगीं असले तर, अथवा अंगीं नसल्यास प्रयत्नानें ते अंगीं बाणवले तर पुढें दिलेल्या कालांत योजना यशस्वी होऊन, त्यांत यश व द्रव्य मिळेल, असें खात्रीलायक म्हणतां येतें. अचूक निर्णयाप्रत येऊन पोहोंचण्या-साठीं कुंभ–रवि व्यक्तींचें तीन विभागांत वर्गीकरण करणें इष्ट ठरतें.

कोणत्याहि वर्षाच्या २१ ते ३० जानेवारीच्या दरम्यान जन्मलेल्यांना पुढें दिलेले कालखंड द्रव्यलाभाच्या दृष्टीनें सुदैवाचे ठरतील:—जानेवारी, फेब्रुवारी व सप्टेंबर १९५७; एप्रिल ते ऑगस्ट व नोव्हेंबर–डिसेंबर १९६१; मे–जून १९६५; डिसेंबर १९६८; जानेवारी ते मार्च व जुलै–ऑगस्ट १९६९; मार्च–एप्रिल व जुलै ते डिसेंबर १९७३; सप्टेंबर–ऑक्टोबर १९७६; एप्रिल–मे १९७७; नोव्हेंबर–डिसेंबर १९८०; जानेवारी ते ऑगस्ट १९८१; फेब्रुवारी–मार्च व सप्टेंबर तें नोव्हेंबर १९८५.

कोणत्याहि वर्षाच्या ३१ जानेवारी ते ९ फेब्रुवारीच्या दरम्यान जन्म-लेल्यांना पुढें दिलेला काल द्रव्यलाभास अनुकूल आहे.—ऑक्टोबर–

नोव्हेंबर १९५७; जानेवारी, फेब्रुवारी १९६२; जून, जुलै, १९६५; सप्टेंबर ऑक्टोबर १९६९; मे, जून १९७३; जानेवारी १९७४; जून १९७७; सप्टेंबर, ऑक्टोबर १९८१; एप्रिल ते ऑगस्ट व डिसेंबर १९८५.

कोणत्याहि वर्षातील १० ते १९ फेब्रुवारीच्या दरम्यान जन्मलेल्यांच्यावर भाग्यलक्ष्मीची कृपापूर्ण दृष्टि राहण्याचा काल पुढीलप्रमाणें आहे:—नोव्हेंबर, डिसेंबर १९५७; जानेवारी व एप्रिल ते सप्टेंबर १९५८; फेब्रुवारी आणि मार्च १९६२; ऑगस्ट, सप्टेंबर व डिसेंबर १९६५; जानेवारी ते एप्रिल १९६६; नोव्हेंबर, डिसेंबर १९६९; मे ते ऑगस्ट १९७०; फेब्रुवारी, मार्च १९७४; जुलै, ऑगस्ट १९७७; जानेवारी ते एप्रिल १९७८; ऑक्टोबर—नोव्हेंबर १९८१; जानेवारी, फेब्रुवारी १९८६.

## संकटाची व समाधानाची वेळ

त्याच त्याच परिस्थितींत जीवन घालविणें कुंभ—रवि व्यक्तींना अतिशय कंटाळवाणें वाटत असल्यानें एखाद्या नवीन कार्यास सुरवात करणें अथवा वैशिट्यपूर्ण योजना आंखणें यांमध्यें त्यांना निरतिशय आनंद वाटतो. पुढील २५ वर्षांत, कोणत्याहि प्रकारच्या महत्वाच्या व नवीन कार्यास सुरवात करण्याच्या, वा नवीन योजना आंखण्याच्या दृष्टीनें पुढील कालखंड भाग्यदायक ठरतील:—मे १९५६; एप्रिल १९५८; मार्च १९६०; फेब्रुवारी, मार्च, १९६२; जानेवारी, फेब्रुवारी १९६४; जानेवारी १९६६; डिसेंबर १९६७; नोव्हेंबर, डिसेंबर १९६९; मे ते ऑक्टोबर १९७१; एप्रिल १९७३; मार्च, एप्रिल १९७५; फेब्रुवारी, मार्च १९७७; फेब्रुवारी १९७९; जानेवारी १९८१; डिसेंबर १९८२; जानेवारी १९८३. या महिन्यांत ग्रहांचीं भ्रमणें उत्साह व सामर्थ्य वाढविणारीं असून यश प्राप्त करून देणारीं ठरतील.

याउलट, पुढील २५ वर्षांत असेहि कांहीं कालखंड आहेत कीं, ज्यावेळीं घाईघाईनें गोष्टी पूर्ण करण्यामुळें व इतरहि अनेक अडचणी व संकटें यांमुळें अनुकूल निर्णयाप्रत येऊन पोहोंचणें कठीण जाईल. कुंभ—रवि व्यक्ति या भावनावश, विकारवश, आणि कांहीं वेळेला अदूरदर्शीपणें निर्णय घेण्याबाबत व कृति करण्याबद्दल प्रसिद्ध असल्यानें पुढें दिलेल्या कालखंडांत त्यांच्या हातून चुका होतील, व त्यांना संकटाशीं झगडावें

लागेल:—ऑगस्ट १९५५; जुलै १९५७; जानेवारी १९५९; मे–जून १९६१; ऑक्टोबर ते डिसेंबर १९६२; जानेवारी ते मे १९६३; ऑक्टोबर १९६४; सप्टेंबर–ऑक्टोबर १९६६; ऑगस्ट व सप्टेंबर १९६८; ऑगस्ट १९७०; जुलै–ऑगस्ट १९७२; जून–जुलै १९७४; जून १९७६; नोव्हेंबर–डिसेंबर १९७७; जानेवारी व एप्रिल ते जून १९७८; ऑक्टोबर–नोव्हेंबर १९७९; एप्रिल १९८०; सप्टेंबर–ऑक्टोबर १९८१; ऑगस्ट–सप्टेंबर १९८३.

निराशा व असमाधानकारक निकाल टाळावयाचे असतील तर या महिन्यांत कोणत्याहि नवीन कार्यास सुरुवात न करणें व महत्त्वाचे निर्णय घेण्याचें शक्यतोंवर टाळणें अंतीं फायद्याचें ठरेल.

## विविध

१९५५ ते १९६२ हीं सात वर्षें आणीबाणीचीं व उलटापालटीचीं जाणार आहेत, या सत्याकडे दुर्लक्ष करण्यांत अर्थ नाहीं. अर्थात् तुमच्या जन्मतारखेप्रमाणें ह्या कालविभागांतहि थोडेंफार पुढेंमागें होईल. परंतु सर्वसामान्यपणें बोलावयाचें झाल्यास या कालांत स्वतःचें फारसें नुकसान होऊं न देतां बाहेर पडावयाचें असल्यास, अधिक परिश्रमांची, प्रयत्नांची, व दूरदर्शी योजना आंखण्याची जरुरी आहे.

या कालांतील ग्रहयोग चिंता करावयास लागणारे व अस्वास्थ्य निर्माण करणारे आहेत. पूर्वींचे स्नेहसंबंध तोडून टाकून नवीन जोडण्याची इच्छा प्रबल होऊन नवीन हितसंबंध, मित्रमंडळी, व कार्यक्रम हातीं घेण्याकडे मनाचा ओढा राहील, व आवडीनिवडींतहि बदल घडून येईल. थोडक्यांत धंद्याच्या व नोकरीच्या क्षेत्राप्रमाणेंच घरगुती वातावरणांतहि मोठ्या प्रमाणावर फेरबदल घडून येतील, असें निश्चितपणें म्हणतां येईल. या कालांत उताळवळेपणानें गोष्टी केल्यास पुढें त्या अयशस्वी होऊन पश्चात्ताप करीत बसण्याची पाळी येईल, हा धोका स्पष्ट दिसत आहे. धंदेवाईक क्षेत्रांतील व आर्थिक बाबतींत संबंधित अशा स्नेह्यासोबत्यांत व सहकाऱ्यांत एक प्रकारचें अस्थिरतेचें वातावरण निर्माण झाल्यामुळें, बहुसंख्य कुंभ–रवि व्यक्तींच्या जीवनावर त्याचा विपरित परिणाम होईल, व त्यांच्या जीवनांत गुंतागुंत व गोंधळ निर्माण होण्याची शक्यता निर्माण होईल.

प्रामाणिकपणें व स्पष्टपणें सांगावयाचें झाल्यास या लोकांना टिकाऊ स्वरूपाचे स्नेहसंबंध ठेवणें व जोडणें कठीण जातें असेंच म्हणावें लागेल. इतकेंच नव्हे तर वैयक्तिक जीवनांतहि अशीच अस्थिरता दिसून आल्यास त्यांत आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं! अनिष्ट व विचित्र स्नेह-संबंधांत गुंतण्याचें व अशाच प्रकारचे अनुभव घेण्याचें या लोकांच्या जीवन-इतिहासांत लिहिलेलें असतें. अशा तऱ्हेचे नवीन स्नेहसंबंध वाढीला लाग-ण्याचा काल म्हणजे १९५५–१९५६ ही दोन वर्षें!

आर्थिकदृष्ट्या हीं वर्षे खर्चाचीं असलीं तरी सामाजिकदृष्ट्या सुखाचीं जातील. या दोन वर्षांत जुने स्नेहसंबंध तोडून नवीन प्रस्थापित करण्याच्या फंदांत पडूं नका; कारण त्यामुळें कल्पनेपेक्षांहि अधिक प्रमाणांत त्रासदायक परिस्थिति निर्माण होईल. परंतु लग्न झालेल्यांना हीं दोन वर्षें सुखासमाधानाचीं जातील अशी आशा बाळगण्यास कांहींच हरकत नाहीं. कारण पालकांना जी जबाबदारी व काळजी वहावी लागते, ती कमी होऊन कुटुंबांतील मुलां–मुलींची प्रगति होत असल्याचें पहाण्यांत त्यांना समाधान मिळेल.

या पुस्तकाच्या वाचकभगिनींतील कुंभ–रवींना स्वतःचे स्वतंत्र कार्य-क्षेत्र आंखण्यास अथवा त्यांना आवडणाऱ्या कार्यास सुरुवात करण्यास हा काल अत्यंत अनुकूल आहे. कारण त्यांना कौटुंबिक बंधनें विशेष बंधन-कारक नसतात; व म्हणूनच त्यांतून त्यांना बरेंचसें स्वातंत्र्य मिळूं शकतें. अर्थात् या गोष्टी बऱ्याच प्रमाणांत सामाजिक परिस्थितीवर अवलं-बून राहतील.

१९५७ ते १९६१ हीं दोन वर्षें वैवाहिक जीवनांत अस्थिर व अस्वस्थ तेचें वातावरण निर्माण करणारीं व स्नेहसंबंध बिघडून टाकणारी ठरतील. अर्थात् अशा प्रकारचें वातावरण निर्माण होण्याचा काल हा तुम्हीं महिन्याच्या सुरुवातीस जन्मलांत कीं अखेरीस यावर अवलंबून राहील. कोणत्याहि गोष्टींत धडाडीनें पुढाकार घेण्याची तुमची वृत्ति असल्यानें वर सांगितल्या-प्रमाणें पुढील कांहीं वर्षांत तुम्ही जागा बदलण्याच्या, व वातावरण अनुकूल असल्यास दूरच्या ठिकाणीं राहण्यास जाण्याच्या बाबतींत भलतेच अधीर

व उत्सुक व्हाल. अथवा नोकरी-धंद्यांत व दृष्टिकोनांत बदल घडून येऊन, जीवनमार्गाला नवीनच वळण मिळणेंहि असंभवनीय नाहीं. योग्य वेळीं योग्य गोष्ट घडावी यासाठीं वर दिलेल्या "संकटाची व समाधानाची वेळ" या भागांतून शुभ वेळ निवडण्याची दक्षता घेतल्यास त्रास कमी होईल.

फल-ज्योतिर्विदांची अशी श्रद्धा आहे कीं, वरवर पाहिलें असतां संगतिप्रिय दिसणाऱ्या कुंभ-रवि व्यतींना खरें पाहिलें असतां अंतःकरणांत एकटेपणा फार जाणवतो. चांगले व वाईट या दोन्ही प्रकारचे मित्र व सहकारी या लोकांचें जीवन घडविण्यांत प्रामुख्यानें महत्त्वाची भूमिका वठवितात हेंहि नाकारतां येत नाहीं. नोव्हेंबर १९६१ पासून १९६४ च्या अखेरपर्यंत असे कांहीं विशिष्ट ग्रहयोग आहेत आणि त्यांत विशेषतः १९६२ च्या पहिल्या तीन महिन्यांतील काल हा अत्यंत अनुकूल व सुदैवी असा असून, इतर लोकांना आश्चर्याचा धक्का बसावा अशी वेगवान् प्रगति तुम्ही करून घ्याल.

त्यानंतर मात्र १९६४ च्या मध्यापर्यंत असे कांहीं प्रसंग येतील कीं, ज्या वेळीं तुमच्यापुढें एक मोठें प्रश्नचिन्ह उभें राहील. या प्रश्नचिन्हाला अगदीं समर्पक उत्तर हवें असेल, तर वैयक्तिक जन्मपत्रिका व जन्मस्थान व जन्मवेळेची अगदीं अचूक माहिती पाहिजे. तथापि सर्वसामान्यपणें असें विधान करतां येईल कीं,उत्पन्नांत जरी वाढ झाली नाहीं तरी पैशाच्या दृष्टीनें तुम्हांला विशेष त्रास होणार नाहीं. तथापि शारीरिक व मानसिक दडपण पडेलच, व त्यामुळें १९६२ च्या शेवटच्या तीन महिन्यांत चांगली संधि मिळूनहि त्याचा योग्य तो उपयोग करून घेणें कठीण जाईल. या वेळींच तुमच्यावर प्रेम करणारी एखादी व्यक्ति तुमच्या कार्याला साथ देईल आणि तुमचें जीवन सुखमय करण्याचा प्रयत्न करील.

फेब्रुवारी आणि मार्च १९६३ मध्यें तुमच्या मित्रमंडळींत एका नवीन मित्राची भर पडेल. तो नवीन संधि प्राप्त करून देईल, व तुमचें ध्येय साध्य व्हावें यासाठीं संपूर्ण सहकार्य करील. तथापि अशा वेळींहि कोणाशींहि जास्त संबंध न ठेवतां, कोणत्याहि गोष्टींत स्वतःला गुंतवून न घेतां, सेवानिवृत्त होण्याचे विचार तुमच्या मनांत घोळूं लागतील. वास्तविक पाहतां जें कार्य

हातीं घेतलें असतां यशप्राप्ति होण्याची निश्चित खात्री बाळगतां येईल अशा कार्यापासूनहि चार पाउलें दूर राहावें अशीच तुमची मनोवृत्ति राहील.

१९६४ सालापासून किंवा अगदीं निश्चित बोलावयाचें झाल्यास जानेवारी १९६६ पासून जुलै १९७६ पर्यंतचा, दहा वर्षांचा काल, हा बहुसंख्य कुंभ–रवि व्यक्तींना विशेष त्रास न होतां प्रगति करतां येईल असाच आहे. जीवनाच्या कोणत्याहि क्षेत्रांत तुम्ही असलांत तरी यशप्राप्ति हमखास होईल. दहा वर्षांच्या या प्रदीर्घ कालांत तुम्हांला सुवर्णसंधि प्राप्त होऊन, तुमच्या विशिष्ट कार्यक्षेत्रांत नांव कमावण्यासारखें महत्त्वाचें कार्य केलें जाईल. या कालांत अविरत कार्यमग्न असणें, व मनामध्यें विधायक व निर्मितिक्षम योजना तयार ठेवणें महत्त्वाचें ठरेल.

या दहा वर्षांत तुम्ही स्वतःचें नशीब घडवूं किंवा बिघडवूं शकाल. तें सर्व तुमच्या हातांतच राहील. प्रत्येक गोष्ट, वैयक्तिक इच्छाशक्ति व प्रयत्न यांवर अवलंबून राहील. स्वतःचा फायदा करून घ्यावयाचा किंवा नाहीं हें ठरविण्यासारख्या परिस्थितींत तुम्हीं असाल, फक्त प्रयत्न मात्र योग्य वेळेसच व्हावयास पाहिजेत. ग्रहांच्या गोचर भ्रमणाच्या दृष्टिकोनांतून विचार केला तर या कालांत उत्तम प्रगतीची सुवर्णसंधिच तुम्हांला लाभत आहे याबद्दल खात्री बाळगा.

परंतु जून ते नोव्हेंबर १९६७ मध्यें आणि त्याचप्रमाणें एप्रिल ते जून १९६८ मध्यें जीवनेतिहासांतील एका महत्त्वाच्या प्रकरणाला तोंड फुटेल, व मोठ्या प्रमाणावर होणाऱ्या फेरफारांना तोंड द्यावें लागून स्वतःच्या कार्यक्रमांत व दृष्टिकोनांत बदल घडून येईल. कारण या वेळीं कांहीं जुन्या सहकाऱ्यांशीं व स्नेह्यांशीं मतभेद होऊन संबंध दुरावतील, आणि त्याच वेळीं मालमत्तेच्या व द्रव्याच्या बाबतींत नातेवाइकांमध्यें गैरसमजुतींचें वातावरण निर्माण होईल, व तुम्हाला कोर्टांत खेचण्याचे विचारहि त्यांच्या मनांत येतील. हें सर्व टाळण्यासाठीं तुम्हीं सुरवातीपासूनच दक्षता घेतली पाहिजे.

सुवर्णसंधि प्राप्त करून देणारा दुसरा कालखंड १९७१ मध्यें, विशेषतः मे ते नोव्हेंबर या दरम्यान येत आहे; व तुमच्या अंगचे गुण, प्रामाणिकपणा, व न्यायप्रियता इतारांना कळून चुकतील. हा काल म्हणजे

एका नवीनच तऱ्हेच्या जीवनाची सुरुवात करणारा ठरेल. फक्त "जुन्या मतांचा जाळा कचरा" असें स्वतःलाच तुम्हीं म्हटलें पाहिजे. धंद्यांत वा नोकरींत ज्या संधीची तुम्ही वाट पहात असाल ती दुर्मिळ संधि प्राप्त करून देऊन तुमच्या योजनांना फल आणून देणारे शुभदायी ग्रहयोग या कालांत निर्माण होत आहेत. स्वतःचें भवितव्य ठरविणें तुमच्याच हातीं असल्यानें जीवनक्षेत्र विकसित करावयाचें, कीं आहे त्यांतच समाधान मानावयाचें, हें तुम्हींच ठरवावयाचें आहे.

इतरेजनांनाहि या कालांत हें स्पष्टपणें कळून चुकेल कीं, कुंभ–रवि व्यक्तींचा स्वभाव मनमिळाऊ असून, प्रत्येक गोष्टींत सुवर्णमध्य पाहण्याची व समतोलत्व राखण्याची त्यांना संवय व आवड असते. या वेळीं राष्ट्रीय व जागतिक क्षेत्रांतील सर्वात ख्यातनाम व्यक्ती ही कुंभ–रवीपैकींच कोणी तरी असेल हें नमूद करून ठेवावें; मग ही व्यक्ती कोणीहि असो, वा तिचें नांव कांहींहि असो,–ती जगांतील गोंधळाच्या वातावरणांत व विशेषतः राजकीय क्षेत्रांतील भयानक संगीतांत एक श्रुतिमधुर संगीत–लहरी उठवून जगाला समाधान देण्याचा प्रयत्न करील हें निश्चित ! राष्ट्रीय व आन्तरराष्ट्रीय प्रगतीकडे लक्ष देऊन पाहणें, हें या वर्षांतील एक मनोरंजक काम आहे; कारण या वेळीं मानवयुगाच्या तत्त्वांचें लोकांना भलतेंच आकर्षण वाटूं लागेल.

१९७६ च्या मध्यापासून १९७९ च्या पावसाळ्यापर्यंत निराशावादीं वातावरणाचें दडपण मनावर पडेल, आणि जवळच्या नातेवाइकांकडून वा सहकाऱ्यांकडूनच अशा कांहीं घटना घडविल्या जातील कीं, त्यांमुळें तुमचें मानसिक स्वास्थ्य बिघडून जाईल. तुमच्या कल्पना व योजना अजिबातच पसंत न पडल्यानें कांहीं वृद्ध मंडळी उघड द्वेष करूं लागतील. त्यांच्या या वागणुकीमुळें व प्रवृत्तीमुळें त्यांच्याशीं असलेले मित्रत्वाचे संबंध तोडले गेले तर निदान मला तरी आश्चर्य वाटणार नाहीं. तथापि तुमच्या नांवाला कलंक लागूं नये म्हणून हीं भांडणें किळसवाणें स्वरूप धारण करणार नाहींत इकडे लक्ष पुरवावें. या दृष्टीनें १९७७ चे शेवटचे तीन महिने, व जून ते सप्टेंबर १९७९ या कालांत दक्षता घ्यावी.

१९७९ च्या अखेरपर्यंत तुमच्या सामाजिक स्नेहसंबंधांवर व

एकंदरींत जीवनावरच निराशेच्या व संकटांच्या ढगांची कृष्णछाया पसरलेली असेल ती मात्र त्यानंतरच्या कांहीं वर्षांत हळू हळू नाहींशी होईल. प्रथम दिसणाऱ्या रुपेरी कडांचेंच पुढें संपूर्ण प्रकाशांत रूपांतर होईल. १९८० च्या शेवटच्या भागांत तुमची पूर्वीची प्रेयसी तुम्हांला मदत करण्यास पुढें येईल, व तुम्हांला नवीन धंदा सुरू करण्यास साहाय्य करील; कारण तिची तुमच्या कर्तृत्वशक्तीवर प्रथमपासूनच श्रद्धा असेल. परंतु मार्च ते मे १९८० मध्यें धंद्यातील सहकाऱ्यांत व तुमच्यांत तीव्र मतभेद निर्माण होतील. हे मतभेद गंभीर स्वरूपाच्या व महत्त्वाच्या मुद्द्यांवर असतील. इतरांना तुमचीं मतें आधुनिक व अव्यवहार्य वाटतील, आणि म्हणूनच प्रयोग करण्यासाठीं तुम्हांला रान मोकळें सोडून ते बाजूला सरकतील. या परिस्थितींत घाबरण्यासारखें वा धोका मानण्यासारखें कांहीं नाहीं, एवढेंच मी या ठिकाणीं सांगूं इच्छितें. तुमच्या कल्पना लागलींच फल देऊं शकल्या नाहींत तरी १९८१ मध्यें तुम्हांला त्याची अपेक्षा धरतां येईल. आणि १९८०–१९८१ मध्यें तुम्हीं जें कांहीं केलें असेल त्यामुळें १९८५ व त्याच्या आसपासच्या कालांत तुम्ही वैभवाच्या व उत्कर्षाच्या शिखरावर असाल.

## महामानव

कुंभ–रवि व्यक्ति ह्या जन्मभर "मानव युगा"च्या प्रेषित या नात्यानेंच वावरत असतात. यालाच कोणी नव युग, यंत्र युग, न्याय व समता यांचें युग अशीं इतर नांवें देतात. पृथ्वीच्या पाठीवर कांहीं तरी अगदीं नवीन गोष्टींचा वा अज्ञाताचा शोध लावणें, जगांत सुधारणा घडवून आणून जगाची आणि सहकाऱ्यांची उन्नति करणें, या गोष्टी हे लोक करीत असतात. जगांत उन्नति करण्यासारखें अथवा सुधारणा घडवून आणण्यासारखें कांहीं नाहीं असा संशय जर त्यांना येऊं लागला तर त्यांची फारच निराशा होते.

तुमचा रवि कुंभेंत असतांना, शुक्र जर मीनेंत नसेल तर, कोणत्याहि प्रकारच्या धार्मिक गोष्टीवर इतरांप्रमाणें अंधश्रद्धा बसणें, अथवा माणुसकीपेक्षांहि दैवाशीं निगडित असलेल्या सामाजिक नियमांना अनुसरून वागणें तुमच्या हातून होणार नाहीं. शास्त्रांत लिहिलेल्या दैवी नियमांनुसार मनुष्यप्राणी कसें आचरण करूं शकेल, असें तुम्हांला नेहमींच वाटत असतें.

२० व्या शतकांत तुमचीं मतें व कल्पना लोकांना पूर्णपणें पटल्या नाहींत तरी नवीन कल्पनांचे उद्‌गाते तुम्ही आहांत ही समाधानाची गोष्ट आहे.

या कल्पना भावी कालांत चांगल्याच मूळ धरणार आहेत. या जगांत जगावें लागणारें जीवन या जगांतील शास्त्रीय नियमांनींच बद्ध केलेलें असावें, म्हणजेच तें सर्वतोपरी सुखासमाधानाचें होईल....तुमच्या कित्येक कल्पना आतां चांगल्याच आकार धारण करूं लागल्या आहेत. तुमचा स्वार्थत्याग अलौकिक असा असून, या शतकांत यापेक्षांहि अधिक पुढें जाण्याची जबाबदारी तुमच्यावरच आहे. आणि कांहीं लोकांनीं तुम्हांला असमाधानी म्हटलें तरी त्यांच्या निष्कर्षाबद्दल त्यांची कींवच करावी हें योग्य ! मीनेच्या सूचनेनुसार आजपर्यंत जगानें आपला बराच मार्ग आक्रमण केला, आतां ती पाळी कुंभेवर आली असून तुम्हीं या स्थानाचा योग्य तो उपयोग करून घेतला पाहिजे. इतर सर्व राशींत जन्मलेले लोक जर "मानव" आहेत, तर तुम्ही "महामानव" आहांत,— आणि तेंहि जन्मसिद्ध हक्कांमुळेंच ! आपापलया सामर्थ्यानुसार तुम्ही ज्योतिषाचें हें विधान खरें करून दाखवाल अशी खात्री आहे.

* * *






# मीन–रवि

( कोणत्याहि वर्षातील २० फेब्रुवारी ते २१ मार्च या कालात जन्मलेले लोक )

## द्रव्यलाभ

जन्मजात अध्यात्मवादी असूनहि जगांतील बहुसंख्य श्रीमंत लोक मीन–रवि व्यक्तीच असतात, हें एक आश्चर्यच नव्हे काय ? अर्थशास्त्र हाहि त्यांच्यापैकीं पुष्कळांच्या आवडीचा विषय असतो, अध्यात्मवादी असून द्रव्यसंचय करण्याची तीव्रतम इच्छा या लोकांच्या ठिकाणीं आढळते. म्हणून कर्तृत्वशक्तीला पुरेपूर वाव मिळेल, आणि सर्व लक्ष केंद्रित केलें असतां व स्वतःच्या व्यक्तिमत्वाचा उपयोग करून घेतला असतां भरपूर द्रव्यप्राप्ति होऊन इतर अनेक लाभ होऊं शकतील, असे कालखंड मी या ठिकाणीं देत आहें. अर्थात् हे फायदे द्रव्यार्जनाच्या स्वरूपाचे असतील किंवा नाहीं हें त्या व्यक्तीच्या दृष्टिकोनावर अवलंबून राहील. परंतु खालीं दिलेला काल हा द्रव्यार्जनाच्या दृष्टीनें अत्यंत लाभदायक आहे, हें कोणालाहि अमान्य करतां येणार नाहीं. मीन–रवि व्यक्तींचें मी तीन विभागांत वर्गीकरण करीत आहें, कारण त्यामुळें अधिक अचूक निर्णय सांपडूं शकतील.

कोणत्याहि वर्षाच्या २० फेब्रुवारी ते १ मार्चचे दरम्यान तुमचा जन्म झाला असला तर पुढील काल सुदैवाचा आहे. तुम्ही त्याचा अनुकूल रीतीनें उपयोग करून घ्या:—फेब्रुवारी, मार्च, ऑक्टोबर १९५८; एप्रिल, मे, सप्टेंबर ते डिसेंबर १९६२; जानेवारी १९६३; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९६५; जून १९६६; जानेवारी ते एप्रिल व सप्टेंबर, ऑक्टोबर १९७०; एप्रिल, ऑक्टोबर, नोव्हेंबर १९७४; सप्टेंबर ते डिसेंबर १९७७; एप्रिल, मे १९७८; डिसेंबर १९८१; जानेवारी ते सप्टेंबर १९८२; मार्च १९८६.

कोणत्याहि वर्षातील २ मार्च ते १० मार्चच्या दरम्यान तुमचा जन्म झाला असल्यास लक्ष्मीची तुमच्यावर पूर्ण कृपादृष्टि असण्याचे कालखंड

पुढीलप्रमाणें आहेत:——डिसेंबर १९५८; जून ते ऑगस्ट १९६२; जानेवारी, फेब्रुवारी १९६३; जुलै १९६६; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९७०; मे ते सप्टेंबर १९७४; जानेवारी १९७५; जून, जुलै १९७८; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९८२; एप्रिल, मे, सप्टेंबर ते डिसेंबर १९८६.

तुमचा जन्म कोणत्याहि वर्षांतील ११ मार्च ते २१ मार्चच्या दरम्यान झालेला असेल तर पुढील कालखंडांत तुमचें आर्थिक दैव उजाडेल असें निश्चितपणें समजा:——जानेवारी ते जून १९५५; जानेवारी, फेब्रुवारी, मे ते ऑक्टोबर १९५९; मार्च १९६३; ऑगस्ट, सप्टेंबर १९६६; फेब्रुवारी ते मे १९६७; डिसेंबर १९७०; जानेवारी, जुलै ते सप्टेंबर १९७१; फेब्रुवारी–मार्च १९७५; ऑगस्ट १९७८; मार्च, एप्रिल १९७९; नोव्हेंबर, डिसेंबर १९८२; जून ते ऑगस्ट १९८६.

## संकटाची व समाधानाची वेळ

आगामी पंचवीस वर्षांत म्हणजे १९५५ ते १९८० पर्यंत कित्येक असे काल आहेत कीं, ज्यावेळीं नवी योजना हाती घेण्याच्या व त्यासाठीं विशेष परिश्रम घेण्याच्या दृष्टीनें आदर्श आहेत. या कालांत स्वत:च्या जीवनाच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाच्या अशा कांहीं नवीन कार्यक्रमांची व योजनांची सुरवात करावी असें तुम्हांस वाटूं लागेल. ज्या वेळेला ज्योतिषी शुभ वेळ समजतात, अथवा शुभ गोष्ट शुभ वेळेला सुरू व्हावी असें आपल्याला वाटत असतांना आपण ज्या वेळेकडे पहात असतों, अशी आदर्श शुभ वेळ व शुभ कालखंड या ठिकाणीं देत आहें:——जानेवारी १९५५; जून ते डिसेंबर १९५६; मे १९५८; एप्रिल १९६०; मार्च, एप्रिल १९६२; मार्च १९६४; फेब्रुवारी, मार्च १९६६; जानेवारी, फेब्रुवारी १९६८; जानेवारी १९७०; नोव्हेंबर, डिसेंबर १९७१; मे, जून १९७३; एप्रिल, मे १९७५; एप्रिल १९७७; मार्च १९७९; फेब्रुवारी, मार्च १९८१; फेब्रुवारी १९८३; जानेवारी १९८५.

याउलट सप्टेंबर १९५५; सप्टेंबर १९५७; ऑगस्ट १९५९; जुलै, ऑगस्ट १९६१; जून, जुलै १९६३; नोव्हेंबर, डिसेंबर १९६४; जानेवारी; ते जून १९६५; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९६६; सप्टेंबर, ऑक्टोबर १९६८;

सप्टेंबर, ऑक्टोबर १९७०; ऑगस्ट, सप्टेंबर १९७२; ऑगस्ट, सप्टेंबर १९७४; जुलै, ऑगस्ट १९७६; जून, जुलै १९७८; डिसेंबर १९७९; जानेवारी ते मार्च, आणि मे ते जुलै १९८०; नोव्हेंबर, डिसेंबर १९८१; ऑक्टोबर, नोव्हेंबर १९८३; सप्टेंबर, ऑक्टोबर १९८५; हे काल मात्र तितकेसे अनुकूल नाहींत. साधारण स्वरूपाच्या अडचणी व प्रश्न या वेळीं एकवटतील व त्याला तुम्हांला तोंड द्यावें लागेल. इतरांना मदत करण्यासाठीं किंवा संतुष्ट राखण्यासाठीं स्वतःच्या वैयक्तिक योजना व कार्यक्रम कदाचित् बाजूला ठेवावे लागतील. नेहमींच्या नियमित कार्यक्रमांत फेरफार करावे लागतील, व चालू प्रश्न डोकें वर काढतील.

## विविध

पुढील कांहीं वर्षे मीन–रवि व्यक्तींना निश्चितपणें प्रगतीचीं व भरभराटीचीं आहेत, या लोकांच्या जीवनावर कांहीं विपरीत परिणाम घडविणारे वा त्यांना कांहीं वाईट अनुभव आणून देणारे ग्रहयोग क्वचितच आढळतील. तथापि दैवाचा अथवा ग्रहांचा फेरा त्यांना भोंवण्याच्या दृष्टीनें १९६६ चा मध्य विचारांत घ्यावा लागेल. कारण त्या वेळीं मीनेंतून शनि हा हर्षलशीं प्रतियोग करीत आहे.

१९५६ मधील गुरूचें कन्येंतील भ्रमण हें अत्यंत महत्त्वाचें आहे. धंदा, नोकरीचाकरी अथवा आवडता छंद आणि आर्थिक दैव यावर सारें लक्ष केंद्रीत होऊन, धंद्यांत वा नोकरींत बदल घडून येण्याचा अथवा जीवनांतील कांहीं गोष्टींची फेरजुळणी करण्याचा हा काल आहे.

आपला कार्यक्रम व दृष्टिकोन यांत बदल न करतां त्यांत अविरतत्व आणण्याचा प्रयत्न केला तर भविष्यकालाचा विचार आशावादी दृष्टिकोनांतून करण्यास कोणताहि प्रत्यवाय नाहीं. पुढील कालांत सुदैवाची भरतीची लाट, तुमची जीवननौका सुखाच्या व समृद्धीच्या किनाऱ्याला नेऊन पोंहोचवील. १९५६ च्या मध्यापासून नवीन संधि प्राप्त होऊन, तुम्हांला फावल्या वेळांत लहानसहान उद्योगधंदे करतां येतील. या रिकामपणाच्या कामगिरींतून तुम्हांला चांगली प्राप्ति करतां येईल.

मात्र १९५९–६० मध्यें आर्थिक परिस्थिति बिघडणार नाहीं याबद्दल

जागरूक राहणें अंतीम फायद्याचें ठरेल. स्वतःच्या मिळकतीबाहेर खर्चाचें प्रमाण वाढूं न देतां, अंथरूण पाहून पाय पसरण्याचें धोरण व देण्या-घेण्याचे सर्व व्यवहार संपुष्टांत आणण्याचे धोरण शहाणपणाचें ठरेल.

पारंपरिक सहजतेनें मीन–रवि व्यक्ति वारंवार प्रेमांत पडतात या स्वभावांत वा संवयींत बदल घडून येण्यासारखे योग पुढील कांहीं वर्षांत आढळून येत नाहींत. मोकळ्या अंतःकरणाचे जे वाचक असतील त्यांना पुढील तीन वर्षें या दृष्टीनें अतिशय रोमहर्षक जातील. भिन्नलिंगी व्यक्तींशीं त्यांचे संबंध या कालांत जुळून येतील, व हे संबंध त्यांना रोमांचकारी व सुखी जीवनाचें प्रत्यंतर घडवतील. अर्थात् १९५६ च्या नंतर हे संबंध टिकून राहतील कीं नाहीं याबद्दल साशंकता वाटते.

१९५७ मधील नेपच्यूनचा वृश्चिकेंतील प्रवेश हा बहुसंख्य मीन–रवि व्यक्तींच्या अंतःकरणांत प्रवासाची ऊर्मि निर्माण करील. व्यक्तीच्या मनो-धर्माप्रमाणें यांत कमीअधिक तीव्रता राहील एवढेंच काय तें ! प्रवास कर-ण्याची तीव्रतम अशी इच्छा निर्माण झाल्यास १९५७ नंतर प्रवास करण्याचे सुयोग येऊन बाहेरचें जग पाहण्याची निश्चित संधि मिळेल. अर्थात् या निदर्शनाबरोबरच कायदेशीर गोष्टी हाताळण्याच्या बाबतींत तुम्हांला अतिशय दक्षता घ्यावी लागेल. विशेषतः १९५६ मध्यें जेव्हां हर्षल व नेप-च्यून यांचे दूषित ग्रहयोग घडून येतील, तेव्हां कायद्याच्या कचाटयांत सांप-डल्यानंतर त्यांतून बाहेर पडणें हें अतिशय कठीण आहे असें आढळून येईल.

सारांश, बहुसंख्य मीन–रवि व्यक्तींना पुढील कांहीं वर्षें सुखी व समाधानी जीवनाचा उपभोग घेण्याची सुवर्णसंधि चालून येत आहे. स्वभा-वतः आनंदी मनोवृत्तीचे हे लोक असल्यानें, इतर कोणत्याहि गोष्टीपेक्षां जीवनाला मर्यादा घालणाऱ्या बंधनांतून मिळणारी सुटका त्यांना लाभदायक ठरेल. कलेची नितांत आवड असणाऱ्या तरुण व्यक्तींनीं आपली कला विधा-यक मार्गानें वाढविण्याचा प्रयत्न करावा, व त्या दृष्टीनें विशेष परिश्रम करून ज्ञान संपादन करावें, हाच माझा सल्ला आहे. असें केल्यास परिपूर्ण व सुखी जीवनाचें स्वप्न साकार होईल, व त्यांच्या कलेच्या क्षेत्रांत १९५७ ते १९६० चे दरम्यान त्यांना बहुमान प्राप्त होईल.

पूर्वीच्या अनुभवांचा आपल्याला भरपूर उपयोग व फायदा होत आहे, असें वयस्कर मीन–रवि व्यक्तींना वाटेल, आणि भावी कालांतील अडचणींना व संकटांना यशस्वीपणें तोंड देण्यास व त्यांतून अनुकूल परिस्थिति निर्माण करण्यास हे अनुभवच मार्गदर्शक ठरले, असें त्यांना कळून चुकेल.

१९६२–६३ मध्यें जगांत कोणतीहि उलथापालथ होवो, अथवा घडामोडी होवोत, मीन–रवि व्यक्तींनीं योजना आंखलेल्या असोत वा नसोत आर्थिकदृष्टया त्यांची भरभराट होणार आहे हें निश्चित ! जागतिक स्वरूपाचे बदल, अडचणी वा संकटें, युद्ध व शांतता यांचा त्यांच्यावर प्रत्यक्ष असा कोणताच परिणाम होणार नाहीं. आणि शेजारच्यावर कोणतेहि अनुभव घेण्याचे प्रसंग आले तरी मीन–रवि व्यक्ति मात्र उत्कर्षच करून घेतील. १९६२ च्या मार्च–एप्रिलमध्यें आर्थिकदृष्टया कांहीं सुवर्णसंधि प्राप्त होईल आणि त्यापुढचा काल द्रव्यदृष्टया फायदेशीर वा लाभदायक होईल. याच कालांत तुमच्या मनोवृत्तींना अनुकूल असें वातावरण उत्पन्न होऊन तुम्हीं सुखी जीवनाचा आनंद उपभोगाल.

अर्थात् १९६३ च्या जून–जुलैमध्यें अचानक अडचणी निर्माण होऊन त्यांतून कसा मार्ग काढावा, याची चिंता तुम्हांला लागेल. १९६२–६३ या कालांत तुमच्या ज्या सहकाऱ्यांनीं व मित्रांनीं तुम्हाला पुरेपूर साहाय्य वा मदत देण्याचें मान्य केलें असेल, त्यांनीं निराळयाच गोष्टींचें तुणतुणें वाजविण्यास सुरुवात केली आहे असें तुम्हांस आढळून येईल. तुम्ही जन्मतःच मुत्सद्दी असल्यानें या गोंधळांतून मार्ग काढाल हें निश्चित. त्यानंतर मात्र आर्थिकदृष्टया तुमची एवढी मोठी प्रगति होईल कीं, तुमचा अपकर्ष व्हावा असें इच्छिणाऱ्यांना तुमचा हेवा वाटूं लागेल.

तथापि जून–जुलै १९६३ या कालांत, एखादा भागीदार घेऊन धंद्याचें क्षेत्र विस्तृत करावें, असे विचार तुमच्या मनांत घोळत असतील तर ते तुमच्या नुकसानीस कारणीभूत होतील हें लक्षांत ठेवा; कारण सरतेशेवटीं ते तुमचा विश्वासघात करतील हें निश्चित ! काळजीपूर्वक रीतीनें योजना आंखल्यास १९६५ पर्यंत असमाधानकारक अशी एकहि घटना घडणार नाहीं. १९६४ मधील तुमच्या जन्म–तारखेच्या आसपास

तुमच्या कीर्तीमध्यें भर पडणारी एक महत्त्वाची योजना व घटना यशस्वी होईल.

तुम्ही दीर्घकालपर्यंत जी योजना प्रत्यक्षांत उतरविण्याचें ठरवीत होतां, त्यांतून कांहीं तरी चांगलें निष्पन्न झाल्याचें, व आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतील या कांहीं वर्षांतील गोंधळानें तुमचें नुकसान होण्याऐवजीं फायदाच झाल्याचें तुमच्या ध्यानांत येईल.

तुम्ही भरपूर धूर्त व धोरणी असाल तर १९६५–११६६ मध्यें कोणतीहि असमाधानकारक घटना घडणार नाहीं अशा रीतीनें योजना आंखण्याची व त्याचबरोबर तुमच्या कार्यापासून परावृत्त होण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून शरीरप्रकृति धड राहील याचीहि तुम्हीं काळजी घ्यावी. १९६५ आणि १९६७ मधील सुरुवातीच्या कांहीं महिन्यांपर्यंत जी कांहीं गोंधळाची परिस्थिति निर्माण होईल, त्यांतून सुरक्षितपणें बाहेर पडावयाचें असल्यास १९६३–१९६४ मधील काळजीपूर्वक रीतीनें आंखलेल्या योजनाच साहाय्यभूत होतील हें पक्कें लक्षांत घ्यावें.

सहज दुर्लक्षिलेल्या गोष्टीमुळेंच १९६५ च्या पहिल्या सहामाहींत अकल्पित अशा संकटांना तोंड देण्याची पाळी येईल. या वेळीं ज्यांच्यावर तुम्हीं नितांत विश्वास टाकलेला असेल असे मित्रसुद्धां “ स्वजन गवसला तो स्याजपाशीं नसे तो, कठिण समय येतां कोण कामास येतो ? ” हे कवीचे बोल खरे करून दाखवतील. १९६५ चा प्रथमार्ध हा तुमची कसोटी पहाणारा ठरणार आहे यांत शंका नाहीं. या वेळीं असे कांहीं प्रश्न निर्माण होतील कीं ज्यांतून “ बाहेर पडण्यास ” बराच कालावधि लागेल, व पुढील कांहीं महिने तुमची प्रगतीहि ‘ जिथल्या तिथें ’च राहील.

अर्थात् १९६६ च्या फेब्रुवारी-मार्चमध्यें आशेचे किरण दिसतील, व या प्रश्नांची वासलात लावून त्यांतून बाहेर पडण्याचा नवीन मार्ग तुम्हांला सांपडेल. परंतु ऑक्टोबरच्या मध्यापासून १९६६ च्या अखेरपर्यंत, तुमच्या कुटुंबांतील कांहीं व्यक्तींच्याशीं तुमचे संबंध संपुष्टांत येतील. आणि वर्षाच्या सुरुवातीलाच जे गैरसमज निर्माण झालेले असतील, त्यांनीं या वेळेला तीव्रतम स्वरूप धारण केलेलें असेल. यांतून तुमची सुटका यक्षिणीची कांडी फिरली

तरच व्हावयाची ! कदाचित् पूर्वीच्या कालांत तुमच्यावर प्रेम करणारी अशी एखादी व्यक्ति साहाय्याला धांवून येईल व तुम्हांला यांतून बाहेर काढील. तरीहि तुमचे कांहीं सहकारी तुमचें नुकसान करण्यास्तव टपून बसलेले असतील; आणि याच वेळीं तुम्ही जर सामाजिक कार्यांत गुंतलेले असाल तर १९६७ मध्यें तुम्हांला अयोग्य व अकारण विरोधाला तोंड द्यावें लागेल. विरोधी पक्षीयांना रणांगणांत उतरून कोल्हेकुई करूं देत, शेवटीं त्यांचे तेच ओरडून ओरडून दमतील व गप्प बसतील. त्यांची उपेक्षा करणें हाच उत्तम मार्ग ! यामुळेंच १९६८ मध्यें तुम्हांला योग्य तें मानाचें स्थान प्राप्त होईल.

बहुधा फेब्रुवारी १९६८ मध्यें तुमच्या जीवनांत एका नवीन मित्राचा प्रवेश होईल; तुमच्या कार्यक्षेत्राचा विस्तार होण्याच्या दृष्टीनें हा मित्र नवीन संधि प्राप्त करून देईल. या संधीचा उपयोग करून घेणें हितावहच ठरेल. तथापि वर्षाच्या मध्यासच तुमच्या योजना फलदायी होतील, हें विशेषत्वानें स्मरणांत ठेवावें.

प्रत्येक माणसाच्या जीवनांत चढउतार असतोच. तेव्हां ह्यापेक्षा विशेष महत्त्वाची लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे तुम्ही मीन–रवि व्यक्ति असल्यानें भावनाप्रधान असतां. प्रेम म्हणजे तुम्हांला जीवनसर्वस्व वाटतें तथापि १९६२–१९६८ या कालांत हर्षलचें कन्येंतून भ्रमण होत असतांना, व १९५७ ते १९७१ या कालांत प्लूटोचें कन्येंतून भ्रमण होत असतांना मित्र व सहकारी यांचें तुमच्याशीं तितकेंसें पटणार नसल्यामुळें जीवन ही फुलांची शय्या नाहीं याचें प्रत्यंतर येईल. जीवनांतील चढ-उतारांचे अनुभव मीन–रवि व्यक्तींना सर्वांत जास्त प्रमाणांत येतात. हे अनुभव आश्चर्य वाटावें इतके विविध असतात, असें ज्योतिर्विदांचें शास्त्रास अनुसरून मत बनलें आहे. आणि या चढउतारांचें मूळ तुमचा ज्यांच्याशीं संबंध येतो त्या मित्रांत वा सहकाऱ्यांत सांपडतें. तुमचा मोठा दुर्गुण म्हणजे " पलायनवादी " मनोवृत्ति ! आत्यंतिक स्वप्नाळू वृत्ति हा एक तुमचा अविभाज्य भाग ! ! शारीरिक अस्तित्वाचा तुम्हांला विसर पडतो तेव्हां तुम्हांला अननुभूत आनंद होतो, व तुम्ही गूढ अशा अवस्थेंत गुंग

होतां. जन्मतःच तुम्ही अध्यात्मवादी आहांत, म्हणून धर्मभोळेपणा तुमच्या अंगीं मुरलेला असतो. परंतु ईश्वराच्या चांगुलपणावर, कृपाळूपणावर तुमच्याइतकी अन्य कोणाचीच श्रद्धा नसते; कारण मीन हें मोक्षाचें चिन्ह असून, त्याची तुम्हांला अचूक माहिती असते.

मालमत्तेसंबंधीं अगर भागीदारीविषयीं ऑक्टोबर–नोव्हेंबर १९६८ मध्यें भांडणतंटा होण्याचा संभव आहे; व या वेळीं अनेक आघाड्यांवर अनेक संकटांशीं तुम्हांला झुंज द्यावी लागेल. या लढाईत तुमचे नातेवाईकच तुमच्यावर अयोग्य दडपण आणतील, व त्यामुळें 'डाव' तुमच्यावरच उलटेल. तुम्ही जर अतिशय दक्षतेनें वागलां नाहींत तर १९६८ मध्यें बेफाट खर्च होऊन तुमच्याजवळ फारच थोडी 'शिल्लक' राहील. आणि तुम्हीं दुर्लक्ष केलेंत तर परिस्थिति काबूंत ठेवण्यासाठीं तुम्हांला मित्रांच्याकडे याचना करण्याची पाळी येईल. तथापि एक वर्षभर जर भांडणतंटा टाळलात तर तुमचें नुकसान तितकेसें होणार नाहीं.

१९६९ च्या मध्यास तुमच्या धंद्यांत आश्चर्यकारक प्रगति व वाढ होईल. या वेळीं अकल्पित संधि प्राप्त होऊन, तुम्हीं खोऱ्यानें पैसा ओढूं शकाल. याच वेळीं तुमच्या कुटुंबातील एखाद्या स्त्रीची तुमच्यावर भलतीच मेहेरनजर होऊन ती तिची सर्व इस्टेट तुमच्या नांवें करून देईल. याची तुम्हांला कधींहि कल्पना नसेल. परंतु ही आयत्यावेळची मोठीच मदत ठरून तुम्हीं सर्व ऋणांतून कर्जमुक्त व्हाल. या मदतीच्या साहाय्यानें धंद्याचें क्षेत्र तुम्हांला व्यापक करतां येईल. धंद्यासाठीं म्हणून तुम्हांला दूरवरचा प्रवासहि घडेल, व तुमची प्रवासाची आत्यंतिक आवडहि पुरविली जाईल.

१९७० च्या सुरुवातीस तुमची सार्वत्रिक प्रगति होईल; व कांहीं वर्षांपूर्वी बहिणभावांना पोसणें ही फार मोठी जबाबदारी वाटत असेल, त्याऐवजीं आतां तेच तुम्हांला तुमच्या योजना प्रगतिपथावर नेण्याच्या दृष्टीनें मदत करणारे साहाय्यक ठरतील. अगदीं जवळच्या नातेवाइकांच्या जबाबदारीचा प्रश्न बाजूस ठेवाल तर तुम्हांला कांही महिने सुट्टी घेऊन दूरवर प्रवास करतां येईल, विश्रांति घेतां येईल. १९७० मध्यें

दूर राहणाऱ्या एखाद्या स्नेह्याचें कांही दिवस राहण्यासाठीं म्हणून बोलावणें येईल. त्याचा सहवास आनंददायक व लाभदायक ठरेल.

१९७० ते १९७७ च्या अखेरपर्यंत बहुतेक सर्वच क्षेत्रांत तुम्ही यशस्वी व्हाल, व प्रगति साधाल. विशेषत: १९७४–७५ सालीं यशोमंदिराचा कळस तुम्ही गांठाल. कीर्ति, पैसा, व धंद्याची वाढ या सर्व गोष्टी या कालांत तुमच्या चरणीं लोळण घेतील. १९७७ पर्यंत कशाचीहि चिंता करावी लागणार नसून, ह्या कालांत कोणत्याहि प्रकारचा त्रास न होतां उलट मित्रांच्याकडून मदत व सहकार्य मिळेल. तुम्ही सामाजिक सेवेंत मग्न असाल तर त्याचें योग्य तें चीज होऊन तुम्हांला मानसन्मान व बहुमानाची जागा मिळेल.

परंतु १९७८ ते १९८० च्या अखेरपर्यंत मात्र कांहीं प्रश्नांना तोंड देण्याची तयारी करावी लागेल. या अडचणीच्या मुळाशीं या वेळींहि तुमचे मित्रच असतील. जमेची बाजू उत्तम स्थितींत रहावी असें वाटत असेल तर अकारण खर्चाच्या अनेक बाबींना फांटा दिल्यास तुमच्यावर येणारें संकट टळेल. या संकटांतून तुम्ही एकदां बाहेर पडलांत कीं त्यापुढचा काल मात्र तुमचें जीवन खरोखरीच सुखी करणारा असाच आहे.

* * *

* * *







* * *

# तुमचें लग्न

स्त्री—पुरुषांच्यामधील संबंध हे शाश्वत स्वरूपाचे आहेत, ही गोष्ट वादातीत आहे. संस्कृति व सुधारणा यांच्या वाढीबरोबर ' लग्नाची पद्धत ' प्रचारांत आली. देशांतील व समाजांतील चालीरीतींच्या फेरफाराप्रमाणें लग्नाच्या प्रकारांतहि बदल दिसून येऊं लागले. याला इतरहि अनेक कारणें आहेतच. प्रत्येक देशांतील लग्नाची पद्धति ही दुसऱ्या देशांतील पद्धतीपेक्षां वेगळ्या स्वरूपाची असल्याचें आढळतें.

पृथ्वीच्या पाठीवर कोठें ना कोठें तरी दररोज एक तरी विवाहसमारंभ साजरा केला जात असेल. वैयक्तिक आवडीनुसार अथवा कोणाच्या तरी दडपणामुळें दोन व्यक्ति एकत्र येत असतील. प्रत्येक दिवशीं पृथ्वीच्या पाठी-वर एखाद्या तरी जोडप्याचें वैवाहिक जीवन संपुष्टांत येत असल्याचें आपणांस आढळून येईल. मग तें विरहामुळें असो, भाडणतंट्याभुळें असो, अथवा त्यापैकीं एकाच्या मृत्यूमुळें असो. जोंपर्यंत मृत्यूनें वैवाहिक जीवन संपुष्टांत येतें, तोंपर्यंच त्याच्या अपरिहार्यतेचें समर्थन करतां येतें, परंतु लग्न झालेल्या जोडप्यांतील असमाधान कमी व्हावें, भांडण कमी व्हावें, यासाठीं सामाजिक नीतिनियमहि प्रत्यहीं बदलत असतात. लग्न झालेल्यांना वैवाहिक जीवन शक्य तेवढ्या सुखानें व समाधानानें उपभोगतां यावें, यासाठीं समाज व अधिकारी व्यक्ति ह्या सामाजिक पद्धतीमध्यें योग्य ते बदल करण्याच्या बाबतींत नेहमींच तत्पर असतात.

भारतामध्यें प्रत्येक प्रांतांत विवाहाच्या चालीरीतींमध्यें व पद्धतीमध्यें फरक आहे. ठिकठिकाणीं विवाहपद्धतींत वैशिष्टय व वेगळेपणा जाणवतो. जातींतील भेदानुसार विवाहपद्धतीहि बदलते. परंतु अगदीं अलीकडच्या कालांत, लोकनियुक्त सरकार आल्यापासून, या लोकनियुक्त सभासदांनीं लग्नाच्या पद्धतींत व चालीरीनींत फरक व सुधारणा व्हाव्यात या दृष्टीनें हालचाली सु केल्या आहेत.

विवाह केलेल्यांना त्रास व दुःख कमी भोगावें लागून त्यांचें जीवन

सुखी व्हावें, हाच त्यामागचा उद्देश आहे. अद्यापहि आपल्या देशाच्या कांहीं भागांत जोडीदार निवडण्याची जबाबदारी पालक मंडळीवर असते. कांहीं आईबाप " माझ्या मुलानें मीं निवडलेल्या मुलीबरोबर लग्न केलें पाहिजे " असें म्हणतांना आढळतात. मुलांना वा मुलींना अशा तऱ्हेनें स्वतःचा जीवन-साथी निवडण्याची संधि मिळत नसून, वडीलधाऱ्या मंडळींनीं निवडलेल्या जोडीदाराच्या गळ्यांत ' माळ ' घालावी लागते. थोडक्यांत, या पद्धतींत महत्त्वाची व्यक्ति म्हणजे पालक होय.

परंतु आतां ही पद्धत हळूहळू पण निश्चितपणें बदलूं लागली आहे. आणि आपलें जीवन घडविणें अथवा बिघडविणें हें आपल्याच हातीं असतें, याचा उमज मुला–मुलींना पडूं लागलेला आहे. आपला जीवनसाथी निवड-ण्याचा हक्क आपलाच आहे, याची जाणीव झाल्यानें आपला जीवनसाथी निवडण्यास ही तरुण मंडळी बाहेर पडतात, व आपल्याला अनुरूप व योग्य जोडीदार निवडतात. अशा रीतीनें दोघांनीं मिळून संसार–रथ हांकावा व भावी आयुष्य सुखी करावें असाच त्यांचा हेतु असतो. सुशिक्षितांच्या संख्येंत वाढ होऊं लागल्यापासून, आईवडिलांनीं, ' हुकूम ' करण्याचा पूर्वा-पार ' अधिकार ' गेलेला आहे हें ओळखलें आहे.

विवाहानें एकत्र येण्यांतला मुख्य उद्देश म्हणजे सुखी व प्रगतीचें जीवन जगण्याची इच्छा ! अर्थात् लग्न करण्यापेक्षां अविवाहित राहण्यानेंच आपण सुखी होऊं अशा मताचेहि कांहीं लोक असतात. सुखाचे अनेक भाग व प्रकार पाडतां येतील. द्रव्याचा संबंध असल्यास ज्योतिषशास्त्रांतील एका विशिष्ट विभागाचा आधार घ्यावा लागतो. परंतु सध्याच्या पुढारलेल्या जगांत व सुधारणेच्या युगांत अत्यंत महत्त्वाची बाब म्हणजे मानसिक ऐक्य, व पति–पत्नींचे जीवन सुखी होण्याच्या दृष्टीनें दोघांच्या दृष्टिकोनांत एक-वाक्यता व एकात्मता असण्याची जरुरी हा ऐक्यपूर्ण दृष्टिकोन ज्योति-र्विदांना समजूं शकतो, व कोणत्या ग्रहांच्या वर्चस्वाखालील कोणती व्यक्ति ध्येय व कल्पना, हेतु व महत्त्वाकांक्षा यांच्या बाबतींत तुमच्याशीं 'समरस' होऊं शकेल हें ज्योतिर्विद समजावून सांगूं शकतात. राशीमध्यें मित्रत्व अथवा शत्रुत्व असण्यामुळें कधीं कधीं जीवनविषयक दृष्टिकोनांतहि खूप

भिन्न प्रकार आढळतात. या पुढारलेल्या युगांत स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीचें स्थान प्राप्त होत आहे, व कायद्यानें आणि समाजानें त्यांस मान्यता




दिलेली आहे ही गोष्ट लक्षांत घेतां, ज्याच्याशीं एखाद्या स्त्रीचा पूर्वपरिचय नाहीं, त्याच्याशीं तिचें केवळ लग्न 'लावलें' आहे म्हणून तिनें तोंड दाबून बुक्कयांचा मार सहन करावा असें आपण म्हणूं शकत नाहीं. त्या व्यक्तीच्या मन:प्रवृत्तीची वा आवडीनिवडीची खरी माहिती आधीं नसल्यानें प्रथम दर्शनीं प्रेमांतून निर्माण झालेल्या विवाहांना व तो करणाऱ्या जोडप्यांना उत्तरार्धांत पश्चात्ताप करण्याची पाळी येते.

मानवयुगाच्या दिशेनें आपण प्रगति करीत असल्यानें लग्नविषयक कल्पनाहि हळूहळू बदलत आहेत व नवीन स्वरूप धारण करीत आहेत. पत्नी ही यापुढें दासी समजली जाणार नाहीं. अथवा पति हा रक्षणकर्ता असतो एवढीच भूमिका राहणार नाहीं. उलट राज्य–सरकारच या बाबतींत सर्वश्रेष्ठ राहणार आहे. लोकसत्तात्मक भारताच्या पत्रिकेचें निरीक्षण केलें असतां त्यांतील उच्चीचा चंद्र पाहतां, भारत सरकार लग्नाच्या बाबतींतले जुने कायदे व स्त्रियांचें स्थान यांत बराच बदल निश्चितपणें करील, याविषयीं संदेह बाळगण्याचें कारण नाही.

सध्याच्या जगांतील लोकांच्या कल्पना १९ व्या शतकांतील लोकांच्या कल्पनांशींहि जुळणाऱ्या नाहींत. आजच्या जोडप्याला ज्योतिषशास्त्रांतील जुन्या ग्रंथांतील कायदे लागूं करून त्यांची निवड करणें चुकीचें ठरेल. शारीरिकदृष्टया मानवांत फारसा फरक झाला नसला, तरी माणसाच्या मनांत, विचारांत व विचारपद्धतींत आमूलाग्रबदल झालेले आहेत. वैवाहिक बंधन सुखाचें व्हावें म्हणून समानधर्मीय, वा एक प्रकारच्या स्वभावानें युक्त व्यक्तीची आपण निवड करतों. आणि जीवन सुखी होण्यासाठीं या गोष्टी समजाव्यात, यासाठीं भांडणतंटयाचे प्रसंग कमी होऊन काडीमोड घेण्याचा कटु प्रसंग टळावा म्हणून मार्गदर्शन करणारे तरी कोण आहेत? यासाठीच आजच्या ज्योतिर्विदांना नवीन सिद्धांत प्रस्थापित करून त्यायोगें लग्नाचा जोडीदार ठरविणें सुलभ जावें, यासाठीं परिश्रम घ्यावे लागत आहेत. योग्य जोडी जमावी यासाठीं मुलगा व मुलगी यांच्या पत्रिका जुळतात कीं नाहीं हें पाहणें अत्यंत उपयुक्त असतें, हें नाकारण्यांत अर्थ नाहीं.

लग्नाचा जोडीदार निवडण्याचा बिनधोक व सोपा मार्ग सांगणें एवढाच हा लेख लिहिण्याचा उद्देश आहे; यासाठीं दोघांचेहि विचार, कल्पना, व ध्येयें यांची माहिती असणें जरूर असून, त्या दोघांचेहि दीर्घकाल 'एकमत' होईल किंवा नाहीं, का त्यांचें प्रेमाचें स्वप्न थोडयांच दिवसांत विरेल याचा निर्णय देतां आला पाहिजे.

यासाठीं या "संबंधांचें" आपण वर्गीकरण केलें पाहिजे. कांहीं जण तुमचे फक्त 'चांगले मित्र' होऊं शकतात. कांहींच्याविषयीं तुम्हांला

याच्यावर " फक्त प्रेम करावें " असें वाटतें. तर इतर कांहींच्या बाबतींत तुम्ही प्रेमहि करूं शकतां; व तेंहि भांडण तंटा न करतां, दुमत न होतां ! ! चांगला मित्र व चांगला प्रियकर यांतील फरक ओळखण्यासाठीं ग्रहयोगां-मधील फरक लक्षांत घेतले पाहिजेत. त्याचबरोबर ज्याच्याबरोबर जीवन व्यतीत करावयाचें आहे त्याची निवड करण्यासाठीं कोणता ग्रहयोग उपयोगी पडेल हेंहि पाहिलें पाहिजे. म्हणूनच ज्यांच्या मनोधर्मांत साधर्म्य असेल असे लोक निवडण्याची गुरुकिल्ली शोधणें जरुरीचें ठरतें. अर्थात् संपूर्ण साधर्म्य असणाऱ्या दोन व्यक्ति या पृथ्वीतलावर सांपडणें अशक्य असलें तरी जास्तींत जास्त साम्य असणाऱ्या दोन व्यक्तींना विवाह करण्याचा सल्ला देऊन त्यांचें वैवाहिक जीवन सुखी करण्याचा प्रयत्न केला पाहिजें. लग्न म्हटलें कीं प्रेम, जबाबदारीची जाणीव, व इतर अनेक बाबी विचारांत घ्याव्या लागतात.

जन्मपत्रिका उपलब्ध नसतील तर एकाच महिन्यांत जन्मलेल्या व्यक्तींत बरेचसें साम्य असतें, असें आम्हास निरीक्षणावरून व अनुभवावरून आढळून आलें आहे. लग्नाच्या दृष्टीनें तरी एकाच महिन्यांत जन्म-लेल्या मुलां–मुलींच्या राशींत रवि एकच असल्यानें, ती गोष्ट आदर्श समजतां येईल. या लेखांत प्रथमश्रेणीच्या विवाहासंबंधांचीच मी चर्चा करीत आहें; व त्यासाठीं जन्म–तारखाच अधिक पसंत केलेल्या आहेत. खालीं दिलेल्या यादीला अनुसरून जर विवाहसंबंध घडून येत असेल तर जोडप्याचें एकमत होऊन जीवन सुखी होईल याविषयीं निश्चित रहावें. मी भिन्न तऱ्हेच्या जोडीदारांची अथवा द्वितीय दर्जाच्या विवाहासंबंधाची चर्चा येथें करीत नाहीं.

या वर्गीकरणाच्या पद्धतीमुळें ( राफाइलच्या बरोबर सहमत होऊन ) इतर सनातनी ज्योतिर्विदांच्यापेक्षां भिन्न मार्ग अनुसरीत आहे, हें मान्य करणें भाग आहे. याचें कारण अतिवेगानें बदलत जाणाऱ्या सामाजिक वा आर्थिक परिस्थितीचें चित्र डोळ्यांपुढें तरळत आहे, व जुन्या सिद्धांताचा या परिस्थितींत उपयोग कमी वाटतो. जोडीदार निवडण्याच्या कामीं त्यांना या लेखाचा फार मोठा उपयोग होईल; एवढेंच नव्हे तर अधिकाअधिक सुखी

होणें आणि लग्नानंतर भरभराट व प्रगति करून घेणें हा लग्न करण्यामधील जो जीवन हेतु असतो, तोहि त्यांना साध्य करून घेतां येईल. ही पद्धत इंग्लिश जन्म तारखेवर आधारलेली असून मुलें व मुली या दोहोंनाहि उपयोगी आहे. रवीची रास कोणती, हें "आपली राशि कोणती ?" या लेखावरून तुम्हांस कळून येईलच. अर्थात् येथें सर्वसामान्य सिद्धांत देत आहे, अचूक निर्णय मात्र वैयक्तिक पत्रिकेवरूनच स्पष्टपणें देतां येईल; व त्यांतहि यांतली माहिती मिळवावीच लागेल हें सांगणें नको.

## मेष–रवि व्यक्ति

( मार्च २२ ते एप्रिल २० च्या दरम्यान जन्मलेले लोक )

रवि मेष राशींत असतांना तुमचा जन्म झाला असल्यानें तुम्ही प्रेमळ अंतःकरणाचे, उत्कट मनोवृत्तीचे असून, जीवनाला धैर्यानें तोंड देणारे आहांत. तुम्हीं स्वतः पुरेपूर प्रेमी वृत्तीचे असल्यानें आपल्या जीवनसाथीनें आपलें प्रेम आपणहून व्यक्त करावें, व तुमच्या उत्कट प्रेमाला तितक्याच उत्कटतेनें साथ द्यावी, अशी तुमची इच्छा असते. तुम्हाला जर आपला स्वभाव वर वर्णन केल्याप्रमाणें आहे, असें वाटत असेल तर तुम्हांला अनुरूप व तुमचें वैवाहिक जीवन सुखी करणारी व्यक्ति म्हणजे "धनु–रवि व्यक्ति" होय.

## वृषभ–रवि व्यक्ति

( एप्रिल २१ ते मे २१ च्या दरम्यान जन्मलेले लोक )

रवि वृषभ राशींत असतांना तुमचा जन्म झाला असल्यानें "अनेक प्रेम-प्रकरणां"वर तुमचा विश्वास नसतो. तुम्ही एकाच व्यक्तीवर प्रेम करतां व तिच्याशीं एकनिष्ठ राहतां. याच कारणास्तव तुमच्या जोडीदाराकडून एकनिष्ठता व प्रेमसर्वस्व मिळण्याची तुम्हीं अपेक्षा धरतां. तुम्ही किती निश्चयी व खंबीर आहांत हें मी सांगायला पाहिजे असें नाहीं. तुम्हीं एकदां निश्चय केलांत कीं कोणत्याहि परिस्थितींत त्यालाच चिकटून राहतां, हें फारच थोड्या लोकांना माहीत असतें. तुमच्या जीवनविषयक कल्पनां व ध्येय यांचा विचार केला असतां, तुमच्या भावना व विचार ओळखून त्याच्याशीं समरस होणारी, तुम्हांला सुखी करणारी, व तुमचें समाधान करणारी व्यक्ति म्हणजे "मकर–रवि" व्यक्ति होय !

## मिथुन–रवि व्यक्ति

( मे २२ ते जून २१ च्या दरम्यान जन्मलेले लोक )

तुम्ही अति उत्साही व वैचित्र्याचे अतिशय भोक्ते आहांत. प्रसंग घडतांक्षणींच त्याचा आनंद तुम्हांला मिळतो. दीर्घकालीन योजना आंखण्याचा विचार तुम्हीं क्वचितच करतां. एकाच गोष्टीला जन्मभर चिकटून रहाणें तुम्हांला जड जातें; कारण तुम्हांला रुचिपालट आवडतो व तुम्हीं तसे वागतां. अशा अतिशय गुंतागुंतीच्या स्वभावाशीं जुळवून घेऊन तुम्हांला आदर्श वाटणारा भागीदार म्हणजे " कुंभ–रवि व्यक्ति " होत.

## कर्क–रवि व्यक्ति

( जून २२ ते जुलै २३ च्या दरम्यान जन्मलेले लोक )

कर्केत रवि असतांना तुमचा जन्म झाला असल्यानें, साध्या व सरळ मार्गानें जीवन व्यतीत करणें, व येईल त्या परिस्थितीशीं जुळवून घेणें, त्याचप्रमाणें कशाहि लोकांच्याबरोबर तात्पुरतें जुळवून घेणें तुम्हांला साधतें. म्हणूनच ' प्रेम ' मिळविणें व तें दाखविण्यांत आनंद मानणें, हें तुमच्या बाबतींत नैसर्गिक आहे. परंतु जीवनांतील जोडीदाराची निवड करतांना व सुखी जीवनाची रूपरेषा आंखतांना, " कन्या–रवि " व्यक्तीच तुम्हांला आदर्श, अनुरूप व अत्युत्कृष्ट आहे असें आढळून येईल.

## सिंह–रवि व्यक्ति

( जुलै २४ ते ऑगस्ट २३ च्या दरम्यान जन्मलेले लोक )

धनाधिपतीनें निर्देशित केली जाणारी ' सिंह ' ही बादशाही व सर्वश्रेष्ठ राशि असून ती भव्य, रुबाबदार व ' दिखाऊ ' आहे. तुम्हीं आदर व प्रेम यांना जीवनांत स्थान देत नाहीं असें म्हणणें चुकीचें ठरेल; आणि जर तुम्हांला तुमच्या ध्येयाप्रमाणें योग्य अशी प्रेम करणारी व्यक्ति आढळली तर तुम्ही त्या व्यक्तीला कधींहि अंतर देणार नाहीं. अंतःकरण व मन सामर्थ्यशाली असल्यानें तुम्ही इतरांपेक्षां उच्च श्रेणींतील लोक आहांत. परंतु जर दुसरी व्यक्ति लाजाळू व भित्री असेल तर तुम्हांला तें फार काळ सहन होणार नाहीं. याच कारणास्तव तुमचें वैवाहिक जीवन सुखी करूं शकेल व तुम्हांला जन्मभर आनंदी ठेवूं शकेल अशी एकच व्यक्ति म्हणजे " वृश्चिक–रवि " व्यक्ति होय.

## कन्या—रवि व्यक्ति

( ऑगस्ट २४ ते सप्टेंबर २३ च्या दरम्यान जन्मलेले लोक )

तुमच्या स्वभावाची व गुणांची परीक्षा फारच थोड्या लोकांना अचूकपणें करतां येते. उलट बहुतेक वेळां तुमच्याविषयीं लोकांचे गैरसमज होतात. तुम्ही सावधगिरीनें वागणारे व गंभीर वृत्तीचे आहांत; परंतु त्रासदायक निश्चित नाहीं हें वरवर पाहणाऱ्यांच्या लक्षांत येत नाहीं. ज्योतिषशास्त्राचा असा विश्वास आहे कीं, प्रेमाच्या बाबतींत तुम्ही सावध असतां. आयुष्याचा जोडीदार निवडतांना तो प्रेमाचा किंवा विश्वासाचा घात करणार नाहीं, याची निश्चिति करून घेतल्याशिवाय तुम्ही पुढें पाऊल टाकीत नाहीं. म्हणून विचार करून ' सत्य ' शोधण्यांत तुम्हीं बराच वेळ घालवितां व मगच तुमचा जोडीदार निवडतां. तुम्ही तुमच्या जोडीदाराचें स्वतःच्या मनाप्रमाणें संरक्षण करीत असलां तरी त्याला आपला आश्रित न समजतां सहचर मानतां. अशा मनोवृत्तीचे असल्यामुळें तुम्हीं " कर्क—रवि " व्यक्तीचीच जीवनांतील जोडीदार म्हणून निवड करावी म्हणजे तुमचें वैवाहिक जीवन सुखाचें होईल.

## तूळ—रवि व्यक्ति

( सप्टेंबर २४ ते ऑक्टोबर २३ च्या दरम्यान जन्मलेले लोक )

ही एकच राशि अशी आहे कीं जीमधील पुरुष व स्त्री यांचे दृष्टिकोण निराळे असतात. तूळ—रवि स्त्रीचा जीवनविषयक जो दृष्टिकोण असेल, जीं मतें असतील, तीं तूळ—रवि पुरुषाचीं असणार नाहींत. तथापि तुम्हीं जर तूळ—रवि असाल तर निश्चितपणें लोकप्रिय असाल. तुम्हांला कलेची आत्यंतिक आवड असते. तुम्ही उत्कट प्रेमी असतां; व प्रेम ही जगांतली सर्वांत महत्त्वाची बाब आहे, असा तुमचा दृढ विश्वास असतो. तुम्ही जर पुरुष असाल तर तुम्ही चांगलेच मनमिळाऊ असून आदर्श मित्र ठरूं शकतां. " मीन—रवि " स्त्री ही तुमची आदर्श जोडीदार ठरूं शकेल, व तुमचें जीवन सुखी होईल.

## वृश्चिक—रवि व्यक्ति

( ऑक्टोबर २४ ते नोव्हेंबर २२ च्या दरम्यान जन्मलेले लोक )

तुम्ही स्त्री असा वा पुरुष असा, तुम्ही धैर्यवान, धाडसी, जबाबदार

व्यक्ति आहांत. ध्येयवादी व समजूतदार मनोवृत्तीचे असल्यानें, जो तुमच्या धाडसी व स्वतंत्र कृतींचें व मनोवृत्तीचें कौतुक करील असाच जोडीदार तुम्हांला आवडेल. त्या दृष्टीनें " सिंह–रवि " व्यक्ति तुमचा आदर्श जोडीदार आहे.

## धनु–रवि व्यक्ति

( नोव्हेंबर २३ ते डिसेंबर २१ च्या दरम्यान जन्मलेले लोक )

ज्योतिषशास्त्रीय श्रद्धा अशी आहे कीं, ' धनु–रवि ' स्त्री ही आदर्श पत्नि असून, उत्कृष्ट स्फूर्तिदात्री आहे. अर्थात् धनु–रवि पुरुषहि आदर्श पति असतो. कारण, धनु–रवि स्त्री वा पुरुष हे दोघेहि खिलाडु मनोवृत्तीचे असून, प्राणिमात्रावर प्रेम करणारे व परोपकारी वृत्तीचे असतात. सहनशीलता व सहानुभूतीनें वागणें हे तुमचे गुणधर्म असून तुम्ही साहस. प्रियहि आहांत. या गोष्टीशीं समरस होऊं शकणारा जोडीदारच तुम्हांला पसंत पडेल. या गोष्टीबरोबरच तुमची स्वातंत्र्यप्रियता उज्वल असल्यानें, या तुमच्या स्वभावाचें आकलन करून तुमचें वैवाहिक जीवन सुखी करणारा जोडीदार म्हणजेच " मेष–रवि " व्यक्ति होय.

## मकर–रवि व्यक्ति

( डिसेंबर २२ ते जानेवारी १९ च्या दरम्यान जन्मलेले लोक )

तुमचा दृष्टिकोण धंदेवाईक व व्यवहारीपणाचा असूनहि तुम्हीं एक-निष्ठ असतां, आणि जीवनांतील सौंदर्य नि कला यांच्याविषयीं तुम्हांला आकर्षण वाटत असतें. तुम्ही महत्त्वाकांक्षी असल्यानें, ती पुरी करण्याच्या दृष्टीनें मदत करूं शकणारी व्यक्तीच तुमचा अनुरूप जीवनसाथी ठरेल, व तोच तुम्हांला सुखी करूं शकेल. प्रस्थापित चालीरीतींविषयीं तुम्हांला मोठाच आदर वाटतो, व अशा प्रकारचा दृष्टिकोण असलेला जोडीदार तुम्हांला अधिक प्रिय वाटेल. आणि म्हणूनच तुमचें वैवाहिक जीवन सुखी करण्याचें सामर्थ्य फक्त " वृषभ–रवि " जोडीदारांजवळच आहे.

## कुंभ–रवि व्यक्ति

( जानेवारी २० ते फेब्रुवारी १८ च्या दरम्यान जन्मलेले लोक )

दुसऱ्याशीं अगदीं सुलभतेनें जूळवून घेण्याचा व समतोलत्व राखण्याची आवड असण्याचा तुमचा स्वभाव आहे. तुमच्यामध्यें मानव-

युगाच्या कल्पनांचें प्रातिनिधिकत्वानें दर्शन होतें. आणि तुम्ही इतरांचा ' जगण्याचा हक्क ' मान्य करायला नेहमींच तयार असतां. तुम्ही स्वतःच्या स्वातंत्र्याचे भोक्ते आहांत, आणि तुमच्यावर प्रभुत्व गाजविण्याचा किंवा आपलेसे करण्याचा प्रयत्न करणाऱ्यापुढें तुम्हीं एखाद्या बुजऱ्या वा भित्र्या घोड्याप्रमाणें लाजाळू बनतां. उत्साही असल्यानें व जीवनांत स्वतःच्या मार्गानें जाण्याची तुमची तीव्रतम इच्छा असल्यानें, तुमचा जन्माचा जोडीदार हा सुसंस्कृत, बुद्धिमान व शांतताप्रिय असावा, अशी तुमची इच्छा असते. आणि मित्र वा मैत्रीण या नात्यापेक्षां तुमचा जोडीदार या नात्यानें तुमचें जीवन सुखी करूं शकणारी व्यक्ति म्हणजे " मिथुन–रवि " व्यक्ति होय.

## मीन–रवि व्यक्ति

( फेब्रुवारी १९ ते मार्च २१ च्या दरम्यान जन्मलेले लोक )

कांहीं तरी वरवरच्या दिखाऊपणावर, उच्चतम ध्येयवादावर, व स्वप्नाळू वृत्तीवर तुमचें फार प्रेम असतें. कांहीं वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या समाजाचे तुम्हीं उत्कृष्ट प्रतिनिधि आहांत. तथापि या शतकांतहि तुम्हांला तुमचें आदरणीय स्थान मिळतच आहे; आणि अचूक व्यक्ति निवडण्याच्या व योग्य निर्णय देण्याच्या कलेमुळें आजहि तुमच्या मतांना मान देणारे अनुयायी तुम्ही जमवूं शकतां. तुमच्या बाबतींत अंतःकरणच बुद्धिमत्तेवर अधिराज्य गाजवितें. आणि या गोष्टी लक्षांत घेतां तुमच्या स्वभावाशीं जुळणारी व तुमची जीवनसाथी होण्यास आदर्शभूत ठरणारी व्यक्ति म्हणजे " तूळ–रवि " व्यक्ति होय ! तथापि मीन–रवि व्यक्ति व विशेषतः मीन–रवि पुरुष लग्नाच्या बाबतींत क्वचितच सुखी आढळतात, असें ज्योतिषशास्त्राचें पुरातन मत आहे.

* * *



**वर्तमान पत्रांत,–**

# तें आव्हान– आणि महापूर

दोन वर्षांपूर्वी माझ्या प्रथम पुस्तकांत (The 1953) आणि पुन्हां गेल्या वर्षी प्रसिद्ध झालेल्या 'आगामी काल' या पुस्तकांत दोन ठिकाणीं ( पृष्ठ. ५० आणि ८४ ) १९५४ सालच्या मध्यास भारत, पाकिस्तान व इतर कांहीं ठिकाणीं म्हणजे तूळ रेषेवरील आणि तूळ राशींतील देशांत भयंकर महापूर येणार आहेत अशी सूचना दिली होती. लोक सावध व्हावेत म्हणून तीच भविष्यवाणी विस्तारानें ७ मार्च १९५४ रोजीं दैनिक 'नवशक्ति' दैनिक 'लोकशक्ति' आणि कांहीं दिवसानंतर दैनिक 'सत्यवादी', दैनिक 'प्रभात' आणि मासिक "ज्योतिर्विज्ञान" या वर्तमानपत्रांतील लेखांत पुन्हां प्रसिद्ध केली होती. त्या सर्व प्रसिद्ध झालेल्या लेखांतील कांहीं भाग मी येथें पुन्हा देत आहें.

दैनिक लोकशक्ति

ज्योतिषशास्त्राच्या टीकाकारांना आव्हान !
भारत-पाकिस्तानात यंदा पुनश्च पूर येणार !!

पुराचें भाकित खोटें ठरल्यास
ज्योतिषशास्त्र सोडण्यास मी तयार आहे

" जुलै १९५४ मध्यें नेपच्यून व हर्षलचा केंद्रयोग घडत असल्यामुळें पूर्व एशिया, आसाम, बिहार व बंगाल म्हणजे पूर्वभारतांत पूर येतील. १९५४ मध्यें येणाऱ्या पुरामुळें जनतेला त्रास होऊं नये म्हणून सरकारनें आधींपासून त्याचा बंदोबस्त करावा अशी माझी भारत सरकारला विनंति-पूर्वक सूचना आहे.... १९५४ मध्यें भारत व पाकिस्तान ( बंगाल )मध्यें आपणाला महापूर पहावे लागतील, आणि निसर्गाच्या प्रकोपापासून बचाव

व्हावा म्हणून कांहीं तरी कायमच्या योजना पुढें आंखणें सरकारला १९५४ च्या महापुरामुळें भाग पडेल....पुरामुळें आसाम, बंगाल, बिहार, उत्तर प्रदेश यांतील कांहीं भागांत म्हणजेच भारत व पाकिस्तानांत पुष्कळशी हानि होईल....या महापुरानें, मुसळधार पावसानें शेंकडों एकर जमिनींत पाणीच पाणी होईल. असंख्य लोकांना निराधार व्हावें लागेल व कांहीं ठिकाणीं पिकें नष्ट होतील. या विभागांतील दळणवळणाच्या साधनांत व्यत्यय निर्माण होईल व सरकार आणि दयाळू अंतःकरणाच्या नागरिकांना आपद्ग्रस्तांना सहाय्य करावें लागेल...." महाकेंद्र योगाचें फल जून, जुलै आणि ऑगस्टपर्यंत टिकणार आहे.

ज्योतिषशास्त्राधारें केलेलें हें आगामी पुरासंबंधींचें भविष्य जर खोटें ठरलें तर मी हें ज्योतिषशास्त्र अध्ययन सोडून देण्यास तयार आहें ( ठसा याच पुस्तकांत पृष्ठ १९३ वर पहा )......माझें हें आव्हान फक्त पुराबाबत आहे......पूर येणार, हें माझें पैजेवर आव्हान आहे............"

मी आपल्यापुढें 'टाइम्स ऑफ इंडिया' या वर्तमानपत्राच्या दि. ३० ऑगस्ट १९५४ रोजीं प्रसिद्ध झालेल्या अंकाच्या पहिल्या पानांवर दिलेल्या बातमीचा ठसा येथें पुनरुधृत् करीत आहें. कित्येक ठसे यापूर्वीच्या पाना-वरहि देण्यांत आलेले आहेत.

प्रेस ट्रस्टच्या बातमीनुसार ३ सप्टेंबर रोजीं भारतीय केंद्रीय मंत्रि-मंडळांतील योजनामंत्रि श्री. गुलझारीलाल नंदा लोकसभेंत असें म्हणाले कीं, "या वर्षीं भारतांत बिहार, बंगाल, आसाम, आणि उत्तर प्रदेशांत महापुरामुळें आतांपर्यंत २४७ लोकांनीं प्राण गमावले. एकंदरींत २५,६५० चौरस मैल जमीन आणि ९५ लाख लोक महापुरांत सांपडले आहेत. ७,७०० च्या वर जनावरें नाहींशीं झालीं आहेत. सुमारें १३६ लाख एकर जमिनींतील पिकांचें नुकसान झालें आहे,—ज्याची किंमत अदमासें ४० कोटी रुपये असेल. फार मोठ्या प्रमाणावर घरादारांचीहि हानि झाली आहे. याखेरीज पुष्कळशीं नदी-नाल्यालगतची शेतीची जमीन वाहून गेली आहे." श्री. नंदा पुढें म्हणाले कीं, "रस्ते रेलमार्ग (लोहमार्ग) आणि पूल यांचेंहि फार नुकसान झालें; आणि त्यामुळें पूर्वीं केंव्हाहि झाले नाहींत

इतके वहातुकीच्या मार्गांत अडथळे उपस्थित झाले. महापूर यापूर्वींहि आले होते, परंतु इतक्या भयंकर आणि इतक्या अधिक प्रमाणावर केव्हांहि आले नाहींत." भाषणाच्या शेवटीं योजनामंत्रि म्हणाले कीं, "सरकार आणि जनता या दोघांनींहि या संकटाशीं सामना करावा व देशाला या महापुराच्या संकटांतून मुक्त करावें."

नवशक्ति

कॉलरा

क्लोरोज

आसाम-बिहारवर ब्रह्मपुत्रा : कोशीचा कोप

१० लाख लोकांवर भीषण आपत्ति

हजार चौरस मैलांत पाणी

मुक्ति संग्रामाला प्रारंभ

इ. स. १९५४ च्या जूनच्या मध्यापासून ते ऑगस्ट अखेरपर्यंतच्या वर्तमानपत्रांत आपणाला असें आढळतें कीं, या वर्षाच्या सुरवातीस सिलोन आणि मलबारमध्यें थोडासा पूर आला होता. त्यानंतर पश्चिम पाकिस्तान-मध्यें एका नदीस महापूर आला आणि त्यांत कांहीं प्राणहानि झाली. युरोपमध्यें ऑस्ट्रेलियांत डॅन्यूब नदीस महापूर आल्यानें लोकांची व माल-मत्तेची फार हानि झाली. पश्चिम बंगालप्रमाणें पूर्वबंगालांत (पाकिस्तान) महापुराचें फार नुकसान झालें. सप्टेंबर ११ रोजीं पाकिस्तान सरकारचे व्यापारमंत्रि जनाब तफजलअल्ली कराचींत म्हणाले कीं, "पूर्वबंगालच्या पुरामुळें १० लक्ष गांठ इतका ज्यूट (Jute) म्हणजे ५० लाख मण ज्यूटची हानि झाली आहे. नेपाळ व भूतानमध्यें पुरामुळें पुष्कळ नुकसान झालें. लोकांना आश्चर्य करण्यासारखी गोष्ट अशी कीं, तिबेटमध्येंहि महापूर आला आणि शेकडों लोक प्राणास मुकले. इतकेंच काय पण त्यांत भारतीय सैनिकांच्या तुकडीतील कांहीं लोक सांपडले. चीनमध्यें महापुरामुळें

२५ लाख एकर जमीन पाण्याखाली बुडाली असून ८ कोटी लोक निराश्रित झाले. स्थलाभावीं जून मध्यापासून, ऑगस्ट अखेरपर्यंतच्या बातम्यांचा थोडक्यांत सारांश येथें दिला आहे.




**The Times of India**

NO 241 VOL. CXVI — BOMBAY: MONDAY, AUGUST 30, 1954 — 2½ ANNAS

**FLOOD DISASTER ON SCALE NOT EXPERIENCED BEFORE**

**50,000 Sq. Miles Submerged In North India, Nepal & E. Bengal**

**NEW PROBLEMS OF RELIEF AND REHABILITATION**

"The Times of India" News Service

NEW DELHI, August

The floods in north-east India, Nepal and East Pakistan have submerged an area of about 50,000 square miles. Such a disaster has never before been experienced in the sub-continent.

**BIHAR RIVERS RISING STILL**

**Many Villages Under Water**

**NEED FOR AID IS URGENT**

**FLOOD RELIEF DRIVE IN BOMBAY**



**Committees For Ministries**

**MEMBERS FROM ALL PARTIES**

**Volunteers Collect Over Rs. 5,000 For Flood Relief**

**SPONTANEOUS CONTRIBUTIONS BY GENEROUS CITIZENS**

By A Staff Reporter

**Debate Today On**

## संपादकीय

पुण्याहून प्रसिद्ध होत असलेलें महाराष्ट्राचें काँग्रेसपक्षीय एक प्रमुख दैनिक पत्र "लोकशक्ति" याच्या २९ ऑगस्ट १९५४ च्या अग्रलेखांत संपादकांनीं खालील विचार प्रकट केले आहेत; "या महापुराच्या वार्ता ऐकतांना गेल्या मार्चमध्यें 'लोकशक्ति'च्या स्तंभांतून श्री. इंदुमती पंडित यांनीं वर्तविलेल्या भविष्याची आठवण झाल्याविना रहात नाहीं. त्यांनी एका नव्या ग्रहाचे भ्रमणावर आधारलेलें असें हें भविष्य वर्तविलें होतें आणि आत्मविश्वासानें असे आव्हान दिलें होतें कीं, हें खोटें ठरेल तर आम्हांस कळवावें. (मीं तसे झाल्यास ज्योतिष सोडून देण्यास तयार आहें.) ज्योतिषशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या मंडळींपैकीं जाणत्या व पोक्त मंडळींनीं, शास्त्रज्ञानें अशा तऱ्हेचें आव्हान कधीं देऊं नये, असेंहि सुचविलें व त्या अर्थाचें एक पत्र 'लोकशक्ती'तच प्रसिद्ध झालें होतें.

परंतु आज महापुराच्या ज्या बातम्या गेला महिना–दीड महिना आपण ऐकतो त्या पाहतां श्री. पंडित यांचें भविष्य म्हणजे पाहावें नि सांगावें अशा स्वरूपाचें दिनेश्वरी भविष्य नाहीं; तर ग्रहांच्या भ्रमणांचा खोल अभ्यास करून त्यांचे त्यांनीं निष्कर्ष काढलेलें आहेत. आणि त्या आव्हान देतात याचा अर्थ त्यांना आपल्या भविष्याचा दर्प आलेला नाहीं, तर आपल्या अभ्यासाच्या निष्कर्षाबद्दल तेवढा आत्मविश्वास निर्माण झालेला आहे, आणि तो त्यांनीं वृत्तपत्रांतून मांडला. अनेक वाचक त्या आव्हानाकडे कुतूहलानें पहात होते. गेल्या महिनाभरांतील घटनांनीं त्यांचा विश्वास रास्त ठरला एवढे तरी खात्रीनें म्हणतां येईल. ग्रहांचें भ्रमण हें एक शास्त्र आहे एवढें सिद्ध करण्याइतके पडताळे या भविष्याचे मिळाले आहेत हें नमूद करून, श्री. इंदुमती पंडित यांचें या क्षेत्रांतील यशाबद्दल अभिनंदन करण्यास हरकत नाहीं."

इंडस्ट्रियल अँड प्रुडेन्शिअल ॲश्युरन्स कं. लि.

लोकमान्य

आ क र्ष क यो ज

पुणें व नासिक येथें भीषण महापुरानें उडविलेला अन

पत्रकारांनीं पाक पंतप्रधानांना घायरें करून निरोप घेतला

खडकवासला धरण फु होतें पण आतां अरिष्ट

मुंबईचें सुप्रसिद्ध गुजराथी पंचाग "जन्मभूमी" यांचे मुख्य संपादक श्री. देवजी वीराजी खोना यांनीं ता. ११–९–१९५४ रोजीं एका पत्रांत असें लिहिलें आहे कीं,—"जन्मभूमीं पंचांग (संवत २०१०) पान ३२ उपर श्रीमती पंडित तरफथी ग्रहण फलादेशनो लेख आपायलो छे. जेमां आंतरराष्ट्रीय बनावोनि आगाहीमांथी अनेक आगाहीओ सत्य निवडी छे. जे विषे श्रीमती पंडितनो संशोधन–प्रयास यशस्वी बन्यो छे.

बंगाल-आसाम अने बिहारना जलप्रलय विषेनी आगाही पण दर्शविला समये बनी छे. . . . आपे जीवननो कीमती समय निःस्वार्थ भावे ज्योतिष शास्त्रमां गाळ्यो छे जे विषे धन्यवाद घटे छे. आवी आगाहीओ धंधादारी ज्योतिषीओ भाग्येज करी शंके छे. ''

\+ + +

'' प्रभातच्या अंकांत ' भावी काल ' या सदरांत इंदुमती पंडित यांनीं पुढील भविष्य वर्तविलें होतें.

' बंगाल, बिहार, आसाम आणि इतर भागांत फार पाऊस पडणार आहे आणि पूर येणार आहेत आणि त्यामुळें वहातुकींत अडथळे व मालमत्तेचें नुकसानहि होणार आहे. महाराष्ट्रांतहि या योगाचा थोडाबहुत परिणाम जाणवल्याशिवाय रहाणार नाहीं. वाचकांना तें सांगणें हें माझें कर्तव्य आहे. ' महाराष्ट्रियांना त्याचा पडताळा आला हें सांगावयास नकोच ! ''

संपादक—' दै. प्रभात ' १७ जुलै १९५४

\+ + +

## भविष्य खरें ठरलें

'' ... कांहीं वर्षांपूर्वी इंदुमतीनीं अशीं भविष्यवाणी वर्तवली होती कीं, जनरल मॅकॉर्थर यांना आपल्या स्थानापासून पदच्युत व्हावें लागेल आणि त्यांना जपानहून परत अमेरिकेला बोलावणें येईल. त्याचप्रमाणें कांहीं काळांतच घडून आलें व त्यांच्याजागीं जनरल रिजवे यांची नेमणूक झाली.'' * दोन वर्षापूर्वी पाकिस्तानचे त्यावेळचे प्रधान मंत्री ख्वाजा नाजिमुद्दीन यांच्याबद्दलहि इंदुमतीनीं असेंच भाकित केलें होतें कीं, त्यांची जागा सक्तीनें खालीं करावी लागेल. त्याचप्रमाणें घडून आलें आणि त्यांच्या जागीं महंमद अल्ली प्रधानमंत्री म्हणून नियुक्त झाले. * त्याचप्रमाणें गेल्याच वर्षी इजिप्तचे राष्ट्राध्यक्ष जनरल नगीब हे अधिकारावरून खालीं येतील, असें इंदुमतींनीं ठामपणें सांगितलें होतें. त्यावेळीं नगीब हे अधिकाराच्या शिखरावर होते. पण खरें आहे, काळ कुणासाठीं थांबत नाहीं. नगीबच्या जागीं आतां कर्नल नासर तितक्याच ताठरपणें चढला आहे.

* कांहीं महिन्यांपूर्वीचे कम्युनिस्ट विरोधी सिनेटर जोसेफ मॅकार्थीच्या

कुंडलींत महाकेंद्र योग असल्यानें पुनरावृत्तीच्या वेळीं त्याचें पतन होईल, असें स्पष्ट भविष्य श्रीमती इंदुमतींनीं उद्घोषित केले होतें. त्याचप्रमाणें दि. १ डिसेंबर रोजीं घडून आलें असून महाकेंद्र योगाची पुनरावृत्ती झाल्या-बरोबर सिनेटर मॅकार्थी विरोधी अविश्वासाचा ठराव प्रचंड बहुमतानें पास झाला आहे. त्यामुळें त्यांचें पतन झालें आहे.

या साऱ्या आश्चर्यजनक घटना पाहिल्या कीं, आम्ही स्तिमित होतों. त्यांनीं आमच्या गेल्याच महा-राष्ट्र दिवाळी अंकांत केलेलीं कांहीं भाकितेंहि अगदीं हुबेहूब तशीं घडून आलीं असून त्यामुळें मोठा विस्मय वाटतो. इंग्लडमध्यें यावेळीं वावटळी व पूर येऊन थोडी मालमत्ता व मनुष्यहानी होईल, त्याचप्रमाणें घडून आलें असून मराठी पत्रांनीं जरी याचा उल्लेख केला नसला तरी बी. बी. सी. च्या रेडिओनें याबद्दल भरपूर माहिती दिली आहे. दि. ३० च्या टाईम्स ऑफ इंडियानें याची बातमी दिली असून १९५२ नंतर अशी वावटळ व पूर आला नव्हता असा उल्लेख करून झालेल्या मनुष्य व वित्तहानीची नोंद दिली आहे. पाकिस्ताबाबतचें भविष्यहि तंतोतंत बरोबर आलें असून इंदुमतींनीं जें म्हटलें होतें.' 'या प्रांतांपैकीं कांहीं मंत्री-मंडळांत परिवर्तन होणार असून कराची मंत्रीमंडळांत खांदे पालट होणार ' वगैरे त्यांनीं केलेलीं भविष्येंहि अचूक ठरलीं असून या सर्वांचें निदान त्यांनीं कितीतरी काळ आधीं वर्तविलें होतें.***एरव्हीं सर्वसाधारण तर्कानें देखील अंदाज करतां येणार नाहींत अशी कितीतरी भविष्यें त्यांनीं कित्येक महिने आधीं सांगितलीं होतीं. निर्भीड, अचूक व स्पष्ट राजकीय भाकितें वर्तवि-ण्यांत इंदुमतींचें स्थान भारतांत तरी आज अद्वितीयच आहे, असें म्हटलें पाहिजे.***

## त्याना वाटतें

इंदुमतींच्या पुस्तकांतून अगर लेखांतून नजर चुकवून अलगद भाकितें उचलून ' आमचीं भाकीतें ! ' असें म्हणून दडपून आपल्या नांवावर सांग-णारे व पुन्हा 'इंदुमतींना कांहीं या शास्त्रांतलें कळत नाहीं' असा नसता तोरा मिरविणारे कांहीं महाभाग 'ज्योतिरंत्न ' आमच्या आढळांत आले आहेत! त्यांचीच भविष्यें शर्विलकाप्रमाणें चोरून आपलें श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्याचा

बृथा प्रयत्न करणाऱ्या या ज्योतिषांनीं पुन्हां इंदुमतींच्यावर टीका करून त्यांना शिवीगाळ करतांना पाहिलें कीं, "कालाय् तस्मै नमः" म्हणून कपाळाला हात लावावासा वाटतो! नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या 'मानवयुग' पुस्तकांत इंदुमतींनीं आगामी ५० वर्षांचें सविस्तर भविष्य प्रसिद्ध करून अशा धंदेवाईक व उचल्या ज्योतिषांना एक 'खाणच' प्राप्त करून दिली आहे; त्यांनीं खुशाल त्यांतील सुवर्णकण उचलावे आणि आपले म्हणून जनांत निर्लज्जपणानें मिरवावें. शिवाय वर ते इंदुमतींच्याबाबत दुष्ट प्रचार व गैरसमज पसरून देण्याचा आटोकाट प्रयत्न स्वतःच्या स्वार्थासाठीं द्वेषामुळें करून देत आहेत. त्यांची शैली उचलण्याचा तर उघड प्रयत्न होत आहे.

*** सखोल अध्ययन करायचें नाहीं, विधायक कार्य करण्याची तयारी नाहीं, नजरेआड उचल करायची, स्वतःचें अज्ञान लपविण्यासाठीं दुसऱ्याला शिव्या द्यायच्या आणि खोटें मोठेपण दाखविण्यासाठीं नांवाच्या मागेंपुढें पदव्या जोडायच्या व खोटे प्रचार करायचे! बहुसंख्य ज्योतिषांच्या अशा प्रवृत्तीमुळें वर्तमानकालांत ज्योतिशास्त्राचें अधःपतन झालें आहे, असें आमचे आतां निश्चित मत झालें आहे. 'मानव युग' पुस्तक या अधोगतीला कांहीं अंशी थांबवील, अशी आम्हांला नक्की खात्री वाटते. ... ... ... ...—संपादक..

**डिसेंबर १९५४ मासिक 'महा-राष्ट्र' पुणें.**

\+ \+ \+

## पडताळा

"गेल्या वर्षी नोव्हेंबर महिन्यांत दै. प्रभातच्या १५ नोव्हेंबर १९५३ च्या अंकांत श्रीमती इंदुमती पंडित यांनी जागतिक शांततेचे ग्रहयोगांबद्दल चर्चा करीत असतांना आपल्या लेखांत असें म्हटलें होते कीं,—" २४ जानेवारी १९५४ रोजीं बर्लिन येथें भरणाऱ्या मोठ्या राष्ट्रांच्या परिषदेत शांततेबद्दल कांहीं करार होणार नाहीं. त्यापुढें एप्रिलमध्यें पुन्हा एक बैठक होईल त्यांतहि कांहीं निष्कर्ष निघणार नाहीं. परंतु जुलै महिन्यांत शांततेसाठीं जी बैठक भरणार आहे त्यांत शांतता स्थापित करण्यासाठीं बड्या राष्ट्रांमध्यें कांहीं करार होतील."

एप्रिलमध्यें जिनेव्हा येथें भरलेल्या बैठकींत कांहीं निष्कर्ष निघाला

नाहीं. परंतु २० जुलै रोजीं इंडोचायनांत शांतता स्थापनेचा करार झाला; म्हणजे श्रीमती पंडित यांचें आणखी एक भविष्य खरें ठरले."

संपादक— दै. '**प्रभात**' २८ जुलै १९५४.

\+ + +

"१९५४ सालांत राहू व मंगळाच्या भ्रमणाबाबत चर्चा करीत असतां दै. प्रभातच्या ३ फेब्रुवारी १९५४ च्याअंकांत त्यांच्या भविष्यविषयक लेखांत श्रीमती इंदुमती पंडित यांनी 'इजिप्त व ब्रिटनमध्यें सुएझ कॅनॉलबद्दल सध्यां चाललेल्या भांडणांत तडजोड घडून येईल,' असें मत प्रगट केलें होतें.

नुकत्याच जुलै २७ रोजीं कैरो येथें इजिप्त व ब्रिटिश सरकारमध्यें सुएझ कॅनॉलच्या प्रश्नाबाबतच्या करारावर सह्या झाल्या. म्हणजे श्रीमती पंडित यांची शास्त्रीय उपपत्ती व भविष्यकथन दोन्ही खरी झालीं."

स. दै. '**प्रभात**'— दि. ११ ऑगस्ट १९५४

\+ + +

**श्रीमती इंदुमती पंडितांच्या भविष्याचा पडताळा**

भारताचे अन्नमंत्री श्री किडवाई यांना मृत्यु श्री गिरी यांचा राजिनामा, पाकिस्तानमधील क्रांति कारक घडामोडी व महंमद अलीचे डासळते स्थान आणि श्री. जयप्रकाश नारायण यांचा पक्षीय राजकारणापासून अलिप्त रहाण्याचा निर्णय ह्या भारतीय उपखंडातील अत्यंत अनपेक्षित घटनांचेहि भविष्य वर्तविण्यात श्रीमती इंदुमति पंडित यशस्वी ठरल्या आहेत कारण

**LOKASHAKTI 30-10-1954**

प्लूटो

शनि






या लेखांत इ. स. १९५५ च्या जानेवारीपासून म्हणजे शके १८७६, विक्रम संवत् २०११, हिजरी सन १३७४ चालू असतांना ते इ. स. २००० च्या अखेरपर्यंतच्या, जगांतील राजकीय, आर्थिक, नैसर्गिक, सामाजिक क्षेत्रांतील महत्त्वाच्या प्रसंगाचें स्थूलमानानें विवेचन, म्हणजेच संभाव्य घटनांची ज्योतिषशास्त्राच्या साहाय्यानें चर्चा करण्यांत आली आहे. अर्थात् वाचकांना फार मोठ्या ज्योतिषशास्त्रीय सिद्धांतांची माहिती करून देण्यांसाठीं लागणारें ' मुद्रण ' सहकार्यहि अपुरें व मर्यादित आहें, हेहि लक्षांत घ्यावें.

मेदिनीय ज्योतिषशास्त्राबाबत चर्चा करीत असतांना कांहीं कालापूर्वी एके ठिकाणीं मीं असें नमूद केलें होतें कीं, ज्या ठिकाणीं नैसर्गिक घटना किंवा घडामोडींच्याविषयीं आग, महापूर, पाऊस, रोगराई इत्यादिविषयीं भविष्यकथन करण्याचा प्रसंग येतो त्यावेळीं कालमर्यादा निश्चितपणें सांगतां येईल; परंतु ज्याठिकाणीं राजकीय घडामोडींचे अंदाज आपण बांधीत असतो अशा वेळी वेळेचीं बंधनें थोडीशीं सैलच ठेवावीं लागतात. कधीं कधीं केलेल्या अंदाजाच्या थोडा काल आधीं तर थोडा काल नंतर त्या घटना घडण्याचा संभव असतो.

अर्थात् अशा परिस्थितींतहि प्रत्येकानें ही खात्री बाळगावी कीं, लोकांच्या मन:प्रवृत्तीचें दिग्दर्शन आणि घडामोडींची संभाव्यता यांमध्यें कालदृष्टया जरी थोडेंफार मागेंपुढें झालें तरी तें दिग्दर्शन वा ते अंदाज चुकण्याचा फारसा संभव नाहीं. यापुढें जाऊन असें म्हणतां येईल कीं, योग्य

ते उपाय आगाऊच अंमलांत आणले तर उपेक्षिलेली बंडाळी किंवा राजकीय खून टाळतां येतात. आणि अशी परिस्थिति असल्यामुळें ज्योतिषशास्त्रसुद्धां एक मानवाला उपयोगी पडणारें शास्त्र ठरतें. कारण, संकट आधींच कळलें तर मनुष्य त्याला तोंड देण्यासाठीं आधींच सज्ज राहणार नाहीं का? म्हणूनच भावी घटनासंबंधीं माहिती स्थूलरीत्या कां होईना मिळवून, विशेषतः ती मातृभूमीच्या व सामान्यतः सर्व मानवजातीच्या-फायद्यासाठीं उपयोगांत आणली जाईल अशा अपेक्षेनें ज्योतिषशास्त्रज्ञानाच्या द्वारें येथें नमूद करण्याचा हा माझा नम्र प्रयत्न आहे.




आणखी एक गोष्ट अशी कीं, एखाद्या देशांतील राजकीय घडामोडी कांहीं अंशीं त्या देशांतील पुढाऱ्यांच्या इच्छा, आकांक्षा, चातुर्य, आणि मुत्सद्दिगिरी यांवर अवलंबून असतात. म्हणून राष्ट्राचें भवितव्य घडविणाऱ्या अशा सर्वच पुढाऱ्यांच्या जन्मकुंडल्या आपणाजवळ असणें अत्यावश्यक

असतें, परंतु त्या सर्व मिळणें संभवनीय नाहीं ही विशेष प्रकारची अडचण होय; आणि दुसरी अडचण जी आज माझ्यासमोर आहे ती म्हणजे पंचांगाबाबतची.

आतां माझ्याजवळ फक्त Hugh Mac Craig चें "The 200 Years Ephemeris-1800 To 2000 Inclusive" आणि राफाइ-लचें "1900 To 2000 च्या Geocentric" हीं दोन स्थूल पंचांगें आहेत. आणि त्यांत पुष्कळशी सूक्ष्म खगोलशास्त्रीय माहिती नसल्यामुळें अनेक भावी घटनांचा उल्लेख येथें करणें शक्य नाहीं. म्हणूनच कांहीं प्रमुख ग्रहांच्या स्थितीवरून व त्यांनीं दाखविलेल्या 'कलां' वरून त्यांचे योगायोग व चंद्र–सूर्य ग्रहणांवरून जी माहिती मिळण्याचा संभव आहे त्यांच्या निष्कर्षाचें सार पुढील परिच्छेदांत काढलें आहे. या पंचांगांतील गणित बरोबर आहे कीं चुकीचें आहे हें माहीत नसल्यामुळें, त्यावर आधारलेल्या भविष्यकथनांच्या यथार्थावर तें अवलंबून राहील.

आणखी एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे ती ही कीं, ग्रहांची व भूगोलाची ( पृथ्वीची ) भूमितिशास्त्रदृष्ट्या एकमेकांशीं संबंधित अशी जी स्थिति असते तिला ज्योतिषशास्त्रांत आपण 'ग्रहयोग' म्हणतों; त्यामुळें त्यांची स्वतःची गुरुत्वाकर्षणाची भूमि निर्माण होते. या गुरुत्वाकर्षणाच्या जोरावरच विश्वांतून बाहेर पडणारे दीप्तिमान किरणहि सजीव आणि निर्जीव प्राणिमात्रांनीं भरलेल्या या पृथ्वीतलावर असंख्य असे बदल घडवून आणतात. पाऊस, धरणीकंप, वादळ, ज्वालामुखी प्रज्वलित होणें, महापूर येणें, किंवा एखाद्या रोगाचा एकाएकीं प्रसार होणें—या गोष्टी अमुक एका दिवशीं घडतील असें भविष्य वर्तविलें असेल तर त्या गोष्टी मात्र अचूकपणें अगदीं सांगितलेल्या वेळीं घडतात.

परंतु जनसमुदायाच्या मनःप्रवृत्तीचा विचार केला तर तोच ग्रहयोग आपल्या स्वतःच्या मार्गानें जात असतो; कारण ग्रहांचे जनसमुदायांवर होणारे परिणाम हे नुसते निदर्शक व सूचक असतात; ते परिणाम माणसांना विशिष्ट तऱ्हेनें वागण्यास भाग पाडूं शकत नाहींत. अशुभ ग्रहांच्या हाल-चालीमुळें निर्माण होणाऱ्या अशुभ घटनांवर, मानवप्राणी स्वतःच्या अलौ-

किक इच्छाशक्तीच्या जोरावर मात करूं शकतो. परंतु जगांतहि अशीं दुबळीं माणसें आपल्याला आढळतात कीं, जीं सहजप्रवृत्तीच्या आहारीं जाऊन पापग्रहांच्या सामर्थ्याला शरण जातात,—व अशा दुर्घटना घडतात. पण एखाद्या विशिष्ट देशांतील सर्वच माणसांच्यावर या पापग्रहांचे दुष्परिणाम व्हावयाला मात्र जरा जास्तच वेळ लागतो. देशांतील बहुसंख्य लोक सुशिक्षित असतील तर मंगळ किंवा शनि यांसारख्या ग्रहांच्या त्रासदायक व दुष्ट दडपणाला आणि परिणामाला तो देश सहजासहजीं बळी पडत नाहीं. या उलट रवि, चंद्र आणि शुक्र यांच्यामुळें निर्माण होणाऱ्या वातावरणाला साथ देण्याची प्रवृत्तीच विशेषतः दिसून येते.




मागासलेल्या विभागांतील लोक मंगळ आणि शनि यांच्या दुष्ट परिणामाला सहजासहजीं व तडकाफडकीं बळी पडतात; आणि या दोन पाप ग्रहांच्या चाहुलीबरोबर हे लोक चापल्य धारण करून, तडफडतांना, अराजक माजवतांना, किंवा हुल्लडबाजी करतांना दृष्टीस पडतात.

या सर्व गोष्टी लक्षांत घेऊनच पुढील विवेचन वाचावें आणि त्याची योजना करावी. यापूर्वींच सांगितल्याप्रमाणें जगताला स्वतःची इच्छाशक्ति नाहीं, व त्यामुळें ग्रहांच्या परिणामांशीं सामना देण्याची ताकद त्याच्यांत नाहीं. त्यामुळेंच ग्रहांच्या परिणामांना पृथ्वी ताबडतोब सामावून घेऊन त्यांच्याशीं जुळतें घेते. शेवटीं असें सांगावयाचें आहे कीं, एखाद्या व्यक्तीची आवडनिवड व इच्छा म्हणून नव्हे तर एक ज्योतिर्विद म्हणूनच कोणाहि समाजाच्या वा राष्ट्राच्याबद्दल पूर्वग्रहदूषित मनोवृत्ति न ठेवतां, प्रामाणिकपणें मी संभाव्य घटना वाचकांसमोर पुढील परिच्छेदांत मांडत आहें.

## -- इ. स. १९५५ --

या वर्षी म्हणजे १९५५ सालीं एकंदर चंद्र आणि सूर्याचीं ३ ग्रहणें आहेत. यांत २० जून आणि १४ डिसेंबर रोजीं सूर्यग्रहण आणि २९ नोव्हेंबर रोजीं चंद्रग्रहण. याशिवाय ७ जानेवारी रोजीं गुरु–हर्षल युति, व २ नोव्हेंबर रोजीं गुरु–प्लूटो युति होत आहेत.



या वर्षी पावसाळ्याच्या कांहीं काळ आधींच आशियांतील कांहीं भागामध्यें आणि उत्तर गोलार्धामध्यें अति–वृष्टि होईल, व खूप नुकसान होईल. सीलोन, जपान, मलबार, आसाम, इंडोचायना, आणि युरोपच्या कांहीं भागांत महापूर येतील. मे आणि जूनच्या शेवटीं भारतामध्यें पावसाळ्याशीं संबंधित नसलेल्या जोरदार पावसाचा तडाखा त्या भागांत रहाणाऱ्या लोकांना सहन करावा लागेल. हर्षल–नेपच्यूनच्या केंद्रयोगामध्यें 'तूळ रेषेवर' (Libra Line) अतिवृष्टि, महापूर, भूकंप, ज्वालामुखी, वादळें, व समुद्राला भरती येणें इत्यादि नैसर्गिक संकटें घडून येतील. १९५५ चा प्रथमार्ध महत्त्वाचा व वैशिष्टयपूर्ण असून, संबंधित अधिकाऱ्यांनीं व त्या भागांत रहाणाऱ्या लोकांनीं या गोष्टींची नोंद करून घेऊन योग्य ती काळजी आधींच घेतली पाहिजे. थोडक्यांत मे व जूनमध्यें हवामान अचानक बदलेल, एप्रिलच्या अखेरीस कांहीं भूकंपाचे धक्के बसतील.

दुसरी अत्यंत महत्त्वाची व सर्व जगाचें लक्ष वेधून घेणारी घटना म्हणजे अणुशक्तींचा उपयोग शांततेच्या कार्यासाठीं केला जाईल. आपण अणु–युगांत वावरत आहोंत याची जाणीव होऊन, या शक्तीचा उपयोग मानवजातीच्या सुखासाठीं व उत्कर्षासाठीं या वर्षी होणार आहे.

१९५५ मध्यें तिसऱ्या महायुद्धाची भीति नसली, तरी आफ्रिका, युरोप व आशिया यांतील कांहीं भागांत अंतर्गत दंग्याधोप्यांची भीति आहे. सुधारणेसाठीं चाललेलें आफ्रिकेंतील युद्ध तीव्र स्वरूप धारण करील. युरोपमधील ट्रिएस्टीच्या आसपासचा प्रदेश हा एक महत्त्वाचा प्रश्न होऊन बसेल, आणि या वर्षाच्या मध्याच्या सुमारास मोठ्या राष्ट्रांना सलोखा करण्यासाठीं एकत्र यावें लागेल. अमेरिकेच्या धोरणानुसार न्यूझीलंड आणि ऑस्ट्रेलियामध्यें मोठ्या प्रमाणा-



वरील लष्करी हालचाली घडून येतील. * पाकिस्तानच्या सत्ताधीश पक्षामध्यें बऱ्याच प्रमाणांत उलथापालथ होईल, आणि कडक लष्करी धोरणाची व्यक्ति अधिकारावर येऊन पुढें महंमद अल्लीचें स्थानांतर होईल. १९५५ हें साल भारत आणि पाकिस्तानला प्रगतीचें असलें तरी त्याचे राजकीय संबंध अधिकच बिघडतील. भारताचे पंतप्रधान नेहरू यांची प्रकृति बिघडून किंवा इतर कारणानें त्याना तात्पुरती 'सेवानिवृत्ति' स्वीकारावी लागण्याचा संभव आहे. लोकांना धक्का देण्यासाठीं पंडित नेहरू एका मुद्द्यावर राजीनामा देण्याची गंभीर धमकी देतील. * भारतांतील परकीय वसाहतींच्या बाबतींतील भावना उग्र स्वरूप धारण करतील; आणि या वर्षीच्या द्वितीयार्धांत एक प्रकारच्या तंग वातावरणांतच राष्ट्रीय ध्वज हातीं घेऊन भारतवासी जनता त्या प्रदेशांत घुसेल. * सरकारी योजनेमुळें व कार्यक्रमामुळें महाराष्ट्रांत चांगलीच प्रगति होईल. कोणत्या ना कोणत्या कारणामुळें या वर्षी भारतामध्यें महाराष्ट्राचें महत्त्व वाढेल, व तो अग्रेसर राहील. मुंबई शहर सर्व दृष्टीनीं आश्चर्यकारक प्रगति करील. तें एक भारतांतील सर्वांत अधिक सुधारलेलें व सुंदर शहर आहे याची खात्री पटवून देईल.

मुंबईच्या सामाजिक जीवनांत एक नवीन सुधारणा होईल. महाराष्ट्राची सिंह राशि असल्यानें चांगलाच फायदा होईल. कारण गुरु त्याच्या राशींतून म्हणजे सिंहेतून भ्रमण करणार आहे. पीकपाणी चांगलें येऊन, पूर्वीपेक्षां लोक अधिक सुखी होतील. परंतु त्यानंतर मात्र या सुखांत हर्षल पुढील वर्षी माती कालविण्याचा प्रयत्न करील.

थोडक्यांत, १९५५ या सालांत शास्त्रें व सामाजिक संस्कृतीच्या दृष्टीनें मानव जातीकडून कांहीं महत्‌कृत्यें केलीं जातील, कम्युनिस्ट राष्ट्रापेक्षां कोणत्याहि बाबतींत मागें न राहण्यासाठीं नवीन मार्ग शोधले जातील. यामुळें अमेरिकेंत आर्थिक मंदी व परागति निर्माण होण्याचा संभव आहे... ह्या दोन्ही मतप्राणालींना एकमेकांजवळ आणण्यांत इंग्लंड दुहेरी धोरण आंखील; व त्यांत संपूर्णतया नसलें तरी थोडेंफार यशस्वी होईल.

राजेमहाराजांच्या दर्जाचे बाबतींत भारत सरकारला या वर्षी कांहीं

महत्त्वाचे निर्णय घ्यावे लागतील. जमीन सुधारणेचा प्रश्न कळकळीनें हाताळला जाईल, व अंमलांत आणला जाईल. आणि या प्रश्नाबद्दलच्या मतांत खूप बदल होतील, जातीय व प्रांतिक भावनेला जोर चढेल.

ऑस्ट्रिया व जर्मनीच्या एकीकरणाची कल्पना या वर्षाच्या प्रथमार्धांत दिसून येईल, व तसा प्रयत्न करून पाहण्यांत येईल. दुसऱ्या महायुद्धानंतर या वर्षीच फ्रान्सची चांगली प्रगति होत असल्याचें आढळून येईल; याचें एक कारण म्हणजे वसाहतींच्या हक्कांना मान्यता दिल्यानें, पार्लमेंटमध्यें शांततेचें, स्थिरपणाचें, व सलोख्याचें वातावरण नांदेल. अमेरिकेच्या सागरापार धोरणाला पाठिंबा देणारा ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, कॅनडा यांचा गट होऊन, त्यांची भयंकर प्रगति होईल. अंतर्गत कटकटी व बाहेरील जगांत बदनामी, अशा विचित्र परिस्थितीला अमेरिकेला तोंड द्यावें लागेल. 'पॅसिफिक 'च्या प्रदेशांत कोठें तरी अॅटम बाँबचा उपयोग केला जाईल, अशी धमकी, ऑस्ट्रेलिया व न्यूझीलंड यांना आपले सहकारी बनवून, अमेरिका अधून मधून देईल. परंतु असा 'स्फोट' होण्याचा संभव दिसत नाहीं. आशियाच्या राजकारणांत सिलोन विचका करण्याचा प्रयत्न करील. थोडयाशा तंग वातावरणानंतर भारत–सिलोन संबंध सुधारतील. सर जॉन कोटेलवाला या वर्षी स्थानच्युत होतील.

सहकार्यानें व सदिच्छेनें वागण्याची प्रबल इच्छा कम्युनिस्ट व बिगर कम्युनिस्ट राष्ट्रांत या वर्षी मोठ्या प्रमाणांत आढळेल. क्रेमलिनमध्यें १९५४ च्या शेवटीं व १९५५ च्या सुरुवातीला दूरगामी स्वरूपाचें जे बदल होणार आहेत, त्यामुळें जगांतील दोन गटांमध्यें चांगले संबंध प्रस्थापित होतील. हळूहळू चीनहि रशियाच्या देखाव्यापासून दूर सरकेल. यामुळें या ठिकाणच्या राष्ट्रांत मुख्यत्वें तीन गट पडले असल्याचें दिसत असलें तरीसुद्धां आशियांतील परिस्थितींत चांगला बदल होऊन, समजूतदारपणा व सलोख्याचें वातावरण निर्माण होईल. अर्थात् १९५५ च्या प्रथमार्धांत चीनमध्यें अंतर्गत स्वरूपाच्या कटकटी व नैसर्गिक आपत्ति घडून येतील. तथापि हें वादळ लौकरच शांत होईल. जपानची प्रगति चालू असून, तें सामर्थ्यशाली राष्ट्र बनत आहे, व उद्योगधंद्याच्या जगांत पूर्वीप्रमाणें अग्रेसर

होणार आहे हें लक्षांत ठेवावें. जपानप्रमाणेंच इंग्लंडहि या क्षेत्रांत जोराची प्रगति करीत असून, आपल्या मालाचा उठाव करण्यासाठीं नवीन बाजार-पेठा उघडीत आहे, व परकीय राष्ट्रांतील बाजारपेठांशीं चांगल्या प्रकारचें संबंध प्रस्थापित करीत आहे, असें या वर्षी अनुभवास येईल. सनातन्यांच्या हातीं सत्ता असणाऱ्या इटलीचीहि या कालांत चांगलीच प्रगति होईल. परंतु ही सत्ता दुसऱ्या पक्षाच्या हातीं हळूहळू जाईल, व इटलीचा नकाशा पिवळसर, पिंगट रंगांत रंगविला जाईल.

या वर्षीच्या भविष्यकथनास उपयोगी पडणारी जरूर ती गणित-माहिती " जन्मभूमी पंचांग कार्यालयानें " पुरविली आहे.

* * *






१९५५–५६ प्रे. आयसेनहॉवरसाठीं धोक्याचें आणि यशाचें आहे.

१९५६ सालांत मंगळग्रह अंतरांत पृथ्वीच्या बराच जवळ येईल.





# — इ. स. १९५६ —




या वर्षी एकंदर चार ग्रहणें आहेत. त्यांत ८ जून आणि २ डिसेंबर रोजीं सूर्यग्रहणें, आणि २४ मे व १८ नोंव्हेंबर रोजीं चंद्रग्रहणें आहेत. याशिवाय जानेवारी-मध्यें शनि—मंगळ युति होत आहे; आणि सप्टेंबर ते डिसें-बरपर्यंत अंतरांत मंगळ पृथ्वी-च्याजवळ येत आहे.

या वर्षाच्या म्हणजे इ. स. १९५६ ( 1956 A. D.) च्या शेवटच्या विभागांत आणि पुढील वर्षाच्या कांहीं कालांत बाजारभाव तेजींत असतील. विशेषतः सट्टा बाजारांत मोठ्या प्रमाणांवर उलाढाली होतील. नवीन उद्योगधंदे वाढीस लागून सहकारीं संस्थांची भरभराट होईल. उद्योगधंद्यांना होणारें फायद्याचें प्रमाणहि नेहमींपेक्षां चांगलेंच असेल.

या वर्षाच्या सप्टेंबर—ऑक्टोबरमध्यें बाजारभाव व मौल्यवान् वस्तूंचे भाव कांहींसे मंद होतील, व त्यामुळें सर्वांचें लक्ष तिकडे लागून राहील.

मंगळ पृथ्वीच्या जवळ येत असल्यानें, राजकारणाच्या क्षेत्रांत तंग व तप्त वातावरण निर्माण होईल. शास्त्रीय, सामाजिक, व औद्योगिक क्षेत्रांत महाराष्ट्र या वर्षी हळूहळू पण चांगली प्रगति करील, व तिची वाढ अशीच कांहीं वर्षे पुढेंहि चालू राहील.

या वर्षांतील प्रमुख ग्रहांचे प्रमुख राशींतील बदल व भ्रमण पाहिलें म्हणजे जगाला मोठ्या प्रश्नांच्या बाबतींत फेर जुळणीचा मार्ग अवलंबावा लागेल आणि पुष्कळ राष्ट्रांना आपल्या अंतर्गत कारभारांत व परदेशाशीं

असलेल्या संबंधांत महत्त्वाचे फेरफार करण्याची पाळी येईल असें दिसतें. कांहीं वेळां सनसनाटी बातम्या निर्माण होतील; तर कांहीं वेळां गोंधळाचें, अव्यवस्थेचें व अराजकतेचें वातावरण निर्माण होईल. काळाबरोबर धांवणें, या बदलत्या फेरफाराशीं जुळवून घेणें लोकांना फारच कठीण जाईल. तथापि हें कांहींहि असलें तरी डोळ्यांपुढें जें चित्र उभें राहातें ते जीवनाची पुनर्रचना करणाऱ्या व भरभराटीप्रत जाणाऱ्या, घटनांचें व्यवस्थित आकलन करून त्या दृष्टीनें प्रगत होणाऱ्या, सुखी जीवनपथ आक्रमिणाऱ्या मानव जातीचेंच होय! जुने पुढारी जाऊन, त्या जागीं नवीन उत्साही पुढारी निर्माण होणाऱ्या कालखंडांत आपण या वर्षी निश्चितपणें प्रवेश करीत असून, अनेक देशांत "नवीन राष्ट्रीय पुढारी निर्माण होण्याचा काल" या दृष्टीनें हें वर्ष संस्मरणीय राहील. या नवागतांच्याबरोबर नवीन अडचणीहि येणारच आहेत; आणि हें विशेषतः या व पुढील वर्षांत दृष्टोत्पत्तीस येणार आहे.

हें वर्ष स्पेनच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें ठरणार आहे. शनि धनूंतून भ्रमण करीत असतांना हुकूमशाहीचा व फ्रँकोचा अंत होत असल्याचें दिसून येईल. फ्रँको अर्थातच राजाची जुनी सत्ता पुनरपि प्रस्थापित करण्याची खटपट करील. एखाद्या वादळाप्रमाणें तो गादीवर आरूढ होईल, पण तितक्याच वेगानें तो पदभ्रष्ट होईल. हुकूमशहाच्या मगरमिठींत दीर्घकाल जखडली गेलेली स्पॅनिश जनता, शेवटीं लोकांच्याकडून निवडलें जाणारें लोकप्रिय सरकारच अधिक पसंत करील. यामुळें युरोपमधील तंग वातावरण जरा शांत होईल. फ्रँकोला वैयक्तिक रीत्या बराच त्रास होईल. तो एक म्हणजे ठार तरी मारला जाईल, किंवा त्याला देशांतून जीव बचावून पळ तरी काढावा लागेल. अर्थात् या वर्षापेक्षांहि यापुढील वर्षीत स्पेनमध्यें अधिक महत्त्वाच्या परिस्थितीविरुद्ध उलाढाली होणार आहेत. चालू क्रांतीला जी सुरुवात होणार त्याची नांदी या वर्षी सुरूं होईल.

इराणमध्येंहि चिघळलेलें वातावरण निर्माण होईल, व सरकार वेडानें झपाटल्यासारखें कृति करील. याआधींच तेलाच्या प्रश्नांत समझोता झाला असला तरी, आर्थिकदृष्टया कोणतीच सुधारणा न झाल्यानें, परकीयांच्या

मदतीवर वा कर्जावर इराणला अवलंबून रहावें लागेल. ऑगस्टच्या सुरुवातीस इटलीजवळ कांहीं भूकंपाचें धक्के बसतील.

भारतामध्यें गुन्हेगारींत वाढ होईल. चित्रपट जगांतील "सनसनाटी बातमी"नें कांहीं काल धक्का बसावा अशी एक घटना घडेल. विद्यार्थी-जगतांत असंतोषाचें वातावरण राहील. भारतांतसुद्धां लोकांत असंतोष राहणार असून कांहीं सरकारी अधिकाऱ्यांत बदल करण्याची मागणी केली जाईल. या वर्षी मृत्युसंख्येंत वाढ होईल, व त्याचबरोबर एका मोठ्या व्यक्तीच्या निधनाची कटु बातमी आपणांस ऐकावी लागेल. भारतांत पावसाळा नेहमींप्रमाणें असेल. नोव्हेंबरच्या सुरवातीस १०५ रेखांशाजवळ नैसर्गिक उत्पात होतील.

भारतांत या वर्षाच्या सुरवातीस साधारण निवडणुका घेतल्या गेल्यास त्यांत जातीय व प्रांतीय वाद मोठी भूमिका बजावतील असे दिसतें. भारतीय राष्ट्रीय कॉंग्रेस प्रमुख विजयी पक्ष असून दिल्लीत मंत्रीमंडळ बनवेल. परंतु विजयीपक्ष शुद्ध कॉंग्रेसपक्ष नसून त्यांत मिश्रित प्रतिनिधी असणार. निवडणुकीपूर्वी वातावरण तंग व उत्तेजित राहील. जातीयवादीपक्ष सुरवातीस जोरांत दिसूनहि कांहीं खास विजय मिळवूं शकणार नाहीं, आणि परकीय सत्ता अप्रत्यक्ष दडपण आणूनही असफल होईल. राष्ट्रीय व जनतेच्या नांवानें रशियाचीं प्यादीं विजयीपक्षांत सांपडतील. सैनिक, पोलिस व अधिकारी वर्ग कॉंग्रेसच्या बाजूला भर देतील.

* * *

# — इ. स. १९५७ —

या वर्षी एकूण चार ग्रहणें आहेत. एप्रिल २९ आणि ऑक्टोबर २३ रोजीं सूर्यग्रहणें असून, मे १३ आणि नोव्हेंबर ७ रोजीं चंद्रग्रहणें आहेत. ऑक्टोबर २० रोजीं गुरु-मंगळ युति आहे.

पावसाळ्याच्या सुरुवातीच्या आधींच कित्येक जोराच्या सरी येतील; परंतु प्रत्यक्ष पावसाळ्यास सुरुवात झाली म्हणजे मात्र पाऊस कमी पडेल.

प्रथम ' भूमिगत ' पद्धतीनें चालू होऊन, नंतर उघड स्वरूप धारण करणारी एक चळवळ महाराष्ट्रांत आपलीं पाळेमुळें रुजवील, व ती कांहीं वर्षें चालू राहील. ही चळवळ सामाजिक प्रगति व औद्योगीकरणाशीं संबंधित अशीच असेल. जून, जुलै व ऑगस्ट हे तीन महिने या दृष्टीनें महत्त्वाचे असून लोकांच्यामध्यें या चळवळीबाबत फार मोठा उत्साह असेल. " जमिनी व गिरण्या या कामगारांच्या मालकीच्या आहेत " ही या चळवळीमागील मूलभूत कल्पना असेल. त्याचबरोबर, " महाराष्ट्र महाराष्ट्रीयांसाठीं आहे. " या घोषणेमुळें शेजारी प्रांतांत पुढील कांहीं वर्षांत कटु भावना निर्माण होतील.

मागील वर्षीच बाजारभावांत वाढ झाल्यामुळें नवीन उद्योगधंदे व नवीन योजना यावर्षीं सुरू करण्यांत येतील. सट्टा बाजारांत तेजीचा नवा उच्चांक गांठला जाईल. पिकांचा नाश व त्यांच्या वाटपांतील अडचणीमुळें शेअर बाजार व इतर बाजारभावांत परिस्थिति सुधारल्याचें दिसून येईल. सबंध वर्षभर धंदेवाईक उलाढाली मोठ्या प्रमाणांत होतील.

भारतांत कांहीं नवीन आर्थिक योजना आंखल्या जातील, व त्यासाठीं कर्जें उभारण्यांत येतील. त्याबरोबरच इतर राष्ट्रांकडून आर्थिक साहाय्य मिळण्याची शक्यता आहे. व्यापार, दळणवळण आणि राजनैतिक संबंध या बाबतींत भारताचे कम्युनिस्ट राष्ट्रांशीं चांगले संबंध राहतील. यामुळें अमेरिकेची वृत्ति मात्र द्वेषयुक्त राहील. मे व जून महिन्यांत कांहीं सांसर्गिक रोगांचा व सांथींच्या रोगांचा प्रसार भारतांतील कांहीं भागांत होईल.




१ डिसेंबर १९५७ पासून १८ मे १९५८ पर्यंत पाकिस्तानच्या जन्मकुंडलींत असलेला कालसर्प योग पुनरुधृत होत आहे. या कालांत पाकिस्तानच्या दोन्ही विभागांत मोठीच धमाल उडेल. राजकीय परिस्थिति विलक्षण तंग बनेल. भयंकर निदर्शनें होऊन राजकीय पुढाऱ्यांचे खून पाडण्याचें प्रयत्न होतील.

इराण व पोलंडच्या आसपासच्या प्रदेशांत, पिकांची परिस्थिति चांगली राहणार नसल्यानें जनतेंत असंतोष निर्माण होईल, व घातपाती कृत्यांना ऊत येईल. या वर्षाच्या शेवटच्या भागांत भारतांतसुद्धां राजे-महाराजे यांच्याविरुद्ध सरकार कायदेकानू करील, व जमिनदारी पद्धतीचें उच्चाटन करण्याचे प्रयत्न होतील.

या वर्षाच्या ( 1957 A. D. ) जानेवारींत व्यक्तिगत व कित्येक राष्ट्रीय जीवनांत खूपच महत्त्वाच्या घडामोडी घडून येण्याचा संभव आहे. एखादी " मोठी " व्यक्ति मृत्युमुखीं पडण्याची बरीच शक्यता आहे. ९ ते १४ जानेवारीच्या कालांत अनेक ठिकाणीं मोठ्या प्रमाणावर निदर्शनें होणार असून त्याचें रूपांतर हिंसेंत होण्याचा संभव आहे. या थोड्या कालावधींत अनेक ठिकाणीं प्रवासी व वाहतुकीच्या मार्गावरील 'अपघात' होतील. जानेवारी व फेब्रुवारींत उत्तर रेखांशावरील अनेक विभागांत जोरदार हिमवर्षाव होऊन कडाक्याची थंडी पडेल. या वर्षाच्या मध्यास जनतेंत पुनश्च एकवार 'तंग' वातावरण निर्माण होईल. एक रेल्वे अपघातहि संभवतो. त्याचप्रमाणें याच सुमारास काश्मीर, ग्रीस व तुर्कस्तानमध्यें त्रासदायक परिस्थिति निर्माण होईल.

दिल्लींतील सामर्थ्यशाली राज्यसरकारामुळें, भारत या वर्षी, आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत मध्यस्थ म्हणून चांगलेंच यश संपादन करील. सरकार या वेळीं जनतेंत लोकप्रिय राहील, व त्याची प्रतिष्ठा वाढेल. कम्युनिस्ट देशांतील एक ख्यातनाम व्यक्ति या वर्षी भारताला भेट देईल. एकमेकांतील समजुतदार धोरणामुळें कम्युनिस्ट राष्ट्रांशीं असणारे स्नेहसंबंध चांगलेच वाढीस लागतील. नेपाळमध्येंसुद्धां राज्यकारभार हांकणारा पक्ष लोकप्रिय राहून सामर्थ्यशाली असाच असेल. तेथील नेहमींच्या भांडणतंट्यांचा या वर्षी अंत झालेला आढळून येईल.

* * *

## — इ. स. १९५८ —

या वर्षी एकूण तीन ग्रहणें आहेत. एप्रिल १९ आणि ऑक्टोबर १२ रोजीं सूर्यग्रहणें असून, मेच्या ३ तारखेस चंद्रग्रहण आहे. शनि-मंगळ युति जानेवारी २२ तारखेस आहे; आणि गुरु–नेपच्यून युति सप्टेंबर २४ तारखेला आहे.

महाराष्ट्रांत आधींच जनतेंत सुरू झालेल्या आंदोलनांत मार्च १९५८ च्या आसपास पक्षोपपक्ष होतील. आर्थिक व शास्त्रीय पायावर एका पक्षाची उभारणी होईल; तर धर्म व जात यांच्या मुद्द्यावर मागणी करणारा दुसरा पक्ष असेल. यांच्यामध्यें उघड भांडणतंटें होतील. या भांडणांत जातीयवाद्यांचा विजय होईल; आणि पुणें व कोल्हापूर येथील जनतेच्या भावना चेतविल्या जातील. लोकांच्या मनाला शांतता मिळवून देण्यासाठीं, त्यानंतरच्या कालांत, कांहीं उपाययोजना केली जाईल. गेले कांहीं दिवस व पुढील कांहीं वर्षें महाराष्ट्राच्या राजकीय क्षेत्रांत वादळी वारे वाहूं लागतील.

उत्तर गोलार्धांत कांहीं ठिकाणीं अवर्षणामुळें दुष्काळी परिस्थिति निर्माण होऊन त्याचबरोबर रोगराई निर्माण होईल व जनतेंत असंतोषाची लाट उसळेल. या वेळीं भारताला परकीयांच्या मदतीची जरूरी भासेल, व ती इतर राष्ट्रांकडून दिली जाईल. या वेळीं भारतांत सामर्थ्यशाली सरकार रहाणार असून कांहीं लष्करी हालचाली पहावयास मिळतील. स्त्रिया राजकारणांत व भारत सरकारच्या कार्यक्रमांत प्रामुख्यानें भाग घेतांना दिसतील. कामगार पक्षाकडून एक मोठा संप घडवून आणला जाईल, आणि तो दडपण्यासाठीं सामर्थ्याचा व दंडुकेशाहीचा वापर करण्यांत येईल.

द्वितीय श्रेणीच्या पुढाऱ्यांच्या मनांत या वर्षाची गुरु-नेपच्यून युति "स्वत्वाची व अभिमानाची" ज्योत पेटवील. यामुळें अनपेक्षित व वाईट प्रकारच्या घटना पूर्व आशियांतील राष्ट्रांत घडून येतील. आणि विशेष हें कीं, हे पुढारी मानवतेच्या, संस्कृतींच्या, आणि अध्यात्माच्या गप्पा मारतील;

आणि दुष्काळी परिस्थिति असूनहि त्यावर उपाय योजण्याऐवजीं लोकांना भलत्याच मार्गानें नेण्याची त्यांची धडपड असेल.

या वर्षाच्या द्वितीयार्धांत एका प्रमुख चिनी पुढाऱ्याचा अंत संभवतो.




बंगाल व आसाममध्यें राजकीय गोंधळ व अस्थिरता निर्माण होऊन डाव्या पक्षांच्या पुढाऱ्यांकडून देश-द्रोही कार्यक्रम हातीं घेतलें जातील. पूर्व—पश्चिम बंगालच्या एकीकरणाची चळवळ उग्र स्वरूप धारण करून, तिचा जोर पुढें कांहीं कालहि टिकेल. गुरु-नेपच्यून युतीनें नेहमींच राजकीय घडामोडींना ऊत येतो; आणि जगांतील पुष्कळ राष्ट्रांत तंग वातावरण व चैतन्य निर्मिलें जातें. या वर्षाचा कांहीं भाग व पुढील वर्षांत आपणाला हें पहावयास मिळेल, आणि अतिशय गंभीरपणें जागतिक युद्धाची भाषा बोलली जाईल; तथापि महायुद्धाबद्दल साशंकता आहे. अर्थात् पृथ्वीच्या पाठीवर लहान प्रमाणांतील भांडण—तंटे आपण उपेक्षूं शकत नाहीं. आरमार व सागरी वाहतुकींत या वर्षी व पुढील वर्षी आश्चर्यकारक शास्त्रीय प्रगति होईल.

या वर्षाच्या अगदीं सुरुवातीस भारतामध्यें विशेषत: शैक्षणिक, प्रांतिक व आर्थिक कारणास्तव वाद माजेल, त्यामुळें राजकीय वातावरण तंग बनेल. ऑस्ट्रेलियामध्यें अशीं कांहीं कारणें निर्माण होतील कीं, सरकारी धोरणाविरुद्ध स्त्रिया असंतोष प्रदर्शित करतील; यामुळें राज्य हांकणाऱ्या पक्षाच्या प्रतिष्ठेला धक्का बसेल.

या वर्षांच्या ऑक्टोबरमधील दुसऱ्या पंधरवड्यांत भूकंपाच्या धक्क्यांची नोंद करावी लागेल, व नोव्हेंबरच्या सुरुवातीस, वाहतुकीशीं संबंधित असे भयानक अपघात होतील. या महिन्यांत कांहीं महत्त्वाचे संपर्हि

होतील; भयंकर स्वरूपाचीं निदर्शनें होतील, व चांदीचे भाव तात्पुरते खालीं जातील.

या वर्षी (1958 A. D.) अमेरिकेचें धोरण व परराष्ट्रांशीं संबंध या बाबतींत फार मोठीं परस्परविरोधी मतें व कटु वाद निर्माण होईल; व त्यांवर भयंकर टीका केली जाईल. यानंतर ब्रिटनच्या मध्यस्थीनेंच या प्रश्नांतील तीव्रता कमी होईल व शांततेचें वातावरण निर्माण होईल.

* * *

# — इ. स. १९५९ —

या वर्षी एकूण तीन ग्रहणें आहेत, पैकीं एप्रिल ८ आणि ऑक्टोबर २ रोजीं सूर्यग्रहणें असून, मार्च २४ रोजीं चंद्रग्रहण आहे. मंगळ–हर्षल युति जून २३ रोजीं; मंगळ–प्लूटो युति जुलै २३ रोजीं, आणि मंगळ–नेपच्यून युति ऑक्टोबर ३१ रोजीं आहे.

नेहमींच्या पावसाळ्यापूर्वी बराच काल भरपूर व जोरदार पाऊस पडेल, आणि जुलैच्या सुरुवातीस वादळाचा वाढता जोर राहील. मध्यपूर्वेत आणि इतर कांहीं ठिकाणीं २५–२६ मेच्या आसपास भूकंपाचे धक्के बसतील. नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यांत दमट हवामान राहील.

या वर्षापासून ( 1959 A. D. ) पुढील दीड वर्षाच्या कालावधींतील शनीचें भ्रमण, व त्याचें भारताच्या सामाजिक व राजकीय जीवनावर होणारे परिणाम असें सुचवितात कीं, आतां भारतीय जनतेला समजून येईल कीं, स्वतंत्र भारताचा पोकळ पुकार कामाचा नाहीं. अतिरेकी जातीयता व जातिभेदाच्या तटबंदी मोडून हा समाज आर्थिक व सामाजिक क्षेत्रांत खऱ्या समानतेला पोंचविला पाहिजे. या समानतेच्या ध्येयासाठीं आणि देशाच्या विकासासाठीं सर्वांनीं अंग झाडून कामाला लागले पाहिजे.

भारताच्या विरुद्ध पश्चिम पाकिस्तानांतील जनतेंत असंतोषाच्या

ज्वाला पेट घेतील, व लोक त्याविरुद्ध उपाययोजना करण्याची मागणी वर्षाच्या प्रथमार्धात करतील. दुसऱ्या भागांत भारत सरकारला या शेजारी राष्ट्रांतील घडामोडींविरुद्ध सक्त उपाय योजणें भाग पडेल; कारण या राष्ट्रांमुळेंच दिल्ली सरकारला बराच त्रास सहन करावा लागलेला असेल.




एका जर्मन ज्योतिष्याचें मतानें यंदा रशियाच्या पत्रिकेप्रमाणें रशियन शक्ति इतरांना भयप्रद होणार आहे. ह्या शास्त्रज्ञानें जगांतील मुत्सद्द्यांना असा इशारा दिला आहे कीं, सारें जग सावध झालें नाहीं तर तिसऱ्या महायुद्धाची सुरुवात रशियाकडून होऊन कांहीं देशांचें जीवन आणि संस्कृतीचा उच्छेद होणार आहे. तो एक प्रलयकालच ठरेल.

या वर्षांत एक स्त्री भारतामध्यें महत्त्वाची कामगिरी पार पाडून राष्ट्रीय जीवनांत महत्त्व पावेल; अथवा तसें न झाल्यास, स्त्रियांना अनुकूल असे कायदे पास केले जातील. शिक्षणक्षेत्रांतहि कांहीं प्रगतिपर सुधारणा होतील. महाराष्ट्रांतसुद्धां कांहीं सुधारणांची मागणी केली जाईल, व पुणें विद्यापीठाला परिस्थितीवर नियंत्रण ठेवणें कठीण जाऊं लागेल. परकीय राष्ट्रांमध्यें सलोखा नांदावा म्हणून भारत सरकार आणखी एक पाऊल पुढें टाकील. पाकिस्तानला कटकटींना तोंड द्यावें लागेल; परंतु तेथील सरकार परिस्थितीशीं आपल्या परीनें तोंड देण्यास समर्थ असल्यानें तें पराजित होण्याची शक्यता कमी आहे.

जपानी सरकारहि सामर्थ्यशाली असेल, परंतु तेथील सम्राटाला संकटांना तोंड द्यावें लागेल. सर्वसाधारणपणें पूर्व आशियांत पिकांचा कांहीं प्रमाणांत नाश होईल. अफगाणिस्तानलाहि नैसर्गिक आपत्तींशीं झुंज द्यावी लागणार असल्यानें कठीण कालांतून मार्ग आक्रमावा लागेल. परंतु तिथलें

सामर्थ्यशाली सरकार परिस्थिति काबूंत आणूं शकेल. जातां जातां हें सांगावेंसें वाटतें कीं, कांहीं परकीय तंत्रज्ञ बा लष्करी अधिकारी " अफगाणिस्तान " चा " तळ " म्हणून उपयोग करतां येईल कां हें पहाण्यासाठीं अफगाणिस्तानला भेट देतील.

* * *

## — इ. स. १९६० —

या वर्षी एकूण चार ग्रहणें आहेत. पैकीं मार्च २७ व सप्टेंबर २० रोजीं सूर्यग्रहणें असून, मार्च १३ व सप्टेंबर ५ रोजीं चंद्रग्रहणें आहेत. या वर्षी शनि–मंगळ युति जानेवारी ३१ रोजीं होत आहे. मागील वर्षाच्या घडामोडीनंतर हें वर्ष राजकीयदृष्टया अत्यंत महत्त्वाचें ठरणार आहे.

ऑस्ट्रेलियाच्या दृष्टीनें हें वर्ष ( 1960 A. D. ) अतिशय भाग्यदायक, भरभराटीचें व उत्कर्षाचें असून, त्याची भरपूर प्रगति होईल; व जगांतील तें एक सामर्थ्यशाली राष्ट्र आहे, असें या भागापुरतें तरी म्हणतां येईल. वर्षाच्या सुरुवातीला ब्रिटिश मुत्सद्दी इतर राष्ट्रांशीं प्रेमाचे व सलोख्याचे स्नेहसंबंध प्रस्थापित करण्यांत सुयश मिळवितील; आणि वर्षाच्या शेवटच्या तीन महिन्यांत युरोपियन प्रश्नांचा कांहीं तरी समाधानकारक निकाल लावण्यांत ब्रिटिश राजकारणी यशस्वी होतील. कारण जगांतील या वेळची परिस्थिति मुत्सद्देगिरीला आवाहन करील, व इंग्लंड हेंच राष्ट्र त्या ठिकाणीं योग्य तऱ्हेनें आपला प्रभाव पाडण्यास समर्थ ठरेल.

भारतांत या वर्षाच्या द्वितीयार्धांत, पंजाबजवळच्या प्रदेशांत व दक्षिण भारतांत कांहीं कटकटी निर्माण झाल्याचें आढळून येईल. त्यांचा उगम या वर्षातील प्रथमार्धांतील कृतीशीं असेल. जातीय व प्रांतीय भावनासुद्धां वातावरण तंग बनविण्यास साहाय्यच करतील. आर्थिक क्षेत्रांत, इतर देशांप्रमाणें भारतांतसुद्धां कापसाच्या किमतींत बरीच वाढ होईल.

पावसाळा नियमितपणें येईल, पण कदाचित् नेहमींपेक्षां थोडा कमी

पाऊस पडण्याची शक्यता आहे. जर्मनी, युरोप व त्यालगतचा भाग या वर्षी जगाचें लक्ष आपल्याकडे वेधून घेईल, कारण तेथें देशद्रोहात्मक कृतींनीं व भांडणतंट्यांनीं आपले स्वरूप चांगलेंच उघड केलेलें असेल. वातावरणांत थोडासा असंतोष असेल, त्याचबरोबर अवर्षणहि असेल. इतर राष्ट्रांनीं जर्मनीची या आधीं जी फसवणूक केली, व त्याच्यावर जो अन्याय केला, त्यामुळें जर्मन जनता खवळून उठेल; व तें राष्ट्र पुनश्च एकदां आपल्या पायांवर उभें राहील. लष्कराच्या हालचाली मोठ्या प्रमाणावर सुरू होतील, आणि यांत ब्रिटनचा त्यांना पूर्ण पाठिंबा (पण अंतस्थरीत्या) असेल. आणि आतां इतिहासाची पुनरावृत्ति होणार असें आपणांस वाटूं लागेल.

रशियांतील दृश्यहि यावर्षी भयानकच दिसणार आहे. तेथील सरकार मध्यें मोठा बदल घडून येऊन परराष्ट्रांशीं असणारे संबंधहि पूर्वीपेक्षां निराळेच राहणार आहेत. भाषणांतून ॲटम बाँबचा उपयोग करण्याच्या धमक्या व प्रति–धमक्या देण्याचा उपक्रम सुरू होईल; आणि लोकांना घाबरवण्यासाठीं, आणि त्यांच्या मनोवृत्तींत बदल घडवून आणण्यासाठीं ॲटम बॉम्बच्या 'चाचणी'चें प्रयोग करण्यांत येतील. जर्मनीला अमेरिकेचा चांगलाच पाठिंबा असेल, आणि कम्युनिस्टांकडून जगावर अधिराज्य गाजविण्याचा जो प्रयत्न होत आहे, त्याविरुद्ध एक प्रकारचें वर्गयुद्ध पुकारण्याची तयारी जोरांत चालूं झालेली असेल. युरोप व मध्यपूर्वेतील घटनांचा पडसाद दक्षिण अमेरिकेंत उमटल्याविना राहणार नाहीं. आंतरराष्ट्रीय प्रश्नांत भाग घेण्याच्या मनःस्थितींत दक्षिण अमेरिका या वेळीं असेल. ब्राझिलमध्यें एका ख्यातनाम व्यक्तीचें निधन होईल.

भारतांत मात्र कम्युनिस्टेतरांऐवजीं कम्युनिस्टांविषयींच सहानुभूति व्यक्त करण्यांत येईल; आणि अलिप्तवादाचा डांगोरा पिटणारा सरकारी पक्ष हळूहळू कम्युनिस्टांच्या तावडींत सांपडत चालल्याचें दृश्य दिसेल. परंतु आजच हें निश्चितपणें सांगतां येईल कीं, १९५० च्या आसपास जगांत ज्या तऱ्हेचा साम्यवाद होता तसा साम्यवाद भारतांत निदान २० व्या शतकांच्या अखेरपर्यंत तरी येण्याचा संभव नाहीं. भारताच्या परराष्ट्रीय

धोरणांत पूर्वी जो कांहीं चुकीचा मार्ग अवलंबण्यांत आला, त्याचीं किंमत या पुढील कांहीं वर्षांत भारताला द्यावी लागणार आहे. भांडवलशाहीचा नाश करण्याचे सरकारचे सारे प्रयत्न अयशस्वी होतील आणि ज्योतिषशास्त्रांतील मला थोडेफार कळतें असा जर तुमचा विश्वास असेल, तर हें नमूद करून ठेवा कीं, भांडवलशाहीचा संपूर्णतया नायनाट व तिचें उच्चाटन भारतांतून कधींच होणार नाहीं; निदान २० व्या शतकांचा अंत होईपर्यंत तरी भांडवलशाहीचा अंत होणार नाहीं.

या वर्षी (इ. स. १९६०) पाकिस्तानवरहि बरींच संकटें ओढवणार आहेत, व तेथील सरकारमध्यें बदल घडून येण्याची शक्यताहि मोठीच आहे. पंजाबच्या आसपासच्या प्रदेशांत निसर्गाचा प्रकोप, व त्याचबरोबर राजकारणांतील प्रगतीची वाढ खुंटलेली आहे असें आढळून येईल, उत्तर भारतांत टोळधाड, कमी पाऊस, यांमुळें पिकांचा नाश होईल. जुलैच्या सुरुवातीला महाराष्ट्राच्या जवळपास एक मोठा अपघात होईल.

* * *

# — इ. स. १९६१ —

या वर्षी एकूण चार ग्रहणें आहेत. पैकीं फेब्रुवारी १५ व ऑगस्ट ११ रोजीं सूर्यग्रहणें असून, मार्च २ व ऑगस्ट २६ रोजीं चंद्रग्रहणें आहेत. याशिवाय फेब्रुवारी १९ रोजीं गुरु–शनि युति असून, जून १५ रोजीं मंगळ–हर्षल युति, व ऑक्टोबर १६ रोजीं मंगळ–नेपच्यून युति आहे.

या वर्षाच्या (इ. स. १९६१) सुरुवातीला बाजारभाव उतरूं लागतील. व यानंतर दीर्घकाल टिकणारी—जवळजवळ १९६६ अखेरपर्यंत–मंदी सुरू होईल. दरम्यान १९६२–६३ मध्यें थोडासा चढउतार होईल, व त्यापाठीमागें आंतरराष्ट्रीय राजकारण असेल. त्यांबरोबर रशियांतील अस्थिर वातावरण व तंग परिस्थिति यांचाहि उल्लेख करावा लागेल.

इंग्लंडच्या व विशेषतः ब्रिटिश कॉमनवेल्थच्या पत्रिकेंत कांहीं प्रति-

कूल ग्रहयोग आहेत. कॉमनवेल्थमध्यें समावेश असलेल्या राष्ट्रांत दीर्घकाल सत्ता ठेवण्याचा व आतां आपलें वर्चस्व दाखविण्याचा मूर्खपणा ब्रिटिश सत्ता करील; त्याचबरोबर जगांतील तंग वातावरणाची यांत भर पडेल.

बीं–बियाण्यावर रोग पडल्यामुळें रशियांतील पीकपाणी या वर्षी चांगलें येणार नाहीं; यामुळें निर्माण होणाऱ्या संकटाला तोंड देणें रशियन सरकारला बरेंच कठीण जाईल. फ्रॉन्समध्यें कटकटी निर्माण होऊन सरकार बदलण्याचे यत्न होतील; राष्ट्राध्यक्षाची फेरनिवडणूक करण्यांत येईल, आणि मतांचें पारडें 'डाव्या' पक्षाकडे झुकेल; या सर्वांच्या बुडाशीं निरनिराळ्या पक्षोपपक्षांतील कलह व अंतर्गत कलह असेल. इतकेंच काय पण फ्रान्सचें विभाजन करण्यांत यावें अशा तऱ्हेची भाषा जनता बोलूं लागेल. ब्राझिलचें सामर्थ्यशाली सरकार मात्र कठीण परिस्थितींतून मंत्र्यांचें व लोकनियुक्त सभासदांचें संरक्षण करील. पोर्तुगीज सरकारला संकटांना तोंड द्यावें लागेल.

भारतांत मृत्युसंख्येंत वाढ होईल. पिकांचा अवर्षणामुळें थोड्या प्रमाणांत नाश होईल. त्यामुळें महाराष्ट्र व आसपासच्या प्रदेशांत दुष्काळी परिस्थिति निर्माण होईल. योग्य दिशेनें प्रयत्न करून व यांत्रिक मदत घेऊन सरकारला या परिस्थितीला यशस्वी रीत्या तोंड देणें शक्य आहे. सरकारच्या सनातनी धोरणामुळें जनतेमध्यें मोठ्या प्रमाणावर असंतोषाची भावना निर्माण होईल. भारतामध्यें लष्कराच्या कांहीं हालचाली दृष्टोत्पत्तीस येतील; कारण भारताला परराष्ट्राकडून एखादा धोका निर्माण झाला असेल. अथवा परराष्ट्रांतील सैनिक वा अधिकारी आपल्या राष्ट्राला भेट देण्याच्या मिषानें येऊन, येथें तळ देण्यास योग्य जागा शोधण्याचा प्रयत्न करतील. हें वर्षच तंग वातावरण, अस्थिर परिस्थिति यांनीं भरलेलें असून, याला तोंड देण्याच्या बाबतींत आपले राजकारणी पुढारी कितपत यशस्वी होतील हा प्रश्नच आहे. एक गोष्ट मात्र स्पष्ट दिसते कीं, राज्यसरकार जें कांहीं करील त्यांत परकीयांच्या धोरणाच्या दडपणाचा भाग बराच असेल. सिलोन सरकारच्या धोरणामुळें दक्षिण भारतांत निर्वासितांची आवक वाढेल.

भारतांत एका नवीन प्रकारच्या राष्ट्रीय विचारधारांचा प्रारंभ होत आहे. याची सुरवात याआधींच कांहीं वर्षे झाली असून, या वर्षी त्यानें चांग-

लेंच मूळ धरलेलें आहे. भारतांत कांहीं महत्त्वाचे व गुंतागुंतीचें राजकीय प्रश्न निर्माण होत असून, भारतांतील एक राजकीय पक्ष ते प्रश्न महात्मा गांधींच्या मार्गानें सोडविण्याचें प्रयत्न करील. या वेळीं महात्मा गांधींच्या पूर्वींच्या शिष्यांपैकीं कोणीहि असणार नाहीत. यानंतरचें गांधीजींचे अनुयायी गांधीजींना 'दैवताचें महत्त्व' प्राप्त करून देतील, व लोकांच्यावर त्यामुळें वजन पाडून, हें अनुयायी स्वतःला महत्त्व प्राप्त करून घेतील. परंतु असें आढळून येईल कीं, त्यांना महात्मा गांधीजींच्या तत्त्वांचें नीटसें आकलन कधींच झालेलें नव्हतें; व त्यामुळें ते समाजाला तीं तत्त्वें व्यवस्थित रीतीनें पटवून देऊं शकणार नाहींत. कांहीं वेळां गांधीजी हे भारतांतले ईश्वर असून, ईश्वराचाच ते अवतार आहेत, अशी समजूत प्रचलित होईल. त्यामुळें नवनवीन सिद्धांत प्रस्थापित होतील, व खरे गांधीजी मात्र लोक विसरूं लागतील..... हें एक वैशिष्टयपूर्ण सत्य असलें तरी त्याबरोबरच भारताच्या सामाजिक व राष्ट्रीय जीवनांत त्याचा फार मोठा परिणाम होणार आहे.

फक्त भारतांतच नव्हे तर इतरत्रहि, या वर्षाच्या (1961 A. D.) ऑगस्ट महिन्यांत मोठीं वादळें होणार असून, त्यामुळें वाहतुकींत व्यत्यय येतील व कांहीं अपघात होतील.

सिलोन व मलबार येथील नद्यांना, पावसाळ्याच्या आधींच जोरदार पावसास सुरुवात झाल्यानें, महापूर येतील व बरेंच नुकसान होईल.

* * *

# —इ. स. १९६२—

या वर्षी एकूण दोन ग्रहणें आहेत, आणि तीं दोन्हींहि सूर्यग्रहणें आहेत. एक फेब्रुवारी ५ रोजीं असून, दुसरें जुलै ३१ रोजीं आहे. गुरु-मंगळ युति फेब्रुवारी ७ रोजीं व शनि-मंगळ युति मार्च ७ रोजीं होत आहे. निरीयण पद्धतीप्रमाणें या वर्षी 'गोला' योग आणि 'कालसर्प' योगहि होत आहेत. फेब्रुवारी ५ म्हणजेच माघ शुद्ध प्रतिपदा, सोमवार, विक्रम संवत

२०१८, शके १८८३, रोजीं आठ ग्रह एका राशीमध्यें आहेत. अशी घटना क्वचितच आढळते. प्राय: अशाच तऱ्हेचा योग १९३४ सालीं आला होता; व पुन्हा तो मे, इ. स. २००० मध्यें येईल. त्या वेळीं सात ग्रह एका राशींत आहेत.

या वर्षी फार मोठ्या प्रमाणावर नैसर्गिक उत्पात होणार आहेत. भूकंप ज्वालामुखी, वादळें, अतिवृष्टी मोठ्या प्रमाणावर हिम वर्षाव, मृत्यु-संख्येंत वाढ व भरपूर अपघात यांतच हें वर्ष संपणार आहे. जगांतील लोकांच्या मनांत समाज सुखी व्हावा, अधिक सुसंपन्न व समाधानी बनावा या दृष्टीनें समाजरचना बदलण्याचे विचार येऊं लागतील.




रशिया आणि स्वीडन-नॉर्वे सारख्या स्कँडीनेवियन राष्ट्रांच्या दृष्टीनें हें वर्ष आत्यंतिक महत्त्वाचें आहे. आफ्रिकेचा कांहीं भाग आणि अमेरिका यांना राजकीय व प्राकृतिकदृष्ट्या हें वर्ष महत्त्वाचें आहे. थोडक्यांत, हें वर्ष सामाजिक व राजकीय बदलांचीं मूलभूत कारणें निर्माण करणारें, व अनेक राष्ट्रांत नवीन कल्पना, नवीन ध्येयें व नवीन तऱ्हेच्या सामाजिक पद्धतींना व संस्थांना जन्म देणारें ठरेल. या व १९६४ सालांतील ग्रहयोगांची चर्चा एकत्र करणें इष्ट ठरेल; कारण या तीन वर्षांतील कालावधींतच एकमेकांशीं संबंधित व सुसूत्र अशा सामाजिक व राजकीय चळवळींचा जन्म व प्रसार होईल.

पुष्कळ देशांत गुन्हेगारीची लाट व तसलीं कृत्यें एक नवीन उच्चांक प्रस्थापित करतील. या ना त्या कारणास्तव कांहीं देशांत दुष्काळी परिस्थिति निर्माण होईल, आणि कांहीं भागांत भूकंपामुळें मालमत्तेचें अमाप नुकसान होईल. धमक्या देऊन, भीतिप्रद वातावरण निर्माण करूनच सामाजिक व राजकीय फेरबदल घडवून आणले जातील. कधीं कधीं हिंसात्मक

कृतींचाहि या कामीं वापर करण्यांत येईल. मानवी समाज ज्या कृतींना " गुन्हेगारी " मानतो, अशा कृति या वेळीं होतील, परंतु ती करणाऱ्यांच्या मनांतील हेतु उदात्तच असेल ! एका नवीन समाजाची स्थापना करावयाची, कांहीं सामाजिक पद्धति बदलावयाच्या, अमानुष व अन्यायी चालीरीतींचा नाश करावयाचा, हाच उदात्त हेतु या लोकांच्या मनांत असेल ! अर्थात् नैसर्गिक उत्पातांनीं सर्वनाश झालेल्या प्रदेशांत गुन्हेगारी स्वरूपाच्या कृतीहि नैसर्गिकच वा स्वाभाविकच ठरतील ! कारण सहाय्याची जरूर असणारे व त्रास आणि संकटें यांना तोंड देणारे आपल्या भावनांना, आपल्या इच्छांना दुसऱ्या कोणत्या रीतीनें तोंड फोडूं शकणार !

ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, टास्मानिया व इतर बेटें हीं एकसंघ राज्य-कारभाराच्या कक्षेंत आणून, त्यांचें एक संघ राज्य करावें, व अशा रीतीनें दक्षिण–पूर्व आशियांत आपलें वर्चस्व प्रस्थापित करावें, अशा हेतूनें ऑस्ट्रे-लिया–न्यूझीलंड येथें योजना तयार केली जाईल व त्यामुळें तेथील राज-कीय वातावरण या वर्षीं चैतन्यानें भरलेलें असेल. यापुढें न्यूगिनीवरील डचांचें साम्राज्य संपुष्टांत आलेलें असेल. पॅसिफिक महासागराच्या प्रदेशांत, एक नवीन योजना, धमकीमुळें ( ही धमकी परराष्ट्रांकडून अप्रत्यक्षरीत्या मिळेल ) निर्माण केली जाईल. जपानचें पुनरुत्थान व उत्कर्ष वेगानें होत आहे. चीनच्या राजकारभाराच्या प्रदेशाचा अधिक विस्तार होईल. या सर्वांमुळें नवीन प्रश्न निर्माण होतील. त्यामुळें व चीन–रशिया विरुद्ध एक संघटित राष्ट्रकुल निर्माण करण्याचा कार्यक्रम जोरांत अंमलांत आणला जाईल. न्यूझीलंडच्या प्रदेशांत मोठ्या प्रमाणावर नैसर्गिक उत्पातांची समस्या निर्माण होईल–विशेषत: तूळ रेषेवरील संकटें दुर्लक्षितां येणार नाहींत. दक्षिण आफ्रिकेंतहि संघटनेचे धागेदोरे गुंफले जातील. राजकीय वाता-वरणांतील तंग परिस्थिति व अस्थैर्य यांतून हिंदी जनता नवीन मार्ग शोध-ण्यासाठीं धडपड करील; व लोक सनातनी मतप्रणालीकडे अधिक प्रमाणांत झुकतील; कारण जनतेसाठीं, जनकल्याणासाठीं, जनतेच्याच नांवानें, व गुन्हेगारीच्या वर्तनानें जनतेचें अमाप नुकसान केलेलें असेल.

भारत व आसपासच्या राष्ट्रांत या वर्षीं महापूर आले तरी सर-

कारच्या दक्षतेमुळें व काळजीपूर्वक आंखणीमुळें पूर्वीपेक्षां नुकसानीचें प्रमाण कमी असेल. निसर्गनिर्मित व राजकीय कारणांस्तव महाराष्ट्रांतील जनता असंतुष्ट असेल व तिचा असंतोष अधूनमधून प्रकट होईल. फ्रान्समध्यें एक ख्यातनाम व्यक्ति निधन पावेल. इटलीमध्यें रोमन् कॅथलिक नवीन हाल-चाली करतील व राष्ट्राला जुन्या समाज व धर्मव्यवस्थेकडे खेंचून नेण्याचा प्रयत्न करतील.

प्रत्यक्ष मान्सून सुरू होण्याआधींच पावसास सुरवात होईल. जुलैमध्यें जोरदार वादळें होतील. नोव्हेंबर–डिसेंबरमध्यें कांहीं प्रदेशांत चांगला पाऊस पडेल.

जग मुख्यत्वेंकरून दोन गटांत विभागलें जात आहे. स्वतःच्या धोरणाला मुरड घालून, भीतीमुळें व आर्थिक अव्यवस्थेमुळें राष्ट्रें एकत्र येण्याचा व संघ निर्माण करण्याचा प्रयत्न करतील. रशियाच्या धोरणांत बदल होऊन, तो ' उजव्या ' बाजूकडे झुकेल. एखादी गोष्ट निश्चित करून त्यानुसार वागण्याचा हा काल आहे. आतां चालू केलेली पद्धत ही जवळ–जवळ या शतकांच्या अखेरपर्यंत टिकून राहील. नैसर्गिक, राजकीय वा आर्थिक कारणांमुळें ज्या राष्ट्रांना नवीन ध्येयधोरणें आंखावीं वा स्वीका–रावीं लागलीं असतील, त्यांनीं निश्चित निर्णय घेण्यास हें वर्ष योग्य आहे. मानवाच्या अंतःकरणांत पडद्यामागें मानवयुगाच्या हालचाली सुरू असून, जुन्या संस्कृतींत थोडाफार बदल करून ती टिकवून धरण्याचें धोरण आढळून येईल. या वर्षाच्या घटना कांहीं पृष्ठांत मावण्याइतक्या सामान्य वा लहान नसून, ज्यांची प्रतिक्रिया पुढें कित्येक वर्षें चालू राहील अशा व ' इतिहास ' निर्मिणाऱ्या अशाच आहेत.

* * *

# — इ. स. १९६३ —

या वर्षी एकूण चार ग्रहणांपैकीं दोन सूर्याचीं व दोन चंद्राचीं आहेत. जानेवारी २५ व जुलै २० रोजीं सूर्यग्रहणें असून, जुलै ६ व डिसेंबर ३०

रोजीं चंद्रग्रहणें आहेत. जून ५ रोजीं मंगळ–हर्षल युति, जून २१ रोजीं मंगळ–प्लूटो युति, व ऑक्टोबर २ रोजीं मंगळ–नेपच्यून युति होत आहे.

या वर्षाच्या म्हणजे इ. स. १९६३ (1963 A. D.) प्रथमार्धांत कापसाचे भाव तेजींत असतील. आणि कॅनडांत सरकारी धोरणामुळें व जागतिक राजकारणांतील व्यवहारामुळें बाजाराची परिस्थिति तंग असेल. जूनच्या आसपास, कोणत्या तरी अनाकलनीय रोगामुळें कॅनडामध्यें पुष्कळ लोक मृत्युमुखीं पडतील.

जुलैमध्यें, अरबी समुद्राच्या आसपासच्या प्रदेशांतील अतिवृष्टीमुळें वाहतुकीचे मार्ग उखडले जातील, व मुंबईचे रस्ते महापुरांत सांपडल्या–प्रमाणें दिसतील. फेब्रुवारीच्या प्रथमार्धांत तुर्कस्थान व जवळच्या प्रदेशांत भूकंपाचे धक्के बसतील. परराष्ट्रांशीं संबंध व व्यवहारांत पैशाचा अपव्यय व उधळपट्टी झाल्यानें रशियाच्या राज्यकर्त्यांत अस्वस्थता निर्माण होईल.

ज्या प्रदेशांत गेल्या एकदोन वर्षांत भांडणतंटे व चळवळीचें वातावरण असेल तें नाहींसें होऊन, तिथें सलोख्याचें व शांततेचें वातावरण निर्माण होईल. आर्थिक क्षेत्रांत कांहीं तरी लाभदायक गोष्टी प्राप्त होऊन, अनेक राष्ट्रांत बहुधा अमेरिकेच्या वा कॅनडाच्या मदतीनें आर्थिक योजना तयार करण्यांत येतील. भारतांत व दक्षिण–पूर्व आशियाई राष्ट्रांत आर्थिक पेंच-प्रसंगाला तोंड देतां येण्यासाठीं परकीय राष्ट्रांकडून साहाय्य मिळेल. आजारीपणांमुळें वा खून केल्यामुळें रशियांतील एक महत्त्वाची व्यक्ति या वर्षीं मृत्युमुखीं पडेल. फ्रान्स व इटलीमध्यें राजकीय वातावरण गढूळ असेल, परंतु कॅनडाच्या दृष्टीनें मात्र हें वर्ष अतिशयच महत्त्वाचें आहे.

गेलीं कांहीं वर्षे, हें वर्ष, व यापुढील कांहीं वर्षें आपण कांहीं महत्त्वाच्या शास्त्रीय संशोधनांचा परिचय करून घेऊं शकूं. ‘ उडत्या तबकड्या ’ ह्या वास्तवांतील असून, त्यांची माहिती सामान्य जनतेला ह्या वर्षीं मिळेल. अन्नधान्याच्या क्षेत्रांतहि नवीन संशोधनाची भर पडेल. वैद्यकीय शास्त्रांतहि एका असाध्य रोगावर नवीन व प्रभावी उपायाचें संशोधन केलें जाईल. क्षयरोग व कॅन्सरवरील औषधांचा प्रायः शोध लावला जाईल. वाढत्या लोकसंख्येमुळें अन्नधान्याची भासणारी उणीव दूर होण्याच्या दृष्टीनें या

चार वर्षांत अशाच कांहीं प्रकारचें परिणामकारक संशोधन केलें जाईल. या संशोधनामुळें राष्ट्रांतील बंधुभाव वाढीला लागेल. जलवाहतुकीच्या क्षेत्रांतहि नवीन संशोधन होईल.

१९६० ते १९६५ हा काल मानवी समाज, त्याचें आरोग्य व त्याच्या जरूरी, यांना उपयुक्त अशा शास्त्रीय संशोधनांनीं भरलेला असाच असेल. भारतांत प्रांतीय भावनेचा मुळासकट नाश करण्यासाठीं चळवळी उभारण्यांत येतील, व त्यामुळें केंद्र सरकारचे हात बळकट होतील. प्रांतिक पुढाऱ्यांच्या आजवरच्या चुकांमुळें या वर्षी ही घटना इष्टच ठरणार आहे. भाषिक वाद पुन्हा एकदां जोरानें तोंड वर काढील, व त्या वेळीं सर्व भारताला स्वीकारणीय अशी भाषा कोणती याचा अंतिम निर्णय घेण्यांत येईल. या पांच वर्षांच्या कालांत भारताच्या सामाजिक व राजकीय जीवनांत बरेच बदल होतील आणि हे बदल ऐतिहासिक महत्त्वाचे असून, यानें संस्कृति, ऐक्यभाव व शास्त्रीय प्रगति भारताकडून साधली जाईल.

या कालखंडांत फक्त भारतांतच नव्हे, तर बहुतेक सर्व राष्ट्रांत मानव समाजाला एक संस्कृति असावी, व तो ऐक्यभावानें नांदावा, अशा विचारांना चालना मिळेल. वांशिक व जातीय भावनांचा नाश व्हावा असे प्रयत्न होतील. सर्व मुस्लिम जगत् जागृत होईल, व ढवळून निघेल. १९४० ते १९६० या कालांत ब्रिटिश व अमेरिकन सरकारचीं बाहुलीं असणारीं मध्यपूर्वेंतील राष्ट्रें आतां स्वतःच्या पायांवर उभीं राहून जागतिक प्रश्नांत स्वतंत्रपणें भाग घेण्याची मागणी करतील. या वेळीं हीं राष्ट्रें ऐक्य भावानें संघटित होऊन प्रगति व उत्कर्ष साधून घेतील व त्यामध्यें इजिप्त हें सर्वांवर प्रभुत्व गाजवणारें राष्ट्र असेल. लहान प्रमाणांत राज्यक्रांति होऊन तुर्कस्थानमधील राज्यव्यवस्थेंत व कारभारांत फेरफार होतील. दक्षिण अमेरिकेंतील ब्राझील हा देश आश्चर्यकारक प्रगति करून दक्षिण अमेरिकेंतील मागासलेल्या प्रदेशांत ऐक्य निर्माण करून एका नवीन संघराज्याच्या दिशेनें वाटचाल करील.

* * *

# — इ. स. १९६४ —

या वर्षाच्या एकूण सहा ग्रहणांपैकीं चार सूर्याचीं आणि दोन चंद्राचीं ग्रहणें आहेत. त्यांत १४ जानेवारी, १० जून, ९ जुलै, आणि ४ डिसेंबर रोजीं सूर्यग्रहणें, आणि २५ जून व १९ डिसेंबर रोजीं चंद्रग्रहणें आहेत. शके १८८५, विक्रम संवत् २०२० फाल्गुन शुद्ध प्रतिपदा, शुक्रवार म्हणजे १४ फेब्रुवारी इ. स. १९६४ रोजीं शनि-मंगळ युति होत आहे.

इ. स. १९६४ ( 1964 A. D. ) हें वर्ष पश्चिम पाकिस्तानला कठिण परिस्थितीचा चांगलाच ' अनुभव ' आणून देणारें ठरणार असून, त्याच्या अस्तित्वालाच धोका निर्माण करणारें ठरेल. पाकिस्तानचा राज्यकारभार हांकणारे दुर्बल व देशघातकी लोक परकीयांना ' चंचुप्रवेश ' करण्यास परवानगी देतील; व त्यामुळें आपल्या ' पाक-राष्ट्रा 'ची प्रतिष्ठा (!) आपण वाढवीत आहोंत अशा भ्रामक कल्पनेनें, आपल्या देशांतील परिस्थितींत बदल घडवून आणण्यासाठीं साहाय्य व्हावें म्हणून त्यांना ' हातपाय ' पसरूं देतील. हें बहुधा रशिया व तुर्कस्तान यांच्याकडून घडविलें जाईल; व ही परिस्थिति यापुढेंहि कांहीं काल चालूं राहील. या वेळीं वातावरणांत समाधानकारक बदल घडवून आणण्याचें सहकार्य भारताकडून केलें जाईल.

भारतामध्यें प्रांतभेद नाहींसे करून, सर्व प्रांतांना एकाच कक्षेंत आणण्याच्या आकांक्षा या वर्षी दर्शविल्या जातील. सिलोन, नेपाळ, भूतान, व भारत यांचें एक संघराज्य स्थापन करण्याची महत्त्वाकांक्षी योजना भारतांतील पुढाऱ्यांच्याकडून आंखली जाईल. गेल्या कांहीं वर्षांत भारतानें शेतीच्या क्षेत्रांत फार मोठी सुधारणा व प्रगति केली असल्यानें, या वर्षी त्या दृष्टीनें जागतिक स्वरूपाचें शेतीविषयक मोठें ' प्रदर्शन ' भरविण्याचे प्रयत्न होतील. शेजारी राष्ट्रांत पाहण्यास मिळणार नाहींत अशा सुधारणा, व अशाच प्रकारची प्रगति भारतानें केली आहे असें आढळून येईल. या वर्षीं कॅनडा, अमेरिका,ऑस्ट्रेलिया, ईजिप्त, आणि भारत हीं राष्ट्रें राजकारणाच्या क्षेत्रांत डोळयांत भरण्यासारख्या कृति करून वृत्तपत्रांना वर्षभर ' खाद्य ' पुरवितील.

पुष्कळ राष्ट्रांना या वर्षाच्या मध्याचें आसपास भयानक स्वरूपाच्या नैसर्गिक उत्पातांना वा आपत्तींना तोंड द्यावें लागेल. यंत्रविशारदांना "विचार करावयास लावणारे" वाढते वाहतुकीचें अपघातहि घडतील. मे, जून व ऑक्टोबरच्या शेवटच्या कालांत भयानक स्वरूपाचें भूकंप व ज्वालामुखीचे उद्रेक यांची नोंद करावी लागेल. उत्तर गोलार्धांतील बहुतेक प्रदेशावर वरुणराजाची कृपादृष्टि वळेल; परंतु कांहीं भागांत अवर्षण पडल्याचें वैचित्र्यमय चित्र पाहायला सांपडेल, ऑगस्टमध्यें हिमालयाच्या आसपासच्या प्रदेशांत जोराचा पाऊस पडल्यानें अनेक नद्यांना महापूर येतील. चीनमध्येंहि हाच प्रकार पहावयास सांपडेल.

या वर्षाचें मध्यास जागतिक बाजारांत अचानक व अकल्पित मंदी येईल, आणि ती पुढील वर्षींहि चालू राहील.

या व पुढील वर्षीं पोर्तुगालला मोठ्या संकटाला तोंड द्यावें लागेल; आणि 'डाव्या' पक्षाच्या लोकांकडून कांहीं वसाहती दास्य-शृंखलांतून मुक्त केल्या जातील. कांहीं शास्त्रज्ञ व कांहीं राष्ट्रें सहारा वाळवंटाचें स्वरूप बदलून तेथें शेती करतां येईल अशा स्वरूपाचा प्रदेश निर्माण करण्याचा प्रयत्न करतील; परंतु त्यांत त्यांना पाहिजे तितकें यश मिळणें दुरापास्त दिसतें. राजस्थानमधील 'थार' वाळवंटाचेंहि शेतीला उपयोगी अशा सुपीक प्रदेशांत रूपांतर करण्याचे प्रयत्न होतील; व त्यांत मात्र थोडीबहुत सफलताहि मिळेल.

अमेरिकेमध्यें परकीय हेरांचा सुळसुळाट व वाढती गुन्हेगारी यांमुळें वाहतुकीच्या व प्रवासाच्या मार्गावर भयंकर अपघात होतील; त्याला इतर अनेक कारणेंहि सहाय्यभूत होतील. राष्ट्राच्या जीवनांत पोकळी निर्माण करूं शकणारी व राज्ययंत्रणेंत अधिकाराच्या जागेवर स्थानापन्न असणारी एक सुप्रसिद्ध अमेरिकन व्यक्ति या वर्षीं निधन पावेल. कांहीं कालानंतर



रशिया व अमेरिका यांचे संबंध सुधारतील. भारतांत कामगारांच्या हिताचें रक्षण करणारे कायदे मंजूर करण्यांत येतील. सनातनवादी व सुधारणावादी यांच्यामध्यें भारतांतील घटनांच्या बाबतींत वैचारिक द्वंद्व सुरूं झालेलें दिसेल. निधन अथवा खून यामुळें एका थोर भारतीय सुपुत्राला आपण या वर्षी पारखे होऊं. ऑस्ट्रेलियांत एका नवीन व गूढ रोगाच्या सांथीमुळें प्राणहानि वाढत असल्याचें आढळेल. एरव्हीं राजकीय व आर्थिक क्षेत्रांत ऑस्ट्रेलिया आश्चर्यकारक प्रगति करील. अर्थात् इतकें असूनहि लोकांत असमाधान असल्यानें सत्तारूढ पक्षाला खालीं ओढण्याचें प्रयत्न केले जातील.

भूमिगतांच्या कांहीं चळवळी चालू झाल्याचें आपणांस आढळून येईल. रशिया अफगणिस्तानला गिळंकृत करून बसेल, अथवा पाकिस्तानचे रक्षण करण्यासाठीं अफगाणिस्तान धांवून येईल. आणि या दोन्ही देशांत राजकीय खून व घातपाती कृत्यांना उधाण येईल. भारत व शेजारी राष्ट्रें कांहीं नैसर्गिक उत्पात व अपघात यामुळें वृत्तपत्रांतून प्रामुख्यानें झळकतील. या वेळींहि परिस्थिति आटोक्यांत आणण्यास शास्त्रज्ञांचे श्रम कारणीभूत होतील, आणि त्यामुळें या व पुढील वर्षी त्यांना महत्व प्राप्त होईल. भारतांत व चीनमध्यें नैसर्गिक उत्पातांमुळें निर्माण होणाऱ्या गंभीर परिणामांना तोंड देण्यासाठीं तांतडीच्या उपाययोजना करून कांहीं काल आणीबाणीची परिस्थिति जाहीर केली जाईल.

* * *

## — इ. स. १९६५ —

या वर्षाच्या एकूण तीन ग्रहणांपैकीं मे ३० आणि नोव्हेंबर २३ रोजीं सूर्यग्रहणें, व जून १४ रोजीं चंद्रग्रहण आहे. या वर्षी ऑक्टोबर १ रोजीं फार महत्त्वाची अशी हर्षल–प्लूटोची पूर्ण अंशात्मक युति होत आहे.

मागील वर्षी सुरूं झालेली बाजारांतील आर्थिक क्षेत्रांतील मंदी या वर्षीहि चालू असून, जगांतील विविध विभागांतील पुढारी हे राष्ट्रीय दृष्टया आणीबाणीच्या व महत्वाचा प्रश्न सोडविण्याच्या कामांत गढलले असतील. या आर्थिक संकटामुळें अनेक राष्ट्रांतील सत्ताधीश पक्षांना आसनावरून खालीं ओढलें जाईल, आणि अनेक राष्ट्रांत राज्यक्रांति घडून येईल.

आधींच बिघडलेल्या या परिस्थितीची तीव्रता वाढविण्यासाठींच कीं काय अतिवृष्टि, महापूर यांद्वारें निसर्ग आपलें उग्र स्वरूप जगांतील अनेक ठिकाणीं उघड करील. पाऊस नेहमींपेक्षां आधींच सुरू होईल, व जूनमध्यें वादळें होऊन त्यानें कित्येक ठिकाणीं कहर उडविला जाईल. या वर्षी म्हणजे इ. स. १९६५ ( 1965 A. D. ) मध्यें लोकमत साधारणपणें प्रक्षुब्ध झाल्यानें एक प्रकारें उत्तेजित वातावरण निर्माण झालेलें आहे, व जगाच्या कानाकोपऱ्यांतून महान् संकटें निर्माण झालेलीं आहेत असें आढळून येईल; त्यामुळें ज्याच्या त्याच्या ओठावर "आतां महायुद्ध सुरू होणार काय ? " असा प्रश्न खेळतांना दिसेल. पुढाऱ्यांनीं निर्माण केलेल्या या भीतिग्रस्त वातावरणांतून जनतेला दिलासा देण्यासाठीं नवीन पुढारी निर्माण होतील, व ते यांतून निश्चितपणें मार्ग काढतील.

पण वाईटांत चांगलें एवढेंच कीं, लोकसंख्येंत वाढ व इतर अनेक कारणांनीं अन्नधान्यांत जो तुटवडा निर्माण होईल त्याला तोंड देण्यासाठीं शास्त्रज्ञांकडून परिणामकारक व आश्चर्यकारक शोध लावले जातील. कृत्रिम अन्नाचा उपयोग मोठ्या प्रमाणावर केला जाईल. कांहीं वर्षांपूर्वीं शास्त्राच्या क्षेत्रांतील ज्या कांहीं गोष्टींना आपण अवास्तव व काल्पनिक म्हणून ढकलीत होतों, त्या या वर्षी सत्यसृष्टींत उतरलेल्या दिसतील; व ही प्रगति पुढेंहि चालू राहील. या वेळपर्यंत कॅन्सर व क्षयरोग यांच्यावर रामबाण औषधांचा शोध लागलेला असेल.

ब्राझील व तुर्कस्तानच्या राष्ट्रीय इतिहासांत एका नवीन प्रकरणाला सुरुवात होत असून, राजकीय क्षेत्रांत विविध तऱ्हेचीं व मोठ्या प्रमाणावर स्थित्यंतरें होतील. अर्थात् हा बदल 'चांगल्या' करितांच आहे; आणि जुन्या पुढाऱ्यांनीं केलेल्या चुकांमुळें निर्माण झालेल्या परिस्थितीशीं नव्या रक्ताचें व ताज्या दमाचे पुढारी कशा प्रकारें सामना देतात, हें पाहण्यासारखें असेल. तुर्कस्तानची प्रगति होत असून, जागतिक राष्ट्रसंघटनेंत ब्राझीलहि मानाचें स्थान प्राप्त करून घेतांना दिसेल. आपल्या देशाच्या मर्यादा वाढविण्यांतहि हें राष्ट्र यशस्वी ठरेल. अमेरिकेला एका भयानक संकटांशीं झुंज द्यावी लागेल; आणि त्यामुळें बहुसंख्य भांडवलशाहीप्रधान संस्थांना तग

धरणें कठीण जाईल. अनेक संपत्तिमान्-संस्थांना आपला कारभार बंद करावा लागेल, व त्यांची जागा नवीन संस्था घेतील. कांहीं प्रसंगीं सरकारला तीं कामें आपल्याकडे घ्यावीं लागतील.

कम्युनिस्टांच्या विरोधी भावनांना उधाण येईल; व रशियन साम्राज्याचा सर्वनाश करण्याचे राजकीय कट अधूनमधून रचण्यांत येतील. कांहीं राष्ट्रांत नवीन प्रकारचे कायदेकानू करण्यांत येतील. परंतु वाढत्या बेकारीला त्यानें आळा बसेल कां? मग हे प्रश्न सुटणार तरी कसे ? असे प्रश्न साहजिकच निर्माण होतात; पण त्याचें उत्तर इतिहासकारांच्या कक्षेंत येत आहे; व त्यांनींच मागील वर्षीं सुरू झालेल्या व पुढील वर्षाच्या मध्यापर्यंत चालू असणाऱ्या घटनांचीं नोंद करावयाची आहे. कामगारांसाठीं नवीन कायदे केले जातील व या क्षेत्रांत सुधारणेचीं पावलें टाकलीं जातील. पूर्वीच्या समाजवादी पद्धतीच्या मार्गानेंच या सुधारणेची वाटचाल असेल, मानवाच्या कल्याणासाठीं जी राजकीय व शास्त्रीय प्रगति होणार आहे, त्याचें बीं या वर्षीच पेरलें जात असल्यानें हें वर्ष अत्यंत महत्त्वाचें आहे. राजा व धर्म यांनीं मानवतेच्या विरोधी आणि जनतेच्या आर्थिक व आधिभौतिक प्रगतीच्या विरोधी अशीं जीं कांहीं कृत्यें आजपर्यंत केलीं, त्याच्याविरुद्ध निषेधाची जोराची वावटळ या वर्षी पुनश्च एकदां उठेल.

तथापि हें वर्ष कामगार, वैद्यकशास्त्र, शेती, अन्नधान्य या क्षेत्रांतील सुधारणांमुळें चिरंतन स्मरणांत राहील.

बदललेल्या हवेमुळेंच प्राय: या वर्षाच्या मध्यास अनेक अपघात होतील. यामुळें यंत्रांना ( व मानवालाहि) सुरक्षितता मिळण्याच्या दृष्टीनें यांत्रिक सुधारणा अंमलांत येतील. एप्रिल, मे या दोन महिन्यांत अपघातांच्या प्रमाणांत वाढ होईल. कांहींहि असलें तरी यंत्राची मोडतोड व प्राणहानि करणारे अनेक भयानक स्वरूपाचे अपघात यांनीं हें वर्ष गाजणार आहे.



भारतांत शास्त्रीय क्षेत्रांत अमाप सुधारणा होतील, व सरकारी यंत्रणेंत कांहीं शास्त्रज्ञांना महत्त्वाच्या जागांवर नेमण्यांत येईल. या वर्षाच्या शेवटच्या तीन महिन्यांत सरकारच्या राष्ट्रीय धोरणाविरुद्ध जनमत प्रक्षुब्ध होईल. भाषिक व प्रांतिक प्रश्न आतां निकालांत निघतील; व याआधीं सत्तारूढ पक्षाच्या धोरणामुळें जीं भांडणें निर्माण झालीं होतीं तीं नाहींशीं करण्याच्या दृष्टीनें सर्वांना मान्य होईल अशी एक योजना आंखली जाईल. वर्षाच्या सुरुवातीस सरकार तितकेंसें लोकप्रिय असणार नाहीं. वाहतुकीच्या पद्धतींत कांहीं सुधारणा होतील, व भारताच्या परदेशीं असलेल्या वकिलातींत कांहीं बदल होतील.

मेक्सिकोमध्यें विध्वंसक कृतींनीं व चळवळींनीं तेथील सरकारांत सत्तांतर होईल. शेजारी राष्ट्रांकडून आजपर्यंत मेक्सिकोच्या प्रगतीला खीळ घातली गेली असली तरी या वर्षीं तें भरपूर प्रगति करून घेईल. या वर्षीं दिवसेंदिवस पावसाच्या उणीवेनें देशांत अन्नधान्याचा जो तुटवडा निर्माण होत आहे त्याला तोंड देण्यासाठीं यांत्रिक सुधारणा अंमलांत आणल्या जातील. कांहीं वर्षांनीं मेक्सिकोचें वालुकामय प्रदेशांत रूपांतर होत असल्याचें आढळून येईल. आणि यापासून बचाव करण्याचें एकमेव साधन म्हणजे आत्यंतिक स्वरूपाची शास्त्रीय पद्धति अवलंबिणें ! ऑस्ट्रेलियांतील जनतेंत गुन्हेगारीची वाढ होत असून, राज्यकर्त्या व्यक्तीला पदच्युत करण्याचा अथवा त्याचा खून करण्याचा प्रयत्न केला जाईल; याच्या पाठीमागें मुख्यतः त्याचें अमेरिकेशीं अतिरिक्त प्रमाणांतील सलोख्याचें व अनुनयाचें धोरण असेल.

इतकें असूनहि औद्योगिक व आर्थिक क्षेत्रांत ऑस्ट्रेलियांत या वर्षांत आश्चर्यकारक प्रगति होईल. अनेक राष्ट्रांतील धार्मिक संस्थांना त्यांच्या राजकारणांतील लुडबुडीमुळें या वर्षीं गोते खावे लागतील; आणि अनेक धर्म—संस्थांच्या प्रमुखांना सरकारी रोषाला बळी पडावें लागेल. ज्योतिषशास्त्राच्या क्षेत्रांतहि या वर्षीं अनेक प्रगतीचे टप्पे गांठले जाऊन, नवीन संशोधनाची भर पडेल, व अनेक उपयुक्त ग्रंथांचें प्रकाशन केलें जाईल.

* * *

# — इ. स. १९६६ —

या वर्षी फक्त दोनच ग्रहणें असून, तीं दोन्ही सूर्यग्रहणें आहेत. एक २० मे रोजीं असून, दुसरें १२ नोव्हेंबरला आहे. २२ फेब्रुवारी रोजीं शनि-मंगळ युति आहे, आणि १३ ऑगस्ट रोजीं मंगळ-गुरु युति घडत आहे.

बाजारांतील मंदी अद्याप चालू असून, जीवनाच्या विविध क्षेत्रांत, निरनिराळ्या राष्ट्रांत, निदान या वर्षाच्या जून अखेरपर्यंत तरी, त्याचे परिणाम टिकून राहणार आहेत. त्यानंतर मात्र आर्थिक स्थैर्यासाठीं नवीन योजना आंखल्या जातील. वाढत्या बेकारीनें अनेक राष्ट्रांच्या राजकीय क्षेत्रांत जी महान् समस्या निर्माण झाली असेल, त्यावरहि उपाययोजना करण्याच्या दृष्टीनें प्रयत्न सुरू करण्यांत येतील.

कांहीं महत्त्वाच्या प्रश्नामुळें या वर्षाच्या मध्यापर्यंत अंतर्गत परिस्थिति स्फोटक बनलेली होती, ती विशेषत: जूननंतर आंतराष्ट्रीय महत्त्वाच्या बैठकींना जन्म देईल. आणि लोकांच्याकडून शांततेची मागणी केली जाणार असल्यामुळें, प्रामुख्यानें "शांतता कशी प्रस्थापित करतां येईल ?" याचीच चर्चा होईल. या बैठकींत सर्वमान्य अशा योजना आंखल्या जाऊन भांडण-तंटे निकालांत काढले जातील. या शांततेचें स्वरूप कायमचें नसून तात्कालिक असलें तरी, राष्ट्राराष्ट्रांतील तह, सलोखे, संधि, करार हे कागदावरच रहातात, अथवा वेळ येईल तेव्हां या कागदांना 'कपटयाचीहि किंमत रहात नाहीं' हें इतिहासाच्या अवलोकनावरून आपणांस माहीत असल्यानें, आपण या तात्कालिक शांततेंतहि समाधान मानावें !

मानव-सुधारणेच्या वा संस्कृतीच्या या दीर्घ इतिहासांत आजपर्यंत जे असंख्य करारनामे, समझोत्याचे वा सलोख्याचे संधि झाले, त्यांतील एक शतांशाचें जरी पालन सर्वांनीं केलें असतें, तरी जगाचीं दुःखें फार कमी झालीं असतीं. संधि, सलोखा-करार करणारे पक्ष हे मुत्सद्देगिरीचा कळस करतात, आणि त्यांना अंतःकरणापासून 'आपण याचें पालन करणार नाहीं' या विषयीं संशय नसतो.

तुर्कस्थान, ग्रीस, पोर्तुगाल, ब्राझील ह्या देशांत कांहीं कठीण समस्या निर्माण झालेल्या होत्या, पण आतां त्या निकालांत काढण्याचे मार्ग सांपडलेले असतील. मुस्लिम राष्ट्रांत याआधीं जो प्रक्षोभ माजलेला असेल त्यामुळें संस्कृति व धर्म यांचें जतन करण्याच्या हेतूनें हीं राष्ट्रें संघटित होतील. मागील व चालू वर्षी अमेरिकेनें राजकारणांत महत्त्वाची भूमिका वठविली असली तरी आर्थिक क्षेत्रांतील पीछेहाटीमुळें तिला अधिक कांहीं करतां आलें नाहीं, व तिचें स्थान भरून काढण्यास कॅनडाला पुढाकार घ्यावा लागेल. भारतांत, विशेषतः दक्षिण भारतांत व महाराष्ट्रांत चांगली प्रगति साधली जाईल.

या वर्षी (1966 A. D.) पोलंडमध्यें राजकीय प्रक्षोभ वाढलेला असेल; आणि अन्नधान्याचा तुटवडा व दुष्काळी परिस्थिति यांना तोंड देण्यासाठीं पोलिश सरकारला अधिक जागरूकतेनें व दक्षतेनें लक्ष पुरवावें लागेल. इराणमध्येंहि अन्नधान्याचा तुटवडा निर्माण होईल; पिकें हातीं लागणार नाहींत; आणि त्यांत टोळधाडीची भर पडेल. या वेळीं इराणला रशिया तत्परतेनें मदत करील. हा परिस्थितीचा सामना सरकारकडून युद्धाच्या पायावर केला जाईल; आणि पोलंडमध्येंहि मंत्रिमंडळांत बदल होईल. परकीयांच्या धोरणामुळें सिंध व बलुचिस्तानमधील जनता प्रक्षुब्ध होईल; आणि वर्षाच्या पहिल्या तिमाहींत तेथें एक प्रकारची क्रांति घडून येईल.

नेहमींपेक्षां पाऊसमान अधिक असेल; व वर्षाच्या सुरुवातीस कडाक्याची थंडी व अनेक ठिकाणीं हिमवृष्टि यांनीं झालेला नाश यांची नोंद करावी लागेल. वर्षाच्या मध्यापर्यंत वाहतुकीशीं संबंधित अपघात विपुल प्रमाणांत होतील. मार्च व त्याच्या आसपासचा काल हा राजकीय दृष्ट्या क्षुब्ध वातावरण असलेला, सामाजिक दृष्ट्या समारंभांनीं–मंगल कार्यांनीं भरलेला असा असेल. निरनिराळ्या धर्मपंथीयांचें आंतरराष्ट्रीय स्वरूपाचें एकत्रित संमेलन या वर्षी भरेल, अशी शक्यता दिसते. नोव्हेंबरच्या प्रथमार्धांत दंगेधोपे, अपघात यांच्या बातम्यांनीं वृत्तपत्रांचे रकाने भरतील.

भारतांतील जनतेंत उत्साहाचे वारे खेळत असून, या वर्षी सरकारच्या योजनेंत सारी जनता उत्साहानें व आत्मीयतेनें सहभागी होईल. तथापि

कामगार चळवळी, संप, व निदर्शनें चालूच रहातील. याची कारणें मुख्यत: सरकारचें जागतिक प्रश्नांतील विशिष्ट धोरण, व गेल्या दोन वर्षांतील आर्थिक मंदीनें उद्योगधंद्यांचा केलेला नाश, हींच असतील.

* * *

# — इ. स. १९६७ —

या वर्षी चार ग्रहणें आहेत. पैकीं ९ मे आणि २ नोव्हेंबर रोजीं सूर्यग्रहणें असून, २४ एप्रिल आणि १८ ऑक्टोबर रोजीं चंद्रग्रहणें आहेत. २६ ऑगस्ट रोजीं मंगळ--नेपच्यून युति होत आहे.

ब्रिटन व त्याचीं दोस्त राष्ट्रें पुन्हा एकदां जागतिक राजकारणावर प्रभुत्व गाजविण्याएवढें मानाचें स्थान प्राप्त करून घेत आहेत, व यांत ब्रिटिशांची मुत्सद्देगिरी प्रकर्षानें प्रभाव पाडीत आहे. गेल्या दोन वर्षांत ग्रहांचा अनुग्रह झाल्यानेंच या वर्षी हें यश व वैभव ब्रिटनला प्राप्त होईल.

पूर्वी अनेकवार मीं हें स्पष्ट केलें आहे कीं, ज्योतिषकथन हें निराशावादी मन:प्रवृत्तींना थारा देत नाहीं. "वाईटाच्या शक्यतेचें भय व वाईट घटनांना आपण प्रतिकार करणें" यांत महदंतर आहे. प्रत्येकाला वाईट घटनांची, त्रासाची भीति वाटत असते. परंतु दुसरी बाजू म्हणजे तत्त्वांच्या साहाय्यानें स्वभावाची घडण करणें, भीतीच्या भावनेभोंवतीं विचारांची कडेकोट तटबंदी निर्माण करणें ही होय! ज्योतिषविषयक सावधगिरीच्या सूचनेनें "प्रसंगाला धैर्यानें तोंड देणें!" आपणास सहज शक्य आहे, अशी आपली भावना निर्माण होण्यास मदत होते.

मध्य व दक्षिण भारताचा कांहीं प्रदेश, दक्षिण अमेरिकेचा कांहीं भाग, मेक्सिको व मध्य आफ्रिका या प्रदेशांत गेलीं कांहीं वर्षें पर्जन्यमान कमी कमी होत असून, यापुढील पुष्कळ वर्षेंहि हाच प्रकार चालूं राहील हें अधिकाऱ्यांच्या लक्षांत येईल. यामुळें अनेक कठीण समस्या निर्माण होतील. तथापि गेल्या कांहीं शतकांत मनुष्याला हवेच्या व ईश्वराच्या सहा-

नुभूतीवर वा दयेवर जगावें लागत असे, त्याऐवजीं आतां शास्त्रीय पद्धतींच्या, उपकरणांच्या, संशोधनांच्या सहाय्यानें या प्रदेशाचें संरक्षण करतां येण्याइतपत मानव समर्थ ठरलेला आहे असें आढळून येईल. गेल्या कित्येक शतकांत तिबेटचा प्रदेश अथवा 'जगाचें छप्पर' म्हणून ओळखला जाणारा हा प्रदेश, आइसलँडचा कांहीं भाग, ग्रीनलंड व अलास्का हे प्रदेश लोकवस्तीला निरुपयोगी म्हणून ठरलेले होते. पण या ठिकाणची हवा आतां चांगलीच बदललेली व सुधारलेली असून ती लोकवस्तीला योग्य व उपयोगी ठरत आहे असें शास्त्रज्ञांना समजून चुकेल. हा प्रदेश शेतीला उपयोगी ठरणार असून लोकसंख्या उत्तरेकडे सरकत आहे असें आढळेल.

हा प्रकार असाच अनेक वर्षें चालू राहणार असल्यानें, सत्तेचें स्थलांतर होत असून, प्रत्येक वर्षी रशिया, कॅनडा व चीन अधिकाअधिक सामर्थ्यवान् बनतील. शास्त्रीय संशोधनाच्या साहाय्यानें शेती-पद्धतींत आश्चर्यकारक सुधारणा व प्रगति होईल; व वाढत्या लोकसंख्येची गरज पुरविण्यासाठीं नेहमींपेक्षां निराळे मार्ग अवलंबिले जातील. या घटनांनीं लोकांची मनोवृत्ति खूपच पालटेल; व राजकारणी पुरुषांपेक्षां शास्त्रज्ञांना अधिक महत्त्व दिलें जाईल. गेल्या कांहीं वर्षांतील व यापुढील कांहीं वर्षातील घटनांचा अर्थ समजून घ्यावयाचा असेल तर राष्ट्रांच्या राजकीय व सामाजिक जीवनावर प्रभुत्व गाजविणाऱ्या या मूलभूत गोष्टींचा आपण बारकाईनें विचार करावयास पाहिजे.

१९६० ते १९७० हीं दहा वर्षें म्हणजे शास्त्रज्ञांनीं संपादन केलेल्या विजयाचा व जनतेचें जीवन अधिक सुखी-समाधानी करण्यासाठीं केलेल्या परिश्रमाचा महत्त्वाचा इतिहास ठरेल ! अर्थात् याचा अर्थ शाश्वत सत्यें अथवा मानवी स्वभाव बदलले असा नाहीं ! या शास्त्रीय प्रगतीबरोबरच आध्यात्मिक व पारंपरिक प्रगतीची नोंद करणें आवश्यक ठरेल. हे दोन्हीहि प्रवाह सामर्थ्यवान् व सुसंघटित होतील. प्रत्येक राष्ट्रांत यामुळें दोन महत्त्वाचे प्रश्न निर्माण होऊन, प्रभुत्व मिळविण्यासाठीं, सत्तासंपादनासाठीं त्यांचा झगडा पूर्वीप्रमाणेंच चालू राहील. ...... मग यांत महत्त्व प्राप्त

करून घेणारा पक्ष कोणताहि असो ! तथापि शास्त्रीय व आर्थिक प्रगतीच्या मागें लागलेल्या लोकांच्या कचाटयांतून धर्म व संस्कृति यांचें रक्षण करण्यासाठीं आध्यात्मिक मनोवृत्तीचे लोक शेवटचा सामना द्यावयास उभे राहतील.

या वर्षी दिल्ली व खाटमांडू येथील सरकार सामर्थ्यवान् असलें तरी सनातनी वृत्तीच्या पक्षांकडून त्यांना जोराचा विरोध राहील. भारतांत धार्मिक व सांस्कृतिक स्वरूपाचीं संमेलनें व समारंभ फार मोठ्या प्रमाणावर होतील. मध्यवर्ती सरकारांत एक अहिंदु व एक स्त्री प्रामुख्यानें तळपत राहतील. शैक्षणिक क्षेत्रांत सांस्कृतिक विषयाचा समावेश करण्यासाठीं अभ्यासक्रमांत फेरफार केले जातील. आध्यात्मिक विषयांचा अभ्यासक्रमांत समावेश होईल.

दिल्लींतील केंद्रीय मंत्रिमंडळांत फेरफार होतील. चीन व तिबेटच्या धोरणामुळें व हालचालींमुळें नेपाळ व भूतान या प्रदेशांत संघर्षास सुरुवात होईल. मोरोक्को सरकारला नैसर्गिक आपत्तींशीं झगडावें लागेल. पोलंड आणि इराण येथील सरकारचें आसन स्थिर असलें तरी प्रवासी व परकी-यांच्यावर कांहीं बंधनें घातलीं जातील. आपले गेलेले प्रदेश परत मिळवि-ण्यासाठीं मोरोक्को व अल्जेरियाकडून मागणी केली जाईल; आणि या दोहोंच्या स्थानाबद्दल आंतरराष्ट्रीय स्वरूपाचे गुतागुंतीचे प्रश्न निर्माण होतील. आपल्या मागण्या मान्य करून घेण्यासाठीं येथील लोक हिंसात्मक मार्गांचा वापर करतील, चळवळी करतील; व त्या दडपून टाकण्यासाठीं मोरोक्कोमध्यें पोलीस व लष्कराच्या हालचाली सुरू होतील. या असंतोषांत ईजिप्त व इंग्लंडचा हात प्रामुख्यानें असेल.

कित्येक वर्षापासून डोकेदुखी होऊन राहिलेल्या स्त्रियांच्या रोगांवर अनेक रामबाण उपाययोजना जर्मनींतील शास्त्रज्ञ शोधून काढतील. स्पेनच्या धोरणामुळें व हालचालीमुळें जर्मन-जनमत प्रक्षुब्ध होईल. जर्मनीचे इतर राष्ट्रांशीं व्यापारविषयक नवीन करारमदार होतील. जर्मनीचें पुनरुत्थान करून तें सामर्थ्यशाली राष्ट्र करण्यास जर्मन सरकार फार उत्सुक असेल आणि अंतर्गत कटकटींचा बंदोबस्त करण्यासाठीं अधिक प्रदेश आपल्या वर्चस्वाखालीं आणण्याचा जर्मनीकडून प्रयत्न केला जाईल.

थोडक्यांत, हें वर्ष बहुतेक सर्वच राष्ट्रांना तुलनात्मकदृष्ट्या प्रगतीचें जाईल.

* * *

# — इ. स. १९६८ —

या वर्षी एकूण चार ग्रहणें आहेत; पैकीं २८ मार्च आणि २२ सप्टेंबर रोजीं सूर्यग्रहणें असून, १३ एप्रिल आणि ६ ऑक्टोबर रोजीं चंद्रग्रहणें आहेत. एप्रिलमध्यें शनि–राहु युति होत आहे. २ मार्च रोजीं मंगळ–शनि युति, व ५ नोव्हेंबर रोजीं मंगळ–गुरु युति होत आहे; तसेंच १२ ऑक्टोबर रोजीं गुरु–प्लूटो युति होत आहे.

या वर्षी ब्रिटनमध्यें 'डाव्यां' चें सरकार सत्तारूढ होण्याचा दाट संभव आहे. जर्मनींतहि सरकारमध्यें बदल होणार असून, बर्लिनमध्यें लोकप्रिय सरकार स्थानापन्न होईल. जपान व चीनमध्यें कटकटीं निर्माण होतील. चीनचें परराष्ट्रीय धोरण हें "प्रदेश विस्तृत करण्या"चें असल्यानें इतर सामर्थ्यशाली राष्ट्रांशीं चीनचें वांकडें येईल. हें वर्ष भारताला त्रासदायक असून, त्याच्या परराष्ट्रीय धोरणांत आमूलाग्र बदल झाल्यानें जगांतील इतर राष्ट्रांशीं असणारे संबंध दुरावतील, व ते तीव्रतम होतील. लोकसभेंत 'उजव्यां'चें मताधिक्य असून, सरकारच्या दैनंदिन कार्यावर आर्थिक परागतीमुळें त्यांचें फारच कडक लक्ष आणि दडपण राहील. नवीन राष्ट्रीय कर्ज उभारावें अशी मागणी केली जाईल. चीनकडून या वर्षी भारताला मोठा धोका प्राप्त होत आहे. व भारताचा उत्कर्ष अथवा परराष्ट्रीय धोरणांतील बदल चीनला पाहवणार नसल्यानें त्याचें भारतांशीं वितुष्ट निर्माण होईल. राष्ट्रांतर्गत प्रश्न अयोग्य रीतीनें हाताळले जात असल्यानें भारतीय जनतेमध्यें असंतोष निर्माण होईल. भारत बाहेरच्या भांडणामध्यें प्रत्यक्ष भाग घेईल, व त्यामुळें भारतीय जनता अस्वस्थ होईल.

स्वतःला प्रगतिशील, व उदारमतवादी म्हणवून घेणारे भारतीय कम्युनिस्ट या वर्षी चीनच्या प्रेरणेनें भारतीय सरकारला उलथून पाडण्याचें

( हिंसात्मक ) प्रयत्न करतील, आणि या वर्षी अथवा कांहीं काल आधींच भारतीय मुत्सद्द्यांना असें कळून येईल कीं, चीन अथवा रशिया येथें 'सदिच्छा मंडळें' पाठविण्यांत आपण फार मोठी चूक केली होती. याआधींच्या चुकीच्या परराष्ट्रीय धोरणाची फार मोठी किंमत या वर्षी भारताला द्यावी लागेल. ब्रिटिशांच्या लष्करी हालचाली वाढतील, व त्यांच्या मुत्सद्देगिरीचा विजय होईल. भारतांतील बिघडलेल्या राजकीय वातावरणांत स्थिरस्थावर करण्यांत महाराष्ट्र पुढाकार घेईल, व फार महत्त्वाची भूमिका पार पाडील. त्याची सामाजिक, राजकीय व शास्त्रीय प्रगतीहि डोळ्यांत भरण्यासारखी, इतकेंच नव्हे तर ' दृष्ट लागण्यासारखी ' अशीच असेल.

प्रगति व जागतिक शांतता या कारणास्तव शेजारी राष्ट्रांशीं सलोख्याचे व शांततेचे संबंध राहावेत, म्हणून धडपडणारी एक प्रमुख चिनी पुढारी व्यक्ति निधन पावेल अथवा तिचा खून केला जाईल; आणि त्यामुळें निर्माण होणारी पोकळी " युद्धखोर " व साहसी ( ! ) लोकांच्याकडून भरून काढली जाईल. थोडक्यांत चिनी सरकारांत बदल होऊन युद्धखोर सरकार सत्ताधीश बनेल. वाईट हवामान व पिकांची हानि यांमुळें ब्रिटिशांना त्रास सहन करावा लागेल. पिकांची परिस्थिति असमाधानकारक असून, व लोकांत असंतोष, असमाधान असूनहि तुर्कस्तानची चांगली प्रगति होईल. ऑस्ट्रिया व जर्मनींतील घटनांनीं तेथील सरकार चिडखोर बनेल. केमालपाशानें निर्माण केलेल्या परंपरांचें पुनरुत्थान केलें जाईल. विशेषतः या वर्षाच्या मध्यानंतर तुर्कस्थान जागतिक घडामोडींत महत्त्वाचा भाग घेईल.

शास्त्रीय क्षेत्रांत, विशेषतः शेती, पाटबंधारे, वैद्यकीय, व वाहतुकीच्या क्षेत्रांत आश्चर्यकारक प्रगति होईल; आणि नवीन यंत्रें व पद्धति यांनीं मानवी जीवन सुखी करण्याचा प्रयत्न केला जाईल. मेच्या आसपास भूकंपाचे धक्के व भयानक स्वरूपाच्या अपघातांची नोंद करावी लागेल. या वर्षी ( 1968 A. D. ) बाजारपेठेंतील परिस्थिति जराशी सुधारलेली असेल; विशेषतः वर्षाच्या शेवटच्या दोन महिन्यांत वस्तूंच्या किंमतींत थोडीशी वाढ होईल. जुलै ऑगस्टमध्यें भरपूर पाऊस पडेल, आणि पावसाळा नेहमींसारखाच असेल.

* * *

# — इ. स. १९६९ —

या वर्षी १८ मार्चला एक व ११ सप्टेंबरला एक, अशीं फक्त दोनच सूर्यग्रहणें आहेत. दुसरी नमूद करण्यासारखी गोष्ट म्हणजे जुलैमध्यें हर्षल–गुरु युति आहे. वर्षभर नेपच्यून व प्लूटो एकमेकांशी शुभयोगाच्या कक्षेंत आहेत.

या वर्षी ( 1969 A. D. ) पावसाचें प्रमाण 'साधारण' राहील; कांहीं ठिकाणीं तो नेहमींपेक्षांहि कमीच पडेल; अर्थात् अचानक वादळी पाऊस व कडाक्याची थंडी यामुळें मार्च महिन्याच्या सुरुवातीसच देशाच्या कांहीं भागांत सांथीचे रोग पसरतील. स्त्रिया व मुलें यांच्या बाबतींतील गुन्ह्यांच्या संख्येंत बरीच वाढ होईल, आणि सरकारला अधिक दक्षता घ्यावी लागेल.

या वर्षी एक दुःखद घटना म्हणजे भारत व इतर कांहीं राष्ट्रांतील कांहीं भागांत संपत्तीचा व गुदामांचा नाश करणाऱ्या आगी अचानकपणें लागतील. कांहीं ठिकाणीं या आगींचें मूळ ज्वालाग्राही स्फोटक पदार्थांत असेल, तर कांहीं ठिकाणीं आत्यंतिक उष्णतेंत असेल. विशेषतः अशा प्रकारच्या आगी लागल्याचें वृत्त जगांतील विविध भागांतील वृत्तपत्रांतून आपणांस वाचण्यास मिळण्याचा काल मुख्यत्वेंकरून फेब्रुवारी, मार्च व एप्रिल १९६९ मध्येंच आहे. हा तीन महिन्यांचा काल उलटल्यानंतरच, समाज अथवा सरकार यांच्या मालकीच्या मालमत्तेचें किती नुकसान झालें याचा आढावा घेणें सोयीस्कर पडेल. कांहीं खेडेगांवांची राखरांगोळी झाल्याचें दृष्टीस पडेल.

ब्रिटनमध्ये आर्थिक मंदीची लाट उसळेल, आणि त्याचा परिणाम म्हणून सनातनी किंवा उदारमतवादी, पक्षांकडे राजकारणाचीं सूत्रें जातील. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत कांहीं महत्त्वाच्या बैठकी भरतील. यांचा उद्देश आंतरराष्ट्रीय वातावरणांतील तंगपणा नाहींसा करून, भांडणें मिट-विणें हाच असेल. यावेळीं 'शहाणपणा'चेंच प्राबल्य वाढेल व आत्यंतिक

सनातनी आणि ' डावे ' मलवादी यांच्यांत एक प्रकारचा समझोता घडून येईल.

मध्यपूर्व, युरोप व भारत या ठिकाणीं नेहमींपेक्षां कमी पाऊस पडणार असल्यानें, पिकें समाधानकारक येणार नाहींत, व कोणत्या तरी स्वरूपांत दुष्काळ पडल्याचें अनुभवास येईल. तुर्कस्तान सभोंवतालच्या मध्यपूर्व देशांत, अनागोंदी कारभार, व पोलिस, सैनिक आणि गुंड यांच्याकडून निर्दयतेची वागणूक यामुळें त्या देशांतील जनता त्रस्त झाल्याचें दिसून येईल. परंतु वर्षाच्या मध्यास वा अखेरीस दुष्काळ व प्राणघातक सांथी यांनीं अनेकांची प्राणहानी झाल्याचें व जनतेंत असमाधान पसरल्याचें दिसून येईल. या ना त्या कारणास्तव, या वर्षांतील सुखसंवादी सूर म्हणून प्रांतीय, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतील भांडणतंटे मिटून, शांततेचें वातावरण निर्माण होईल. या वर्षी, इ. स. १९६९, पूर्व भारतांत बऱ्याच कटकटी निर्माण होतील आणि त्यानंतर डाव्या उजव्यांचा विश्वास असलेले लोकच मध्यवर्ति सरकारांत असतील.

* * *

# -- इ. स. १९७० --

या वर्षी एकूण चार ग्रहणें आहेत. पैकीं ७ मार्च व ३१ ऑगस्ट रोजीं सूर्य-ग्रहणें असून; २१ फेब्रुवारी व १७ ऑगस्ट रोजीं चंद्र-ग्रहणें आहेत. शनि-मंगळ युति १६ मार्च १९७० रोजीं होत आहे.

फ्रान्समध्यें विस्तृत प्रमाणावर रक्तपातरहित राज्यक्रांति होणार असून तेथील परिस्थितींत सर्वतोपरी बदल होईल. रशियामध्येंहि क्रांतिकारक चळवळींचा जोर वाढूं लागेल. कामगारांनीं बऱ्याच कालापूर्वीपासून चालू ठेवलेल्या भूमिगत चळवळीला आतां उघड व क्वचित् प्रसंगीं विध्वंसक स्वरूप प्राप्त होईल. कांहीं कालापूर्वी "पोलादी पडदा" फाडण्यांत यश मिळविलें गेलें असलें, तरी बाहेरच्या जगाला रशियांतील दडपशाहीची

व असंतोषाची बातमी मिळूं नये, म्हणून तो पुनश्च एकदां नव्यानें टांगण्यांत रशियन सरकार यश मिळवील. तुर्कस्तानच्या आसपास ऑगस्ट व सप्टेंबरच्या सुरवातीस मोठे भूकंपाचे धक्के बसतील. इराण, जॉर्जिया, सायप्रस, कॉकेशस या प्रदेशांत व त्यांच्या आसपासच्या भूखंडांत, तेथील परिस्थितीबद्दल जनमत असंतुष्ट व प्रक्षुब्ध होईल. शक्तिमान मुस्लीम राष्ट्रें " रशियांतील मुसलमानांच्यासाठीं एक वेगळें व नवीन राष्ट्र निर्माण केलें जावें " अशी जोराची मागणी करतील; परंतु रशिया त्या मागणीला हरताळ फासेल. तथापि अशा प्रकारची विलक्षण चळवळ चालू होईल एवढें खरें !

या वर्षी, इ. स. १९७०, उत्तर गोलार्धांत पावसाळ्यांत नेहमीपेक्षा पावसाचें प्रमाण कमी असेल, तथापि या वर्षाच्या शेवटच्या तीन महिन्यांत कडाक्याची थंडी पडून त्यामुळें उत्तर अक्षांशावरील प्रदेशांत हिमवृष्टि व महापूर यांमुळें लोकांना त्रास सहन करावा लागेल. मार्च, एप्रिल व मे या महिन्यांत व त्याच्या आसपासच्या कालांत, भूकंपांच्या धक्क्यांचे प्रमाण वाढेल, व इटलीच्या आसपासच्या प्रदेशांत ज्वालामुखी आपले स्वरूप प्रकट करतील. या वर्षाच्या प्रथमार्धांत बहुतेक बाजारभावांत चढ–उतार राहील. इराण व इराणजवळील रशियन प्रदेशांत जनता असंतोषानें धुमसत आहे, चळवळींनीं उग्र स्वरूप धारण केलेलें आहे व कांहीं खून पडलेले आहेत, असें दृश्य दिसेल. पोर्तुगालमध्यें चांगलें सरकार सत्तारूढ झालेलें असल्यानें, त्या राष्ट्राच्या परराष्ट्रीय संबंधांत सुधारणा झालेली आहे असें आढळेल.




या वर्षी भारतीय जनतेंत उत्साहाचे वारे वहात असून भारत सरकारच्या परराष्ट्रीय धोरणाला सारी जनता पाठिंबा देईल. भारताची

भरभराट व्हावी, म्हणून नवीन योजना कार्यवाहींत आणल्या जातील; तथापि जातीय वातावरण तंग बनून, जातीय, प्रांतिक अथवा भाषिक मुद्द्यावर थोडे दंगे होतील. ह्या घटना विशेषतः या वर्षाच्या प्रथमार्धांत घडतील; व त्यासाठीं सरकारला वारंवार आणीबाणीची परिस्थिति जाहीर करावी लागेल. कांहीं नामधारी माजी राजे (संस्थानिक) कालवश होतील.

परकीय राष्ट्रांच्या प्रेरणेनें ब्राझीलमध्यें देशविरोधी चळवळी चालू होतील; व जनतेंत असंतोष निर्माण होईल, व प्रक्षोभ माजेल. आपल्या वसाहती आतां ताब्यांत राहिल्या नसल्यानें, पोर्तुगाल ब्राझीलवर दडपण आणण्याचा प्रयत्न करील, त्या वेळीं निर्वासितांचा प्रश्नहि त्या ठिकाणीं निर्माण होईल. ब्राझील व पोर्तुगालमधील घटना जगाचें लक्ष आपल्याकडे वेधून घेतील, व त्या घटनांचा दक्षिण अमेरिकेच्या खंडप्राय प्रदेशावर फार मोठा परिणाम होईल.

रशिया, पोलंड व इतर कम्युनिस्ट राष्ट्रांच्या वृत्तीमुळें व धोरणांमुळें तुर्कस्तानमध्यें अस्वास्थ्य निर्माण होईल.

* * *

## -- इ. स. १९७१ --

या वर्षी एकूण पांच ग्रहणें आहेत. पैकीं २५ फेब्रुवारी, २२ जुलै आणि २० ऑगस्ट रोजीं सूर्य-ग्रहणें असून, १० फेब्रुवारी आणि ६ ऑगस्ट रोजीं चंद्र-ग्रहणें आहेत. गुरु-मंगळ युति २६ जानेवारीला असून मंगळ-नेपच्यून युति २७ जानेवारीला होत आहे. गुरु-नेपच्यून युति १ फेब्रुवारी, २२ मे आणि १६ सप्टेंबर अशी तीन वेळेला होत आहे. मंगळ स्तंभी असल्याकारणानें राहु-मंगळ युतीहि या वर्षी तीन वेळेला होत आहे.

या वर्षाच्या सुरुवातीस तूळ-रेषेच्या दक्षिण भागावर बरेच भूकंप होतील, व ज्वालामुखी जागृत होतील. तांबड्या समुद्रांतील वादळामुळें किनाऱ्यावरील कांहीं बंदरांची नासधूस होईल. फेब्रुवारी व मार्चमध्यें इंग्लिश

खाडीमध्यें मोठीं वादळें निर्माण होऊन त्याचा उपसर्ग पश्चिम युरोपमधील प्रदेशालाहि पोंचणार आहे. या वादळांमुळें मालमत्तेचें बरेंच नुकसान होईल. भारतांत सुद्धां पूर्व व पश्चिम किनाऱ्यावर कोठें तरी किनाऱ्याचा कांहीं भागच समुद्रांत नाहींसा होईल. या बाबतींत आपल्या सरकारनें दक्ष असणें अत्यंत महत्त्वाचें ठरेल. कॅनडांत जुलैमध्यें व आसपासच्या कालांत नेहमीपेक्षां अधिक प्रमाणांत भरपूर पाऊस पडेल. उत्तर गोलार्धांत उन्हाळयांत भयंकर कडक उन्हाळा सुरू होऊन धूळीचीं वादळें होतील. ऑस्ट्रेलियांत उत्पातामुळें मालमत्तेची नासधूस होईल; आणि मार्चमध्ये जगांतील निरनिराळया वाहतुकीच्या क्षेत्रांतील बऱ्याच अपघातांची नोंद करावी लागेल.

वांशिक व धार्मिक चळवळीच्या दृष्टीनें हें वर्ष अत्यंत महत्त्वाचें आहे मध्यपूर्वेतील सिंध, बलुचिस्तान, पख्तुनिस्तान, इराण, इराक, सौदी अरेबिया, सुदान इत्यादि प्रदेशांत एक नवीनच चळवळ सुरू होत असून, धर्मवेडया मुसलमानांची एक संघटना निर्माण होईल; व ती चळवळ गेल्या कांहीं वर्षात आर्थिक व शास्त्रीय वृत्तीमुळें क्षीण होऊं लागलेल्या इस्लामी संस्कृतीचें व धर्माचें पुनरुज्जीवन करण्याचा एक मोठा कार्यक्रम हातीं घेईल.

अमेरिकेंतसुद्धां सरकारकडून सहाय्य मिळविणारी मिशनऱ्यांची एक संघटना जगांतील निरनिराळया प्रदेशांत आपले हातपाय पसरील, व मानवतेचीं मूल्यें टिकवून धरण्यासाठीं ख्रिश्चन तत्त्वांचा प्रचार करील. ब्रह्मदेश व सयाममध्यें बौद्ध धर्माचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न होईल, व त्यासाठी मोठ्या प्रमाणावरील कांहीं धार्मिक समारंभ साजरे केले जातील.

आर्थिक वा आधिभौतिक मूल्यांच्या कचाटयांत सांपडलेल्या मानव जातीची या मगरमिठींतून सुटका करण्यासाठींच, जगांतील मुसलमान, हिंदु बौद्ध, ख्रिश्चन इत्यादि धर्मपंथांतील धार्मिक मनोवृत्तीच्या लोकांच्या वेगवेगळया संघटनांचे प्रयत्न चालू होतील. लोकांच्या वृत्तींत व जीवनविषयक दृष्टिकोनांत बदल घडवून आणण्यासाठीं या संघटना निरनिराळे कार्यक्रम हातीं घेतील, व आधिभौतिक वा इहलौकिक सुखाच्या मागें लागलेल्यांन

आपल्याकडे खेंचून घेण्याचे यत्न करतील. हें वर्ष ही या घटनेची फक्त सुरुवात असून, पुढील अनेक वर्षें ही रस्सीखेंच चालू राहील व लोकांमध्यें अभूतपूर्व उत्साह दिसून येईल. धर्मयुगाची लहानशी आवृत्ति थोडा काल पहावयास सांपडेल; पण त्यांतहि दोन विरोधी वृत्तींमुळें शांततेऐवजीं झगडयाचेंच प्रमाण अधिक असेल.

बेकारीला पायबंद घालण्यासाठीं नवीन उद्योगधंदे, व्यापार इत्यादींत वाढ होत असल्यानें भारताला हें वर्ष ( 1971 A. D. ) चांगलें जाणार आहे असें म्हणणेंच योग्य होईल. भारताचे परराष्ट्राशीं चांगले संबंध असतील. शैक्षणिक पद्धतींत पुरातन संस्कृति व परंपरेचा समावेश करण्यासाठीं आणखी बदल होतील. शेजारी राष्ट्रांच्या धमकावणीमुळें, आणि जातीय वातावरण तंग झाल्यामुळें, अथवा जातीय स्वरूपाचे दंगे झाल्यामुळें भारताच्या पश्चिम व उत्तर भागांत लष्करी हालचाली कराव्या लागतील.

सिंध आणि बलुचिस्तानला शेजारी राष्ट्रांकडून व परकीय सत्तेकडून धोका निर्माण होत असल्यानें त्यांच्या दृष्टीनें हें वर्ष अत्यंत महत्त्वाचें आहे. तथापि तेथें सुद्धां दुर्बल सरकारच्याऐवजीं ताज्या दमाचें सामर्थ्यशील सरकार सत्तारूढ होईल. मुस्लीम जातीयवादाच्या पुनरुज्जीवनामुळें फ्रान्सचे मुस्लीम राष्ट्रांशीं असणारे संबंध अधिकच बिघडतील, व फ्रेंच जनमत प्रक्षुब्ध होईल. स्पेनची थोडीफार प्रगति होत असून, इतर युरोपियन राष्ट्रांचें महत्त्व कमी झाल्यामुळें त्याचा फायदा स्पेन आपली प्रतिष्ठा व आपलें वजन वाढवून घेण्यासाठीं करील.

ब्रिटन व जर्मनी यांच्यामध्यें पुन्हा एकदां नवीन तहनामा घडून येईल. त्याचप्रमाणें मुस्लीम राष्ट्रांशीं त्यांचा नवीन संधि होईल. याचा उद्देश अनुक्रमें राष्ट्रीय भावनेच्या उत्कटतेला व जातीयवादी मनोवृत्तीला पायबंद घालणें हाच असेल. रशियाचें मुस्लीम राष्ट्रांशीं शांततेचे धोरण असेल. आग्नेय आशियांत व भारतांत कम्युनिस्ट अधिक प्रबल होतील व सरकारला ते या वर्षी सतत जोराचा विरोध करतील. मध्यपूर्वेत निर्माण झालेल्या परिस्थितीला काबूंत आणण्यासाठीं फ्रान्स अथवा इटली पुढें सरसावेल. ऑस्ट्रेलिया या वर्षी, चांगलीच प्रगति करीत असून, युरोपां-

तील बिघडलेल्या परिस्थितीचा फायदा करून घेईल. राष्ट्रांतर्गत व्यवस्थेंत व आंतरराष्ट्रीय संबंधांत कॅनडाची उत्तम प्रगति होत असून, त्याची प्रतिष्ठा वाढेल.

याउलट नैसर्गिक व राजकीय करणांस्तव पोर्तुगालची बरीच पीछेहाट होत असलेली दिसून येईल, व तेथें हुकूमशाही पक्ष अथवा एखादा हुकूमशहा सत्तारूढ होईल. जगांतील निरनिराळ्या भागांतील सांस्कृतिक व धार्मिक संस्थांचें पुनरुज्जीवन पाहून रशियांत प्रक्षोभ माजेल, व मध्य-पूर्वेंत आणि युरोपच्या कांहीं भागांत आपली पक्कड अधिक आवळण्यासाठीं रशिया नवीन पेंच अतिशय मुत्सद्देगिरीनें टाकील. या आधारें व या संदर्भानेंच पुढील कांहीं वर्षांतील घटनांचा अभ्यास केला पाहिजे. कारण वर उल्लेखिलेल्या सर्व घटना एकदम आकाशांतून पडणार नसून, त्या सावकाश व एकमेकांशीं कार्यकारणभावानें निगडित अशाच असतील.

* * *

# – इ. स. १९७२ –

या वर्षीं ग्रहणांचा एकूण नंबर व त्यांच्या तारखा यांच्यामध्यें दोन पंचांगांत थोडासा मतभेद आहे. मुख्य पंचांगाप्रमाणें या वर्षीं एकूण चार ग्रहणें आहेत. पैकीं १६ जानेवारी व १० जुलै रोजीं सूर्य–ग्रहणें असून, ३० जानेवारी व २६ जुलै रोजीं चंद्र–ग्रहणें आहेत. ३१ मार्च रोजीं शनि–मंगळ युति आहे.

आर्थिक क्षेत्रांत, सट्टेबाजारांत, शेअरबाजारांत या वर्षीं बरीच सुधारणा होत असून औद्योगिक उत्पादनांत नवीन उच्चांक गांठले जातील. या इ. स. १९७२ आणि पुढील वर्षीं अमेरिका आणि आग्नेय आशियांतील राष्ट्रें खूपच प्रगति करीत असून, औद्योगिक क्षेत्रांत आपली मातृभूमि "भारत" इतकी प्रगति करील कीं, शेजारील राष्ट्रें—विशेषतः मुस्लीम राष्ट्रें, आपला उघड द्वेष करूं लागतील, व भारताशीं वैर धारण करतील. या वर्षाच्या व

पुढील वर्षाच्या कांहीं कालांत इतर कांहीं परकीय राष्ट्रांच्या चिथावणीमुळें मुस्लिम राष्ट्रें व भारत यांच्यामध्यें गैरसमज निर्माण होतील. मुत्सद्द्यांच्या हातांतील बाहुलीं बनलेले पुढारी या आगींत तेल ओततील. तथापि या वर्षाच्या शेवटीं मुत्सद्देगिरीच्या क्षेत्रांत भारत विजयी होईल आणि मनुष्य-निर्मित गैरसमज व भांडणें नाहींशीं होऊन समझोता निर्माण होईल.

या वर्षी ( 1972 A. D. ) उत्तर गोलार्धांतील अनेक प्रदेशांवर चांगला पाऊस पडून पीकपाणीहि चांगलें येईल, परंतु मेक्सिको, इजिप्तचा कांहीं भाग, आणि मध्य भारतांत दुष्काळी परिस्थिति निर्माण होईल. तथापि सरकारच्या तत्परतेनें परिस्थिति कांहीं अंशीं निवळेल. पावसाळ्याच्या आधींच कांहीं काल पावसास सुरुवात होईल, व त्यामुळें अनर्थ ओढवणार नसला तरी पावसाचें प्रमाण जास्त राहील. पाणी-पुरवठा करणारे 'जला-शय' तुडुंब भरून वहातील. या वर्षी एप्रिलच्या सुरुवातीस अचानक जोराचा पाऊस व वादळें होतील.

भारतांत आणि आग्नेय आशियांत नवीन उद्योगधंद्यांची स्थापना होईल, आणि हा प्रदेश अधिकाधिक स्वावलंबी बनेल. चीनच्या हस्तक्षेपाच्या धोरणांमुळें त्याचे रशियाशीं असलेले संबंध या व पुढील वर्षी बरेच बिघड-तील, व या दोन राष्ट्रांत कटकटींना सुरुवात होईल. भरपूर उद्योगधंदे व बेकारीचा अभाव यामुळें चीन सामर्थ्यशाली व सुसंपन्न राष्ट्र होत असून, गेल्या कांहीं वर्षातच आग्नेय आशियांतील बहुसंख्य राष्ट्रांवर त्यांचें चांगलेंच वजन पडत असल्याचें दिसून येईल.

नेपाळ आणि तिबेटमध्यें नवीन उद्योगधंद्यांमुळें बरीच भरभराट होत असून, तेथील जनता सुखी व समाधानी बनेल. चीनच्या मदतीमुळें ब्रह्मदेश आपल्या पायावर उभा राहील, आणि भारत, चीन व जपान यांच्या-मध्यें ह्या प्रदेशावर प्रभुत्व गाजविण्याची अहमहमिका लागेल व त्यांत चीन विजयी होईल असें वाटतें. कांहींहि असलें तरी भारताचे परराष्ट्रांशीं संबंध चांगले असतील, व त्याची प्रतिष्ठा वाढेल. अधून मधून शेजारील मुस्लीम राष्ट्रें तंटे निर्माण करतील. आणि या बाबतींत सर्वस्वी दोषी ती ठरूं शकणार नाहींत; कारण, कांहीं वजनदार आणि जातीयवादी पुढारी आपल्या भाष-

णानें आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत काय परिणाम होतील याचा विचार न करतां कांहीं गैरसमज पसरविणारीं व अदूरदर्शीपणाचीं विधानें करतील. थोडक्यांत आर्थिक दृष्टया भारतासह सगळ्या जगाला हें वर्ष सुखाचें व भरभराटीचें ठरणार आहे.

भारतांत या वर्षीं कांहीं ठिकाणीं मोठ्या आगी व अपघात यांची नोंद करावी लागेल. भारताची औद्योगिक प्रगती व व्यापारी संबंध हे इतर राष्ट्रांनीं हेवा करावा असे असतील. भारताला परकीय पुढाऱ्यांच्या व परकीय राष्ट्रांना भारतीय पुढाऱ्यांच्या भेटी देण्याचे प्रसंग, त्याचप्रमाणें व्यापारी शिष्टमंडळाच्या भेटीची देवाण-घेवाण घडून येईल. एखादें मोठें औद्योगिक प्रदर्शनहि भरविलें जाण्याची शक्यता आहे. भारताची कामगिरी पुन्हा एकदां जगाच्या नजरेंत भरेल. भारताचा परराष्ट्रांशीं व्यापार व दळणवळण यांत या वर्षीं खूपच प्रगति होईल.

या वर्षाच्या प्रथमार्धांत अमेरिकेंत प्रक्षुब्ध वातावरण निर्माण होऊन भयंकर मोठीं निदर्शनें व घातपाती कृत्यें यांच्यामुळें ‘डावे’ गट प्रसिद्धी मिळवितील, आणि कांहीं वेळां आतां सरकार उलथून टाकलें जाईल कीं काय असें जनतेस वाटेल. अमेरिकन राजकारणांतील एका ख्यातनाम पुढाऱ्याचा मृत्यु अगर खून होण्याची दाट शक्यता आहे. रशियामध्यें सामर्थ्यवान् सरकार असल्यामुळें अमेरिकेप्रमाणेंच रशियाचेंहि आशिया व युरोपमधील व्यापारी क्षेत्रांत समान वर्चस्व राहील. इटलीचीहि या वर्षीं चांगलीच प्रगति होत असून पूर्वीच्या अधःपतनांतून या राष्ट्रानें पुन्हा वैभव प्राप्त करून घेतलें आहे असें दिसून येईल. ‘पोप’च्या अधिकाराबद्दल जनतेमध्यें चळवळ सुरू होणार असून ‘पोप’ चें लोकांच्यावरतीं चांगलेंच वजन पडेल, असें ‘रोम’ ची पत्रिका पाहून म्हणावेंसें वाटतें. अर्थात् या वेळीं जनतेवर अमेरिकेचें धोरणहि प्रभाव पाडल्यावांचून राहणार नाहीं. जानेवारी व फेब्रुवारीच्या आसपास इटलीमध्यें, विशेषतः वाहतुकीच्या क्षेत्रांत एक फार मोठा संप होईल.

* * *

# -- इ. स. १९७३ --

या वर्षाच्या एकूण चार ग्रहणांपैकीं एक सूर्यग्रहण खग्रास असून बराच काल टिकणार आहे. ४ जानेवारी, ३० जून आणि २४ डिसेंबर रोजीं सूर्यग्रहणें असून १० डिसेंबर रोजीं चंद्रग्रहण आहे.

जगाची आर्थिक प्रगति चांगल्या रीतीनें होत असून, आग्नेय आशियांतील राष्ट्रांत फाटाफूट होत आहे; व त्यापैकीं कांहीं ऑस्ट्रेलिया व अमेरिकेच्या जोरदार दडपणाखालीं जात आहेत असें या वर्षी दिसून येईल. रशिया आणि स्कॅन्डीनेव्हियन राष्ट्रें औद्योगिक व आर्थिक क्षेत्रांत चांगल्या रीतीनें प्रगत होत आहेत. मे महिन्यांत व त्याच्या आसपासच्या कालांत औद्योगिक उत्पादनाचा व शेअर बाजारांतील तेजीचा उच्चांक गांठला जाईल.

भारत चागल्या रीतीनें प्रगत होत असून मुस्लीम राष्ट्रांबरोबरचे त्याचे संबंध सलोख्याचे राहतील. या बाबतींत सत्तारूढ असलेल्या पंतप्रधानांच्या दूरदृष्टीचें कौतुक केले पाहिजे. 'लोकसत्तात्मक' राज्य म्हणून आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत भारताची प्रतिष्ठा वाढेल व त्याचें परराष्ट्रांशीं संबंध मैत्रीचे असतील. पीकपाणी चांगलें असल्यानें लोक समाधानी असतील. भारताची औद्योगिक व शास्त्रीय प्रगति व्हावी याकडे सरकारचें लक्ष पूर्णपणें असेल; आणि देशाच्या नैसर्गिक संपत्तीचा पुरेपूर उपयोग करून घेण्यासाठीं पाटबंधाऱ्याच्या व शेतकी सुधारणेच्या नवीन योजना हातीं घेतल्या जातील. देशांतील खनिज द्रव्याच्या साठ्यांचा शोध लावण्यांत येऊन भारताच्या संपत्तींत भर टाकण्यांत येईल. भारतीय शास्त्रज्ञ कांहीं नवीन शोध लावून भारताचें नांव जगांत दुमदुमवतील. पूर्व भारतांतील उद्योगधंद्यांची वाढ करण्यासाठीं 'अणु' शक्तीचा उपयोग करण्यांत येत आहे. भारत सरकारच्या तिजोरींत चांगलीच भर पडेल.

ब्रिटन आणि जपान आपल्या बाजारपेठा गमावून बसतील, व इतर राष्ट्रांशीं भांडणें उकरून काढतील. मागील आणि या वर्षी दक्षिण अमेरिकेंत

अर्जेन्टिनानें खूपच प्रगति केलेली असेल. त्याचबरोबर इतर राष्ट्रांच्या सहाय्यानें ऑस्ट्रियानेंहि आपली प्रगति करून घेतलेलीं असेल. या वर्षी म्हणजे इ. स. १९७३ सालीं पावसाचें मान सर्वसाधारण राहील. इजिप्तमध्यें लष्करी पक्ष तंटेबखेडे निर्माण करील, व देशाच्या परराष्ट्रीय धोरणामध्यें दडपण आणण्याचा प्रयत्न करील. जुलैमध्यें आग्नेय आशियांतील राष्ट्रांत हवामान बिघडल्यामुळें अडचणी निर्माण होतील, व त्यांतच भर म्हणून जोरदार पाऊस पडेल. इजिप्तमधील लष्करी पक्षाच्या वृत्तीमुळें सरकारपुढें अनेक अडचणी उभ्या राहातील. असाच प्रकार पण लहानशा प्रमाणांत भारतांतहि दिसून येईल. या वर्षीच्या शेवटीं अथवा पुढील वर्षाच्या सुरवातीस इजिप्तमध्यें ‘ तक्ता पालट ’ होऊन परकीय दडपणाखालील लष्करी प्रमुख सत्तारूढ झाल्याचें परत एकदां निदर्शनास येईल.

ऑस्ट्रेलियाचे परराष्ट्राशीं असणारे संबंध दुरावतील, आणि त्यांतच चीनच्या आणि भारताच्या प्रगतीमुळें अमेरिका त्यांचा द्वेष करूं लागेल. ऑस्ट्रेलिया युद्धाची भाषा बोलूं लागेल. परंतु इतर देशांच्या मध्यस्तीमुळें त्याची ही युद्धगर्जना पोकळ ठरेल. जूनमध्यें अमेरिकेंत भयानक स्वरूपाचे भूकंप, जोरदार पाऊस, व मोठीं वादळें—यामुळें मालमत्तेची मोठ्या प्रमाणावर हानि होईल. परंतु अमेरिकन जनता त्याला मोठ्या धैर्यानें तोंड देईल. आंतरराष्ट्रीय राजकारणांत अमेरिका पुन्हा एकदां युद्धाची भाषा बोलूं लागेल, आणि अर्थहीन प्रश्न निर्माण करील. बहुधा ‘ रिपब्लिकन ’ पक्ष सत्तारूढ होईल; आणि त्याचें धोरण सनातनी वृत्तीचें असेल.

* * *

# — इ. स. १९७४ —

या वर्षी एकूण चार ग्रहणें आहेत. पैकीं २० जून आणि १३ डिसेंबर रोजीं सूर्य-ग्रहणें असून, ४ जून व २९ नोव्हेंबर रोजीं चंद्रग्रहणें आहेत. १९ मे रोजीं शनि-मंगळ युति आहे.

या वर्षी म्हणजे इ. स. १९७४ च्या मे महिन्यापर्यंत बाजारांत तेजीचें वातावरण असेल, आणि वस्तुतः मार्चमध्यें उच्चांक गांठला गेलेला असेल. कारण त्या वेळीं नवीन उद्योगधंद्यांची स्थापना झालेली असेल. आणि प्रथमतः अनेक अफवा उठल्यामुळें वस्तूंच्या किमती जरी कडाडल्या तरी नंतर या अफवा खोटया ठरणार असल्यामुळें, आणि भांडवलवाल्यांनीं व उद्योगपतींनीं उगीचच निर्माण केलेल्या व पोसलेल्या राजकीय प्रश्नांचा समाधानकारक निकाल लागल्यामुळें वर्षाच्या शेवटीं वस्तूंचे भाव परत घसरतील. माणसाच्या मनोवृत्तींत बदल होत नसल्यामुळें, आणि स्वतःच्या फायद्याचाच तो विचार करीत असल्यामुळें आपले हेतु साध्य करून घेण्यासाठीं त्यानें अशा प्रकारची कृती जरी केली तरी त्याला कित्येक लोक गुन्हा समजत नाहींत हें खरें! एप्रिल आणि मेमध्यें युद्धाची भाषा जोरांत बोलली जाईल. आणि त्यासाठीं कांहीं कारणेंहि शोधलीं जातील. अमेरिकेच्या दिग्दर्शनाखालीं ऑस्ट्रेलिया आणि स्पेन या दृष्टीनें महत्त्वाची भूमिका वठवतील.

या वर्षी (1974 A. D.) बहुतेक ठिकाणीं पाऊस साधारणच असेल. परंतु भारतांत व विशेषतः उत्तर भारतांतील प्रदेशांत पावसाळयाच्या आधीं जोरदार पाऊस येतील. दक्षिण भारत, सिलोन, मलाया, सयाम, आणि इन्डोचायना येथील नद्यांना पूर येतील, व मालमत्तेचें थोडेफार नुकसान होईल. वाईट हवेमुळें पिकांचा नाश होण्याची भीति पूर्वी निर्माण झालेली असली तरी, कालव्यांच्या व पाटबंधाऱ्यांच्या विपुलतेमुळें पिकें चांगलीं येतील. जनता उत्साही व सहकार्य देण्यास उत्सुक असेल. भारतामध्यें धार्मिक व सांस्कृतिक स्वरूपाचे उत्सव मोठया प्रमाणावर साजरे होतील, व त्याला देशांतल्या देशांत भरपूर प्रसिद्धी मिळेल. रुग्णालयांच्या संख्येंत वाढ होईल. तुरुंगांतील पद्धतींत सुधारणा होतील, आणि यापूर्वी असलेलीं कित्येक कडक बंधनें काढून टाकलीं जातील.

या वर्षाच्या प्रथमार्धांत अमेरिकेंतील विरोधी पक्षाचें सामर्थ्य वाढत असून, सरकारी पक्षाच्या मार्गांत बऱ्याच अडचणी निर्माण केल्या जातील. कम्युनिस्टांचा अनुनय करण्याच्या धोरणाविरुद्ध व देशांतील अंतर्गत धोरणा-

विरुद्ध विरोधी पक्ष जोरदार आवाज उठवील. ऑस्ट्रेलियामध्यें गुन्हेगारी चळवळींना ऊत येईल. धरपकडीचें सत्र सुरू होईल. सरकार एखादा नवीन कायदा करील, व त्याअन्वयें एखाद्या पक्षावर पूर्णपणें बंदी घातली जाईल. असें असलें तरी आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत ऑस्ट्रेलियाची प्रतिष्ठा वाढेल, व इतर देशांतील अंतर कमी करण्याच्या दृष्टीनें दळणवळणाचे नवनवीन मार्ग व पद्धति अवलंबिल्या जातील.

या वर्षाच्या द्वितीयार्धांत व पुढील वर्षाच्या कांहीं भागांत भारतांतील कापसाच्या किमती भरमसाट वाढतील. याचें कारण इतर देशांकडून भारतीय कापसास भरपूर मागणी असेल, व त्याचबरोबर वर्षाच्या शेवटच्या भागांत अमेरिकेनें युद्धाची भाषा व त्याचबरोबर प्रत्यक्ष तयारी सुरू केलेली असेल. मध्यपूर्वेंत आणि उत्तर आफ्रिकेंत निर्माण झालेल्या नवीनच समस्यांना तोंड देण्यासाठीं अमेरिका आपलें लष्कर तिकडे पाठवील. सरकारकडून 'सिनेट'कडे त्या प्रदेशाला मदत करण्यासाठीं व तेथील समस्या सोडविण्यासाठीं अधिक डॉलर्सची मागणी केली जाईल. अमेरिकेच्या धोरणांत ऑस्ट्रेलियाहि सहभागी होण्याची इच्छा प्रदर्शित करील. मे महि-न्यांत आणि त्याच्या आसपासच्या कालांत अमेरिकन सरकारपुढें अनेक अडचणी निर्माण होतील, व तेथील राष्ट्राध्यक्षांचा खून करण्याचा प्रयत्न डाव्या गटांतील लोकांच्याकडून केला जाईल. इतिहासकारांना असें नमूद करून ठेवावें लागेल कीं, या वर्षी आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत गोंधळाची व त्रासाची परिस्थिति निर्माण करण्यांत प्रामुख्यानें अमेरिका, ऑस्ट्रेलिया व चीन यांचेंच अंग असून, त्यांनीं हें सर्व स्वतःच्या आर्थिक स्वार्थासाठीं केलेलें आहे.

* * *

## -- इ. स. १९७५ --

या वर्षी एकूण चार ग्रहणें आहेत. पैकीं ११ मे व ३ नोव्हेंबर रोजीं सूर्यग्रहणें असून २४ मे व १८ नोव्हेंबर रोजीं चंद्रग्रहणें आहेत. १७ जून रोजीं मंगळ–गुरु युति आहे.

या वर्षी इ. स. १९७५ सालीं उत्तर गोलार्धांत पावसाळा योग्य वेळीं सुरू होईल; परंतु थोडया कालानंतर पावसाचें प्रमाण वाढून जुलै-ऑगस्ट-मध्यें कांहीं नद्यांना पूर येतील. ऑक्टोबर व नोव्हेंबरमध्यें धरणीकंपांची नोंद करावी लागेल. या वेळीं त्यांची तीव्रता जाणवली नाहीं तरी पुढील वर्षी याची भयानकता प्रत्ययास येईल. या वर्षाच्या मध्यास व त्यानंतरच्या कालांत जातीय य वांशिक वातावरण तंग बनल्याचें व जूनमध्यें जगांतील बऱ्याच भागांत तें शिगेला पोंचल्याचें आढळून येईल. ब्रिटनमध्यें सनातनी व उदारमतवादी पक्ष यांच्यांत व्यापारविषयक, अंतर्गत आणि आंतरराष्ट्रीय धोरणाबद्दल एक प्रकारचें द्वंद्व सुरू होत असल्यानें ब्रिटनला हें वर्ष त्रासाचें जाणार आहे.

या वर्षाच्या ( 1975 A. D. ) शेवटच्या भागापासून म्हणजे ऑक्टोबर १९७५ पासून आर्थिक मंदीच्या कालांत आपण प्रवेश करीत असून, तिची झळ पुढील वर्षीहि जाणवेल. या कालांत बाजारांत मोठीच ‘ उलथापालथ ’ होत असून, भरपूर प्रमाणांत निर्मिति करणाऱ्या उद्योगपतींना गिऱ्हाइकांचा तुटवडा भासेल, व गुदामामध्यें माल तसाच पडून राहिल्यानें, पुढील वर्षी कांहीं गिरण्या बंद करण्याची पाळी येईल; व कामगारांच्या संख्येंत बरीच कपात करावी लागेल. यामुळें बेकारीचा प्रश्न डोकें वर काढील. या गोंधळाच्या परिस्थितींत वस्तूंच्या किंमती खालीं आणून, बाजारांत स्थिर-स्थावर करण्यांत फक्त ब्रिटन, जपान व जर्मनी हीं राष्ट्रेंच यशस्वी होतील. इतर राष्ट्रांना मात्र या परिस्थितींतून मार्ग काढण्यास फार वेळ लागेल.

या वर्षी फ्रान्सला अनेक मोठ्या संकटांना तोंड द्यावें लागेल. जनतेमध्यें असंतोष, सरकारमध्यें एकसारखे बदल, असे प्रकार दोन वर्षें चालू राहणार असून, फ्रान्सची साम्राज्यसत्ता संपूर्णपणें विलयाला गेल्याचें आपणांस पहावयास सांपडेल. गेल्या दोन वर्षांतील आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतील तंग परिस्थितीमुळें सोसावें लागलेलें नुकसान, आणि वाढती बेकारी, यामुळें इटालियन जनतेंत असंतोष पसरून कांहीं दंगेधोपे व चळवळी सुरू होतील.

सनातनी पक्षाचें परंतु सामर्थ्यशाली सरकार असलेल्या भारताला मात्र हें वर्ष अपवादात्मक चांगलें आहे. कारण हें सरकार मजुरांच्या हिता-पेक्षांहि राष्ट्रीय संपत्तींत भर टाकण्याकडे आणि भारताची औद्योगिक व शेतकी क्षेत्रांत प्रगति होण्याकडे अधिक लक्ष पुरवील. अर्थात् याचबरोबर कामगारांत असंतोष निर्माण होत असून, वर्षाच्या पहिल्या तीन महिन्यां-नंतर एक मोठा संप घडवून आणला जाण्याचें भय निर्माण होईल. राष्ट्रीय पुढारीच हा प्रश्न कसा हाताळावयाचा हें ठरवूं शकतील व्यापार व उद्योग-धंद्यांत आतां खूपच वाढ झालेली असली तरी ' मंदी 'चीं चिन्हें दिसूं लागतील; पण या वेळींहि सरकार परिस्थिति काबूंत आणण्याचे सर्व प्रयत्न करील, व मंदी आटोक्यांत येईल; आणि निदान या वर्षीं तरी परिस्थितीवर मात करण्यांत सरकारनें यश संपादन केल्याचें सुखदायक दृश्य पाहावयास मिळेल. लोकसभेंतील वातावरण या वर्षीं चांगलेंच तापलेलें असेल; व कडाक्याचे वादविवाद होऊन कांहीं सभासद आपला पक्षहि बदलतील. याचें कारण सत्तारूढ सरकारचें हुकूमशाही धोरण हेंच असेल. ब्रम्हदेशाचीहि प्रगति चांगल्या प्रकारें होईल !

इराणमधील सामर्थ्यशाली सरकारला अंतर्गत प्रश्नांना व कटकटींना तोंड द्यावें लागेल. पण अखेरीस तें परिस्थितीवर मात करील. इराणच्या आसपासच्या प्रदेशांत अन्नधान्याचा तुटवडा निर्माण होईल. मोरोक्कोंतील राज्यप्रमुखाचा मृत्यु अथवा मोरोक्कोंत मोठी दंगल उडून, शत्रूंशीं युद्ध करण्याबाबतच्या प्रश्नावर खडाजंगीची चर्चा होईल. सत्ताधीश पक्षाच्या प्रश्न हाताळण्याच्या वेडगळ धोरणामुळें त्या पक्षांत गोंधळ निर्माण होईल. या राष्ट्राच्या शत्रुसंख्येंत वाढ होईल, आणि एक मोठा संप घडून येईल. या वर्षीं पोलंडमध्यें गोंधळाचें व अस्थिरतेचें वातावरण निर्माण होऊन, विरोधी पक्षांना दडपण्यासाठीं लष्करी हालचाली केल्या जातील. त्याच-प्रमाणें वर्षाच्या शेवटच्या भागांत जनतेंतील प्रक्षोभ शांत करण्यासाठीं फौजी कानून पुकारण्यापर्यंत पाळी येईल.

आर्थिक मंदीमुळें ऑस्ट्रेलियांतील गुन्हेगारीच्या कृत्यांत भर पडेल, व सरकारी तिजोरींत तितकीशी भर पडणार नाहीं. एका सरकारी प्रमु-

त्याचा खून करण्याचा प्रयत्न होईल. या वर्षापासून मुस्लीम राष्ट्रें बरीच प्रगति करीत असून त्यांचा कल " डाव्या " पक्षाकडे झुकूं लागलेला असेल. त्यांच्यातील धर्मवेड्या भावनांचा आतां अंत झालेला आहे असें आपल्या निदर्शनास येईल.

* * *

# -- इ. स. १९७६ --

या वर्षी एकूण तीन ग्रहणें आहेत. पैकीं २९ एप्रिल व २३ ऑक्टोबर रोजीं सूर्यग्रहणें असून, १३ मे रोजीं चंद्रग्रहण आहे. ११ मे रोजीं शनि–मंगळ युति आहे.

या वर्षी म्हणजे इ. स. १९७६ मध्यें भारताच्या पुष्कळ भागांत एप्रिल आणि मे महिन्यांत भलत्याच वेळीं पावसाळी वादळें व पावसाच्या जोरदार सरी येतील. दक्षिण भारतांतील कांहीं नद्यांना या वेळीं पूर पण येतील. या वर्षाच्या मध्यास बाजारांतील भाव आश्चर्य वाटावें इतके गडगडतील. १९७६ सालांतील बाजारांत होणारी ही दुसरी मंदी होय.

एकाच महिन्यांत दोन ग्रहणें आणि 'कालसर्पयोग' यामुळें व्यक्तिगत आणि राष्ट्रीय जीवनाच्या दृष्टीनें हें वर्ष संकटांनीं व त्रासांनीं ग्रासलेलें आहे असें म्हणावें लागेल. अवेळीं पडलेल्या जोरदार पावसामुळें पिकांचें कांहीं प्रमाणांत नुकसान होईल. जागतिक मंदीमुळें व्यापारी क्षेत्रांत अनेक राष्ट्रें 'जीवघेणी' चढाओढ करतील, व त्यामुळें आंतरराष्ट्रीय परिस्थिति तंग बनेल.

या वर्षाच्या ( 1976 A. D. ) पहिल्या तिमाहींत कॅनडामध्यें देशद्रोही कृत्यें, भांडणतंटे, व खून मारामाऱ्या यांना ऊत येईल व जनतेच्या मागणीमुळें कदाचित सरकारहि पण बदललें जाईल, अर्थात या पाठीमागें आर्थिक कारणेंहि आहेतच. मोरोक्को आणि टचुनिशियामध्यें राजद्रोही राजकीय कृत्यांमुळें आंतरराष्ट्रीय वातावरण तंग बनून त्याबद्दल फ्रान्सच्या

माथ्यावर या दोषाचें खापर फोडलें जाईल. या वर्षाच्या मध्यास भयानक स्वरूपाच्या भूकंपांचीं व गंभीर स्वरूपाच्या अपघातांची नोंद करावी लागेल. नवनवीन शोध लावले जाऊन विमान वाहतूक, जलवाहतूक व जमिनीवरील प्रवासाच्या साधनांत व पद्धतींत सुधारणा केल्या जातील. त्याचप्रमाणें आर्थिक मंदीमुळें पुष्कळ राष्ट्रांना आपली अर्थव्यवस्था व पद्धति यामध्यें बदल करावा लागून तीं समाजवादाकडे झुकूं लागतील. आर्थिक तुटवडयाला तोंड देण्यासाठीं श्रीमंत लोकांच्यावर जबरदस्त कर बसविले जातील. परंतु यामुळें प्रश्न न सुटतां डावे पक्ष अधिकच प्रबल होतील, व कांहीं बाबतींत ते सत्ताहि काबीज करतील असें आपणांस दिसून येईल. इराणच्या आसपासच्या प्रदेशांतील तेल धंद्याची व्यवस्था जरी आजपर्यंत समाधानकारक होती तरी या वर्षी व्यापारांतील समतोलत्व बिघडल्यामुळें या धंद्यावर मोठा परिणाम होईल. पोलंडमध्यें पिकांची थोडीफार हानि होईल. कॅनडा आणि अमेरिका येथील सरकार गडगडेल, आणि या वर्षी तेथें निवडणुका घेतल्या गेल्यास विरोधी पक्षीय बहुमतानें दणदणीत विजय मिळवितील.

भारतामध्यें सामर्थ्यशाली सरकार सत्तारूढ असून नवीन आर्थिक योजनांच्या सहाय्यानें देशाची प्रगति व्हावी असा तें प्रयत्न करील. परंतु सरकारच्या विरुद्ध कांहीं कट रचण्यांत येतील, आणि एखाद्या प्रमुख सरकारी अधिकाऱ्याचा खून करण्यांत आल्यामुळें देशांत अशांतता निर्माण होईल. मध्यवर्ति सरकारांत एक स्त्री या वर्षी प्रामुख्यानें भाग घेईल. संस्कृति आणि सुखसोयी यांसाठीं भरपूर खर्च करण्याच्या सरकारी धोरणामुळें एक विशिष्ट गट सरकारला जोरदार विरोध करील व या खर्चांत कपात करण्याची मागणी करील. सरकारला उलथून टाकण्याच्या कटाचा सुगावा लागून अनेक लोकांची धरपकड होईल; आणि या कटाशीं संबंध असलेल्या संघटनेवर तात्पुरती का होईना बंदी घातली जाईल. शैक्षणिक धोरणांत आणखी नवीन सुधारणा केल्या जातील. करमणुकीच्या क्षेत्रांतहि नवीन दालनें राष्ट्रीय जीवनांत उघडलीं जातील.

* * *

# -- इ. स. १९७७ --

या वर्षी एकूण तीन ग्रहणें आहेत; पैकीं १८ एप्रिल व १२ ऑक्टोबर रोजीं सूर्यग्रहणें असून, ४ एप्रिल रोजीं चंद्रग्रहण आहे. ५ सप्टेंबर रोजीं मंगळ--गुरु युति होत आहे.

या वर्षी म्हणजे इ. स. १९७७ मध्येंहि बाजारांतील मंदी चालू असून विशेषतः ती वर्षाच्या प्रथमार्धात जाणवेल. त्याचप्रमाणें पुन्हां पुढील वर्षाच्या मध्यास त्याची जाणीव होईल. पुढील वर्षी सप्टेंबरपासून वस्तूंच्या किंमती सर्वसाधारण स्थिर होऊं लागतील व बाजारांत स्थिरस्थावर होईल. या वर्षाच्या म्हणजे इ. स. १९७७ च्या पहिल्या तिमाहींत आर्थिक संकटाबरोबर वाहतुकीच्या क्षेत्रांतील अपघात व नैसर्गिक उत्पात यांची भर पडेल. त्यांत भर म्हणूनच कीं काय मे महिन्यांत वादळें व वावटळी यांच्यामुळें वहातुकीमध्यें अनेक वेळां अडथळे निर्माण होतील. युरोपिअन राष्ट्रांत जपानमध्यें आणि त्याच्या जवळच्या प्रदेशांत मे महिन्याच्या मध्यास कांहीं भूकंप होतील.

या वर्षी पाऊस सर्वसाधारणच असेल. तथापि कांहीं ठिकाणीं पुरांची पुनरावृत्ति होईल. फ्रान्स, इटली, आणि थोड्याफार प्रमाणांत महाराष्ट्रांत अनिश्चित हवामानामुळें नैसर्गिक आपत्ति उद्‌भवतील.

जून आणि जुलैमध्यें जगातील पुष्कळ ठिकाणीं जागतिक वातावरण तंग होईल अशा प्रकारचे अंतर्गत भांडणाचे प्रसंग निर्माण होतील. तथापि हीं भांडणें विशिष्ट प्रदेशापुरतींच मर्यादित रहाणारीं असून, जागतिक महायुद्धाची शक्यता दिसत नाहीं. अर्थात अनेक राजकारण-धुरंधरांच्या मनांत गोंधळ उडालेला असेल, व जागतिक महायुद्धाचा भडका आतां लवकरच उडणार असें त्यांना वाटूं लागेल. अशा प्रकारच्या कटकटी निर्माण करणारे प्रदेश कमीअधिक प्रमाणांत युरोप व आफ्रिका हे असतील. या कटकटींचा संबंध ऑस्ट्रियांशीं असेल. आणि त्यांचा निकाल लावण्यासाठीं आंतरराष्ट्रीय स्वरूपाच्या बैठकी व्हिएन्नामध्यें भरतील.

देशांतील दारिद्र्य आणि असंतोष यांचा समूळ बीमोड करण्यासाठीं ऑस्ट्रियाला या वर्षीं परकीयांची मदत घ्यावी लागेल. जर्मनीमध्यें सामर्थ्यशाली सरकार असून तें आपल्या व्यापाराचें क्षेत्र अधिक व्यापक करील. जर्मनींत जवळपासच्या प्रदेशांतील प्राणिमात्रांत एका नवीन रोगाचा प्रसार होईल आणि त्याकडे शास्त्रज्ञाचें लक्ष वेधलें जाईल. त्याचप्रमाणें जर्मन समाजांतील स्त्रियांच्या मृत्यचें प्रमाण या वर्षीं बऱ्याच प्रमाणांत वाढणार आहे. अर्जेंटिना या वर्षीं इतर कांहीं राष्ट्रांशीं व्यापारविषयक नवीन करारमदार करणार असल्यामुळें त्याचे शेजारील राष्ट्रांशीं असलेले संबंध अधिकच बिघडतील. परकीय वकिलातींच्या देशांतील हालचालींबद्दल वाटेल त्या वावड्या उडविल्या जातील. अर्जेन्टिनानें आतांपर्यंत चांगली प्रगति केलेली असून, त्याचें राजकीय व औद्योगिक स्वरूप अंतर्बाह्य बदलत असलें तरी शेजारच्या ब्राझील या शत्रु राष्ट्राशीं त्याला स्पर्धा करणें कठीण जाईल.

भारतामध्यें अणुशक्ती उपाययोजनांच्या क्षेत्रांत अधिक प्रगति होईल. देशांतील शेतकीच्या परिस्थितींत भरपूर सुधारणा करण्याचे प्रयत्न सरकार करीत असून महापुरापासून कोणत्याहि प्रकारचें कसलेंच नुकसान होऊं नये यासाठीं काय योजना करतां येईल याचा सरकार विचार करील. महापुरानें चीनमध्यें या वर्षीं हाहाकार उडविल्यामुळें तेथेंहि भारताप्रमाणेंच या बाबतींत जोरदार योजना चालू असतील. या वर्षीं भारतांत कांहीं सार्वजनिक इमारती आगीच्या भक्ष्यस्थानीं पडल्याचें आणि कांहीं जहाजांना व रेल्वेंना अपघात झाल्याचें वृत्त आपणांस ऐकावयास मिळेल. नैसर्गिक आपत्तीमुळें भारताचें एक जहाज पूर्व समुद्रांत नाश पावेल. पुष्कळ अपघातांच्या पाठीमागें कटांचे धागेदोरे असतील असा संशय बळावेल. मंदिरांच्या आणि देवालयांच्या बाबतींतील अनास्थेमुळें जनता प्रक्षुब्ध होईल, व त्यामुळें त्यांची दुरुस्ती आपल्या खर्चानें करण्याचें सरकार ठरवील.

* * *

# — इ. स. १९७८ —

या वर्षीं एकूण चार ग्रहणें आहेत. पैकीं ७ एप्रिल व २ ऑक्टोबर रोजीं सूर्यग्रहणें असून, २४ मार्च व १६ सप्टेंबर रोजीं चंद्रग्रहणें आहेत. ३ जून रोजीं शनि–मंगळ युति होत आहे.

या वर्षीं, इ. स. १९७८, भारतांतील शेतकरी आपल्या सरकारच्या विरुद्ध प्रक्षोभ माजवितील. तथापि यामुळें निर्माण होणाऱ्या परिस्थितीला सरकारकडून यशस्वी रीतीनें तोंड दिलें जाईल. व्यापारांत वाढ, अधिक विस्तृत कार्यक्षेत्र, आणि पूर्व भारतांत नवीन उद्योगधंद्यांची स्थापना, यामुळें भारत उत्कर्षाच्या व भरभराटीच्या दिशेनें आगेकूच करीत असून, या वर्षीं सरकारी तिजोरी तुडुंब भरलेली असेल. भारतांतील स्त्री–कामगारांचें जीवन सुधारण्याकडे सरकार लक्ष पुरवील. या वर्षाच्या मध्यास भरपूर पीकपाणी हातीं आल्यानें सुखी, समाधानी व समृद्ध भारताचें चित्र डोळ्यापुढें उभें राहील. सरकारविरोधी पक्ष सुसंघटित असून, सरकारी कार्यक्रमावर त्यांची करडी नजर राहील. भारतांतील मजूर–संघटनाहि सुसंघटित स्वरूपांत पहावयास सांपडतील.

चिनी सरकारविरुद्ध देशामध्यें कांहीं देशहितविरोधी चळवळी चालू असतील. या वर्षाचें हवामान चिनी जनतेला प्रतिकूल असून, कांहीं नैसर्गिक आपत्तीमुळें हे लोक अधिकच संत्रस्त होतील. ब्रह्मदेशांत पिकांची नासधूस होईल व एखादा रोग फैलावेल. ब्रम्हदेशाचे परराष्ट्रांशीं असणारे संबंध बिघडतील, व विशेषत: भारताच्या बाबतींत त्यांत कटुता निर्माण होईल. भारतविरोधी धोरणाबाबत सरकारी पक्षांत मतभेद निर्माण होऊन प्रक्षोभ माजेल.

युरोपमध्यें या वर्षीं बऱ्याच ख्यातनाम व्यक्तींचें, विशेषत: धार्मिक संस्थांच्या प्रमुखांचें निधन होईल. पोर्तुगालला या वर्षीं ब्रिटिशांच्याकडून बराच उपद्रव सोसावा लागेल. या त्रासांतून आपली कातडी बचाविण्या-साठीं ब्रिटिशांच्या मागणीपुढें मान तुकविण्याचा एकमेव मार्ग पोर्तुगीजांना

मोकळा राहील. दमास्कसमध्यें या वर्षीं एक वैचित्र्यपूर्ण आणि वैशिष्टयपूर्ण दृश्य दिसत आहे. उत्तरेकडील अथवा वायव्येकडील एक सामर्थ्यशाली राष्ट्र दमास्कसमधील सरकारला त्याच्या आज्ञेप्रमाणें राज्यकारभार चालवावयास लावील, व दमास्कसच्या सरकारनें या आज्ञांचें पालन करण्यांत कुचराई केली तर त्यासाठीं तेथें लष्कर आणून ठेवण्यासहि हें राष्ट्र मागें-पुढें पहाणार नाहीं. कम्युनिस्टांचें अथवा मास्कोचें दडपण अथवा दिग्दर्शन यामुळें या ठिकाणीं बऱ्याच कटकटी निर्माण होतील. तेलाच्या प्रश्नावरील करारनाम्याबाबत मतभेद निर्माण होऊन पूर्वीचे संबंधांचा अंत होण्याची शक्यता आपण नजरेआड करूं शकत नाहीं.

महाराष्ट्रांत शैक्षणिक धोरणाविरुद्ध मोठा आवाज उठविला जाईल, व त्याचबरोबर चित्रपटगृहांच्या प्रश्नावरून असंतोषाचें वातावरण व दंगल निर्माण होईल. जूनच्या आसपास महाराष्ट्रांत एखादा मोठा संप झालेला पहावयास सांपडेल. फ्रान्सच्या परराष्ट्रीय धोरणाची स्तुति केली जात आहे, त्याचे परराष्ट्रीय संबंध खूपच सुधारले आहेत, व देशांतहि सुखसमृद्धि आहे–असें आल्हाददायक, दृश्य दिसेल. याउलट, या वर्षाच्या मध्यास इराणमध्यें कांहीं कटकटी निर्माण होतील.

आंतरराष्ट्रीय राजकारणाचें सुखदायक चित्र पहावयाचें असल्यास, या वर्षाच्या दुसऱ्या सहामाहीची मार्गप्रतीक्षा करणें इष्ट ठरेल ! मुस्लीम राष्ट्रांच्या बावतींतील कांहीं प्रश्नांचें " भिजत पडलेलें घोंगडें " आतां निकालांत निघालेलें दिसेल. या प्रश्नाचा समाधानकारक निकाल लावण्यांत कांहीं राष्ट्रें यश संपादन करतील. या वर्षाच्या शेवटच्या तिमाहींत थंडीचें प्रमाण बरेंच वाढेल, व अवेळीं पाऊस पडेल. या वर्षाच्या हिवाळ्यांत मद्रासमध्यें चांगलाच पाऊस पडेल. उत्तर गोलार्धांत पावसाळा नियमित व सर्वसाधारण असेल. बाजारपेठेंत स्थैर्य व उद्योगधंद्यांत प्रगति यामुळें हें वर्ष व्यापारी मंडळींना बऱ्यापैकीं जाईल. जलवाहतुकीच्या क्षेत्रांत बऱ्याच सुधारणा घडून येतील.

* * *

# — इ. स. १९७९ —

या वर्षी एकूण चार ग्रहणें आहेत. पैकीं २६ फेब्रुवारी व २२ ऑगस्ट रोजीं सूर्यग्रहणें असून, १३ मार्च व ६ सप्टेंबर रोजीं चंद्रग्रहणें आहेत. १४ डिसेंबर रोजीं मंगळ–गुरु युति होत आहे.

या वर्षाच्या इ. स. १९७९ सुरुवातीला कापसाच्या किमतींत बरीच वाढ होईल. भारत सरकारला हें वर्ष सुखावह जाणार नसून कित्येक प्रश्नांवर सरकारी धोरणाचा वा पक्षाचा पराभव होईल. कोणा एका परकीय सत्तेच्या भारतविरोधी कारवायांबद्दल व धोरणाबद्दल भारताच्या सरकारी पक्षांतील मंडळीमध्यें प्रक्षोभ निर्माण होऊन, त्या परकीय सत्तेच्या विरुद्ध भारतानें उघड उपाययोजना करून (Direct Action) कानपिचक्या द्याव्यात, असें त्यांचें मागणें असेल. कांहीहि असलें तरी भारतीय सरकार सामर्थ्यशाली असून, खंबीर धोरणानें वागेल. त्याचें उत्पन्नहि या वर्षी चांगलेंच राहणार आहे. मात्र या वर्षाचें पीकपाणी तितकेंसें चांगलें नसल्यानें अनेक वस्तूंच्या किमतींत कांहीं कालापर्यंत बरीच वाढ होईल. या वर्षी कांहीं खनिज द्रव्यांचा व खाणींचा शोध लावण्यांत येईल, पण त्याचबरोबर खाणीकामगारांच्याकडून कांहीं कटकटी निर्माण केल्या जातील. त्याचप्रमाणें या वर्षी कांहीं नैसर्गिक उत्पातांना आपणांस तोंड द्यावें लागेल.

युरोप व आफ्रिकेच्या कांहीं भागांत या वर्षी अवर्षण पडेल, व वादळामुळें मालमत्तेची हानी होईल. ग्रीसला हें वर्ष त्रासदायक जाईल. रशियाचे परराष्ट्रीय संबंध या वर्षी सलोख्याचे असतील; जागतिक राजकारणांत एक महत्त्वाचा व मुत्सद्देगिरीचा विजय रशियाकडून संपादन केला जाईल. भूमध्य समुद्राच्या किनाऱ्यावरील कांहीं बंदरांना या वर्षी धोका निर्माण होत आहे. ब्राझिलमध्यें गुन्हेगारींत वाढ होत असून सरकारला भंडावून सोडण्याचे कार्यक्रमांतहि वाढ झालेली दिसेल. तथापि ब्राझिलचें सरकार या कटकटींना पुरून उरेल. रोममधील पोपच्या हालचालींबद्दल बरीच जोराची टीका होईल, आणि त्याच्याविरुद्ध लोकमत खवळलेलें

असल्यामुळें परराष्ट्रांमध्यें त्याचा गैरफायदा घेतला जाईल. इटालीच्या सरकारविरुद्ध जनमत प्रक्षुब्ध असेल; आणि सरकारी पक्षांत व राज्यकर्त्यांत गोंधळ माजलेला असेल. फ्रान्सची या वर्षी चांगलीच प्रगति होईल. महाराष्ट्रहि प्रगतिपथावर असून, कांहीं कालापूर्वी ज्या पुढाऱ्यांनीं पक्षांतर केलें असेल ते आपल्या पूर्वीच्या पक्षांत येतील व देशाची सेवा पूर्ववत् करूं लागतील. पोर्तुगालमधील एक ख्यातनाम व्यक्ति कालवश होईल.

भारतांत कांहीं ठिकाणीं अवर्षण पडणार असल्यामुळें सरकारला कठीण प्रसंगाला तोंड द्यावें लागेल. या वर्षाच्या मध्यानंतर एका राजकीय प्रश्नामुळें आंतरराष्ट्रीय स्वरूपाचा पेंचप्रसंग निर्माण होऊन, मध्यपूर्वेत युद्धाची भाषा उघडपणें बोलली जाईल. आग्नेय आशियाच्या बदललेल्या धोरणावरून त्यांतील कांहीं राष्ट्रांना ऑस्ट्रेलिया धमकी देईल. या वर्षाच्या द्वितीयार्धांत, बाजारपेठेंत स्थिरस्थावर झालेली असेल, व नवीन पद्धतीचें अवलंबन केल्यामुळें उद्योगधंद्यांचीहि प्रगति होत असल्याचें पाहावयास मिळेल. उत्तर भारतांत मे महिन्यांत पुष्कळच वादळें होतील, व धुळीच्या वावटळींनीं रहदारीच्या मार्गांत वारंवार अडथळे येतील; तथापि अपघातांचें फारसें भय बाळगण्याचें कारण दिसत नाहीं. भारतांत पावसाळा सर्वसाधारण असेल, असें दिसतें.

* * *

# — इ. स. १९८० —

या वर्षी फक्त दोन सूर्यग्रहणें आहेत. एक १६ फेब्रुवारी रोजीं असून दुसरें १० ऑगस्ट रोजीं आहे. ५ मे रोजीं गुरु—मंगळ युति आहे, आणि २२ जून रोजीं शनि—मंगळ युति होत आहे.

गेल्या कांहीं वर्षांपासून भारताच्या राजकीय व सामाजिक जीवन-प्रवाहाला जें एक नवीन वळण मिळालेलें आहे, त्यांत इ. स. १९८९ पर्यंत कोणताहि विशेष बदल होणार नाहीं. त्यानंतर मात्र प्रमुख ग्रहांकडून या

जीवनप्रवाहाला निराळें व भयंकर स्वरूप प्राप्त करून दिलें जाईल; प्रगतीचा वेग मंदावेल; आणि जें जें कांहीं लिहिलें जाईल त्याचा अर्थ जरा बदलून घ्यावा लागेल. इ. स. १९८९ नंतरच्या सर्वच लिखाणाचा विचार गंभीरपणें करणें क्रमप्राप्त ठरेल.

या (1980 A. D.) आणि पुढील वर्षी असे कांहीं ग्रहयोग आहेत की ज्यांचे परिणाम जवळ जवळ पुढील शंभर वर्षें तरी टिकून राहतील. विसाव्या शतकांतील चीनच्या इतिहासांतील चढउतारांवरून व अस्थिर वातावरणावरून चिनी लोकांनीं जे धडे घेतले, व आजची परिस्थिति प्राप्त करून घेण्यासाठीं त्यांना ३५ वर्षांहून अधिक काल संकटांशीं झुंजावें लागलें तें अशाच प्रकारच्या ग्रहयोगामुळें होय हें लक्षांत घ्यावें. चीनचा कांहीं भाग तूळेच्या व कांहीं भाग कुंभेच्या स्वामित्वाखालीं येत असल्यानें, आशियांतील मानव जातीच्या इतिहासांत चिनी लोक फार महत्त्वाची भूमिका वठवतील हें निःसंशय ! चिनी जनतेचा उत्कर्ष, व त्याचबरोबर मागील कांहीं कालांतील कांहीं भारतीयांचीं देशविरोधीं कृत्यें यामुळें भारताचा 'उत्कर्ष' डोळ्यांत भरणार नाहीं. २५–३० वर्षांपूर्वी भारतांत फार मोठें नेते निर्माण झाले असूनहि, त्याची दूरदृष्टि अपुरी ठरल्यामुळेंच चीनचा सध्यांचा उत्कर्ष झालेला आहे, असें या वर्षी म्हणतां येईल. त्या भारतीय नेत्यांच्या कोत्या दृष्टिकोनाचा चीनला अप्रत्यक्ष फायदा झाल्याचें आपणांस या वर्षी कळून चुकेल.

चीनच्या उदाहरणावरून ब्रह्मदेशानें योग्य तो धडा घेतलेला आहे, असें दिसून येईल. मुस्लिम राष्ट्रांनीं सुसंघटित होऊन जो उत्कर्ष प्राप्त करून घेतलेला असेल, तशाच प्रकारचा उत्कर्ष प्राप्त करून घेण्यासाठीं त्यांच्या पावलावर पाऊल टेवून दक्षिण आशियांतील राष्ट्रें मुत्सद्देगिरीचा व सांस्कृतिक समानतेचा आश्रय करून, राजकारणाच्या दृष्टीनें सुसंघटित होतील. या राष्ट्रांत प्रामुख्यानें बौद्ध धर्माचे अनुयायी असल्यानें भारताला वगळून, हीं राष्ट्रें 'एक' होतील. भारतांत भिन्न धर्मीयांची वस्ती असल्यानें त्याला बौद्ध, मुस्लिम वा ख्रिश्चन धर्माच्या श्रेष्ठत्वाचें महत्व पटवून जनतेंतील ऐक्यभावनेला आवाहन करतां येणार नाहीं; आणि त्याचबरोबर

हिंदुत्वावरची निष्ठा कमी होऊन हिंदु धर्माचा ऱ्हास होत चालल्यानें त्याची फार कठीण अवस्था होईल.

राजकीय दृष्टचा अतिशय धूर्तपणानें वागणाऱ्या व तत्त्वज्ञानाचा गाढ अभ्यास असणाऱ्या एका सामर्थ्यवान् पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं चीनमध्यें एक मोठी संघटना निर्माण होईल व हा पुढारी आशियांतील बहुसंख्य राष्ट्रांतील भेदभाव नाहींसा करून सर्वांची एक प्रबळ संघटना तयार करील. जुन्या चालीरीति, परंपरा, कायदे यांची हकालपट्टी करण्यांत येऊन, या गटांतील राष्ट्रांमध्यें सांस्कृतिक, सामाजिक, धार्मिक, व आर्थिक ऐक्यभाव निर्माण करण्यांत येऊन त्यांच्या या हक्कांचें संरक्षण करण्यांत येईल; अर्थात् या सर्वांच्या मुळाशीं वैभवशाली चीनचें वर्चस्व राहणार आहे, ही गोष्ट लक्षांत घ्यावी लागेल.

या वेळपर्यंत अनेक शास्त्रज्ञांच्या हें ध्यानांत आलेलें असेल कीं, शास्त्रामध्यें इतक्या सुधारणा करूनहि आणि मानवाच्या जीवनांत सुखाची मोठ्या प्रमाणांत निर्मिति होऊनहि सांस्कृतिक, भौगोलिक, व सामाजिक परंपरेवरील लोकांची श्रद्धा फारशी कमी झालेली नाहीं. याचाच अर्थ अध्यात्मवादानें शास्त्राचा थोड्याफार प्रमाणांत पराभव केलेला आहे असें आढळून येईल. राजकीय दृष्टिकोनांतून एखाद्या राष्ट्रांतील घडामोडींचा वा घटनांचा अभ्यास करतांना व निष्कर्ष काढतांना, शास्त्र व अध्यात्म या दोन गोष्टी वेगळ्या करतां येत नाहींत असें प्रत्ययास येईल. इ. स. १९५० च्या सुरुवातीस चीनचे कायदेकानू जितके ‘ कम्युनिस्ट ’ ( नास्तिक ) थाटाचे असतील तितके ते यावेळीं असणार नाहींत. परंतु या असंख्य व अवाढव्य गोष्टींना समतोल प्राप्त व्हावा म्हणून ज्याचा उपयोग करण्यांत येईल ती गोष्ट जरा रुंद ‘ पाया ’वर अधिष्ठित असेल. निरनिराळ्या प्रकारच्या जनसमूहांतील सर्वांना समानतेनें आवडतील व योग्य होतील अशाच गोष्टींच्या आधारें हीं राष्ट्रें एकत्र येतील. हे समान गुणधर्म वा कायदे कोणते याचा विचार एवढ्या थोड्या जागेंत करतां येणें कठीण आहे. अर्थात् हें घडून येण्यापूर्वी चीनमध्यें खूपच उलथापालथ झालेली असेल, व यापुढील कालांतहि या संघटनेंत स्वतःच्या वैयक्तिक स्वार्थासाठीं कांहीं पुढारी कलह

निर्माण करतील, अधून मधून संघटनेशीं द्रोह करतील हें सत्य नाकारतां येणार नाहीं. कारण कांहींहि झालें तरी मनुष्याचा स्वभाव बदलत नाहीं हें शाश्वत सत्य आहे.

या वर्षी, म्हणजे इ. स. १९८० मध्यें, उत्तर गोलार्धात पावसाळा नियमित व सर्वसाधारण असेल. बाजारांत स्थिरस्थावर राहील, व औद्योगिक आणि आर्थिक क्षेत्रांत प्रगति होईल. ही प्रगति निदान ऑक्टोबर अखेर चालू राहील. शेतीच्या क्षेत्रांतहि भरपूर प्रगति होणार असून, कांहीं नवीन औषधांचा शोध लावला जाईल.

मार्च, सप्टेंबर, व ऑक्टोबरचे आसपास भारतांत व जवळपासच्या कांहीं ठिकाणीं भूकंप होतील व त्यामुळें भारतीय व भारताच्या शेजारील जनतेचें थोडेंसें नुकसान होऊन त्रास होईल. भारताचे परराष्ट्रांशीं चांगले संबंध राहतील व व्यापाराच्या क्षेत्रांत नवीन संबंध प्रस्थापित होईल. या वर्षाच्या द्वितीयार्धांत भारतांत कांहीं ठिकाणीं गोंधळाची व दंगलीची परिस्थिति निर्माण होईल त्याला तोंड देणें सरकारला जरा कठीणच जाईल. वर्षाच्या उत्तरार्धांत सरकारी तिजोरींत घट उत्पन्न झाल्यानें राष्ट्रीय कर्ज उभारलें जाईल. कांहींहि असलें तरी सरकारची लोकप्रियता कमी होणार नाहीं.

रशियांतील कामगारांत अस्वस्थता निर्माण होऊन 'सरकार' मध्यें बदल केला जावा, अथवा सरकारच्या कांहीं धोरणांत बदल करावा अशी मागणी कामगार करतील. रशियाच्या व्यापारावर प्रतिकूल परिणाम होईल, परंतु कांहीं कालानंतर मुत्सद्देगिरीच्या धोरणामुळें व्यापाराचीं नवीन क्षेत्रें उघडीं होतील. शेजारी राष्ट्रांच्या द्वेषपरिपूर्ण वृत्तीमुळें फ्रान्स सरकारला संकटांना तोंड द्यावें लागेल. मे महिन्यांत पृथ्वीच्या पाठीवर अनेक ठिकाणीं गंभीर स्वरूपाचे अपघात, वादळें, आणि अग्निप्रलय यांची नोंद करावीं लागेल.

* * *

# — इ. स. १९८१ —

या वर्षी एकूण तीन ग्रहणें असून ४ फेब्रुवारी व ३१ जुलै रोजीं सूर्य-ग्रहणें आहेत, व १७ जुलै रोजीं चंद्रग्रहण आहे. १ जानेवारी, ८ मार्च, आणि २४ जुलै अशा तीन वेळेला गुरु–शनि युति होणार आहे.

मध्यपूर्वेत, विशेषत: जेरुसलेम व मक्का येथें 'हाज'चे वेळीं गेल्या वर्षी सांस्कृतिक स्वरूपाचे मोठमोठे उत्सव व परिषदा भरल्याचें आपण पाहिलेंच असेल ! या प्रदेशांतील कांहीं देशांनीं ग्रीक संस्कृतीचें पुनरुज्जीवन करण्याच्या दृष्टीनें गेल्या वर्षी कांहीं बैठका भरविल्या असतील ! जेरुसलेम, तुर्कस्तान, ग्रीस, व त्याच्या जवळपासचा प्रदेश हा जागतिक चर्चेचा विषय बनलेला असून, सांस्कृतिक व धार्मिक स्वरूपाच्या परिषदा व बैठकी यांनीं येथील वातावरण भरून गेलेलें होतें हें गेल्या वर्षाचा इतिहास आपणांस सांगत असेल. एका विशिष्ट आणि समान हेतुसाधना-साठीं मुस्लीम, ख्रिश्चन, आणि इतर धर्मपंथीयांनीं निरनिराळ्या संस्कृति व धर्म यामध्यें सलोखा नांदेल अशी योजना तयार करण्याचे जोर-दार प्रयत्न गेल्या वर्षी केले होते आणि त्यांच्या या प्रयत्नांना फल येत असल्याचीं चिन्हें या वर्षी दिसूं लागतील. गेल्या वर्षी, पॅरिसमध्यें जी बैठक भरली होती, ती दीर्घकाळ स्मरणांत राहील.

SOLAR ECLIPSE
JULY. 31ST, 1981
BANARAS
(BHARAT)
Sayan-Map
By
Indoomati

या वर्षी म्हणजे इ. स. १९८१ मध्यें, चीन, ब्रह्मदेश, भारत, नेपाळ, व तिबेट या देशांतील दळणवळणाच्या मार्गांत सुधारणा करण्यांत येतील; आणि गेल्या कित्येक शतकांत अपरिचित अशा ठिकाणीं नवीन रस्ते बांधण्याच्या योजना आंखण्यांत येतील. अशा रीतीनें आग्नेय

आशियांतील राष्ट्रें ‘जवळ जवळ’ येतील, आणि व्यापाराची वाढ होऊन या राष्ट्रांचीहि भरभराट होईल.

या वर्षी (1981 A. D.) भारतांत मिश्र सरकार असेल, व तें सामर्थ्यवानहि असेल. जमिनीच्या बाबतींत कांहीं नवे कायदे करण्याचे या सरकारकडून प्रयत्न केले जातील. तथापि देशांतील भांडवलवाल्यांचें उच्चाटन करण्याच्या प्रयत्नांना यश मिळणार नाहीं. रशियन सरकारपुढें या वर्षी संकटांचें ताट वाढून ठेवलेलें असून, जनतेच्या वाढत्या विरोधाला त्याला तोंड द्यावें लागेल. फ्रान्स व आसपासच्या प्रदेशांत वाईट हवामानामुळें अन्नधान्याचा तुटवडा निर्माण होईल; पीकपाणी चांगलें येणार नाहीं. त्याचप्रमाणें वर्षाच्या प्रथमार्धांत वाईट हवामानामुळें चिनी समुद्रकिनाऱ्या-जवळ कांहीं जहाजें बुडतील व बरेंच नुकसान होईल. भारतीय सरकार सामर्थ्यशाली राहणार असूनहि, “घरच्या दुही” मुळें लोकसभेंतील काम-काजांत सुरळीतपणा राहणार नाहीं. ऑस्ट्रियामध्यें परकीय लष्करांच्या हालचाली सुरू होतील, व जर्मनीचें त्याच्याशीं बरेंच मोठें वितुष्ट येईल असें दिसतें. लष्कराच्या दडपशाहीमुळें तेथील जनतेला फार त्रास सहन करावा लागेल. बनारसच्या आसपास कांहीं लोकांचा शोकजनक अंत होईल व त्यामुळें जनतेंत प्रक्षोभ निर्माण होईल. मेक्सिकोमधील एक प्रसिद्ध व्यक्ति कालवश होईल.

मोठ्या प्रमाणावर संहारक ठरणारीं अशीं कांहीं तुफान वादळें, ऑगस्ट व सप्टेंबरच्या आसपासचे कालांत पृथ्वीच्या पाठीवर कांहीं प्रदेशांत होतील. बाजारभाव प्रथम स्थिर असतील, परंतु वर्षाच्या उत्तरार्धांत एका ‘महत्त्वाच्या प्रश्ना’ चा समाधानकारक निकाल लागल्याच्या अफवेमुळें शेअर बाजारांत घसरगुंडी सुरू होईल.

या वर्षी दळणवळणाच्या वा वाहतुकीच्या पद्धतींत बरीच प्रगति होईल, आणि यांत्रिक क्षेत्रांतहि सुधारणा झाल्याचें दिसून येईल. सामाजिक व राजकीय क्षेत्रांतहि घडामोडीमध्यें ‘समतोलत्व’ राखलें गेल्याचें प्रत्ययास येईल. मात्र महाराष्ट्रांत कांहीं भागांतील लोकांच्या गुन्हेगारीच्या कृत्यांनीं जनतेंत अस्वास्थ्य निर्माण होईल.

* * *

# -- इ. स. १९८२ --

या वर्षी एकूण सात ग्रहणें आहेत. २५ जानेवारी, २१ जून, २० जुलै, आणि १५ डिसेंबर रोजीं सूर्यग्रहणें असून, ९ जानेवारी, ६ जुलै, ३० डिसेंबर, रोजीं चंद्रग्रहणें आहेत. ६ जुलै रोजीं शनि-मंगळ युति आहे, ७ ऑगस्ट रोजीं गुरु-मंगळ युति, आणि ४ नोव्हेंबर रोजीं शनि-प्लूटो युति होत आहे.

वर उल्लेखिलेल्या ग्रहणांमुळें व युतीमुळें हें वर्ष म्हणजे (इ.स. १९८२) चैतन्यानें व हालचालींनीं भरलेलें असून, वैयक्तिक जीवनांत, राष्ट्रीय घडामोडींत, व आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत अनेक फेरबदल होऊन व त्यांची पुनर्रचना व फेरजुळणी करावी लागेल असें स्पष्ट दिसतें. परकीय राष्ट्रांशीं असणाऱ्या संबंधांना सुरळीत मार्गावर ठेवून, आपल्या साम्राज्यांतील वसाहतींच्यावर चांगलें नियंत्रण ठेवण्यासाठीं कॅनडाला आपल्या राष्ट्रांतील जनतेवर अधिक कर बसविणें भाग पडेल. भारतांत मृत्युसंख्येचें प्रमाण बरेंच वाढेल, व राज्यकारभार हांकणाऱ्या पक्षांत गोंधळ व अस्थैर्य निर्माण होईल. इतकें असूनहि भारतीय जनता मात्र सहनशीलतेनें वागून कित्येक गोष्टींत सरकारशीं सहकार्य करील. तथापि केंद्रसरकारमध्यें या वर्षी बरीच उलथापालथ होईल. जनतेवर या वर्षी नवीन ' मृत्यु-कर ' बसविले जातील. देशामध्यें चोरीमारीचें प्रमाण वाढून गुन्हेगारींत भर पडेल; यामुळें अनेक लोक हवालदिल होतील. सरकारला ही परिस्थिति आटोक्यांत आणण्यास बराच कालावधि लागेल; व यामुळें सरकारवर जोराची टीका होईल.

कांहीं ख्यातनाम व्यक्तींच्या निधनामुळें रशियांतील जनता शोकमग्न होईल, आणि मास्कोमध्यें ध्वज "खालीं" केला जाऊन, राष्ट्रीय शोकदिन पाळण्यांत येईल. परंतु या निधनापाठीमागें "अनैसर्गिक मृत्यु"चीं कारणें आहेत, याची कल्पना असल्यानें रशियन जनता सरकारचा तिटकारा करूं लागेल.

पंजाबमध्यें संकटांची मालिका सुरू होत असून, विशेषतः राजकीय कटकटीमुळें जनमत दोन विरोधी वळणांनीं वहात असल्याचें व मोठीं निद-

र्शनें होणार असल्याचें स्पष्ट दिसत आहे. यावर उपाय-योजना म्हणून वर्षाच्या मध्यास " मार्शल लॉ "—लष्करी कायदा पुकारण्यांत येईल, व धरपकडीचें सत्र सुरू होईल. या वर्षाच्या शेवटच्या भागांत कांहीं प्रश्नांचा निकाल असमाधानकारकपणें लागल्यानें कॅनडा खवळून उठेल, व वसाहतीशीं युद्ध पुकारण्याची भाषा बोलूं लागेल. अंतर्गत प्रश्नांमुळें कॅनडाच्या सरकारला ' घरगुती ' संकटांनाहि तोंड द्यावें लागेल. ऑस्ट्रेलियाची ' राष्ट्रीय–प्रकृति ' चांगली राहणार नाहीं. वाईट हवामान, नैसर्गिक उत्पात व मृत्युसंख्येंत वाढ, या गोष्टींमुळें कॅनडांतील जनता हवालदिल होईल. सरकारला जोरदार विरोधाला तोंड द्यावें लागून, सत्तारूढ पक्षाला पदच्युत करण्याची गुप्त कट रचण्यांत येईल.

अमेरिकेचा एक जगद्विख्यात सुपुत्र या वर्षी कालवश होईल. या वर्षाच्या मध्यास, अमेरिकेच्या परराष्ट्रीय धोरणाबद्दल विशेषत: ऑस्ट्रेलियाशीं असलेल्या धोरणाबद्दल, फारच गैरसमजूत निर्माण होईल. त्याचप्रमाणें अमेरिकेंत व कॅनडांत सरकारविरुद्ध भूमिगत चळवळी सुरू होऊन, सरकारच्या कांहीं गुप्त योजना बाहेर फुटतील.

एप्रिल व मेमध्यें, उत्तर गोलार्धातील बऱ्याच मोठ्या प्रदेशांत तुफान वादळें व भयंकर असा उष्मा होईल. वादळामुळें व धुळीच्या वावटळीनीं याच वेळीं वहातुकीच्या क्षेत्रांत अडथळे व विलंब निर्माण झाल्याचें ऐकावयास मिळेल. एप्रिलच्या सुरवातीस वहातुकीच्या क्षेत्रांतील अपघाताची नोंद करावी लागेल. याच वेळीं पुष्कळ ठिकाणीं दंगेधोपे होतील व मोठ्या प्रमाणावर निदर्शनें झाल्याचें दिसून येईल. *एक महत्त्वाचा मुद्दा म्हणजे, या वर्षी बहुतेक राष्ट्रांत लग्नांचें व त्याचबरोबर घटस्फोटांचें प्रमाण भलतेंच वाढेल, व या दोन्हीहि बाबतींत पूर्वीचे सर्व उच्चांक मोडले जातील. या वर्षी प्रत्येक व्यक्तीनें वैयक्तिक व विशेषत: विवाहाच्या बाबतींत फारच काळजीपूर्वक पावलें टाकावींत असें सुचवावेसें वाटतें. विशेष चढउतार न होतां बाजारभाव स्थिर राहतील. बहुतेक सर्वच देशांत वाईट हवामानामुळें पिकांची हानी होईल. ऑगस्टमध्यें अनेक ठिकाणीं आगी लागून मालमत्तेचें मोठेंच नुकसान होईल; आणि ऑगस्टच्या आसपास, पॅसिफिक

हासागरांत ज्वालामुखी जागृत झाल्याची खळबळजनक वार्ता ऐका-
यास मिळेल.

निरनिराळ्या प्रकारचे विध्वंसक शास्त्रीय शोध लागल्याचें, व कोठें
री युद्ध सुरूं होऊन अणु-बॉम्ब वा तत्सम संहारक शस्त्रास्त्रांचा उपयोग
ला गेल्याचें, आपणांस ऐकावयास मिळेल. या वर्षी जागतिक राजकारणांत
ावटळ उठणार असून, पुढें काय घटना घडतील याचा अंदाज कोणासच
तां येणार नाहीं. राजकारणधुरंधरांनाहि निश्चित काय घडेल, हें समजूं
कणार नाहीं. जगाच्या इतिहासांत नमूद करून ठेवण्यासारख्या घटना
डल्या नाहींत तर तें एक आश्चर्यच समजावें लागेल. युद्धाची ठिणगी
याची ठिकाणें पूर्व आशिया व मध्यपूर्वेत कोठेंतरी असतील एवढें
निश्चित ! आणि ही ठिणगी पेटविण्यांत कॅनडा व ऑस्ट्रेलियाचा प्रामुख्यानें
ाग असेल; व त्यांनीं जरी त्यांत प्रत्यक्ष भाग घेतला नाहीं तरी इतिहास-
ारांना असें आढळून येईल कीं, हीं दोन राष्ट्रें अथवा तेथील मुत्सद्दी या
द्धाच्या व वर्षभराच्या कटकटींच्या बुडाशीं होते, व त्यांनींच इतिहासाला
क नवीन वळण दिलेलें आहे.

चांगल्या व वाईट, सामाजिक, नैसर्गिक व राजकीय अशा सर्व
त्रांतील फेरबदलांचें विवेचन करण्यास, ह्या पुस्तकाचीं पृष्ठें अपुरीं पडतील.
मिश्र स्वरूपाचे निर्णय प्राप्त करून देणारें व संहारक आणि भडका उडवून
णाऱ्या प्रसंगांनीं भरलेंले असें हें अतिशय महत्त्वाचें वर्ष आहे !

* * *

# — इ. स. १९८३ —

या वर्षी एकूण तीन ग्रहणें आहेत. ११ जून व ४ डिसेंबर रोजीं सूर्य-
हणें असून, २५ जून रोजीं चंद्रग्रहण आहे. २० फेब्रुवारी, १५ मे आणि
६ सप्टेंबर अशी तीन वेळेला गुरु–हर्षल यांची महत्त्वपूर्ण युति होत आहे.

या वर्षी इ. स. १९८३, हवामानांत वरचेवर बदल होत राहणार

असून, प्रायः जोराचे वारे व वादळें यांचें प्रमाण जास्त असेल. मार्चमध्यें पृथ्वीच्या पाठीवर ठिकठिकाणीं वादळें होऊन, बरेंच नुकसान होईल. जूनमध्यें नेहमींपेक्षां अधिक ऊष्णतामान राहून, कांहीं ठिकाणीं आगी लागतील. ऑक्टोबरमध्यें पुन्हा एकदां जोराचीं वादळें होतील. पावसाळा सर्वसाधारण असला, तरी जरुरीपेक्षां पाऊस जरासा कमीच पडेल. जुलै व ऑगस्टमध्यें, विशेषतः भारतांत व शेजारच्या प्रदेशांत जोराचा पाऊस पडेल व त्याच्या अनुषंगानें वादळेंहि होतील. हा पाऊस सर्वत्र सारखा पडणार नसल्यानें पिकांच्या दृष्टीनें वाईट ठरेल. परंतु पुढील वर्षीं मात्र भरपूर पाऊस, क्वचित् जरुरीपेक्षां जास्ती पाऊस पडून, पाणीपुरवठा करणारे तलाव तुडुंब भरतील.

आंतरराष्ट्रीय राजकारणांत भडका उडवून देऊं शकणारी मागील वर्षीं निर्माण झालेली परिस्थिति याहि वर्षीं चालू राहील. इंडो–चीन, सयाम, बाली व सुमात्रा या आग्नेय आशियांतील प्रदेशांचा अंतर्भाव "युद्ध चालू होऊं शकणाऱ्या" प्रदेशांत करावा लागेल. या ठिकाणीं चीन अथवा जपानचें लष्कर हालचाली करूं लागेल, व या प्रदेशांत एक प्रकारचें वर्चस्व स्थापण्यांत त्या लष्कराला यश येईल. या वर्षाच्या शेवटीं एकमेकांच्या सहकार्यानें आपलें अस्तित्व टिकविण्याच्या धोरणाचें अधिष्ठानावर हीं शत्रूराष्ट्रें सलोखा करतील आणि त्या तडजोडीनंतरच शांतता प्रस्थापित होईल. या वर्षाच्या ( 1983 A. D. ) सुरवातीला, या प्रदेशांत जी क्रांति सुरू झाली, तिच्यांतील विस्कळीतपणा-मुळेंच परकीय सत्तेला हस्तक्षेप करतां आला असें इतिहासकारांना नमूद करावें लागेल. त्याचप्रमाणें आग्नेय आशियांतील कटकटींत, ब्रह्मदेस आणि भारत यांनीं प्रत्यक्ष भाग घेतला होता असें दिसून येईल.

राष्ट्र सुसंघटित व सामर्थ्यशाली व्हावें, या हेतूनें अमेरिकेंत आणीबाणीची परिस्थिति जाहीर करण्यांत येईल; पण आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतील प्रतिष्ठा अमेरिका गमावून बसत आहे यांत संशय नाहीं. उलट कॅनडा व ऑस्ट्रेलिया मुत्सद्देगिरीच्या क्षेत्रांत अधिक प्रभावी ठरूं लागल्याचें दृष्टोत्पत्तीस येईल. जगाचें नेतृत्व गमावून बसण्याची पाळी या कांहीं

वर्षांच्या कालांत अमेरिकेवर आलेली आहे, निदान तात्पुरतें तरी हें नेतृत्व सोडण्याची पाळी आलेली आहे असें दिसतें.

इजिप्तच्या आसपासच्या प्रदेशांत अंतर्गत अराजक माजून, दंगेखोरांच्याकडून सरकारला आसनावरून तात्पुरतें खालीं ओढलें जाईल. गुन्हेगारीची वाढती लाट व अंतर्गत दंगेधोपे यामुळें शांततेची व वाटाघाटीची भाषा बोलण्यांत अमेरिका पुढाकार घेईल. भारतीय सरकारहि या वर्षी गोंधळलेल्या मन:स्थितींत असेल. सनातनी व भांडवलवाले देशाचें भवितव्य घडविण्यांत प्रामुख्यानें भाग घेतील व बदललेल्या जागतिक वातावरणाला तोंड देण्यासाठीं सरकारला आपल्या धोरणांत महत्त्वाचे व मोठे फेरबदल करावे लागून, एक प्रकारें अपयशच स्वीकारावें लागेल. हा प्रकार विशेषत: या वर्षाचे मध्यास अनुभवास येईल. या वर्षाच्या सुरुवातीसच भारतीय सरकारचे परराष्ट्रीस संबंध बरेच बिघडलेले असल्याचें व कांहीं प्रसंगीं आपलें सरकार लष्करी सामर्थ्याचा उपयोग करीत असल्याचें पहावयास सांपडेल. इतकें असूनहि, या वर्षी व्यापार व दळणवळणांत भारताची भरभराट होत असल्याचें व त्याचबरोबर आपल्या राष्ट्राची शत्रुसंख्या फुगत असल्याचें दिसून येईल. भारतीय सरकारमधील वकिलातींत महत्त्वाचे बदल करण्यांत येतील.

मागील व या वर्षी (1983 A.D.) राजकारणी व्यक्तींकडून निर्माण केल्या गेलेल्या अस्थिर, गोंधळाच्या, दुर्दैवी, व वैशिष्ट्यपूर्ण परिस्थितींतून आपण आपली जीवननौका हांकारीत आहोंत. कांहीं देशांत उग्र स्वरूपाचीं निदर्शनें व सत्तारूढ सरकारांची पदच्युति यांसारख्या भडका उडवून देणाऱ्या घटना आढळतील. त्याचप्रमाणें मागील व या वर्षाच्या राजकीय आणि नैसर्गिक उत्पातांमुळें व्यक्तिगत व राष्ट्रीय मालमत्तेचें फार मोठें नुकसान होऊन बरीच प्राणहानि होत असल्याचें पहावें लागेल; व एकमेकांच्या सहकार्यानें अस्तित्व टिकविण्याच्या धोरणावर एकवाक्यता झाल्यानंतर व युद्धतहकुबीवर एकमत झाल्यानंतर, या व पुढील वर्षांच्या कांहीं भागांत पुनर्रचनेचा कार्यक्रम हातीं घेतला जाईल. संहाराच्या व

विनाशाच्या या कार्यांत जपान व ब्रिटनचाहि बराच मोठा वांटा आहे हें नमूद करण्यासारखें आहे.

* * *

# — इ. स. १९८४ —

या वर्षीं फक्त सूर्याचींच दोन ग्रहणें आहेत. एक ३० मे रोजीं असून दुसरें २२ नोव्हेंबरला आहे. १५ फेब्रुवारी रोजीं शनि–मंगळ युति आहे. १९ जानेवारीला गुरु–नेपच्यून युति असून या वर्षीं मंगळ स्तंभी आहे.

पृथ्वीच्या पाठीवरील राजकीय रंगभूमीवर या वर्षीं वैशिष्ट्यपूर्ण प्रसंग घडणार आहेत.* सुधारणेकडे कल दर्शविणाऱ्या आश्चर्यजनक घडामोडी या वर्षीं भारतांत घडणार असून, २० व्या शतकाच्या शेवटाजवळ जरी आपण जात असलों तरी पत्रिकेकडे पहातां असें दिसून येतें कीं, समाज व सरकार या दोन्हीहि बाबतींत भारत पुरातन कालच्या पद्धतींचा कांहीं प्रमाणांत स्वीकार करील. या वेळीं बऱ्याच प्रमाणांत असंतोष निर्माण होऊन निदर्शनें होतील. * कांहींहि असलें तरी आशियांतील लहानमोठ्या राष्ट्रांचें नेतृत्व करणारें सामर्थ्यशाली राष्ट्र म्हणूनच भारताचें स्थान राहील, व आपल्या शेजारी राष्ट्रांना भारत सहाय्य करील.

परंतु या वर्षी नेहमींपेक्षां अधिक पाऊस बहुतेक सर्वच ठिकाणीं पडेल. या अतिवृष्टीमुळें नद्यांना महापूर येतील, आणि विशेषतः समुद्रकिनाऱ्या-लगतच्या प्रदेशांत महापूर व अतिवृष्टीच्या उच्चांक यांची नोंद करावी लागेल. ऑक्टोबरच्या प्रथमार्धांत हवामानांत एकदम फरक पडून कांहीं ठिकाणीं अचानक अतिवृष्टी होईल, व भारताच्या कांहीं भागांत जोरदार धुक्यामुळें वाहतुकीच्या व प्रवासाच्या मार्गांत अडथळे निर्माण होऊन, कालापव्यय होईल. ऑक्टोबरमधील या हवेच्या फरकामुळें लहान प्रमाणांत सांथीच्या रोगांचा फैलाव होईल. तथापि भारताचें शक्तिशाली सरकार त्याचा ताबडतोब बंदोबस्त करील.

१९८४ च्या पहिल्या तीन महिन्यांत पृथ्वीच्या पाठीवर राजकारणाच्या क्षेत्रांत नाट्यमय प्रकार घडतील. मध्यपूर्वेतील मुस्लिम राष्ट्रांत आणि आफ्रिकेंत गंभीर स्वरूपाच्या कटकटी निर्माण होतील. आर्थिक व जातीय कारणास्तव वर्षाच्या प्रथमार्धांत इराण सरकार नाट्यमय रीतीनें कोलमडून पडेल. इराणच्या जवळच्या मुस्लीम राष्ट्रांमध्यें मोठ्या प्रमाणांत अस्वास्थ्य निर्माण होईल, आणि सरकारमध्यें फेरबदल होतील ही गोष्ट निश्चित आहे. मागील वर्षाप्रमाणेंच या वर्षाच्या कांहीं भागांत मोरोक्को व ट्युनिशियामध्यें मोठ्या प्रमाणावर दंगेधोपे होऊन एक नवीन प्रकारचें सरकार निर्माण होईल, व त्यामुळें राष्ट्रांत सुधारणा घडून येतील.

भारताप्रमाणेंच इतर अनेक देश राष्ट्रीय स्वरूपाच्या विधायक कार्यांत गुंततील, त्यामुळें बोलणें कमी पण काम जास्त असें चांगलें वातावरण निर्माण होऊन हें वर्ष विधायक व प्रगतीचें ठरेल. परंतु याचा अर्थ राजकीय तंटेबखेडे थांबतील असा नव्हे. उलट खून, तक्तापालट, सरकार उलथून पाडणें, असल्या अनिष्ट घटना घडतील. या वर्षी मृत्युसंख्येंत वाढ होईल, आणि विशेषतः जानेवारी ते ऑगस्टमध्यें नैसर्गिक व अपघाती मृत्यूंचें प्रमाण वाढेल. कांहीं ठिकाणीं अचानक अपघाती स्वरूपाच्या व मोठ्या प्रमाणावरील आगी लागून जनतेच्या व सरकारच्या मालमत्तेचें नुकसान होईल. विशेषतः पहिल्या तीन महिन्यांत एखाद्या शहराचा संपूर्ण भाग व कांहीं खेडींच्या खेडीं आगीच्या भक्षस्थानीं पडतील.

भारतामध्यें 'उजवे' अथवा सनातनी मताचें राजकारणी पुरुष दिल्ली सरकारच्या यापूर्वीच्या कालांतील धार्मिक आणि सामाजिक धोरणांमुळें त्या प्रस्थापित सरकारचा पराभव करतील; आणि ज्यांच्या पत्रिकेमध्यें मकर राशि प्रमुख असेल अशा लोकांच्याकडूनच हा बदल घडवून आणण्यांत येईल. *जीवनाकडे तत्त्वज्ञानाच्या दृष्टीकोनांतून बघणारा, उंच, शामल वर्णाचा एक पुरुष या वेळीं भारतांत प्रामुख्यानें अतिशय प्रसिद्धीस येईल; व तो तत्त्वज्ञानी राजकारणी म्हणून ख्यातनाम होईल. भारताच्या जुन्या परंपरेचा तो प्रतिनिधीच असेल. राष्ट्रीय पुनर्रचनेसाठीं भारतसरकार निधि उभारील. कांहीं राष्ट्रीय संस्था, कालवे, धरणें इत्यादींच्या सुधारणेसाठीं खूप पैसा

उभारावा लागेल. थोडक्यांत हें वर्ष आकर्षक असून अनेक प्रकारें इतिहासांत नमूद करून ठेवण्यासारखें आहे.

या वर्षी ( 1984 A. D. ) कांहीं ठिकाणीं पुनरावृत्त होणारे असे अनेक भूकंपांचे धक्के बसतील. त्याचप्रमाणें ज्वालामुखी नव्या प्रमाणांत जागृत होतील. विशेषत: या वर्षाच्या एप्रिल व जून महिन्यांत आशिया आणि युरोपमधील व विशेषतः तुर्कस्तान, फिलिपाईन्स व ऑस्ट्रेलियांतील नैसर्गिक आपत्तींनी लोकांच्या प्राणांची व मालमत्तेची हानी होईल.

* * *

## — इ. स. १९८५ —

या वर्षी एकूण चार ग्रहणें आहेत. पैकीं १९ मे व १२ नोव्हेंबर रोजीं सूर्यग्रहणें असून, ४ मे आणि आणि २८ ऑक्टोबर रोजीं चंद्रग्रहणें आहेत. एप्रिलमध्यें राहु–मंगळ युति आहे.

एप्रिल, मे, जुलै, ऑगस्ट, व सप्टेंबर या महिन्यांत पृथ्वीच्या पाठी-वर भूकंपाचे धक्के नेहमींपेक्षां अधिक बसतील. सूक्ष्म पंचागांच्या अभावीं निश्चित तारखा देतां येत नाहींत. इतर कांहीं ठिकाणाबरोबरच इटली व सिसिलीमध्यें मोठ्या प्रमाणावर नुकसान होईल. ऑगस्टमध्यें काहीं काल बाजारभाव खालीं येतील.

या वर्षाच्या ( 1985 A. D. ) प्रथमार्धांत चीनचा पश्चिम भाग, तिबेटच्या आसपासचा प्रदेश, व सिकियांगमध्यें दुष्काळ आणि प्राणघातक सांथी पसरतील.

एप्रिल, मे व जूनमध्यें भारतांत पाण्याचा तुटवडा भासेल व लोकांना त्रास होईल. परंतु या वर्षी बहुतेक सर्व ठिकाणीं पाऊस लवकरच म्हणजे जूनच्या पहिल्या आठवड्यांत सुरूं होणार असल्यामुळे आणि दक्षिण भार-ताच्या समुद्रकिनाऱ्यालगतच्या प्रदेशांत तो भरपूर प्रमाणांत पडणार

असल्यानें विशेष काळजी करण्याचें कारण नाहीं. सिलोनमध्यें अवेळीं पूर येतील.

रशिया, स्वीडन, नॉर्वे यांसारखीं स्कॅन्डिनेव्हियन राष्ट्रें आणि उत्तर अमेरिकेचा कांहीं भाग हे धनधान्यानें विपुल असतील. उत्तर प्रदेशावरील या ठिकाणीं २० व्या शतकाच्या सुरुवातीला दाट वस्ती नव्हती; परंतु आतां तेथें भरपूर वस्ती वाढेल आणि तिथल्या हवामानांतहि आश्चर्यकारक बदल घडून तें अधिक ऊबदार होईल. इ. स. १९५४ मध्यें प्रसिद्ध होत असलेलें हें पुस्तक आतां वाचणाऱ्या या वाचकांना ही सगळी गंमत वाटेल, परंतु महत्त्वाच्या ग्रहांच्या हालचाली पहातां लेखिकेला या गोष्टी स्पष्टपणें दिसत आहेत.

थोडक्यांत या आणि मागील वर्षाच्या महत्त्वाच्या घटना म्हणजे द्वेषाचें वातावरण, खून व दंगेधोपे, विशिष्ट प्रकारची क्रान्ति असल्या घटनांनीं मध्यपूर्वेतील मुस्लीम राष्ट्रें आणि आफ्रिका खंड येथें नाट्यमय व रक्तरंजित दृश्यें दिसतील. या बदलाला निश्चित नांव देतां आलें नाहीं तरी मुस्लीम राष्ट्रांच्या दृष्टिकोनांत क्रांतिकारक बदल घडून येत आहे, आणि २० साव्या शतकांतील यापूर्वींच्या वर्षांपेक्षां एक वेगळा इतिहास निर्माण करण्यास ते तयार झाले आहेत असें दिसून येईल. १९८४–८५ ही फक्त सुरुवात आहे, अधिक त्रास, कटकटी आणि फेरफार हे पुढेंच आहेत याची वाचकांनीं आत्तांच नोंद करून ठेवावी.

भारताच्या दृष्टीनें हें वर्ष चांगलें असून, सामाजिक व सांस्कृतिक सुधारणेला उत्तेजन देणाऱ्या सनातनी मतांच्या सरकारमुळें देशाची चांगलीच प्रगति होईल. जुन्या कल्पना, परंपरा, सांस्कृतिक व धार्मिक श्रद्धा यांची देशांत मोठ्या प्रमाणांत वाढ होईल; आणि सरकारचे प्रतिनिधि मोठमोठ्या धार्मिक उत्सवांना अधिकृत रीतीनें उपस्थित राहिल्याचें दृश्य दिसेल.

पाऊस चांगलाच पडून जलाशय तुडुंब भरतील. परंतु त्याचबरोबर असे कांहीं ग्रहयोग आहेत कीं देशाच्या कांहीं भागांत अनावृष्टीमुळें विहिरी कोरड्या ठणठणीत पडतील. भारतांतच नव्हे तर जगाच्या इतर कांहीं

भागांतहि अनावृष्टीमुळें चिंताजनक परिस्थिति निर्माण होईल. भाजीपाल्याचा नाश, व त्याचबरोबर रोगांचा फैलाव व तापाची सांथ यामुळें जनता हवालदील बनून जाईल. दक्षिण भारताच्या कांहीं भागांत, महाराष्ट्राच्या पठारावर, हैद्राबाद व त्याच्या आसपासच्या प्रदेशांत अनावृष्टीमुळें दुष्काळी परिस्थिति निर्माण होईल. या वेळीं यंत्रांचाच थोडाफार उपयोग होईल. वरुण राजाची कृपा व्हावी म्हणून मोठा 'यज्ञयाग' केला जाईल. परंतु सर्वांना असें आढळून येईल कीं, या प्रार्थनेचा उपयोग मृत्यु, रोगराई, अथवा भाजीपाल्याचा आणि गुराढोरांचा नाश थांबविण्यासाठीं होत नसून त्यासाठीं बाहेरचीच मदत घ्यावी लागणार आहे.भारताप्रमाणेंच जगांतील इतर देशांतहि लोकांना जो हा त्रास सोसावा लागणार आहे, त्यामुळें नवीन व सामर्थ्यवान पुढारी पुढें येतील; व ते लोकांचें दैन्य नाहीसें न करतां फक्त ईश्वराचें माहात्म्य वर्णन करणाऱ्या त्या जुन्या पुढाऱ्यांना पदच्युत करण्याचे प्रयत्न करतील.

या वर्षाच्या, इ. स. १९८५, शेवटच्या तीन महिन्यांत उत्तर-पश्चिम आफ्रिकेंतील आळशी व मूर्ख राज्यकर्त्यांच्यामुळें एक अतिशय शक्तिवान् मनुष्य परकीय राष्ट्रांच्या मदतीनें जुनी राजवट उलथून पाडून सत्ता आपल्या हातांत घेईल, आणि तेथून पुढील काळांत निष्ठुरपणें त्या देशांचा राज्यकारभार करील.

* * *

# — इ. स. १९८६ —

या वर्षीं एकूण चार ग्रहणें आहेत.९ एप्रिल व ३ ऑक्टोबर रोजीं सूर्यग्रहणें असून, २४ एप्रिल आणि १७ ऑक्टोबर रोजीं चंद्रग्रहणें आहेत. १८ फेब्रुवारीला शनि–मंगळ युति आहे; १३ मार्चला मंगळ-हर्षल युति आहे; २० डिसेंबरला मंगळ–गुरु युति आहे; आणि वर्षाच्या मध्यास बराच काल मंगळ स्तंभी आहे.

आपल्या प्रगतीमुळें व अग्रेसरत्वामुळें अनेक राष्ट्रांना संभ्रमांत

टाकणाऱ्या मादागास्कर बेटाच्या व आफ्रिकेच्या किनाऱ्यालगतच्या प्रदेशाच्या दृष्टीनें हें वर्ष अत्यंत महत्त्वाचें आहे. या वर्षी व आसपासच्या कालांत, आपल्या कर्तृत्वानें थक्क करून सोडणारीं राष्ट्रें म्हणजे ब्राझिल, ऑस्ट्रेलिया व मेक्सिको ! इजिप्त, भारत व अफगाणिस्तान या ठिकाणींहि राजकारणांत कमी खळबळ असणार नाहीं; आणि राजकारणाच्या रंग-भूमीवरील आपल्या कौशल्यानें ग्रीस हा चिमुकला देश तर जगाला आश्चर्यचकित केल्याविना रहाणार नाहीं.

सत्तारूढ पक्षांतील फाटाफूट, आणि कांहीं लोकप्रिय मंत्र्यांचे राजीनामे यांमुळें भारताला हें वर्ष ( इ. स. १९८६ ) प्रतिकूल जाईल असें सूचित केलें जात आहे. ब्रह्मदेशांतील सरकारचा या वर्षी पराजय होऊन तेथें जर निवडणुका झाल्या तर सरकारी पक्ष लोकांच्या पाठिंब्याला बऱ्याच अंशीं मुकेल असें दिसतें. परंतु इतर कांहीं कारणांमुळें भारताचें उत्पन्न चांगलें असेल, आणि देशांतील आणि देशाबाहेरील व्यापार वृद्धिंगत होऊन फायदाच होईल. लोकसभेंतील वादविवादहि चांगलेच रंगतील.

अरबी राष्ट्रांत मोठ्या प्रमाणावर निदर्शनें होतील, आणि या वर्षीं मोठ्या नाट्यमय पद्धतीनें दोनदां सरकारांत बदल केला जाईल. आंतर-राष्ट्रीय राजकारणाच्या क्षेत्रांतील वातावरण चांगलेंच ढवळून निघालेलें असेल. तथापि इतर कांहीं राष्ट्रांना शांततेची भूक तितक्याच मोठ्या प्रमाणावर असेल. * या वर्षाच्या द्वितीयार्धात योजनाबद्ध किंवा गुप्त रीतीनें अणुबाँबचे कांहीं स्फोट होतील, व त्यामुळें मोठ्या प्रमाणावर प्राणहानि होईल. एरवीं अणुशक्तीचा उपयोग जगांतील निरनिराळ्या प्रदेशांत अतिशय सुलभतेनें व स्वस्ततेनें केला जाईल, आणि अणुशक्तीवर चालणारीं जहाजें समुद्रांतून स्वैरपणें संचार करूं लागल्याचें ऐकावयास मिळालें तरी त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहींच नाहीं. खरें पाहिलें असतां बऱ्याच वर्षांपूर्वीपासून असें होत आहे असे लेखिकेचे विचार आहेत. आग्नेय आशियांतील इन्डोचायना व सयाम या प्रदेशांत अनेक कटकटी उपस्थित होत असून, त्या ठिकाणीं सत्ताधीश असलेल्या परकीय सत्तेविरुद्ध

बंडाचा झेंडा उभारण्यांत येईल. या देशांना दास्यमुक्त करण्यासाठीं कांहीं अमेरिकन देश प्रयत्न करतील. एक गोष्ट आपण लक्षांत ठेवावी ती ही कीं, या शतकाच्या सुरुवातीचा वसाहतवाद व चालू वसाहतवाद यांत थोडा-फार फरक आहे.

जपानमधील एका ख्यातनाम व्यक्तीच्या मृत्यूचा योग दिसतो. जपानचे परराष्ट्रीय संबंध या वर्षी सुधारलेले असून, इतरांच्या सहाय्यामुळें जपानचा फायदाच होत आहे. आधुनिक शास्त्रीय संशोधनांच्यामुळें निर्माण झालेल्या एका गूढ रोगाचा फैलाव जपानी स्त्री समाजांत होऊन त्यांना त्याचा त्रास भोगावा लागेल. अटलांटिक महासागरांत या वर्षाच्या दुसऱ्या तिमाहींत वादळें होऊन युरोप आणि आफ्रिकेच्या किनाऱ्याला त्याचा उपसर्ग पोहोंचेल. त्याचप्रमाणें या वर्षाच्या द्वितीयार्धात सिंध आणि बलुचिस्तानमधील पिकांचें नुकसान होणार असून, कांहीं प्रसिद्ध व्यक्ति कालवश होतील. ऑक्टोबरमध्यें क्वेटा आणि काश्मीरच्या आसपास कांहीं भयानक भूकंपाचें धक्के बसून मोठ्या प्रमाणावर प्राणहानि व वित्तहानी होईल.

भारत आणि आसपासच्या देशांत या वर्षी नेहमीपेक्षां थोडासा कमी पाऊस पडेल. मार्च व एप्रिलमध्यें बाजारांत आणि विशेषत: अन्नधान्य, औद्योगिक, व शेअर बाजारांत थोडीशी अस्थिरता निर्माण होईल. जातीय वातावरण तंग बनल्यामुळें पुष्कळ ठिकाणीं या वर्षाच्या मध्यास दंगेधोपे झाल्याचें वृत्त ऐकावयास मिळेल. धार्मिक संस्था, वा त्यांचे प्रतिनिधि आणि जनता यांच्यांत जूनमध्यें मोठ्या प्रमाणावर तंटे निर्माण होतील.

* * *

## — इ. स. १९८७ —

या वर्षी एकूण तीन ग्रहणें आहेत. २९ मार्च व २३ सप्टेंबर रोजी सूर्यग्रहणें असून ७ ऑक्टोबर रोजीं चंद्रग्रहण आहे.

मागील वर्षी कापसाच्या किंमती बऱ्याच वाढलेल्या असल्या तरी या वर्षी जगांतील बहुतेक देशांच्या बाजारपेठेंत उदासीनता निर्माण होऊन त्याला 'मंडई'चें स्वरूप प्राप्त होईल. आशियांतील आणि युरोपांतील महत्त्वाच्या बाजारपेठेंत आपलें वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठीं जपान, जर्मनी व इंग्लंड यांच्या औद्योगिक उत्पादनांत व किंमतींत मोठी चढाओढ होऊन बाजारांत इतका भरमसाट माल येईल कीं गिऱ्हाईकांचीच उणीव भासेल. या वर्षाची दुसरी व तिसरी तिमाही अत्यंत महत्वाची असून, चांगल्या व वाईट घटना, उत्कर्ष व अपकर्ष एकाच वेळीं व अतिशय वेगानें, झाल्याचें आढळून येईल. या वर्षातील, म्हणजे इ. स. १९८७ मधील, घटनांची नोंद करण्यास एखादा मोठा ग्रंथहि अपुरा पडेल.

या वर्षी फ्रान्स आणि इटलीमध्यें राजकीय, व सामाजिक दृष्ट्या महत्त्वाचे फेरबदल होतील. जपानमध्यें असंतोष पसरून सरकारला एका मोठ्या संकटाला तोंड द्यावें लागेल. तथापि शास्त्रीय क्षेत्रांत जपानला भूषणावह असे शोध लावले जातील. टोकिओमध्यें या वर्षाच्या प्रथमार्धांत एक मोठा संप होईल.

भारतांतील घटना वैचित्र्यपूर्ण व विविध प्रकारच्या असून, चिनी लोकांच्याकडून भारताच्या स्वातंत्र्याला धोका निर्माण होण्याचा दाट संभव आहे. आर्थिक क्षेत्रांत भारतापुढें अनेक समस्या निर्माण होतील, व जरूर तेवढी संपत्ति उपलब्ध होऊं शकणार नाहीं. सरकारी उत्पन्नांत घट झाल्यानें सरकारी नोकरांच्या पगाराला बिलंब लागला तरी त्यांत आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं. अशा प्रसंगीं ब्रिटिश जनता भारत सरकारच्या साहाय्यास धांवून येईल, अथवा जपान मदत करील असें वाटतें. अर्थात् आपल्या मुत्सद्दी परराष्ट्र वकिलांच्या धोरणामुळेंच या गोष्टी केवळ शक्य होतील. या वर्षी भारताच्या राज्यकारभारांत बराच फेरबदल होणार असून, राजकीय दृष्ट्या भारताला हें वर्ष त्रासदायकच होणार आहे. तथापि पीकपाणी चांगलें येईल, व खनिज पदार्थांच्या नवीन खाणींचा शोध लावण्यांत येईल. भारताच्या व नेपाळच्या परराष्ट्रीय धोरणांत आणि संबंधांत परकीय दडपणामुळें कांहीं मूलभूत बदल होतील.

मुस्लीम राष्ट्रांचे परराष्ट्रीय संबंधहि या वर्षी बिघडलेले असून, अरेबिया, सुदान, आणि इजिप्त यांचे परराष्ट्रीय संबंध तर फारच चिघळलेले असतील. मध्यपूर्वेतील बदललेल्या परिस्थितीला यशस्वी रीतीनें तोंड देतांना ब्रिटिशांच्या मुत्सद्देगिरीचा विजय होईल. या प्रदेशांत मे आणि जूनमध्यें अमेरिका थोडीफार महत्त्वाची भूमिका वठवील. या वर्षाच्या मध्यानंतर जेरुसलेम, तुर्कस्तान, आणि ग्रीस या प्रदेशांत ब्रिटिश लोक शांतता प्रस्थापित करतील. युरोपमध्यें, जर्मनीच्या जवळपास या वर्षाच्या प्रथमार्धानंतर एका सांथीच्या रोगाचा जोरदार फैलाव होईल, आणि अवर्षणामुळें पिकांचीहि हानि होईल.

या वर्षी ( 1987 A. D. ) आणि जवळपासच्या कालांत जुगारीच्या आणि रेसच्या क्षेत्रांत बऱ्याच सुधारणा होऊन नवीन पद्धतींचा अवलंब केला जाईल; आणि राज्यसरकारनें या गोष्टींना जरी पाठिंबा दिला तरी आश्चर्य मानूं नये. * आज जरी ही गोष्ट खुळेपणाची वाटली तरी युरोपच्या कांहीं भागांतील, ऑस्ट्रेलियांतील आणि आशियांतील कांहीं राष्ट्रें जुगारी सट्टयाच्या आणि अशाच आणखी इतर गोष्टींच्या मागें लागल्याचें दिसून येईल. सार्वजनिक पैशाची अफरातफर होऊं नये, व तो वाईट रीतीनें हाताळला जाऊं नये, आणि त्यांत कांहीं व्यक्तींनीं स्वार्थ साधूं नये हाच या राष्ट्रांचा खरा उद्देश असेल. या वर्षाच्या पूर्वी अशा प्रकारच्या योजना हाताळल्या गेल्या; पण त्या अयशस्वी झाल्या असल्या तरी या वर्षी पूर्वीच्या अनुभवावरून शहाणपणा व नवीन पद्धतीचा अवलंब केल्यामुळें आतां यशप्राप्ति होत आहे असें दिसेल.

ब्रिटनमध्यें या शतकाच्या सुरुवातीच्या कालांतील साम्राज्यसत्तेच्या पद्धतीवर अद्यापहि विश्वास असणारें सनातनी पक्षाचें सरकार ब्रिटनमध्यें सत्तारूढ होईल. आणि त्याच्याकडून कांहीं नवीन साहसाचीं कृत्यें केलीं जातील. * जपानसुद्धां आपल्या प्रदेशाचा विस्तार करण्याचा प्रयत्न करील; परंतु फक्त ऑस्ट्रेलिया इन्डोनेशिया जवळचीं बेटें जिंकण्याच्या बाबतींत निश्चितपणें यशस्वी होईल. कांहीं प्रदेशांत स्थानिक स्वरूपाचें युद्ध, तर दुसऱ्या ठिकाणीं पुष्कळ शांतता असें दृश्य दिसेल.

या वर्षी पुरेपूर पाऊस पडून तो सर्वत्र सारख्या प्रमाणांत विखुरला जाईल. हवा वादळी राहील. ज्या प्रदेशांत सामान्यत: कमी पाऊस पडतो त्या ठिकाणीं जोराच्या वाऱ्यामुळें भरपूर पाऊस पडेल. पुष्कळ ठिकाणीं अकल्पितपणें पाऊस पडल्यानें आश्चर्य वाटेल. पूर्वी ज्या ठिकाणीं कमी पाऊस पडत असेल त्या ठिकाणीं जास्ती—अशी विचित्र परिस्थिति निर्माण होईल. भारतांत पावसाळा सर्वसाधारण असल्याचें अनुभवास आलें तरी पाऊस मात्र नेहमींपेक्षां जास्ती पडेल.

* * *

# — इ. स. १९८८ —

या वर्षी एकूण तीन ग्रहणें आहेत. १८ मार्च व ११ सप्टेंबर रोजीं सूर्यग्रहणें असून, २७ ऑगस्ट रोजीं चंद्रग्रहण आहे. २१ फेब्रुवारी रोजीं मंगळ—हर्षल युति आहे. २२ फेब्रुवारीस शनि—मंगळ युति आहे; आणि ७ मार्चला मंगळ-नेपच्यून युति आहे. याशिवाय विशेष महत्त्वाची अशी शनि—हर्षल युति १० फेब्रुवारी, ३० जून, व २१ सप्टेंबर अशी तीन वेळेला होत आहे.

हें वर्ष, इ. स. १९८८, वरील ग्रहयोगांमुळें, अनेक फेरबदलांनीं व पुनर्जुळणी कराव्या लागणाऱ्या घटनांनीं भरलेलें आहे. हें वर्ष भारताला एक नवीन संदेश देत आहे—भारताच्या राष्ट्रीय जीवनाला एक नवीनच वळण मिळणार असून, तें पुढील बरींच वर्षे त्या मार्गानें चालू राहील. भारत आपल्या देशाच्या सीमारेषा वाढवीत असून, अधिक प्रदेश व्याप्त करण्याच्या त्याच्या योजना सफल होतील; व कांहीं कायदेकानू तयार केले जातील. भारत स्वत:च्या प्रदेशांत पंजाब व अफगाणिस्तानचा कोणत्या मार्गानें समावेश करून घेईल हें त्या वेळच्या भारतीय राजकारणधुरंधरांच्या बुद्धिमत्तेवर अवलंबून राहील; पण या योजनेला चालना मिळाल्याचें प्रत्यक्षांत पहावयास सांपडेल व भारताची सरहद्द विस्तृत झाल्याचें दिसून

येईल. पुरातन भारतीय संस्कृतीचें पुनरुत्थान करण्यासाठीं राष्ट्रीय महोत्सव साजरे करण्यांत येतील. भारतानें केलेल्या कार्याबद्दल, संपादिलेल्या सुयशाबद्दल जनतेंत आनंदीं वातावरण दिसून येऊन जल्लोष साजरा केला जाईल. .......तथापि एका ख्यातनाम मंत्र्याच्या निधनामुळें ध्वज खालीं उतरण्याचा एक दुःखद प्रसंगहि याच वर्षी येईल असें दिसतें.

पूर्वी सांगितल्याप्रमाणें, या वर्षाच्या (1988) घटना ह्या आगामी कांहीं वर्षांतील घटनांची तोंडओळख करून देत आहेत; व या आणि पुढील वर्षी शुभदायक घटनांनींच ही सुरुवात होत आहे. तेव्हां 'नांदी' तर चांगली झाली असेंच म्हणावें लागेल. गेल्या कांहीं वर्षात अगदींच दुर्लक्षिलेलें 'साक्षरताप्रसारा'चें अथवा 'जनताशिक्षणा'चें कार्य मोठ्या प्रमाणावर हातीं घेतलें जाईल. त्याचप्रमाणें आजपर्यंत राजकारणी पुढाऱ्यांनीं विद्यार्थ्यांचा राजकारणासाठीं दुरुपयोग करून घेतला होता, व त्याचें शिक्षणाचें ध्येय त्यांना साध्य करून दिलेलें नाहीं असें आढळून येईल. त्यामुळें विद्यार्थ्यांच्या कार्यक्षेत्रांना मर्यादा घालणारे नवीन कायदे केले जातील. आजपर्यंत असले कायदे असफल झाले असले तरी येथून पुढें त्यांचा उपयोग होऊन, शिक्षण हें सर्वांना खरोखरच सक्तीचें केलें जाईल.

त्याचबरोबर राष्ट्राच्या करमणुकीच्या क्षेत्रांत व कार्यक्रमांत महत्त्वाचे फेरबदल होतील. प्रथम रंगभूमीचा थोडासा तोटा झाला असेल, त्यामुळें या कलेला संरक्षण देऊन त्याचा विस्तार करण्यासाठीं सरकार उपाययोजना करील; व त्यासाठीं कांहीं कायदेहि करील. उद्योगधंद्यांचा उत्कर्ष व्हावा म्हणून अधिक बाजारपेठा हस्तगत करण्यांत येतील, व परकीय देशाशीं व्यापार वाढविण्यांत येईल.* सामर्थ्यवान् नेत्यांच्या मार्गदर्शनाखालीं भारतीय सरकारला देशापुढील प्रश्नाचें व्यावहारीक व वास्तववादी दृष्टीकोनांतून मार्गदर्शन करणारी 'शुक्रप्रधान' व्यक्ति असेल, व ती अतिशय लोकप्रियहि असेल. अनेक चांगल्या गोष्टींनीं युक्त असलेल्या या वर्षांत कांहीं कटकटी पण निर्माण होत आहेत. देशांतील एक लष्करी गट बंड करून उठण्याची शक्यता आहे. युरोपिअन राष्ट्रांतील लष्करी पुढारी आपआपल्या सत्ताधीशांच्या धोरणाबद्दल नाखूष असतील. त्याचबरोबर, भारत, इजिप्त,

तुर्कस्तान, व ग्रीस या देशांतील कांहीं प्रसिद्ध व लोकप्रिय व्यक्ति कालवश होतील.

परकीय सत्तेच्या मदतीमुळें तुर्कस्तान साहसप्रिय धोरण स्वीकारील. पण त्यामुळेंच त्याच्यावर कठीण प्रसंग येईल, व या आणि पुढील वर्षी त्याला त्यासाठीं फार किमत द्यावी लागेल. तुर्कस्तान, बलुचिस्तान, पंजाब, व इराण या ठिकाणीं फेब्रुवारीमध्यें कांहीं नैसर्गिक उत्पात होत असून, भूकंपाच्या धक्यांमुळें खेड्यांना फारच मोठा धोका निर्माण होईल. विशेषत: पंजाबमध्यें ही घटना अटळ आहे.

एप्रिलमध्यें जगांतील निरनिराळ्या भागांत निरनिराळ्या प्रकारच्या राजकारणाशीं संबंधित अशा वावटळी उठतील. जुन्या बहुसंख्य गोष्टींत बराच फेरबदल करावा लागणार आहे, आणि त्याच्याकडे नव्या दृष्टिकोनांतून पहावयास लावणारें असें हें वर्ष असून, कोणत्याहि प्रकारच्या आत्यंतिक मनोवृत्तींना येथें थारा असणार नाहीं. जागतिक प्रश्नांचा वास्तववादी व व्यवहारिक दृष्टिकोनांतून विचार करण्यांत येईल, व या मार्गाचा अवलंब करणारा भारत श्रेष्ठ ठरेल. भारतांतील कांहीं खाणींत अनर्थ निर्माण होतील. पिकें मात्र सगळीकडे सर्वसाधारण चांगलीं येतील.

भारतासह जगांतील बहुतेक सर्व प्रदेशांत या वर्षाच्या मध्यास आर्थिक मंदीचा तडाखा बसेल. शेअरबाजारांत व औद्योगिक क्षेत्रांत फार मोठी मंदी निर्माण होऊन पुष्कळ व्यापारी संस्थांचा मोठा तोटा होईल, परंतु मधल्या कालांत बाजारामध्यें थोडीफार स्थिरस्थावरता निर्माण होईल. आणि नंतर पुन्हां एकदा आकस्मिकपणें बाजारभाव गडगडतील.

या वर्षाच्या सुरुवातीबरोबरच भारत एका नवीन प्रकारच्या राष्ट्रीय जीवनास सुरुवात करीत आहे. राजकारणाच्या क्षेत्रांतील बहुतेक सर्व गोष्टींत त्यानें पूर्वीचे सर्व उच्चांक मोडलेले आहेत आणि पुढें असेंच हें सर्व चालूं राहणार आहे असें आपणांस आढळून येईल. हें वर्ष (1988 A. D.) ही फक्त सुरुवात असून या वेळीं भारतांतील तरुण व सर्व उत्साही जनता एका आवाजांत म्हणेल, " आमच्या मातृभूमीच्या प्रगतीसाठीं व उत्कर्षासाठीं आम्हीं आत्मबलिदान करण्यास एका पायावर तयार आहोंत;

आणि कोणत्याहि परिस्थितींत आमची मातृभूमि वैभवाच्या शिखरावर असलेली व जगांत अग्रेसर ठरलेली पाहिल्याशिवाय आम्हीं स्वस्थ बसणार नाहीं."

येथून पुढें शिक्षण अथवा प्रसिद्ध होणारें वाङमय हें एखाद्या विशिष्ट व उच्चभ्रू वर्गासाठीं नसून तें जनतेसाठीं आहे अशी भावना सर्वांमध्यें राहील. यामुळें शिक्षणाचा दर्जा जरी उच्च राहणार नसला तरी 'जनता शिक्षण' हातीं घेतलें म्हणजे कांहीं उच्च गोष्टींची अपेक्षा धरून चालत नाहीं हें सहज समजून येईल. आणि सबंध जनताच साक्षर झाल्याशिवाय राष्ट्रीय कार्यात एखाद्या विशिष्ट पुढारलेल्या गटाचा तितकासा उपयोग पण होत नाहीं. म्हणूनच या वर्षी, इतर सर्व जनतेबरोबर त्यांच्या आवाजाला साथ देऊन आतां कै. लेखिका म्हणते, "भारत उत्कर्ष साधून घेवो ! भारत चिरायु होवो !' आणि माझ्या मातृभूमीच्या पाठीशीं साक्षात् भगवान् उभा राहो ! "

* * *

# — इ. स. १९८९ —

या वर्षी एकूण चार ग्रहणें आहेत; ७ मार्च व ३१ ऑगस्ट रोजीं सूर्यग्रहणें असून, २० फेब्रुवारी व १७ ऑगस्ट रोजीं चंद्रग्रहणें आहेत. ११ मार्च रोजीं मंगळ–गुरु युति आहे. या वर्षी अतिशय महत्त्वाची अशी शनि–नेपच्यून यांची युति २ मार्च; ४ जुलै, व १३ नोव्हेंबर रोजीं घडत आहे.

हवामानांतील बदल, नैसर्गिक संकटें, आणि यामुळें होणारा नाश व प्राणहानि हें या वर्षाचें महत्त्वाचें अंग आहे. अतिवृष्टि, महापूर, भूकंप, ज्वालामुखींचे स्फोट, भयानक पुन:पुन्हा वादळें, हिमवृष्टि, सागराला तुफान भरती, त्याचप्रमाणें त्या त्या प्रदेशाच्या भौगोलिक परिस्थितीप्रमाणें अनावृष्टि, साथीचे रोग, धुलिकामय वादळें यामुळें या वर्षी जगतांत सर्व ठिकाणीं जनतेला त्रास सोसावा लागेल. आणि याच्याबरोबरच जागतिक-

राजकारणांत अचानक फेरबदल होतील. गेल्या कांहीं वर्षांत राजकारण-दृष्ट्या जगाचें भवितव्य ठरविणारे प्रमुख राष्ट्रांतील सुप्रसिद्ध लोक कालवश झालेले असतील. त्याचप्रमाणें कांहीं पुढारी स्थानभ्रष्ट होतील, अथवा त्यांचा खून केला जाईल; आणि याच्या पाठीमागें पृथ्वीच्या पाठीवरील कांहीं भागांतील क्रांतीचीं कारणें सांपडूं शकतील. या दुर्घटना एखाद्या विशिष्ट दिवशीं अथवा एखाद्या विशिष्ट महिन्यांत घडणार नसून दीर्घकाल चालणाऱ्या दुर्घटनांची ही सुरुवात आहे.

आपण असें पाहिलेंच आहे कीं, १९१७ च्या आसपास रशिया हें जगांतील एक बलाढ्य राष्ट्र म्हणून गणलें जाऊं लागलें. क्रांतीनंतर १९५२-५३ च्या आसपास नवीन सामर्थ्यशाली चीन राजकारणाच्या क्षितिजावर तळपूं लागला. त्या वेळेपासून आजपावेतों चीन एकसारखी प्रगति करीत असून आतां त्याला स्थैर्य प्राप्त झालेलें आहे. ... आणि आतां आपली वेळ आलेली आहे.

इ. स. १९५० च्या सुमारास भारत हें कृतिपेक्षां उक्तीमुळें श्रेष्ठत्व मिळविलेलें राष्ट्र असेल, पण आतां, येथून पुढें मात्र आशियांतील तें एक खरेंखुरें सामर्थ्यशाली व बलाढ्य राष्ट्र म्हणून ओळखलें जाईल. आशियांत भारत व आफ्रिकेंत इजिप्त हीं बलाढ्य राष्ट्रें ठरून, जागतिक राजकारणांत तीं महत्त्वाची भूमिका वठवतील.

या वर्षापूर्वी, म्हणजे इ. स. १९८९–९० पूर्वी भारतानें राजकीय व सामाजिक संकटांशीं झुंज दिलेली असेल; व अस्थिरता, अव्यवस्था, ऐक्याचा अभाव, प्रांतभेद, जातिभेद, वंशभेद, इत्यादींनीं भारत गांजून गेलेला असेल. पण आतां, या वेळीं भारतीय पुढाऱ्यांना हें कळून चुकलें असेल कीं, आपला उत्कर्ष साधावयाचा असेल तर या भेदांना व दुर्गुणांना फांटा द्यावयास हवा... आपल्या राष्ट्रांत ऐक्य व्हावें व त्याची प्रगति व्हावी म्हणून प्रथम रशियानें व नंतर चीननें आपल्या देशांतील जनतेवर जशीं कडक बंधनें घातलीं तशींच आपणहि घातलीं पाहिजेत हें भारतीय पुढाऱ्यांना पटेल; व जवळजवळ त्याच प्रकारच्या कालांत भारत आतां प्रवेश करीत आहे. रशियानें राज्य-

क्रांतीचीं पाळेंमुळें चीनमध्यें पसरविलीं, व चीननेंहि थोड्याफार फरकानें ही क्रांति स्वीकारली.

त्याचप्रमाणें चीनहि भारताकडे हे क्रांतीचे वारे पाठवून देईल व भारतहि थोड्याफार फरकानें त्याचा स्वीकार करील. मार्क्स, सुनियत्सेन व महात्मा गांधी यांनीं सांगितलेले निरनिराळे सिद्धान्त या भरतभूमीच्या वातावरणांत मंथून काढले जातील; त्याजकडे अतिशय व्यावहारिक व वास्तववादी दृष्टिकोनाबरोबरच थोड्याशा अध्यात्मवादी मनोवृत्तींतून पाहिलें जाईल.

या नवीन मार्गाचा अवलंब केल्यामुळें अतिशय भक्कम व स्थिर पायावर उभारलेलें एक सामर्थ्यशाली राष्ट्र म्हणून भारताची कीर्ति त्रिखंडांत दुमदुमून राहील; व पुढील चाळीस वर्षें तरी त्यांत कोणत्याहि प्रकारचा खंड पडणार नाहीं. यापुढील भारताच्या भविष्याचा विचार करतांना ही पार्श्वभूमि आपण विचारांत घेतली पाहिजे, व त्या दृष्टीनेंच पुढील घटनांचा अन्वयार्थ या मूलभूत सिद्धान्ताला अनुसरून लावला पाहिजे;–आणि ही मूलभूत मौलिक गोष्ट म्हणजे, " जगांतील एक खरेंखुरें बलाढ्य राष्ट्र होण्याच्या दिशेनें भारताची वाटचाल चालू आहे! "

मागील वर्षीं चालू झालेली आर्थिक मंदी व बाजारभावांतील घसरगुंडी अद्यापहि थोड्याफार प्रमाणांत टिकून राहिली आहे. अनेक राष्ट्रांना .जागतिक प्रश्न निर्माण करणाऱ्या बेकारी, राष्ट्रीय असंतोष, अस्थिरता इत्यादि संकटांतून आपलें तोंड वर काढतांना अद्यापहि कठीण जात आहे. या शतकाच्या प्रथम भागांत राष्ट्राराष्ट्रांत आर्थिक समतोलत्व टिकविण्याची जशी धडपड चाले, त्याचप्रमाणें राष्ट्राराष्ट्रांत लष्करी समतोलत्व निर्माण व्हावें म्हणून नवीन सिद्धान्त पुढें मांडले जातील.

या वर्षीं ( 1989 A. D. ) भारताच्या राष्ट्राध्यक्षांचा दीर्घकालीन आजारामुळें मृत्यु संभवतो; व त्यांच्या जागीं एका नवीन, उत्साही व कर्तृत्वशाली व्यक्तींची स्थापना होईल असेंहि वाटतें. भारतांत आणि जगांत इतर कांहीं ठिकाणीं मार्चमध्यें भूकंपाचे भयानक धक्के बसतील; आणि याच प्रदेशांत वर्षाच्या शेवटीं कडाक्याची थंडी पडेल.

कांहीं युरोपियन राष्ट्रांनीं आपापसांतील भांडणानें आपलें वर्चस्व गमावल्यानें आतां त्यांच्याऐवजीं स्पेन व पोर्तुगाल हीं बलाढ्य राष्ट्रें म्हणून नांव मिळविण्याचा प्रयत्न करतील. त्यांतहि स्पेनलाच चांगली संधि प्राप्त होत आहे. भारतांतील पक्षोपपक्षांतील विरोध नाहींसा होऊन त्यांच्यांत एकी निर्माण होईल, व भारतांतील चालू काळांतील पुढाऱ्यांच्या इच्छेप्रमाणें भारताची घटना बदलण्यांत येईल. भारतांतील वाहतुकीच्या, रस्त्यांच्या, व दळणवळणाऱ्या मार्गांत अनेक सुधारणा होऊन, अनेक नवीन रस्ते बांधण्यांत येतील. देशांत ऐक्यभाव नांदावा, शांतता व सुव्यवस्था रहावी यासाठीं दळणवळणांत व वाहतुकींत भरपूर प्रगति केली पाहिजे हें भारतीय राज्यकर्त्यांना कळून चुकेल.

या व मागील वर्षीं नैसर्गिक आणि राजकीय उत्पातांमुळें वा आपत्तींमुळें पूर्वींच्या धरणादि योजनांचें जें कांहीं नुकसान झालेलें असेल त्याची आतां दुरुस्ती करण्यांत येईल, व त्यासाठीं फारच खर्च करावा लागेल. परंतु यांतहि व्यावहारिकतेचा व धंदेवाईक वृत्तीचा अवलंब केल्यामुळें आपलें राष्ट्र अर्थशास्त्रांत पारंगत झाल्याचें आढळून येईल. काटकसरीमुळेंच आपलें राष्ट्र वैभवसंपन्न होत आहे, आपला उत्कर्ष साधून घेत आहे, याची आपल्याला या वर्षीं प्रचीति येईल.

* * *

# — इ. स. १९९० —

या वर्षीं एकूण चार ग्रहणें आहेत. २६ जानेवारी व २२ जुलै रोजीं सूर्यग्रहणें असून, ९ फेब्रुवारी व ६ ऑगस्ट रोजीं चंद्रग्रहणें आहेत. २८ फेब्रुवारीला शनि–मंगळ युति आहे.

या वर्षाच्या इ. स. १९९० सुरुवातीस भारताच्या अडचणी कांहीं नवीन पद्धतींचा अवलंब करून सोडविण्याचा प्रयत्न भारत सरकारकडून केला जाईल. या पद्धतीबद्दल लोकांत बरेच मतभेद असले तरी परिस्थितीच्या

गंभीरतेचीं जाणीव असल्यामुळें सारी भारतीय जनता एकमतानें सरकारला त्याच्या सर्व कार्यांत हार्दिक पाठिंबा देईल.

या वर्षाच्या द्वितीयार्धांत योग्य कायदे करण्याची जनतेकडून मागणी केली जाईल. यावेळीं विरोधी पक्षसुद्धां सरकारला सहकार्याचा हात पुढें करील. परंतु सरकारी यंत्रणेंतील एक विशिष्ट अधिकारी-गट व लष्करी-प्रमुख सरकार जें करूं इच्छील तें अमान्य करण्याचा प्रयत्न करील. तथापि कांहीं कालानंतर त्यांचेंसुद्धां समाधान होईल असा मार्ग शोधण्यांत येईल. आणि या वर्षाच्या शेवटीं महात्मा गांधींच्या जन्मतिथीच्या आसपास हातीं भरपूर सत्ता असलेलें केंद्र सरकार प्रस्थापित होऊन, भारताच्या वर्चस्वाखालीं जास्ती प्रदेश आणण्याचा, व भारतीय भूमीवरील परकीय सत्तांना समुद्रपार हांकलून देण्याचा पराक्रम हें सरकार करून दाखवील. इतकेंच काय, पण परकीयांचें आर्थिक वर्चस्वहि भारताला सहन होणार नाहीं, व एक अगदीं नवीन परराष्ट्रीय धोरण भारत सरकारकडून आंखलें जाईल. भारताच्या या योजनांच्या विरुद्ध इतर कांहीं राष्ट्रें आवाज उठवतील, व बऱ्यावाईट मार्गांचा अवलंब करून त्या योजना हाणून पाडण्याचा प्रयत्न करतील. परंतु सामर्थ्यशाली भारत सरकार त्यांतूनहि डोकें वर काढील. अर्थातच इतर राष्ट्रांचा द्वेषभाव व जळफळाट हा राहणारच !

पावसाळा सर्वसाधारण राहील; आणि त्यामुळें भारतांतील पिकेंहि समाधानकारक येतील. तथापि मध्यप्रदेशाचा कांहीं भाग व त्याच्या आस-पासच्या प्रदेशांत कांहीं दुष्काळी परिस्थिति असेल. इ. स. १९१७ च्या सुरुवातीला रशियामध्यें जी नवीन पद्धत सुरूं झाली तिचा आतां ऱ्हास होत असून रशियन वर्चस्वाखालील व दडपणाखालील बहुसंख्य राष्ट्रें त्या गटांतून बाहेर पडतील. असा कांहीं प्रयत्न इ. स. १९६० सालीं पण झाला होता. हा प्रकार दीर्घ कालापासून सुरूं झालेला असून अजूनहि बराच काल असाच राहील. तथापि रशियाचा नकाशा व त्याच्या मर्यादा बदलत असूनहि तें एक सामर्थ्यशाली राष्ट्र राहील. एका बाजूस चीन आणि दुसरीकडे जर्मनी अथवा दुसरीं शेजारील राष्ट्रें त्याच्या सामर्थ्याचा कांहीं भाग आपल्याकडे ओढून घेतील.

या वर्षी (1990 A. D.) पोलंडहि स्वतःच्या पायावर उभें राहील. रशियाचा एक लाडका सुपुत्र कालवश होईल. दक्षिण भारत आणि आफ्रिकेच्या कांहीं भागांत एक जोरदार सांथ फैलावेल. पूर्वीच्या जुन्या सरकारच्या जागीं इजिप्तमध्यें नवीन सामर्थ्यशाली सरकार स्थानापन्न होत आहे, आणि आफ्रिका खंडांतील तें एक सामर्थ्यवान् राष्ट्र बनत आहे. इजिप्तमधील सामाजिक आणि राजकीय जीवनांत बऱ्याच महत्त्वाच्या सुधारणा व फेरबदल होत असल्यामुळें या वर्षाच्या मध्यास तेथील जनतेंत उत्साह व चैतन्य दिसून येईल. रशियामध्यें पिकांच्या नाशांतूनच, या शतकाच्या सुरुवातीप्रमाणेंच फार मोठा दुष्काळ पडल्याचें दिसून येईल. तेहरानच्या आसपासहि दुष्काळी परिस्थिति असेल; तथापि परराष्ट्रांच्या मदतीमुळें त्याची तीव्रता तितकी भासणार नाहीं.

जुन्या भारतीय ज्योतिषशास्त्रीय उपपत्तीच्या आधारें या पुस्तकाचें संपादक श्री. अजंता जैन हे कांहीं वर्षाच्या आजारीपणानंतर व सामाजिक कार्यातील सेवानिवृत्तीनंतर या वर्षी (1990 A. D.) कालवश होतील. मृत्यूपूर्वी एक मोठा तत्त्वज्ञानी व कुशल धंदेवाईक अशी त्यांची ख्याति झालेली असेल. आणि आपल्यामागें त्यांनीं एका मोठ्या व भरभराटीच्या धंद्याचा व्याप मांडून ठेवलेला असल्याचें दिसून येईल.



" इन्शान समझता है कि, तदबीर है सब कुछ,
मजबुरीयाँ कहति है कि, तकदीर भी कुछ है !"

मागील व या वर्षी बऱ्याच राष्ट्रांत पुष्कळ शास्त्रीय प्रगति व दळणवळणाच्या पद्धतींत बऱ्याच सुधारणा होत असल्याचें दिसून येईल.

* * *

# — इ. स. १९९१ —

या वर्षी एकूण तीन ग्रहणें आहेत. १५ जानेवारी व ११ जुलै रोजीं सूर्यग्रहणें असून, २१ डिसेंबर रोजीं चंद्रग्रहण आहे. १३ जून रोजीं गुरु–मंगळ युति आहे.

मागील अनेक संकटें, आर्थिक मंदी, आणि प्रतिकूल निसर्ग यांच्यांतून भारताला आपलें डोकें वर काढावें लागत असल्यानें, 'सगळें आबादी-आबाद आहे.' असें कोणीच म्हणूं शकणार नाहीं. ग्रहयोगांकडे पाहिलें असतां उघड दिसतें कीं, भारताच्या राष्ट्रीय रथाला दोन अथवा तीन विरुद्ध दिशांनीं निरनिराळ्या शक्ति खेचीत आहेत . . . परंतु वर्षा–दोन वर्षांत हा विरोध नाहींसा होऊन योग्य मार्गानें व चांगल्या वेगानें हाच रथ सुरळीत चालूं लागेल. या संकटांतून भारत 'तावून सुलाखून' बाहेर पडेल; आणि जगाला एक नवीन प्रकारचें जीवन, नवीन प्रकाश, आणि अधिक शांततेनें जीवन जगण्याचा मार्ग पुन्हा एकदां दाखवून देईल.

या वर्षी म्हणजे इ. स. १९९१ मध्यें भारतीय सरकार हें सामर्थ्यशाली, लोकप्रिय व दूरदर्शी इत्यादि गुणांनीं युक्त असून, आणी-बाणीच्या प्रसंगांना धैर्यानें व तत्परतेनें तोंड देण्यांत व त्यांत यश मिळविण्यांत तें समर्थ ठरेल. बाजारांतील चलनाच्या तुटवड्यामुळें एप्रिल आणि मेमध्यें जनतेंत असंतोष पसरेल. अर्थात् त्यामुळें प्रगतीचा वेग काडीमात्र मंदावणार नाहीं. कारण नवीन कायदे आणि परदेशांशीं वाढता व्यापार यांमुळें भरपूर पैसा येऊन राष्ट्रीय शत्रूला आपल्या देशाचा उंबरठादेखील ओलांडतां येणार नाहीं. भारताच्या इतिहासांत इ. स. १९८९, १९९० व १९९१ हीं वर्षे सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखीं आहेत. ऐकतांना गंमतीचें वाटलें तरी इजिप्त आणि भारत यांच्या संस्कृतींत आणि परंपरेंत फार मोठें साम्य आढळून येईल....आणि नाईल खोऱ्यांतील पुरातन संस्कृतीचे आधारस्तंभ असलेल्या इजिप्शियन लोकांनीं भारताइतकीच प्रगति केल्याचें आपणांस आढळून येईल.

या वर्षी (1991 A D.) भारतांत खरें खुरें लोकप्रिय सरकार असेल. आणि संख्येनें कमी असलेले धर्मवेडे व सनातनी विरोधक हजारों वर्षांपूर्वींच्या धर्मग्रंथांतील उताऱ्यांनीं सरकारचें लक्ष वळविण्याचा प्रयत्न करतील, तरीपण त्यांच्या या विदुषकी प्रयत्नांना सरकार भीक घालणार नाहीं. गरीब जनतेच्या गरजेकडे काळजीपूर्वक लक्ष पुरविणाऱ्या सरकारी संस्था व रुग्णालयें यांच्यांत भरपूर सुधारणा होतील. या वर्षी काळाबाजार करणाऱ्या असंख्य धंदेवाईक लोकांना कोणतीहि दयामाया न दाखवितां पकडून तुरुंगात टाकलें जाईल; आणि भारतांतील व्यापारीवर्गानें प्रामाणिकपणानें व सचोटीनें हा धंदा चालवावा अशी व्यवस्था केली जाईल. अधूनमधून येणाऱ्या टोळधाडींमुळें आणि प्राणघातक सांथीमुळें थोडेंफार नुकसान सोसावें लागलें तरी एकंदरींत पिकें चांगलीं येतील व शास्त्रज्ञहि पिकांचा नाश होऊं नये या दृष्टीनें काहीं प्रयत्न करतील.

* रशियाला हें वर्ष पुन्हा एकदां संकटाचें जाईल. तेथील जनता असंतुष्ट असेल. चीन व रशियामधील संबंध इतके बिघडतील कीं, या दोन राष्ट्रांत युद्धाची भाषा वारंवार बोलली जाईल. रशिया दुर्बल व तेजोहीन व्हावा यासाठीं युरोपमधील दोन मोठीं राष्ट्रें त्याला सतत विरोध करतील.

* भारतामध्यें पंजाब आणि काश्मीरजवळच्या देशाच्या मर्यादा व इतर कांहीं गोष्टींमुळें भांडणतंटे निर्माण होतील ... नदीच्या पाण्याच्या चुकीच्या विभागणीमुळें त्या ठिकाणीं दुष्काळी परिस्थिति निर्माण झालेली असेल. पंजाबमधील कांहीं प्रसिद्ध पुढारी या भांडणाच्या बुडाशीं असतील. कॅनडामध्यें हवामानांत बराच बदल झाल्याचें, आणि नद्यांनीं आपले मार्ग बदलून बराच अनर्थ निर्माण केल्याचें दिसून येईल. थोडक्यांत या वर्षी कॅनडामध्यें नैसर्गिक उत्पात व संकटें यामुळें जनता गांजून जाईल.

महाराष्ट्रांतसुद्धां प्रतिकूल हवामान राहील. तथापि तेथील जनता बरीच सुखी व प्रगतिशील राहील. एका जगप्रसिद्ध अमेरिकन व्यक्तीचें निधन ही या वर्षीची जागतिक महत्त्वाची बातमी ठरेल. अमेरिकाहि बऱ्याच कटकटी निर्माण करील. आणि याच कालाच्या आसपास तिनें रशियाविरुद्ध सूड

घेतल्याचें पाहावयास सांपडेल. वस्तुतः पाहतां सत्तेचें पारडें अमेरिकेकडून कॅनडाकडे; जपानकडून ऑस्ट्रेलियाकडे; चीनकडून भारताकडे व तुर्कस्तान-कडून इजिप्तकडे झुकत आहे असें दिसेल. २० व्या शतकांतील कोणत्याहि कालखंडापेक्षां या वर्षात फार मोठ्या जागतिक क्रांतीच्या दिशेनें आपण वाटचाल करीत आहोंत. या वर्षी पावसाळाहि सर्वसाधारण असणार नाहीं. कारण सर्वच गोष्टी सर्वसामान्याच्या वर किंवा खालीं असल्याचें दिसून येईल.

* * *

# -- इ. स. १९९२ --

या वर्षी एकूण पांच ग्रहणें आहेत. ४ जानेवारी; ३० जून व २४ डिसेंबर रोजीं सूर्यग्रहणें असून, १५ जून व ९ डिसेंबर रोजीं चंद्रग्रहणें आहेत. ५ मार्च रोजीं शनि–मंगळ युति आहे.

या वर्षापासून इ. स. १९९२ जागतिक स्वरूपाच्या आर्थिक मंदीच्या क्षेत्रांत आपण प्रवेश करीत आहोंत. शेअर व सट्टा बाजार वेगानें घसरगुं-डीच्या मार्गानें जात असल्याचें दिसेल. याचें एक प्रमुख कारण म्हणजे, चुकीच्या धोरणांचा पाठपुरावा केल्यानें आंतरराष्ट्रीय राजकारणांत रशिया व अमेरिका या दोन्ही बलाढ्य राष्ट्रांना फार मोठें नुकसान सोसावें लागून, दोन्हीहि देशांत कलह व कटकटींना ऊत आलेला असेल. कांहीं कालापूर्वी "रशिया कोलमडून पडेल व आपला फायदा होईल" असें स्वप्न अमेरिका पहात होती. तर "अमेरिकेची अर्थव्यवस्था कोलमडून पडणार व आपण वर्चस्व गाजविणार" अशा कल्पनेंत रशिया दंग होता. परंतु दोघांनींहि वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष केल्यानें दोघेहि कोलमडून पडले, व इतर राष्ट्रांचाच फायदा झाला असें दृश्य दिसेल. जागतिक वर्चस्व मिळविण्याच्या चढाओढींत फक्त जगाचाच विजय होतो; कोणा एका विशिष्ट सत्तेचा होऊं शकत नाहीं . . . हें असें कां ? या कूट प्रश्नाचा निर्णय वाचकांनीं घ्यावयाचा आहे.

भारत सरकारपुढें संकटांचे डोंगर उभे रहात आहेत; आणि भारताचा द्वेष करणारीं राष्ट्रें, " अखिल भरतखंड बेचिराख " करण्याची




भाषा बोलूं लागतील. अर्थात् हें बोलणें हवेंत विरून जाईल यांत संशय नाहीं. या वर्षी भारताचे परराष्ट्रीय संबंधहि साधारण बिघडलेले असतील. कामगारांतील असंतोषाप्रमाणेंच, ' सिव्हिल सव्र्हंटस् ' व लष्करी प्रमुख यांच्यांतील असमाधानानें अंतर्गत कटकटी निर्माण होतील; पण प्रबळ असें केंद्रसरकार परकीयांच्या चिथावणीनें आंखल्या गेलेल्या गुप्त कटांचा शोध लावून, त्यांचीं पाळेंमुळें उखडून काढील. परराष्ट्रीय संबंधांत बिघाड निर्माण होण्याचें हें एक प्रमुख कारण आहे.

चीनच्या विरुद्ध भारताला उभें करण्याच्या हेतूनें रशियाच्या क्रेमलिनमधील पुढाऱ्यांकडून भारतांतील देशद्रोह्यांना " पैसा " चारला जाईल व त्यामुळेंच पुढें कठीण समस्या निर्माण होतील. ( इ. स. १९५० ते ६० या कालांत अशाच तऱ्हेच्या लोकांनीं स्वतःचा गौरव करून घेतला होता. ) ... या समस्या सोडविण्यांत भारत सरकार वर्षभर गढून जाईल. पंजाब, काश्मीर, अफगाणिस्तान या प्रदेशांतील जनतेंत दंगेधोपे व बंडाळी माजून, भारत सरकारला सतावून सोडण्याचा त्यांचा उद्देश असेल. ही बंडाळी शमविण्यासाठीं लष्कराचा उपयोग करावा लागेल; पण अधिकाऱ्यांच्या आज्ञांचा कांहीं सैनिक अवमान करतील... व या सर्वांच्या मुळाशीं परकीयांचा,-विशेषतः रशिया, चीन आणि अमेरिकेचा गुप्त पैसा असेल हें निश्चित !

या वर्षी ब्रह्मदेश, आसाम व बिहारमध्यें थोडे पूर येणार असले तरी इ. स. १९५४ इतके ते भयानक असणार नाहींत. नैसर्गिक उत्पातांशीं

लढा देण्यासाठीं भारत व ब्रह्मदेश हीं राष्ट्रें एकमतानें कांहीं योजना आंखतील. रशियन लोकांच्या खुळचट वा वेडगळ कृतींनीं इटलीमध्येंहि गंभीर स्वरूपाच्या कटकटी निर्माण होतील, व त्याचा परिणाम देशाची प्रतिष्ठा परराष्ट्रांत कमी होण्यांत होईल. परकीयांच्या चिथावणीमुळें इटालियन सरकार कोलमडून पाडण्यांत येईल व त्या जागीं कम्युनिस्ट राष्ट्रांच्या आदेशाप्रमाणें त्यांच्या वर्चस्वाखालील सरकार स्थापन करण्यांत येईल. या वर्षाच्या शेवटीं पूर्व भारताच्या सरहद्दींना त्या बाजूकडील शेजारी राष्ट्रांकडून मोठाच धक्का निर्माण होत आहे; भारतीय सरकार या प्रसंगाला कसें तोंड देतें हें त्याचें त्यालाच ठाऊक !

संस्थांना–संस्थानांतील अंतर्गत झगड्यामुळें, अमेरिकेंतहि अनेक कटकटी निर्माण होत आहेत. मेक्सिकोला अमेरिकेचें वर्चस्व यापुढें सहन होणार नाहीं ! तीच स्थिति दक्षिण अमेरिकेंतील इतर संस्थानांची !! या संस्थानांतील फाटाफुटीमुळें अमेरिका "शुद्धीवर" येईल, पण तिचा डोलारा मात्र आतां कोसळलेलाच असेल. याच वेळीं सांथीच्या रोगांचा फैलाव अभूतपूर्व प्रमाणावर होऊन, त्यांत भर म्हणूनच कीं काय—निसर्गाच्या उत्पातांमुळें अमेरिकेंतील मृत्युसंख्या प्रमाणाबाहेर वाढेल. आंतरराष्ट्रीय कटकटी निर्माण होण्याचीं दोनच केंद्रें या वर्षीं आपलें लक्ष वेधतील—ती म्हणजे रशिया व अमेरिका ! !

* * *

## — इ. स. १९९३ —

या वर्षीं एकूण चार ग्रहणें आहेत; २१ मे व १३ नोव्हेंबर रोजीं सूर्यग्रहणें असून, ४ जून व २९ नोव्हेंबर रोजीं चंद्रग्रहणें आहेत. १ फेब्रुवारी व ५ नोव्हेंबर रोजीं हर्षल–नेपच्यून यांची युति होत आहे; ५ सप्टेंबर रोजीं गुरु–मंगळ युति आहे.

अनेक व्यक्तींच्या जीवनाच्या दृष्टीनें हें वर्ष संकटाचें व धकाधकीचें

जाणार आहे. विशेष माहितीसाठीं पृष्ठ ३८ वरील 'हर्षल–नेपच्यून' चा लेख पहावा. महत्त्वाचे ग्रहयोग फक्त वातावरणांतच गोंधळ माजवीत नसून जगावरतीं राज्य करणाऱ्या लोकांच्या मनांतहि गोंधळ व उदासीनता निर्माण करीत आहेत. पुढाऱ्यांच्याकडून घाईघाईनें केलेलें कार्य व वक्तृत्व यांमुळें सगळीकडे सावळागोंधळ निर्माण होईल. या वक्तृत्वांना खरें पाहिलें असतां काडीचीदेखील किंमत असणार नाहीं. परंतु त्यांच्यामुळें मानवी समाजांत मोठी खळबळ निर्माण होईल.

या वर्षी (इ. स. १९९३) अपघातांनीं व हृदयक्रिया बंद पडून निधन पावणाऱ्यांची संख्या बरीच मोठी असेल. यावरती कांहीं तोडगा शोधण्याचा प्रयत्न जगांतील शास्त्रज्ञ करतील. परंतु त्यांत त्यांना बिलकूल यश लाभणार नाहीं. कारण मृत्यू हा अटळ आहे. मरणाऱ्या माणसाला थोडाफार आराम मिळवून देण्याचें कार्य हे शास्त्रज्ञ करूं शकतील, येवढीच त्यांच्या शास्त्राची मर्यादा. शास्त्र हें जीवनाच्या सुखसोईंत भर घालूं शकेल; परंतु व्यक्तीचे दुर्गुण, अथवा त्याचा स्वभाव, अथवा जीवनांतच मूलभूत बदल कोणतेंहि शास्त्र करूं शकणार नाहीं.

१९६० पूर्वीं हे परिच्छेद वाचणाऱ्यांना असें वाटेल कीं, १९९३ अथवा २००० मध्यें जग बदलून जाईल. परंतु १९८०–१९९० नंतर हें पुस्तक वाचणारे वाचक सिंहावलोकन करतील तर जगांत कांहींहि बदल झाला नाहीं व विशेष कांहीं संपादन केलें नाहीं असें पाहून त्यांना आश्चर्य वाटेल. सत्तेचें एका राष्ट्राकडून दुसऱ्या राष्ट्राकडे स्थित्यंतर, अथवा लोकांच्यावर राज्य करण्याच्या पद्धतींतील थोडा बदल, याशिवाय इतर दुर्गुण आहेत तसेच राहिले आहेत; एवढेंच नव्हे तर 'हर्षल–नेपच्यून' युतीमुळें जगाची थोडीफार परागतिच झाली आहे असें आढळून येईल.

दुसरें म्हणजे १९५३–५४–५५ मध्यें सुरू केलेल्या संस्था अथवा कार्यें यांच्यामध्यें बदल अथवा दुरुस्ती केल्याशिवाय त्या तग धरूं शकणार नाहींत. एरव्हीं त्या या वर्षी कोलमडून पडतील अथवा आर्थिक दृष्टया पुढें चालविणें कठीण जाईल; किंवा सामाजिक दृष्टया त्या निरुपयोगी ठरतील असें आढळून येईल. या कारणास्तव हें वर्ष अतिशय महत्त्वाचें आहे.

केंद्र सरकारप्रमाणेंच देशांतहि १९५०–५५ मध्यें जन्मलेल्या महत्त्वाकांक्षी लोकांच्यामुळें जो गोंधळ व अस्थिरता निर्माण केली जाईल त्यामुळें या वर्षाची पहिली तिमाहि भारताला सुखावह जाणार नाहीं. हिमालयाच्या खालच्या प्रदेशांत, त्याचप्रमाणें 'कुंभ' रेषेवर भूकंपाचे कांहीं धक्के बसतील. त्याचप्रमाणें 'तूळ' रेषाहि हादरून निघेल. नवीन योजना हातीं घेणें, राष्ट्रीय पुनर्रचनेच्या नवीन योजनांना चालना देणें, पाटबंधाऱ्यांच्या योजना हातीं घेणें, आणि व्यापार वृद्धींगत करणें इत्यादि कार्यक्रमांत या वर्षाच्या मध्यास सरकार दंग असेल. एका आंतरराष्ट्रीय भांडणामध्यें भारत महत्त्वाची भूमिका वठवील, आणि सप्टेंबरनंतर त्याची चोहींकडे वाहवा होईल. * एका आंतरराष्ट्रीय वादामध्यें भारत हें सर्वांचें लक्ष बनून राहील. या वादांत भारत हें एक प्रमुख भूमिका वठवीत असल्यामुळें कांहीं सनसनाटी बातम्या आपणांस ऐकावयास मिळ-



तील. या वर्षाच्या शेवटीं व पुढील वर्षाच्या सुरुवातीस 'रस्तेवाढी'च्या योजना आणि दळणवळणाच्या योजना प्रत्यक्षांत आणल्या जातील. या बाबतींत जनतादेखील हार्दिक सहकार्य देईल.

अमेरिकेंतील वॉशिंग्टनमधील धार्मिक संस्थांचा आणि सरकारचा झगडा सुरू होईल. ऑस्ट्रेलियामध्यें नवीन सांथींचा रोग फैलावून मृत्यु-संख्येचें प्रमाण भरमसाट वाढेल. वाईट हवामानामुळें लोकांच्या दैन्यावस्थेंत व दुःखांत भर पडून, 'मेस्किकोमध्यें' क्रांतीच्या ज्वाला धूमसूं लागतील. त्याप्रमाणें शेजारील राष्ट्रांशीं त्यांचे वितुष्ट येईल. पोलंड, इराण व रशियाची युक्रेनकडील बाजू या ठिकाणीं राजकीय वातावरण चिघळेल, व तेथील जनता अधिकाऱ्यांच्याविरुद्ध बंड करून उठण्यास प्रवृत्त होईल. इजिप्तमध्यें विशेष कांहीं घडणार नसलें तरी उत्तर आफ्रिकेंत मात्र तेथील सरकार हिंसक मार्गानींच उलथून टाकलें जाईल.

नोव्हेंबरमध्यें हवामानांत अचानक बदल होऊन मध्यपूर्व आशियांत भूकंपाचे धक्के बसतील, व अधूनमधून वादळें होतील. हाच प्रकार तुर्कस्तान व इराणमध्यें होईल. चलनाच्या बाजारांत तगी निर्माण होईल; कारण उद्योगधंद्याना पैसा मिळणार नाहीं. याचा परिणाम बेकारी निर्माण होण्यांत होईल. आंतरराष्ट्रीय परिस्थितींत निराशाजनक वातावरणामुळें बाजार-भावांत भलतेच चढउतार होतील. भारताच्या दृष्टीनें नसले तरी बऱ्याच राष्ट्रांच्या दृष्टीनें रशिया व अमेरिका त्रासदायक परिस्थिति निर्माण करीत आहेत.

राजकारणाचे खेळ कसे खेळावयाचे याचे धडे भारतानें आधींच गिरविल्यामुळें आपला तोल कसा सावरावयाचा हें त्याला समजलेले आहे. शेतीप्रधान देश असल्यामुळें कोणत्याहि बाबतींत मर्यादा अथवा सीमा पाळाव्या लागतात यावर त्याची श्रद्धा आहे. या मर्यादा भारत स्वतः कधींच ओलंडणार नाहीं. आणि त्या कधींच ओलांडूं नयेत हा ऐतिहासिक महत्त्वाचा धडा या वर्षीं भारताकडून जगाला शिकावा लागेल.

* * *

# -- इ. स. १९९४ --

या वर्षी एकूण तीन ग्रहणें आहेत; १० मे व ३ नोव्हेंबर रोजीं सूर्य-ग्रहणें असून, २५ मे रोजीं चंद्रग्रहण आहे. १४ मार्च रोजीं शनि—मंगळ युति होत आहे.

या वर्षाच्या मे व जून महिन्यांत बाजारांत थोडीफार मंदी राहील; पण त्यानंतर वस्तूंच्या किमतींत चढ होऊन त्या स्थिर होतील. अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय निकाल लागून सप्टेंबरमध्यें व आसपासच्या कालांत जगांतील परिस्थिति शांततेची, समाधानाची, व सामाजिक आणि आर्थिक दृष्टया भरपूर प्रगतीची राहील.

या वर्षाच्या म्हणजे इ. स. १९९४ च्या एप्रिल, ऑक्टोबर व नोव्हेंबर महिन्यांत पृथ्वीच्या पाठीवर बऱ्याच ठिकाणीं भूकंप होतील, व ज्वालामुखी आग ओकतील. वर्षाच्या शेवटच्या तिमाहींत कडाक्याची थंडी पडेल, व वरच्या अक्षांशावर नेहमींपेक्षां अधिक प्रमाणांत हिमवृष्टि होईल.

पोलंडच्या आसपासच्या प्रदेशावर राजकीय दृष्टया पोलादी पडदा टाकण्यांत येईल. विशेषतः पोलंडचे शेजारी राष्ट्राशीं संबंध खूपच बिघडतील. अमेरिकेच्या कांहीं प्रदेशांत व ऑस्ट्रेलियांत गुन्हेगारीची जोरदार लाट उसळेल. सर्वसाधारपणें मुस्लीम राष्ट्रांत व विशेषतः आफ्रिकेंतील मुस्लीम राष्ट्रांत सत्ताधीश पक्षांना, आणि राजघराण्यांतील व्यक्तींना संकटांना तोंड द्यावें लागेल. कारण सामान्य जनता सर्व प्रकारच्या भेदांचें निर्मूलन व्हावें अशी मागणी करील.

भारतीय सरकार आर्थिक अडचणींत सांपडेल, व धार्मिक संस्थांच्या ताब्यांतील मालमत्ता सरकारनें आपल्याकडे घ्यावी असें सुचविलें जाईल. लोकांच्यामध्यें उत्साही वातावरण असून सर्वांना समानतेनें वागणूक मिळावी अशी जनतेची इच्छा असेल. सरकार कार्यक्षम असल्यामुळें येणाऱ्या परि-स्थितीला तें धैर्यानें तोंड देईल. देशाच्या दळणवळणाच्या पद्धतींत आणखी नवीन सुधारणा होतील. ऑस्ट्रेलियाच्या आणि कॅनडाच्या चीड येण्या-

सारख्या वागणुकीमुळें या वर्षाच्या मध्यास त्यांचे व भारताचे संबंध बिघडतील. चलनाचा तुटवडा भरून काढण्यासाठीं एखादें राष्ट्रीय कर्ज उभारण्याचा सरकारचा विचार असेल. वर्षाच्या शेवटच्या विभागांत आंतरराष्ट्रीय भांडणांत भारत मध्यस्थाची भूमिका वठवील, आणि आशियाच्या कांहीं भागावर आक्रमण करण्याच्या कॅनडाच्या व ऑस्ट्रेलियाच्या वृत्तीचा वा प्रयत्नांचा भारताकडून जोरदार विरोध केला जाईल. युरोपमधील स्पेन व पोर्तुगालच्या प्रदेशांत संकटांची परंपरा निर्माण होत असून, कांहीं धार्मिक संस्थांच्या चिथावणीमुळें तेथील सरकार जबरदस्तीनें उलथून पाडण्यांत येऊन त्या जागीं नवीन सरकार स्थापन करण्यांत येईल.

या वर्षाच्या ( 1994 A. D. ) सुरुवातीस नेहमींपेक्षां अधिक प्रमाणांत प्रवासाच्या क्षेत्रांतील अपघातांची नोंद करावी लागेल. जमिनीच्या धुपणीवर प्रतिबंधक इलाज योजून नापीक जमिनीसुद्धां लागवडीस आणण्याच्या दृष्टीनें कांहीं मार्ग शोधण्याचा यशस्वी प्रयत्न केला जाईल. पावसाळा नियमित व वेळेवर होईल. तथापि बऱ्याच प्रदेशांत तो नेहमींपेक्षां अधिक पडेल.

* * *

## -- इ. स. १९९५ --

या वर्षीं एकूण तीन ग्रहणें आहेत. २९ एप्रिल व २४ ऑक्टोबर रोजीं सूर्यग्रहणें असून, १५ एप्रिल रोजीं चंद्रग्रहण आहे. १६ नोव्हेंबर रोजीं गुरु-मंगळ युति आहे.

या वर्षाच्या ( 1995 A. D. ) प्रथमार्धांत कांहीं प्रसिद्ध बंगाली व्यक्तींच्या निधनामुळें पूर्व भारतांतील जनमत प्रक्षुब्ध बनेल. तथापि व्यापार व उद्योगधंदे भरभराटीस आलेले असल्यामुळें त्याला वाईट वळण लागणार नाहीं. कांहीं नैसर्गिक उत्पातांनंतर कांहीं नवीन खाणींचा शोध

लागेल. सरहद्दीच्या बाबतींतील शेजारी राष्ट्रांच्या त्रासदायक धोरणामुळें भारताच्या पूर्वसरहद्दीवर आणि भूतानमध्यें अशांततेचें वातावरण निर्माण होईल. या परराष्ट्रांच्या सरहद्दीवरील कटकटीबद्दल भारतीय सरकार त्यांचा खरपूस समाचार घेईल.

ब्रह्मदेश आणि जपानधील कांहीं ख्यातनाम व्यक्ति कालवश होत आहेत. या व गेल्या वर्षाच्या विशिष्ट राजकीय धोरणामुळें पोलंडच्या आसपासच्या देशांतील चांगल्या भरभराटीला आलेल्या व्यापारावर वाईट परिणाम होत आहे व तो विस्कळित होत आहे. या वर्षी म्हणजे इ. स. १९९५ मध्यें इराण आणि पोलंडमध्यें खंबीर मनोवृत्तीचें सरकार बंड करून उठणाऱ्या जनतेला लष्करी कायद्याचा उपयोग करून थंड ठेवील. मात्र अंतर्गत अराजकतेमुळें मोरोक्को सरकार गडगडेल आणि तेथील एका प्रसिद्ध व्यक्तीचा खून करण्याचा प्रयत्न होईल. या दुष्कृत्यांत इराण वा पोलंडचा हात असेल.

पोलंडच्या असल्या हीन वृत्तीमुळें शहाजोगपणें युद्धाची भाषा बोलली जाईल. आणि प्रत्यक्षांत उघड तंटेबखेडे निर्माण होऊन रक्तपातहि होईल. विशेषत: इराणच्या सरहद्दीपाशीं या घटना घडतील. परंतु यामध्यें स्पेन सरकारचा फायदा होईल. मादागास्कर बेटाची या वर्षी बरीच भरभराट होईल आणि तेथील नवीन उद्योगधंद्यांमुळें बेटावरील संमिश्र लोकसंख्येचें जीवनमान चांगलेंच सुधारेल.

तिबेट आणि नेपाळ येथील सरकारांच्यापुढें या वर्षी संकटांचें ताट वाढून ठेवलेलें असून, तेथील जनतेला चीनचा अकारण हस्तक्षेप व वर्चस्व मुळींच रुचणार नाहीं. हिमालयीन प्रदेशांतील देशांत महत्त्वाची भूमिका खेळणारें नेपाळहि कांहीं तरी कारणानें चीनबरोबरचें आपले संबंध बिघडवून घेण्यास राजी होईल. चीनी सरकारच्या दिग्दर्शनाखालींच अलीकडच्या कालांत या चिमुकल्या राष्ट्रानें आपली सर्वांगीण प्रगति केली असेल ही गोष्ट वेगळी ! भारताचे नेपाळ व तिबेटशीं संबंध स्नेहसलोख्याचे राहून कांहीं नव्या कररारमदारावर सह्या केल्या जातील. तिबेट आणि खाटमांडू येथील काहीं शिष्टमंडळें या वर्षी भारतास भेट देतील.

रशियाचें शेजारी राष्ट्रांवरील वर्चस्व आतां उत्तरोत्तर कमी होत आहे असें या वर्षी दिसून येईल. ' मार्क्स ' नें समाजसत्तावादाच्या मांडलेल्या सिद्धांतामध्यें थोडाफार बदल होऊन नंतरच त्याचा स्वीकार केला जाईल. इतकेंच काय पण युरोप, आफ्रिका आणि आशियांतील कांहीं राष्ट्रांनीं थोड्याफार बदलानंतर त्या तत्त्वांचा यापूर्वींच स्वीकार केलेला आहे असें दिसून येईल. तथापि यापूर्वी एखाद्या राक्षसाप्रमाणें रशियाचा जो सर्वत्र दरारा होता तो अंतर्गत अव्यवस्थेमुळें व बाहेरील दडपणामुळें खूपच कमी होईल आणि त्याची सत्ता शेजारील राष्ट्रांमध्यें विभागली जाईल. आंतर-राष्ट्रीय राजकारणाच्या क्षेत्रांतील वर्चस्व गमावून बसणारें दुसरें राष्ट्र म्हणजे अमेरिका–रशियाच्या दृष्टीनें ही फक्त सुरुवातच आहे, पण शेवट मात्र अद्यापि बराच दूर आहे.

* * *

## — इ. स. १९९६ —

या वर्षी एकूण चार ग्रहणें आहेत. १७ एप्रिल व १२ ऑक्टोबर रोजीं सूर्यग्रहणें असून, ४ एप्रिल व २७ सप्टेंबर रोजीं चंद्रग्रहणें आहेत. २१ मार्च रोजीं शनि–मंगळ युति आहे.

या वर्षाच्या म्हणजे इ. स. १९९६ च्या प्रथमार्धांत पूर्वभारतांतील जनतेंत नैसर्गिक आपत्तीमुळें असमाधान व असंतोष निर्माण होईल. त्याचप्रमाणें या कालांत एक ख्यातनाम ब्रिटिश व्यक्ति निधन पावेल. ब्रिटनचे परराष्ट्रीय संबंध बरेच गढूळ होतील. जर्मन राष्ट्राच्या शेजारील प्रदेशाविषयींच्या धोरणाबद्दल व संबंधाबद्दल या वर्षाच्या उत्तरार्धांत मोठ्या हालचाली होतील. उत्तर युरोप आणि ऑस्ट्रियासभोंवतालच्या देशांतील अरण्यांत पिकांनीं भरलेल्या जमिनींवर अग्निप्रलयानें हाहा:कार उडेल. शिवाय या वर्षाच्या द्वितीयार्धांत तेथील जनतेंचें कांहीं राष्ट्रांशीं वितुष्ट येईल. कांहीं राष्ट्रांशीं असलेले राजनैतिक संबंध

तोडून टाकावेत असें इजिप्तच्या सामर्थ्यशाली सरकारला वाटूं लागेल. इजिप्तच्या सरकारला या वर्षी वाढत्या विरोधाला तोंड द्यावें लागत असून त्याला लष्करार्चेहि सहकार्य मिळणार नाहीं. तथापि कामगार वर्गाचा त्याला फार मोठा पाठिंबा मिळेल. एक प्रख्यात चिनी व्यक्ति या वर्षी कालवश होईल.

भारतांत या वर्षी संमिश्र स्वरूपाच्या घटना घडतील. कामगार वर्गाचें आणि सरकारी नोकरांचें 'जीवनमान' सुधारावें व त्यांचा दर्जा वाढावा यासाठीं नवीन कायदे करण्याकडे सरकारकडून जागरूकतेनें लक्ष पुरविलें जाईल. आंतरराष्ट्रीय राजकारणांत एकमेकांविरुद्ध भांडत असलेल्या दोन बलाढ्य राष्ट्रांत सलोखा निर्माण करण्यांत या वर्षाच्या प्रथमार्धांत भारत यशस्वी होईल. भारतीय सरकारच्या धोरणाला जातीयवादी पुढाऱ्यांच्याकडून फार मोठा विरोध केला जाईल. परंतु एकंदरींत पाहातां भारत आणि इतर कांहीं देश यांच्याकडून होणाऱ्या या कृती राजकारणांत गोंधळ माजविणाऱ्या राष्ट्रांना शांतता निर्माण करण्यास स्फूर्तिप्रंत ठरतील, व यामुळेंच जगांतील राजकारणांत शांततेचें व सलोख्याचें वातावरण नांदेल. इजिप्त व भारतांतील पुढारी मध्यस्थाची भूमिका फार चांगल्या प्रकारें पार पाडतील.

या वर्षी (1996 A.D.) भारतांत अपघातांचें प्रमाण वाढेल. विशेषत: समुद्रकिनाऱ्यालगत व नाविक दलाशीं हे अपघात संबंधित असतील. या वर्षाच्या द्वितीयार्धांत सरकारचा कांहीं विचित्र धोरणामुळें पराभव झालेला असेल. नंतर भारतांत संमिश्र सरकारची स्थापना होईल व तें सरकार नवीन राष्ट्रीय कार्यक्रम हातीं घेईल. जगांतील समाजसत्तावादी राष्ट्रांशीं भारताचे संबंध सलोख्याचे असतील. भारताचा व्यापार उत्तरोत्तर वृद्धिंगत होत असून, या वर्षीच्या द्वितीयार्धांत भारतीय सरकारची आर्थिक परिस्थिति चांगलीच सुधारलेली असेल. कांहीं प्रमुख मंत्र्यांनीं केलेल्या व्यवहाराबाबत अफवा उठतील, पण त्यांत कांहीं तथ्य नाहीं असें आढळून येईल. अर्थात् भारतीय राजकारण-धुरंधरांच्या मनांत या अफवा अशांतता निर्माण केल्याविना राहाणार नाहींत. कांहीं झालें तरी अपघाताचे व नैसर्गिक आपत्तींचें प्रमाण

खूपच कमी असल्यानें, अनेक क्षेत्रांत भारत या वर्षी प्रगतिपथावर आहे असें पाहावयास मिळेल.

* * *

# -- इ. स. १९९७ --

या वर्षी एकूण चार ग्रहणें आहेत. ९ मार्च व १ सप्टेंबर रोजीं सूर्य-ग्रहणें असून, २४ मार्च व १६ सप्टेंबर रोजीं चंद्रग्रहणें आहेत. ९ जानेवारीला गुरु-नेपच्यून युति होत असून १६ फेब्रुवारीला गुरु-हर्षल युति होत आहे.

अनेक राष्ट्रांच्या जीवनांत या दोन युति फार महत्त्वाची भूमिका वठवीत आहेत. तथापि सर्वसामान्यतः निरनिराळ्या ध्येयाचा पुरस्कार करणाऱ्या राष्ट्रांमध्यें गुण्यागोविंदानें नांदण्याची इच्छा होईल. या वर्षी सर्वत्र सलोख्याचें वातावरण नांदेल असें म्हणावेंसें वाटतें. युद्धानें छिन्नविच्छिन्न झालेल्या राष्ट्रांना व युद्धखोर राष्ट्रांना एक महान् मुत्सद्दी शांततेचा, सुबत्तेचा आणि गुण्यागोविंदानें व सहकार्यानें आपलें अस्तित्व टिकविण्याचा मंत्र जगताच्या कानाकोंपऱ्यांत पोंचवील. ही भूमिका वठविण्यांत या वर्षी आपला भारत यशस्वी होत आहे हें सुदैवच म्हणावयाचें !

या पुस्तकांत उल्लेखिलेल्या यामागील सर्व वर्षांतील प्रमुख ग्रहांच्या युतींना ज्योतिषशास्त्रदृष्टया फार मोठें महत्त्व आहे. गुरु-नेपच्यून युति असो वा शनि-गुरु युति असो—व्यक्तींच्या वा राष्ट्रांच्या जीवनांत त्यांच्या-कडून विशिष्ट व विविध भूमिका वठविल्या जातात. कारण सौरमंडळांतील त्यांचें व त्यांच्या युतींचें क्षेत्र फारच मोठें असतें. जागतिक घडामोडींवर या युतींचें फार मोठें दडपण असतें व त्यांच्यामुळें बरेच दूरगामी परिणाम घडून येतात हें उघड आहे. त्याचप्रमाणें राष्ट्राच्या वा जगाच्या घडामोडीं-वरील या युतींचे परिणाम हे त्याच दोन ग्रहांची पुनश्च युति होईपर्यंत टिकून राहतात हे लक्षांत ठेवणें जरूर आहे. त्याच ग्रहांच्या एका युती-

पासून दुसऱ्या युतीपर्यंतच्या कालाला 'चक्र' (Cycle) असें नांव देतां येईल. या वर्षी दोन युति होत असून त्यांच्या परिणामांची नोंद थोडक्यांत नुकतीच केलेली आहे. यापूर्वीच सांगितल्याप्रमाणें खगोलशास्त्रांतील सूक्ष्म अंकांचा व गणिताचा अभाव असल्यानें सविस्तर निष्कर्षांची नोंद करणें अशक्यप्राय ठरत आहे.

या वर्षी म्हणजे इ. स. १९९७ मध्यें ऑस्ट्रेलियांतील धर्मसंस्थांच्या प्रतिनिधींची वा धार्मिक मनोवृत्तीच्या लोकांची मोठ्या प्रमाणावर "देवाच्या दारीं" रवानगी होईल. तेथील सरकार प्रबळ असलें तरीहि त्याला जोरदार विरोधाला तोंड द्यावें लागेल. या देशाची वसाहतींच्या बाबतींतील परिस्थिति चांगली राहून ऑस्ट्रेलिया खंडांतील व्यापारहि वृद्धिंगत होईल. जगांतील पुष्कळ भागांत व विशेषतः युरोपखंडाच्या मध्य-भागीं, मार्च व आसपासच्या कालांत वाईट हवामान असेल.

अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष बहुधा याच वर्षी कालवश होतील; किंवा तसें न झाल्यास या वर्षाच्या द्वितीयार्धांत अमेरिकन सरकारला कांहीं धोरणांच्या बाबतींत जोरदार पराभव स्वीकारावा लागेल. या वर्षी (1997 A. D.) ब्राझीलमध्यें उद्योगधंद्यांच्या वाढीमुळें व थोड्याफार प्रमाणांत बेकारीमुळें गुन्हेगारीची लाट उसळेल. स्वतःला उदारमतवादी म्हणविणाऱ्या (!) लोकांची मोठ्या प्रमाणावर धरपकड होईल; आणि कांहीं संस्था व संघटनां-वर बंदी घालण्याचा गंभीरपणें तेथील सरकार विचार करील.

या वर्षाच्या, म्हणजे इ. स. १९९७ च्या सुरुवातीस, जमीन व शेती-विषयक सरकारी धोरणाला विरोधी पक्षांकडून संघटितरीत्या जोरदार विरोध होणार असल्यानें, सरकारला अडचणींना तोंड द्यावें लागेल असें दिसतें. या वर्षाच्या दुसऱ्या तिमाहींत भारताचें कांहीं राष्ट्रांशीं थोडेंफार वितुष्ट आलें तरी समाजसत्तावादी वा लोकप्रिय सरकार असणाऱ्या राष्ट्रांशीं त्याचे संबंध सलोख्याचे असतील. त्याचप्रमाणें इतर राष्ट्रांतील भांडणें मिटविण्यासाठीं भारताला मध्यस्थाची भूमिका पत्करावी लागेल. परंतु हें ध्येय साध्य करण्याच्या मार्गांत बऱ्याच अडचणी येतील. वर्षाच्या तिसऱ्या तिमाहींत जनतेंत भलताच उत्साह दिसून येईल, व सर्व

वर्गाच्या लोकांकडून सरकारच्या 'मध्यस्था'च्या धोरणांतील यशस्वितेचा गौरव केला जाईल.... व्यापारहि चांगल्या रीतीनें वृद्धिगत होईल. फक्त कांहीं वकिलातींत 'बदल्या' केल्या जाण्याचा संभव आहे.

या वर्षी बाजारभावांत 'चढ' असून, भारतीय जनतेकडून औद्योगिक शेअर्सची मोठ्या प्रमाणावर मागणी केली जाईल. याचा अर्थ त्यांचा दर वाढलेला असेल असा नसून, राजकीय क्षेत्रांत स्थैर्य निर्माण होऊन, उज्वल भविष्याची खात्री वाटत असल्यानेंच ही मागणी वाढलेली असेल असा आहे.

या वर्षी पावसाळा सर्वसाधारण व नियमित असला तरी समुद्र-किनाऱ्यालगतच्या प्रदेशाला व नाविकदलाला उपसर्ग पोंचविणारीं कांहीं वादळें होतील, एवढें निश्चित !

* * *

# इ. स. १९९८

या वर्षी फक्त दोन ग्रहणें आहेत. २६ फेब्रुवारी व २२ ऑगस्ट अशीं दोन्हींहि सूर्यग्रहणेंच आहेत. २१ जानेवारीला गुरु–मंगळ युति होत असून शनि–मंगळ युति २ एप्रिल रोजीं होत आहे.

या वर्षी भारतांतील व इतर देशांतील कापसाच्या बाजारांत तेजी निर्माण होत असून, गेल्या कांहीं वर्षांनंतर आतांच या किंमतीत बरीच वाढ होत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येईल.

या वर्षी म्हणजे इ. स. १९९८ मध्यें इटली, फ्रान्स व रशिया येथील धार्मिक संस्थांवर कांहीं बंधनें घातलीं जातील. चर्चच्या लोकांकडून राजकारणांत लुडबुड केली जाते; याबद्दल त्यांच्या कार्यक्रमांना आळा घालण्यांत यावा, अशी मागणी सुधारणावादी जनतेकडून केली जाईल. एरव्हींसुद्धां मास्कोंतील सत्ताधीश पक्षाला पराभव पत्करावा लागेल;—व पूर्वींच्याच पद्धतीनें पवित्र वातावरण वा 'शुद्धि' करण्यासाठीं मोठ्या प्रमाणावर धरपकडीचें सत्र अवलंबिलें जाईल.

परराष्ट्रांशीं संबंध बिघडल्यामुळें स्पेन, पोर्तुगालमध्यें मोठ्या चळवळींना व कार्यक्रमांना ऊत येईल. या खंडांतील कांहीं प्रदेशाला नैसर्गिक

आपत्तींची झळ लागत असून, अवर्षण व लहान प्रमाणावरील दुष्काळ यांनाहि तेथील जनतेला तोंड द्यावें लागेल. भारतांतील मध्यप्रदेशांत व दक्षिण भागांत दुष्काळी परिस्थिति असेल.

भारतांत या वर्षी ( 1998 A. D. ) वाहतुकीच्या व दळणवळणाच्या मार्गांत वाढ व सुधारणा होत असून, भारतांत व परदेशीं प्रवास करणाऱ्यांना खूपच सुखसोयी उपलब्ध करून देण्यांत येतील. त्याचप्रमाणें खर्चिक योजना सुरू करण्यासहि भारत सरकार मागेपुढें पाहणार नाहीं. सरकारचें उत्पन्न चांगलेंच असेल. या वर्षाच्या दुसऱ्या तिमाहींत हवामानांतील बिघाडामुळें व नैसर्गिक आपत्तींमुळें सरकारला कठीण प्रसंगांना तोंड द्यावें लागणार आहे. आसाम व बिहारमध्यें भूकंपाचे कांहीं धक्के बसणार आहेत. वर्षाच्या उत्तरार्धांत सरकारमध्यें 'जागृति' निर्माण होऊन, परिस्थितीशीं कौशल्यानें व कार्यक्षमतेनें लढा देण्याचें सामर्थ्य भारत सरकार दाखवून देईल. नैसर्गिक संकटांना ताबडतोब निकालांत काढून जनतेचे हाल होऊं नयेत अशा योजना यशस्वी रीतीनें कार्यवाहींत आणल्या जातील.

भारताच्या किनाऱ्यापैकीं कांहीं भागांत बराच बदल झालेला असून जलवाहतुकीच्या बाबतींत असंख्य अडथळे निर्माण होत असल्यानें, कांहीं बंदरें बदलून, नवीन ठिकाणीं सोय करण्याचा विचार करणें क्रमप्राप्त आहे असें भारत सरकारला आढळून येईल. तसेंच वर्षाच्या शेवटीं शेवटीं कांहीं भयानक स्वरूपाच्या अपघातांमुळें राष्ट्रीय वित्तहानि व प्राणहानि होईल. अशा प्रकारचे अपघात भारतांत विशेषत: मद्रासजवळच्या प्रदेशांत व भारताबाहेर सिलोनमध्यें घडून येतील.

पावसाळा सर्वसाधारण असेल; तथापि तो अवेळीं व पिकांच्या दृष्टीनें थोडाफार निरुपयोगी, आणि नेहमींपेक्षां थोडासा कमीच असेल. ..

* * *

* " मुद्दई लाख बुरा चाहे तो क्या होता है,
वही होता है जो मंजुरे खुदा होता है "

# — इ. स. १९९९ —

या वर्षी एकूण तीन ग्रहणें आहेत. १६ फेब्रुवारी व ११ ऑगस्ट रोजीं सूर्यग्रहणें असून, २८ जुलै रोजीं चंद्रग्रहण आहे.

या वर्षाच्या म्हणजे इ. स. १९९९ च्या मध्यास, जगांतील पुष्कळ ठिकाणीं भयानक अग्निप्रलय होणार असून, कांहीं गिरण्या, गुदामें इत्यादींचाच तेवढा नाश होईल असें नसून, कांहीं शहरांचे भागच्या भाग व कांहीं खेडींच्या खेडीं बेचिराख होतील. दर वर्षी कोठें ना कोठें तरी लागणाऱ्या आगींइतकें या आगींचें सामान्य स्वरूप नसून, यांचें स्वरूप भयानक व पूर्वीचे सर्व उच्चांक मोडणारें असेंच असल्यानें, त्यांच्याविरुद्ध वेळींच उपाययोजना करतां यावी म्हणून ही धोक्याची पूर्वसूचना मुद्दाम दिलेली आहे.

आंतरराष्ट्रीय राजकारणांतील हटवादी धोरणामुळें, व स्वतःच्या गरजा व उणीवा भरून काढण्यासाठीं शेजारी राष्ट्रांवर टाकलेल्या ओझ्यामुळें या व पुढील वर्षी रशियाला फार मोठा त्रास सोसावा लागेल. कांहीं नैसर्गिक संकटांमुळें व अज्ञात रोगांमुळें रशियांत प्राण्यांचा तुटवडा निर्माण होईल. शेतांतील शेळ्या–मेंढ्यांचा मोठ्या प्रमाणावर संहार होईल. प्राण्यांचे कळपच्या कळप मृत्युमुखीं पडतील. शेजारी राष्ट्रांनाहि या रोगाचा उपसर्ग पोंचेल. ऑस्ट्रेलियांतील मेंढ्यांनाहि अशाच रोगाला बळी पडावें लागल्यानें लोंकरीची पैदास घटेल.

भारतांतील एक लोकप्रिय व ख्यातनाम व्यक्ति भयंकर आजारी तरी पडेल अथवा निधन तरी पावेल! या व्यक्तीच्या प्रकृतीबद्दल सारें राष्ट्र चितामग्न होऊन, त्याच्या सुरक्षिततेसाठीं ठिकठिकाणीं ईश्वराची प्रार्थना करण्यांत येईल. कांहीं प्रश्नांवरील मंत्रिमंडळांतील मतभेदांमुळें सरकारच्या कार्यपद्धतींत गोंधळ निर्माण होईल. कांहीं मंत्री राजीनामा देतील. महाराष्ट्रांत या वर्षी राजकीय कार्यक्रमांना उधाण येईल.

या वर्षाचा भारत अस्थिर व अशांत अशा वातावरणांतून वाटचाल करीत आहे. या वातावरणाचीं कारणें राष्ट्रीय स्वरूपाचीं असतील. या व

इतर कांहीं कारणांमुळें भारतीय जनता प्रक्षुब्ध होऊन इतर राष्ट्रांशीं असलेल्या भांडणांचा निकाल लष्करी उपाययोजना करूनच लावला जावा अशी मागणी करील, आणि आपल्या राष्ट्रीय नेत्यांना आपल्या राष्ट्रांचे प्रश्न योग्य रीतीनें सोडवितां आले नाहीं तर या वर्षी भारताकडून परकीयांवर आक्रमण झाल्याचें पहावें लागेल. भारताचें सामर्थ्य वाढलेलें असल्यानें त्याचा युद्धांत जय झाला तरीहि एखादा भारतीय मुत्सद्दी असा प्रश्न टाकील कीं, "शांततेच्या मार्गानें तुम्हीं विजय कां मिळवूं शकलां नाहीं ?"...थोडक्यांत भारत सर्वच क्षेत्रांत यशस्विता संपादन करील, पण त्यांत लष्कराचा उपयोग केलेला असेल, हें लक्षांत ठेवावें.

फ्रान्सच्या पुढें सर्व वर्षभर संकटाचें ताट वाढून ठेवलेलें आहे. तेथील सत्ताधीश पक्षांत सारखे बदल होतील, व सरकारी पक्षापेक्षां विरोधकांचें नेहमींच बहुमत राहील, असें या वर्षाचें ग्रहमान सांगतें. लष्करी साहस करण्याचा खटाटोप करतांना, फ्रान्सला आपलीं मित्र–राष्ट्रें आपल्याशीं असलेले संबंध तोडीत आहेत हें कळणार नाहीं.

या वर्षाच्या (1991 A.D.) बहुसंख्य पत्रिका एकाच मुद्द्याला अधिक महत्त्वाचें स्थान देत आहेत. भारताचे परराष्ट्रीय संबध चांगले राहणार नसून लष्करी सामर्थ्याचा उपयोग करूनच भारत यशस्वी होईल. त्याचबरोबर अनेक भारतीयांना यासाठीं आपलें रक्त सांडावें लागेल. आणि भारतीय मंत्रिमंडळांत एका लष्करी सदस्याचा समावेश करून, त्याच्याकडून या कृतींच्या बाबतींत दिग्दर्शन केलें जाईल. अथवा सरकारी यंत्रणेंतील लष्करी मनोवृत्तीच्या या व्यक्तीच्या उपस्थितीमुळें भारत आक्रमणशील बनेल. भारत या वर्षी एखाद्या मुस्लिम राष्ट्रावर अथवा दिल्लीच्या पश्चिमेस असलेल्या एका राष्ट्रावर स्वारी करून, त्यांत सरतेशेवटीं विजयी होईल. कांहीं लोक युद्धानंतरच्या संहाराकडे पाहून "ह्या विजयासाठीं केवढी किंमत द्यावी लागली!" असे उद्‌गार काढतील. तथापि जगाच्या इतिहासांत नमूद केलें जाणारें असें हें भारताचें पहिलेंच 'साहस' असल्यानें, व या 'साहसांत' अभिमानास्पद विजय प्राप्त होत असल्यानें, भारताला त्यासाठीं "द्याव्या लागणाऱ्या किंमती"ची पर्वा वाटणार नाहीं.

विशेषतः "कुंभ रेषा" मध्यपूर्व व आग्नेय आशिया येथील प्रदेशांत या व पुढील वर्षी भूकंप व जागृत ज्वालामुखीसारखीं कांहीं नैसर्गिक संकटें निर्माण होत आहेत. त्याचप्रमाणें हवामानहि थोड्याफार प्रमाणांत प्रतिकूल राहील! पाऊस नेहमींपेक्षां थोडा जास्त पडेल, व तोहि नेहमींपेक्षां उशीरां सुरू होईल. पावसाळ्याचा जोर जास्त राहील, पण त्याचें आगमन थोड्याशा वेळानेंच होईल !

* * *

# -- इ. स. २००० --

या वर्षी म्हणजेच इ. स. २००० सालीं एकंदर सहा ग्रहणें आहेत. पैकीं चार सूर्यग्रहणें व दोन चंद्रग्रहणें होत. जानेवारी २१ व जुलै १६ चंद्रग्रहणें; आणि फेब्रुवारी ५, जुलै १, जुलै ३१, व डिसेंबर २५ ला सूर्यग्रहणें आहेत. तसेंच एप्रिल ६ रोजीं मंगळ–गुरु युति; एप्रिल १५ रोजीं मंगळ–शनि युति आणि मे २६ रोजीं गुरु–शनि युति होत आहे. मे महिन्यांत निरीयण ज्योतिषपद्धतीचा 'गोला योग' आणि 'काल-सर्प-योग' होत आहेत.

# (2000 A. D.)

या वर्षी मानवसमाज विसाव्या शतकाच्या शेवटच्या वर्षांत आला आहे; आणि नव्या एकविसाव्या शतकांत पदार्पण करणार आहे. इतकेंच नव्हे, तर राजकीय, सामाजिक, आर्थिक, आणि कांहीं अंशीं नैसर्गिक अशा एका नव्या युगांत प्रवेश करीत आहे. आणि तो प्रवेश होण्यापूर्वीं शांततेनें आणि कांहीं वेळां हिंसेच्या मार्गानें प्राचीन व्यवस्था बदलण्यांत येईल. कांहीं राष्ट्रें नाहींशीं होऊन नवीन राष्ट्रें उदयास येतील. नव्या आर्थिक आंतरराष्ट्रीय करारांमुळें सामाजिक क्षेत्रांतहि बदल घडून येईल.

इ. स. २००० वर्षांच्या बरेच पूर्वींपासून उत्तर गोलार्धांत शक्तिशाली राष्ट्रें म्हणजे ४५ अक्षांशाच्या वर असलेलीं राष्ट्रें होत. आणि दुसरी महत्त्वाची गोष्ट अशी कीं, ६० अक्षांशाच्या जवळचा उत्तरेकडील प्रदेश पूर्वींसारखा

बर्फाच्छादित न रहातां, मानवास वास्तव्य करण्याजोगा व सुपीक राहील. दक्षिण गोलार्धात अर्जेंटिना, दक्षिण आफ्रिका, आणि न्यूझीलंड व ऑस्ट्रेलियाचा दक्षिण भाग हीं राष्ट्रें बरींच शक्तिशाली आहेत असें इतिहासाच्या पानावर लिहिलें जाईल.

जून, जुलै आणि ऑगस्ट महिन्यांत, पर्जन्यवृष्टि, वादळ व महापुरामुळें आशिया व युरोपच्या उत्तर भागांत बरेंच नुकसान होईल. या वर्षाच्या प्रारंभीं हिमवादळामुळें युरोप, रशियाचा कांहीं भाग, व कॅनडाच्या उत्तर भागांत बरेंच मालमत्तेचें नुकसान, वहातुकींत व्यत्यय, आणि जनहानि होईल. भारतांत गेल्या वर्षाच्या (१९९९) शेवटच्या भागांत व या वर्षाच्या (2000A.D.) सुरुवातीस पाण्याच्या दुष्काळामुळें दक्षिण भारताचा कांहीं भाग, महाराष्ट्र, गुजराथ, व मध्य भारताचा कांहीं भाग या ठिकाणीं लोकांत हाहाःकार माजेल. आणि पावसाळ्यांत जास्ती पाऊस पडल्यानें अन्य कांहीं भागांतील पिकें नष्ट होतील. म्हणून दक्षिण व मध्य भारतांत दुष्काळाची परिस्थित्ति जाहीर करण्यांत येईल.

या वर्षी विशेषतः एप्रिल व मे महिन्यांत असंभवनीय असे नैसर्गिक उत्पात प्रशांत महासागराच्या किनाऱ्यालगतच्या प्रदेशांत होतील. विशेषतः जपान, फिलिपाईन्स, न्यूगिनी, न्यूझीलंड या ठिकाणीं याचा प्रभाव जास्त दिसून येईल. भूकंप व ज्वालामुखीच्या उद्रेकानें या दोन महिन्यांत या प्रदेशांतील कांहीं भाग हादरला जाऊन मालमत्तेचें व जीविताचें असंभवनीय असें नुकसान होईल. उत्तर व दक्षिण अमेरिकेचा कांहीं भाग यांत येतो.

गेल्या वर्षाप्रमाणें या वर्षांतहि आर्थिक जगांत विशेषतः वस्तूंच्या बाजारभावांत मंदीची लाट येईल, कीं ज्यामुळें पुष्कळशा राष्ट्रांत आर्थिक पुनर्संघटनेबाबत जनतेची मागणी होईल. रशियाच्या धोरणामुळें व कांहीं

अशीं भांडवलशाहीच्या अनर्थामुळें पुष्कळ राष्ट्रांचें आर्थिक स्थैर्य नष्ट होऊन जनता त्रस्त होईल. या दोन वर्षांत आर्थिक जगतांत असंभवनीय अशा अनर्थांमुळें, मंदीच्या तडाख्यामुळें व अव्यवस्थेमुळें पुष्कळशा राष्ट्रांचे प्रमुख एकत्रित होऊन जगाला या संकटांतून वांचविण्यासाठीं आणि सर्व-साधारण लोकांच्या जीवनांत आर्थिक स्थैर्य व राष्ट्रांत प्रगति कायम राखण्यासाठीं अशी एक नवी संघटना अस्तित्वांत येईल कीं, तिला आपण 'संयुक्त राष्ट्र आर्थिक संघटना' असें नांव देऊं.

लष्करी सत्ता समतोल राखण्यासाठीं ज्याप्रमाणें १९२० सालीं लीग ऑफ नेशन्स ऑर्गनायझेशन ही संघटना अस्तित्वांत आली आणि तिनें जगांत शांतता स्थापित करण्यासाठीं पावलें टाकलीं त्याचप्रमाणें आर्थिक व्यवहारांत समतोलपणा राखण्यासाठीं नवी संघटना अस्तित्वांत येऊन कार्यप्रवण होईल.

कित्येक वर्षांपासून आशियाच्या कांहीं भागांत चीन जी सत्ता गाजवीत आहे तेथें गेल्या वर्षीं ज्या कांहीं आंतरिक कटकटी निर्माण झाल्या त्या पुन्हा डोकें वर काढून या महिन्याच्या सुमारास चिनी साम्राज्यवाद्यांचा अंत घड-वून आणतील आणि त्याचें कारण बाहेरील शक्ति नसून केवळ आंतरिक कटकटी हेंच राहील. याशिवाय आशियाच्या पूर्व भागांत पुष्कळसे सामाजिक व अर्थनैतिक बदल घडून येतील. हे बदल हिंसात्मकरीत्या घडून येतील; आणि त्यांत कित्येक सत्ताधीश व्यक्तींची प्राणहानि होईल. चीनच्या आंतरिक अव्यवस्थेमुळें पुष्कळशीं आशियाई राष्ट्रें भारताच्या नेतृत्वा-खालीं एकत्रित होऊन नवा सामाजिक व आर्थिक व्यवस्थेचा पाया रचतील. चीन देशांत नवें सरकार प्रस्थापित होईल.

पोलंड व इराण दोनतीन वर्षांपासून ज्या आंतरिक कटकटींत होतें त्या कटकटी राजकीय स्वरूपाच्या नसून आर्थिक व सामाजिक स्वरूपाच्या रहातील. कांहीं इतर राष्ट्रांच्या दडपणामुळें आणि कांहीं अंशीं आंतरिक कटकटींमुळें या वर्षाच्या प्रथमार्धांत पोलंड सरकराचें पतन घडून येईल, व शेजारचीं राष्ट्रें एकत्रित होऊन आपली सत्ता कायम करतील. त्यांच्या विशिष्ट राजकीय धोरणामुळें कांहीं कालापासून शक्तिशाली बनलेल्या ह्या पोलंड देशाचें विलिनीकरण करण्यांत येईल. इराणमध्यें आंतरिक व बाह्य

अशा दोन्ही कटकटी या वर्षी दिसत आहेत; आणि इराणच्या सरहद्दीवरील राष्ट्रें व इराण यांच्या एकत्वाखालीं एक नवें संयुक्त तेल-प्रधान राष्ट्र निर्माण होण्याची शक्यता आहे.

प्रशांत महासागरात असलेल्या हवाई आणि होनोलुलू या बेटांवर आक्रमण होऊन तीं कॅनडाचे लष्करी तळ म्हणून वापरण्यांत येतील. जपान व जर्मनी हीं दोन्ही राष्ट्रें पुन्हा वर येतील. रशियांत आंतरिक क्रांति घडून नव्या सरकारची स्थापना होईल. परंतु समाजवाद कायम राहील आणि जनतेला सांस्कृतिक व आध्यात्मिक स्वतंत्रता कांहीं अंशीं देण्यांत येईल.

आर्थिक व यांत्रिक प्रगतीमुळें कॅनडाची सर्वश्रेष्ठ राष्ट्र म्हणून गणना होत होती. आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत ज्या राष्ट्राचा ध्वज कीर्तिशिखरावर होता त्या राष्ट्रांत या वर्षी परराष्ट्रीय नीति व धोरणामुळें कांहीं गोंधळ व गैर-समज निर्माण होतील.

या वर्षापासून भारत प्रगतीच्या नव्या मार्गावर पावलें टाकणार आहे. भारताच्या प्रधानांच्या या वर्षाच्या आजारपणामुळें किंवा मृत्यूमुळें नव्या प्रधानांची सत्ता सुरू होईल. या वर्षाच्या मध्यास मोठ्या प्रमाणांत संप घडून येईल. सांथीच्या रोगांमुळें कित्येक व्यक्ति मृत्युमुखीं पडतील. एकंदरींत या वर्षी भारतांत सांस्कृतिक व भाषिक ऐक्य घडून येईल असें दिसतें.

* * *



# काल—सर्प--योग

१३, आणि १७ जून १९५४ सालच्या पुण्यांतील मराठी दैनिक "लोकशक्तीं"त या लेखाचा कांहीं भाग प्रसिद्ध झाला होता. परंतु तो तात्पुरता असल्यामुळें भावी कालांत होणाऱ्या परिणामांबाबत त्यांत चर्चा केलेलीं नव्हती.

कालसर्पयोग या निरिग्रण हिंदु ज्योतिष उपपत्तीबाबत श्री. अजंत्रा



जैन यांनीं त्यांच्या वहींत जें नोंदून ठेवलें होतें, तें आतां मी आपल्यासमोर ठेवीत आहें. ( चित्र श्री. जैन )

"कालसर्पयोग ही ज्योतिषशास्त्रांतील संपूर्णतया हिंदुपद्धति आहे. ज्या वेळीं राहु व केतूच्या एका बाजूला सर्व ग्रह येतात तेव्हां कालसर्पयोग निर्माण होतो. या योगाच्या उपपत्तींत हर्षल, नेपच्यून व प्लूटोसारखे ग्रह अंतर्भूत नसतात.

त्याच्याविषयीं व त्याच्या परिणामाविषयीं खोलवर विचार केला असतां असें म्हणतां येईल कीं, त्यांत "सर्प" आहे. सापाच्या कृति विविध प्रकारच्या असतात. शेषानें ( नागानें ) आपल्या फणीवर पृथ्वी तोलून धरली असल्याची आख्यायिका आपणांस माहीत आहेच. जैन धर्माच्या पौराणिक ग्रथांत सांगितलें आहे कीं, एका नागानें दुष्टाच्या हल्ल्यापासून स्वामी पार्श्वनाथ तपश्चर्या करीत बसले असतां त्यांचें संरक्षण करण्याकरितां आपली फणी त्यांच्या मस्तकावर छत्रीप्रमाणें धरली होती. जैन मंदिरांत स्वामी पार्श्वनाथाच्या मूर्तीवर नागाचें तें दृश्य आपणाला आजहि दिसतें. (२) त्यानंतर

सापानें माणसाला किंवा प्राण्याला आपल्या विळख्यांत आवळून धरलें आहे, तो त्याला चावतहि नाहीं, सोडीतहि नाहीं, परंतु त्याचा गुदमरून जीव घेत आहे असेंहि दिसून येतें. (३) त्यानंतर साप चावतो व त्यानें विषबाधा होऊन मनुष्य मृत्युमुखीं पडतो असें दिसून येतें. प्रत्येकाच्या जन्मकुंडलींत "कालसर्पयोग" अशा प्रकारें निरनिराळ्या तऱ्हेनें आपला "प्रभाव" पाडीत असतो.

या योगानें, ज्यांच्या पत्रिकेंत तो असतो अशा कांहीं लोकांना फार मोठें केलें आहे, आणि कांहींना तर "कालसर्पयोग" हें नांव सार्थ व्हावें अशा रीतीनें क्षणांत मृत्युमुखीं लोटलें आहे. ज्या ज्या वेळीं कालसर्पयोग पुनरावृत्त होतो तेव्हां त्या व्यक्तींच्या जीवनांत कांहीं तरी आश्चर्यकारक व वैशिष्ट्यपूर्ण घटना घडतात. बहुसंख्य लोकांना भरपूर बुद्धिमत्ता असूनहि ते जीवनांत पुढें येऊं शकले नाहींत—याचें कारण बऱ्याच वेळेला हा रहस्यमय योग असतो. परंतु जे या योगाचा विळखा तोडून बाहेर येऊं शकले ते लोक मात्र खूपच पुढें आले असें दिसतें.

अरेबियाच्या लॉरेन्सच्या पत्रिकेंत हा योग होता; आणि तो खूपच प्रसिद्धीस आला. अरेबियाच्या इतिहासांत तो एखाद्या दंतकथेंतील व्यक्ती-प्रमाणेंच चमकून गेला. त्याच्या पत्रिकेंतील तृतीय व नवमस्थानीं कालसर्पयोग होता. ज्यावेळीं या योगाची पुनरावृत्ति झाली, तेव्हां तो दिवंगत झाला. अरेबियाच्या एका शहरांतून प्रवास करीत असतांना तो मोटारींतून बाहेर फेकला गेला व तेथेंच मृत्यु पावला !

इतर कांहीं व्यक्तींपैकीं भारताचे पंतप्रधान पंडित नेहरू, नैरोबी येथील भारताचे भूतपूर्व हायकमिशनर अप्पासाहेब पंत, स्टीफन फॉस्टर, प्रिन्स बेनेस, प्रिन्स ऑफ बेरार, जेम्स डेव्हिस, संगीतज्ञ थोपेन, फ्रान्सचे मार्शल पेतॉं, हेन्री ए वॅलेस, व डिझरेली इत्यादींच्या पत्रिकेंत कालसर्पयोग आहे."

याच स्मरणवहींत श्री. जैन यांनीं असें लिहिलें आहे कीं, "१९५०च्या कालसर्पयोगाशीं शनीचा संबंध असल्यामुळें तो अतिशय सामर्थ्यशाली, संहारक आणि त्रासदायक ठरेल. परंतु १९५४ मध्यें होणाऱ्या या योगाची गोष्ट निराळी आहे. कारण शनि हा राहुपासून बऱ्याच अंतरावर आहे."

१९५४ चा योग पंडित नेहरूंच्या पत्रिकेंत पुनरावृत्त होत असल्यामुळें त्याचे त्यांच्यावर होणारे परिणाम व नेहरूंच्या आयुष्यांत त्या वेळीं घडून येणाऱ्या गोष्टी लक्षांत ठेवणें चांगलें...त्या धडामोडींवरून व प्रसंगावरून आपणांला या योगाची पुढील कार्यपद्धति बऱ्याच अंशीं कळून येईल.

हा योग चालू असतां प्रत्येक महिन्यांतून १५ दिवस ज्या वेळीं चंद्र त्याच्या कक्षेच्या बाहेर जाईल, तेवढ्या कालांत योगाचें सामर्थ्य थोडें कमी होईल, व आपल्याला थोडी सुटका वाटेल. वैयक्तिक, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय जीवनांत हा काल त्रासाचा व दगदगीचा ठरणार आहे. पुष्कळसे दुःखद मृत्यु, अशांतता, अव्यवस्था व गोंधळ माजण्याचे हे दिवस आहेत. या दीर्घकालांत कोणत्याहि कार्यास प्रारंभ करूं नये. विशेषतः विवाहसंबंध तर अवश्य टाळावेत. या कालांत केलेल्या लग्नांचा शेवट दुःखांत झालेला आढळून येईल.

यांत दोन प्रकारचे योग दिसून येतात. (१) ज्या वेळीं राहु—केतूच्या एका बाजूला सर्व ग्रह एकत्र येतात तेव्हां त्याला पूर्ण योग म्हणतात. (२) ज्या वेळीं एखादा ग्रह राहु—केतूच्या कक्षेंतून बाहेर असेल त्यावेळीं त्याला अपूर्ण योग (Defective) म्हणतात. त्यांचे परिणामहि भिन्न व विविध असतात.

थोडक्यांत, सर्वसामान्यतः आपणा सर्वांनाच हा काल फारसा चांगला नाहीं आणि विशेषतः ज्यांच्या पत्रिकेंत हा योग पुनरावृत्त होत आहे त्यांना तो त्रासदायक ठरणार आहे. ज्या वेळीं कालसर्पयोग चालू होता त्या वेळीं पराक्रमी हिटलरनें रशियावर स्वारी केली, आणि बहुधा याच कारणास्तव त्याला त्याच्या ज्योतिषानें त्या कालांत चढाई न करण्याचा सल्ला दिला होता. परंतु पुढचें सर्व तुम्हांला इतिहासावरून माहीत आहेच.

## उदाहरण

भारताच्या स्वातंत्र्यप्राप्तीनंतर पहिलीं कांहीं वर्षें बंगालमध्यें कम्युनिस्ट पार्टी फार दंगल माजवीत असे. मारपीट करणें, बाँब फेंकणें, बस व ट्रॅम जाळणें, वाहतुकीला अडथळा करणें, दगडफेंक करणें, ॲसिड बल्ब फेंकणें, आगी लावणें, इत्यादि प्रकार म्हणजे कलकत्त्याचें नेहमींचें जीवन झालें होतें.

कलकत्याच्या जीवनांत भीतियुक्त वातावरण निर्माण होऊन थोडा कालपर्यंत तेथें गोंधळाचें साम्राज्य निर्माण झालें होतें. कम्युनिस्ट राज्यांत श्री. रणदिवेंची विजयपताका फडकत होती.

त्यावेळीं कॉंग्रेस पक्षाच्या कोणत्याहि पुढाऱ्याची सभा हे लोक निर्विघ्नपणें पार पडूं देत नव्हते. इतकेंच काय परंतु रासबिहारी ॲव्हेन्यू येथें नेताजी बोस आणि आझाद फौज यांच्या गौरवार्थ भरलेल्या महान् सभेंत पंडित नेहरू व सरदार पटेल यांच्या भाषणापूर्वीच कित्येक कम्युनिस्टांनीं सभेसाठीं लावलेल्या लाउडस्पीकरच्या तारा तोडल्या. केव्हां कोणता नेता कम्युनिस्टांच्या हिंसा-प्रवृत्तीचा भक्ष्य होईल याचा नेम नव्हता.

## शत्रुंजय योग

बंगालची अशी स्थिती असतांना असें कळलें कीं, कांहीं कार्याकरितां भारताचे माजी उपप्रधानमंत्री कै. सरदार पटेल कलकत्त्यांत येणार आहेत. त्यावेळीं कित्येक प्रमुखज्योतिष्यांनीं सरदार पटेलांच्या पत्रिकेची आलोचना करण्यासाठीं खाजगी सभा घेतली. सभेंत पुष्कळशा ज्योतिष्यांचें एकमत होऊन असा निष्कर्ष काढला गेला कीं, या वेळीं सरदार पटेल कलकत्त्यांत आल्यानंतर त्यांच्यावर कम्युनिस्ट लोक बॉंबफेक करतील; म्हणजेच त्यांच्या जीवितास पूर्ण धोका आहे. हें सर्व ऐकून श्री. अजंताबाबू



व त्यांचे मित्र ( त्यांचें संपूर्ण नांव प्रकाशित करण्यास मला अनुमति नाहीं.) हे दोघे चिडले. श्री. अजंता जैन मागील बाकावरून उठून सभेच्या अध्यक्ष-स्थानीं गेले आणि अध्यक्षांना विनंति करून त्यांच्या विशिष्ट अनुमतीनें त्या सभेसमोर असें म्हणाले,—

" सरदार पटेलांचे कम्युनिस्ट लोक शत्रु आहेत हें आपण जाणतों. सरदार पटेलांच्या जन्मकुडलींत सहाव्या घरांत विशिष्ट ग्रह पडल्यामुळें शत्रुंजय राजयोग झालेला आहे हें आपण ज्योतिष-शास्त्रीय उपपत्तीवरून मानतों. म्हणजे सरदार पटेल त्यांच्या आयुष्यांत शत्रूंवर विजय मिळवतील, म्हणजेच शत्रु त्यांना केव्हांहि पराभूत करूं शकणार नाहींत असा या राजयोगाचा निष्कर्ष निघतो. ज्योतिषशास्त्र जर खरें आहे तर पटेलांच्यावर बाँबफेक होणार नाहीं आणि कम्युनिस्टांकडून त्यांना धोका नाहीं, असा माझा विश्वास आहे. येथें जमलेली मंडळी सरदार पटेलांच्या जिवास धोका आहे असा प्रस्ताव आधींच ग्रहण करुन बसल्यामुळें माझ्या निष्कर्षाला मान मिळणार नाहीं हें मला माहीत आहे. परंतु ज्योतिषशास्त्राचा विद्यार्थी या नात्यानें माझे विचार येथें नमूद करणें मी माझे कर्तव्य समजतों. या जीवनांत जन्मास आलेली प्रत्येक व्यक्ति मरणार आहे हें विश्वसनीय आहे. सरदार पटेल स्वतःच्या मृत्यूनें, आजारी पडून एक दिवस मरतील हें खरें, परंतु शत्रु किंवा कम्युनिस्टांच्या हातून त्यांना मृत्यु अगर धोका नाहीं असे माझे विचार आपल्यासमोर मांडून मी रजा घेतों. " ( चित्र सरदार पटेल )



सरदार पटेल कलकत्त्याला आले व सुरक्षित परत गेले. त्यांच्यावर हल्ला झाला नाहीं किंवा त्यांना मृत्यूहि आला नाहीं. या घटनेनंतर श्री. अजंता जैन व त्यांचे ते मित्र ह्या दोघांनीं एकत्र बसून सरदार पटेलांच्या पत्रिकेवर चर्चा केली. श्री. जैन यांच्या मित्रानें त्यांना सरदार पटे-

लांच्या पत्रिकेवरून भाकितें करण्याची विनंति केली आणि त्याबाबत श्री. जैन यांनीं पुढील मत प्रदर्शित केलें.

" सरदार पटेलांच्या निरयण जन्मकुंडलींत कालसर्पयोग आहे. कारण सर्व ग्रह राहु आणि केतू यांच्या एका बाजूस पडलेले आहेत. राहु मीनेंत आणि केतू कन्येंत आहे. १९५० सालीं अखेरच्या दोन, तीन महिन्यांत राहु मीनेंत असून केतू शनीबरोबर कन्येंत आहे आणि सर्व ग्रह एका बाजूस राहून सरदार पटेलांच्या कुंडलींतील कालसर्पयोगाची पुनरावृत्ति




होत आहे. म्हणजे माझा पूर्ण विश्वास आणि अध्ययनावरून १९५० सालीं कालसर्पयोग असलेल्या वेळीं सरदार पटेल आजारी पडून मृत्यू पावतील, असें वाटतें."

१५–१२–१९५० रोजीं मीन-कन्येंत कालसर्पयोग चालूं असतांना मुंबई येथें भारताचे पोलादी पुरुष स्वर्गवासी झाले.

प्राचीन भारतीय ज्योतिषशास्त्राचें एक वैशिष्टय असें कीं, त्यांत थोडक्यांत व संक्षिप्त स्वरूपांत ग्रहांच्या समूहाला विशेष–नांवें देऊन त्यांचे परिणाम सूचित केलेले आहेत. उदाहरणार्थ राजयोग, लक्ष्मीयोग, दारिद्रय-योग, परिव्राजकयोग, गजकेसरी योग, शत्रुंजययोग, कालसर्पयोग इत्यादि. या लेखांत फक्त कालसर्पयोगाची चर्चा करण्यांत आलेली आहे.

ते दोन प्रकारचे असतात हेंहि आपण पाहिलें; म्हणजेच पूर्णयोग (complete) व अपूर्ण योग ( Defective ).

वाचकांच्या लक्षांत हेंहि आलें असेल कीं सर्वच कालसर्पयोगांचा परिणाम व कार्यकारी शक्ति सारखी नसते. याचें कारण म्हणजे कालसर्पयोग चालू असतांना जेव्हां शनि, गुरुसारखे महत्त्वाचे ग्रह राहु–केतूच्या जवळ असतात तेव्हां त्याचे परिणाम जितके महत्त्वाचे असतात; तितकें ते नसल्यावेळीं नसतात. कित्येक ज्योतिर्विदांचें असेंहि मत आहे कीं इतर सर्व ग्रह राहु–केतूच्या एका बाजूस असून गुरु, मंगळ किंवा शनि यांतून कोणताहि एक ग्रह दुसऱ्या बाजूस असतांनाहि कालसर्पयोग होतो. परंतु त्याला अपूर्ण कालसर्पयोग म्हणतात. आणि जो ग्रह बाहेर असतो त्याला रक्षणकर्ता ग्रह ( Saving Planet ) असें म्हणतात.

प्रत्येक रक्षणकर्त्या ग्रहाचें कार्य वेगवेगळें असतें. ज्योतिर्विदांचें असेंहि मत आहे कीं, ग्रह नक्षत्रांत कालसर्पयोग चालू असतांना कोणत्याहि महत्त्वाच्या कार्यास प्रारंभ केला असतां त्याचा परिणाम अपेक्षेप्रमाणें होत नाहीं. या उलट वाईट होण्याचा जास्त संभव असतो. अर्थातच परिणाम कसा होणार हें कृतीच्या वेळेवरहि अवलंबून असतें हें विसरूं नये. दुसरें असें मत आहे कीं, कालसर्पयोग चालू असतांना लोकांच्या मनांत कांहीं महत्त्वाचें कार्य करण्याची इच्छा प्रबळ होते आणि म्हणूनच या योगाच्या वेळीं कांहीं महत्त्वाच्या गोष्टी केल्या गेल्या हें इतिहासाच्या पानावरून दिसून येतें.

**पूर्वीचे कालसर्पयोग—**

खालील उदाहरणें मी एका समकालीन ज्योतिर्विदाच्या लेखांतून पुनरावृत्त करीत आहें.—

( १ ) २ एप्रिल १८५७ पासून २७ ऑगस्ट १८५७ पर्यंत कालसर्पयोग अस्तित्वांत होता, त्या वेळीं भारतांत शिपायी विद्रोह झाला.

( २ ) ३० जानेवारी १९१७ पासून १८ जून १९१७ पर्यंत कालसर्पयोग चालू होता आणि एप्रिलमध्यें अमेरिकेनें जर्मनीबरोबर युद्ध पुकारलें.

( ३ ) २८ जून १९१९ रोजीं दुपारीं ३ वाजून ४५ मिनिटांनीं व्हर्सेल्सच्या तहावर सह्या झाल्या. या वेळीं पूर्ण कालसर्पयोग चालू होता.

परंतु त्याच दिवशीं गजकेसरी योग असल्यामुळें हा करार अपेक्षेपेक्षां जास्ती दिवस टिकला.

( ४ ) १ डिसेंबर १९२५ रोजीं कालसर्पयोग असतांना लोकांनीं करारावर ( Locarno Pact ) सह्या केल्या गेल्या.

( ५ ) ११ डिसेंबर १९३७ पासून २१ एप्रिल १९३८ पर्यंत कालसर्प योग चालू होता. १३ मार्च १९३८ रोजीं जर्मनीच्या हिटलरनें ऑस्ट्रिया ताब्यांत घेतला.

( ६ ) ५ मे १९४० ते २१ सप्टेंबर १९४० पर्यंत कालसर्पयोग होता. या कालांत जर्मनीनें ब्रिटनवर आक्रमण केलें.

( ७ ) २७ जून १९४१ ते १६ ऑगस्ट १९४१ पर्यंत कालसर्पयोग होता. २२ जून १९४१ रोजीं हिटलरनें रशियावर आक्रमण केलें.

( ८ ) ९ ऑगस्ट १९४२ सालीं कालसर्पयोग चालू असतांना भारतामध्यें राष्ट्रीय नेत्यांना अटक करण्यांत आली व "भारत छोडो" आंदोलनास सुरुवात झाली.

( ९ ) २४ ऑक्टोबर १९४५ रोजीं, पूर्ण कालसर्पयोग चालू असतांना संयुक्त राष्ट्रसंघाची स्थापना झाली. हा कालसर्पयोग १६ सप्टेंबर १९४५ पासून २२ डिसेंबर १९४५ पर्यंत होता. म्हणून ही संस्था विशेष कांहीं कार्य करूं शकणार नाहीं आणि पुष्कळ काल टिकूं शकणार नाहीं असेंहि मत प्रदर्शित करण्यांत आलें आहे.

( १० ) २ जुलै १९४७ ते २ ऑक्टोबर १९४७ पर्यंत कालसर्पयोग चालू होता. १८ जुलै १९४७ रोजीं ब्रिटनच्या सत्ताधिकाऱ्यांनीं भारतीय भूखंडाची भारत व पाकिस्तान या दोन विभागांत फाळणी करून त्यांना स्वातंत्र्य देण्याच्या घोषणेवर सह्या केल्या. याच वर्षी १५ ऑगस्ट रोजीं भारत व पाकिस्तानांत स्वातंत्र्याची घोषणा करण्यांत आली. त्यानंतर काय झालें तें सर्वांना माहीत आहेच.

(११) १८ ऑक्टोबर १९५० ते १८ फेब्रुवारी १९५१ पर्यंत कालसर्पयोग चालू होता. या कालांत श्री. अजंता जैन यांनीं केलेल्या भाकिताप्रमाणें भारताचें उपप्रधानमंत्रि आणि लोहपुरुष (Iron Man) सरदार

पटेल; भारतांतील पुष्कळशा लोकांत महायोगी म्हणून ओळखले जाणारे पांडेचरीचे श्री. अरविंद घोष; इंग्रजी भाषेंत श्रेष्ठ लेखक म्हणून ओळखले जाणारे जॉर्ज बर्नार्ड शॉ; विख्यात भारतीय सामाजिक कार्यकर्ते ठक्कर बाप्पा इत्यादींचा देहांत झाला. आणि याच वेळीं नेपाळमध्यें क्रांति होऊन नेपाळचे राजे त्रिभुवन पळून दिल्लीस आले. इजिप्तमध्यें राजा फरुकनें सुंदरी नरीमनबरोबर लग्न केलें.

(१२) १२ जून ते १२ ऑक्टोबर १९५४ पर्यंत कालसर्पयोग चालू होता. या कालांत मॅनिला येथें सभा भरून पाकिस्तान, सयाम, फिलिपाइन्स्, ऑस्ट्रेलिया, न्यूझिलंड, फ्रान्स, अमेरिका आणि ब्रिटनमध्यें 'सीटो' नामक करार झाला. (S. E. A. T. O.) भारतीय केंद्रीय सरकारांत, नेहरू मंत्रि-मंडळांतील एक फार लोकप्रिय मजूरमंत्रि आणि श्री. नेहरूंचे आवडते मित्र श्री. व्ही. व्ही. गिरी यांनीं नेहरूंच्या विनंतीस न जुमानतां राजीनामा दिला.

भारताचे प्रधानमंत्री पंडित नेहरूंनीं स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे कीं, ते कॉंग्रेसचे अध्यक्ष पुन्हा होणार नाहींत आणि थोड्या काळपर्यंत शक्यतर प्रधान मंत्रीपदही तें सोडतील. दक्षिण आफ्रिकेचा दानवासारखा वर्णविरोधी प्रधानमंत्री डॉ. मालान सेवानिवृत्त होणार अशी १२–१०–५४ रोजीं जोहान्सबर्ग येथें घोषणा करण्यांत आली.

**भावी कालसर्पयोग–**

आगामी कालांत खालीं दिलेल्या तारखांस कालसर्पयोग अस्तित्वांत येणार आहेत. त्या वेळीं महत्त्वाच्या राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय घटना घडतील. तसेंच ज्यांच्या पत्रिकेंत ते पुनरावृत्त होतील त्यांनाहि व्यक्तिगत जीवनांत फेरबदल आणि त्रास सहन करावा लागेल. आणि याच वेळीं कांहीं विशेष महत्त्वाचें कार्य सुरूं न करणें योग्य ठरेल असें लेखिकेचें मत आहे.

(१) १९ जुलै १९५५ पासून २९ नोव्हेंबर १९५५ पर्यंत. (२) १७ डिसेंबर १९५७ पासून १५ मे १९५८ पर्यंत. (३) ११ नोव्हेंबर १९५९ पासून २७ मार्च १९६० पर्यंत. (४) २१ सप्टेंबर १९६१ पासून ४ जुलै १९६२ पर्यंत.

* * *

# भावी काल—

या प्रकरणांत प्रसिद्धीच्या प्रकाशांत तळपत नसलेल्या चार व्यक्तींच्या जन्मपत्रिकांची चर्चा करीत आहे. कोल्हापूर, पुणें, मुंबई आणि कलकत्ता अशा चार निरनिराळ्या शहरांतील व्यक्तींच्या जन्मपत्रिकांची चर्चा करण्यांत एक विशिष्ट उद्देश आहे. त्यांच्या बाबतींत केलें जाणारें भविष्य-कथन कितपत सत्य ठरतें हें भावी कालांत पाहावयास सांपडेल व त्याबरोबरच ज्योतिषशास्त्राची सत्यताहि पाहावयास सांपडेल. या व्यक्ति प्रसिद्ध नसल्यामुळें त्यांची माहिती सर्वांना व्हावी या दृष्टीनें त्यांचा परिचय करून देण्यांत येत आहे. या चारहि व्यक्तींचा भावी काल उज्वल असून, त्यामुळें भावी कालांत तुम्ही त्यांना सहज ओळखूं शकाल; आणि त्यावेळीं हें पुस्तक 'साक्षीदारा'ची भूमिका पार पाडील. वाचकांच्या दृष्टीनें आज या व्यक्तींना महत्त्व नसलें तरी भावी–कालांत आपापल्या क्षेत्रांत या व्यक्ती उच्च स्थान प्राप्त करून घेतील या आशेनें व खात्रीनें त्यांच्या 'सायन' पत्रिकांची चर्चा येथें केलेली आहे.

## (१) शिवाजी थोरात

कोल्हापूरचे सन्माननीय नागरिक डॉ. पी. सी. पाटील, (थोरात) पी. एच्. डी. (मिथुन–रवि; तूला–चंद्र) यांना तीन मुलगे आहेत. पहिले मेजर जनरल शंकरराव थोरात; D. S. O. दुसरे श्री. दिनकरराव थोरात, डी. एस्. पी. आणि तिसरे कॅप्टन नानासाहेब थोरात.

सध्या पुण्यांत वास्तव्य करून असणारे व कैसर-इ-हिंद पदक मिळविणारे श्री. एस्. एस्. शिर्के, बी. ए., बी. एस्सी. (मिथुन–रवि; धनु–

चंद्र ), यांची कन्या सरोजिनी शिर्के, बी. ए., बी. टी. ( मकर–लग्न; धनु–रवि, चंद्र ) यांचें लग्न कॅप्टन नानासाहेब थोरात, ( मेष–रवि; सिंह-चंद्र; मिथुन–लग्न; कन्येंत मंगळ; मिथुनेंत गुरु ) यांच्याशीं झालें. पुणें वानवडी मिलिटरी हॉस्पिटलमध्यें १६ ऑक्टोबर १९५३ रोजीं पहांटे लग्नीं यांचें सिंह राशि उदित होत असतांना, कॅप्टन नानासाहेब व श्रीमती सरोजिनी थोरात यांचें चतुर्थ संतान पण पहिला मुलगा जन्मास आला; आणि त्याचें नांव 'माणकेश्वर उर्फ 'शिवाजी' ठेवण्यांत आलें. शिर्के व थोरात या दोन वंशाचें संमिश्र स्वरूप आपणास 'शिवाजी 'मध्यें पहावयास सांपडेल. या दोन वंशाच्या एकीकरणांतून एक प्रभावी व पराक्रमी व्यक्ति जन्मास आलेली आहे, असें दिसतें. ज्योतिषशास्त्रदृष्ट्या मेष–रवि नानासाहेब आणि धनु–रवि सरोजिनी हें अत्यंत अनुरूप दांपत्य असल्यामुळे (लेख: तुमचें लग्न; पृष्ठ १८३ पहा.) समतोल दृष्टिकोनानें युक्त असलेल्या पुत्ररत्नाचा त्यांना लाभ झाला. *जो पुढे यशस्वी इंजिनियर म्हणून कीर्ति व संपत्ती मिळवील.

लक्षांत घेण्यासारखे शिवाजीचे ( चित्र ) कांहीं ग्रहयोग असें आहेत:— लग्न सिंह, २६ अंश ( सायन ) प्रथमांत कन्येचा मंगळ, तूळेंत रवि; वृश्चिकेंत बुध; मकरेंत चंद्र आणि दशमांत मिथुनेचा गुरु याला विशेष महत्त्व देऊन, ही पत्रिका पाहिली पाहिजे. या ठिकाणीं समाजवादी पुढारी श्री. जयप्रकाश नारायण यांच्या पत्रिकेची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. श्री. जयप्रकाश नारायण यांच्या जन्मकुंडलींत लग्नीं सिंह राशि उदित होत असून, तूळेंत–रवि, वृश्चिकेंत बुध, आणि मकरेंत चंद्र असून, गुरु सप्तमांत आहे.



शिवाजी आणि श्री. जयप्रकाश नारायण यांच्या पत्रिकेंत बरेंच साम्य आहे; पण कांहीं अंशीं, विशेषत: गुरुच्या स्थानामुळें, एक फार मोठा फरक झालेला आहे. सत्ताधीश न

बनतां, सामाजिक कार्य करावें, अशी श्री. जयप्रकाश नारायण यांची वागणूक असून, " महाराष्ट्राचा भावी पुढारी " शिवाजी थोरात असें म्हणेल कीं, " सत्तेशिवाय सामाजिक सुधारणा करणें कठीण आहे " . . . अर्थात् कोणत्याहि दोन व्यक्तींत संपूर्ण साम्य आढळत नाहीं हें शाश्वत सत्य आहे. एकंदरींत, थोरातांच्या वंशांत, महाराष्ट्राच्या भावी पुढाऱ्यानें जन्म घेतलेला आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं. शिवाजीला १६ वें वर्ष लागेपर्यंत, त्याच्या जीवितास कोणताहि धोका निर्माण झाला नाहीं तर " आपला भावी नेता " या आशेनें व अभिमानानें महाराष्ट्राला या मुलाकडे पहावयास मिळेल. धर्मयुग व मानवयुग या दोन आत्यंतिक विरोधी मतप्रणालींचा सुवर्णमध्य व समतोल राखूं शकणारें कर्तृत्व शिवाजीच्या नेतृत्वांतच पहावयास सांपडेल.

## ( २ ) हेमलता शहा

दोन व्यक्तींची तुलना करूं नये असें कांहीं लोक म्हणतात. तुलना ही द्वेषार्ह आहे असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे. परंतु एखादी विशिष्ट गोष्ट वा घटना समजण्यासाठीं तुलना आवश्यक ठरते. उदाहरणार्थ, सिंह लग्न व लग्नीं रवि असलेल्या श्रीमती विजयलक्ष्मी पंडित कांहीं शब्दांत बोलतात, तर सिंह लग्न व लग्नीं चंद्र असलेले पंडित जवाहरलाल नेहरू वाक्यांत आपला आशय व्यक्त करतात. परंतु सिंह लग्न आणि रवि—चंद्र दोन्हीहि लग्नीं असलेली हेमलता नेहमीं परिच्छेदांत बोलते.

बुद्धिमान् लोक जन्मावे लागतात असें कांहींचें मत, तर कांहीचें, असे लोक जन्मत नसून ते निर्माण करावे लागतात असें आहे. हीच गोष्ट सिनेतारकांच्या बाबतींतहि लागू पडते. कांहीं वेळेस आपण अभिजात वा जन्मजात कलावंत पाहूं शकतों, तर कांहीं वेळां परिश्रमानें शिकून तयार झालेले प्रसिद्ध कलावंतहि दिसतात. कांहीं लोकांच्या अंगीं अभिनयाची जन्मजात कला असूनसुद्धां ते जनतेपुढें न आल्यानें अप्रसिद्धच राहतात. माझी अशी खात्री आहे कीं, श्रीमती विजयालक्ष्मी यांनीं नाट्यकलेच्या क्षेत्रांत पदार्पण केलें असतें तर एक श्रेष्ठ अभिनेत्री म्हणून त्यांचा लौकिक झाला असता. अर्थात् राजकीय रंगभूमीवर त्या आपली भूमिका तितक्याच

कौशल्यानें वठवतात हें आपणांस माहीत आहेच. अभिनयाची दैवी देणगी हेमलतेला प्राप्त झालेली असल्यामुळें उत्तम अभिनय कसा करावयाचा हें तिला चांगलें माहीत आहे. सिंह-प्रधान व्यक्ति असल्यामुळें हेमलता ही मानवयुगाची पराकोटीची प्रतिनिधि ठरेल असे तिचे ग्रहयोग आहेत. आणि त्यामुळें भावी कालांतील स्त्रियांना हेमलता ही अतिशय पुढारलेल्या मताची आहे असें वाटेल. हेमलता मानवयुगाचा संदेश नुसता सांगून थांबणार नसून प्रत्यक्ष आचरणांत आणणारी आहे.

३ ऑगस्ट १९५१ रोजीं मुंबईमध्यें लग्नीं सिंह राशि वीस अंशावर उदित होत असतांना श्री. मोतीलाल आणि श्रीमती विजयालक्ष्मी यांना हें पहिलेंच कन्यारत्न झालेलें आहे. आणि तेंहि सर्व जगाला दिपवून टाकणारें ठरेल. अर्थात् हेमलताच्या (चित्र) ह्या गुणामुळेंच या असामान्य मुलीबद्दल लोकांचे तिच्याविषयीं गैरसमज होतील. अर्थात् सामान्य लोकांना असामान्य लोकांच्या गुणांची यथायोग्य कल्पना करतां येत नाहीं हें नेहमीचेंच आहे. इतकेंच कशाला, तिच्या आईलाहि आपल्या मुलीमध्यें कांहीं विकृति तर नाहीं ना, असा संशय अधून मधून येईल ! परंतु शेवटीं तिला एका सत्याचा उमज पडेल, तो हाच कीं, "अशा असामान्य मुलीची आपण माता आहोंत" याबद्दल आपल्याला अभिमानच वाटला पाहिजे.



## ( ३ ) राजकुमार जैन

ज्या वेळेला स्वतःचा फायदा साधण्याच्या हेतूनें मानवप्राणी बंधनांना झुगारून देऊन आपलें अस्तित्व प्रकट करतो, आणि सेवेपेक्षां स्वार्थाकडे कमी लक्ष देतो त्याचवेळेला संपूर्ण मानव जातीला समाधान आणि शांतता यांचा लाभ होईल अशी शक्यता दिसूं लागते....'भावी कालां'तील एक

यशस्वी धंदेवाईक व सामाजिक कार्यकर्ता म्हणून प्रसिद्धी पावणाऱ्या राजकुमारचे विचार वरील प्रकारचे असतील........ही गोष्ट माहीत असल्यामुळेंच त्याचे चुलते श्री. अजंता जैन यांनीं राजकुमारचें बालपणीचें शिक्षण टागोरांच्या 'शांतिनिकेतन' मध्यें व्हावें असा आग्रह धरला होता.

अजंता जैन आजारी पडून महाराष्ट्रांत औषधोपचारासाठीं आल्यामुळें राजकुमारला 'शांतिनिकेतन' मधून काढून कलकत्त्याच्या हायस्कूलमध्यें पुढील शिक्षणासाठीं ठेवण्यांत आलें. राजकुमारच्या अंत:प्रवृत्तीला तेथील वातावरण मानवण्यासारखें नव्हतें. म्हणूनच १९५४ च्या सुरुवातीस 'घर सोडून' त्यानें मुंबईचा मार्ग धरला. चित्रपटसृष्टींत शिरावें ही त्याची तीव्र मनीषा! श्री. अजंता जैन व लेखिका 'मानव युग' या पुस्तकाच्या कामांत दंग असतांनाच राजकुमार आमच्याकडे आला. पुण्याला आल्यानंतर त्याला सर्व गोष्टींचें यथार्थ ज्ञान करून देण्यांत आलें. तेव्हां आपल्या चुलत्याजवळ थोडे दिवस राहून व चित्रपटसृष्टींत शिरण्याचा विचार मनांतून काढून टाकून, पुढील शिक्षण घेण्यासाठीं तो परत कलकत्त्यास गेला.

श्री. बी. एल्. जैन व श्री. अजंता जैन हे दोघे सहोदर बंधु आहेत.



पूर्व बंगालमध्यें आपल्या कुटुंबांत पूर्वापार चालत आलेल्या 'तागा'च्या (Jute) धंद्यांकडे थोरले बंधु या नात्यानें श्री. बी. एल. जैन यांनाच लक्ष पुरवावें लागतें. 'सुजानगड' मध्यें (बिकानेर राजस्थान) १८ सप्टेंबर १९३७ रोजीं लग्नीं कन्या राशि ४ अंशावर उदित होत असतांना राजकुमारचा जन्म झाला. आपल्या मामाच्या घरी जन्माला येणारा राजकुमार हा श्री. बी. एल. जैन (चित्र) यांचा पहिलाच मुलगा असून, राजकुमारचा भविष्यकाल त्याच्या पत्रिकेवरून पुढें मांडलेला आहे. यावरून प्रत्यक्ष ज्योतिषशास्त्राचा कस लागेल.

वयाच्या २० व्या वर्षी म्हणजे १९५७ च्या आसपास राजकुमारचें

लग्न होईल. आणि या वैवाहिक जीवनांतून त्याला चार अपत्यांचा लाभ होईल. लग्नानंतरच तो धंद्याच्या क्षेत्रांत पदार्पण करील, व १९६२ पर्यंत त्याची एकसारखी उन्नति होत जाईल.

१९६२-६३ मध्यें थोडेसे अडथळे निर्माण होतील. परंतु त्यानंतर राजकुमारच्या (चित्र) वयाच्या ३२ व्या वर्षापर्यंत त्याचा एकसारखा उत्कर्ष होत राहील. याच सुमारास तो राजकारणांतहि भाग घेऊं लागेल. आणि एक यशस्वी सामाजिक कार्यकर्ता म्हणून लोकप्रिय होईल. वयाच्या ३२ व्या वर्षानंतर त्याचें सामाजिक स्थान उंचावत असून, तो फक्त आपल्या प्रांतांतच प्रसिद्धी पावणार नसून त्याची कीर्ति इतरत्रहि दुमदुमेल. यावेळेस तो एक श्रीमान् उद्योगपति म्हणून मान्यता मिळविणार असून, वयाच्या ४५ व्या वर्षापर्यंत सामाजिक व आर्थिक क्षेत्रांत त्याला भरपूर मानमान्यता मिळेल. ४५ व्या वर्षी त्याच्या जीवनाला अगदीं नवीन कलाटणी मिळेल. सामाजिक क्षेत्रांतील बजबजपुरीचा वीट येऊन तो त्या कार्यांतील आपलें अंग काढून घेईल. आपल्या कल्पनेप्रमाणें गोष्टी घडून येत नाहींत असें त्याला आढळून आल्यामुळे तो फक्त आपल्या उद्योगधंद्यांतच लक्ष घालील, व त्यानंतर तो कालवश होईपर्यंत दिवसेंदिवस त्याची प्रगति होत जाईल. आणि २००५ मध्यें म्हणजे या पुस्तकाचें कार्य संपल्यावर सुमारें ५ वर्षांनीं एक श्रीमान् असामी म्हणून आपलें नांव मागें ठेवून राजकुमार कालवश होईल. षष्ठम स्थानांतील दूषित चंद्रामुळें त्याच्या जीवनांत अनेक अपघात व अनेकदां आजारीपण आढळेल. त्याचप्रमाणें बुध व मंगळ एकमेकांकडे दूषित दृष्टिकोनांतून पहात असल्यामुळें तो एक कटु टीकाकार आहे. त्याचें बोलणें 'धारदार'



राहणार असल्यामुळें कांहीं लोकांना तें कटु वाटेल. परंतु त्याच्या प्रामाणिकपणामुळें या दोषावर सहज पांघरूण पडेल.

धर्मयुगाकडे या पत्रिकेचा कल असला तरी कुंभेंत चंद्र असल्यामुळें या व्यक्तीला इतर माणसांच्या हक्कांची जाणीव असेल; भविष्यकाल या सिद्धांतांची सत्यता पटवून देईल. आणि "दैवांत असलेलें कोणीच हिरावून नेणार नाहीं" असें ध्येयवाक्य दृष्टिसमोर ठेवणारा राजकुमार या सिद्धांताला साक्षीदार म्हणून राहील. हें पुस्तक प्रकाशित केलें जात असतांना तो अद्यापहि विद्यार्थी असून त्याच्या वयाला १६ वर्षें पूर्ण झाल्यानें त्याच्या जीवनाचें संपूर्ण परीक्षण करतां आलें.

## (४) रसिकलाल शहा

बाजाराकडे जाणारा मार्ग जितका सरळ असतो तितकाच संपत्तीकडे नेणारा मार्गहि सरळ व सुलभ असतो. उद्योग आणि चिकाटी या दोन साधनांमुळेंच हा मार्ग सुलभ होतो. या पत्रिकेची वृत्तीहि याच मध्यवर्ति कल्पनेवर केंद्रित झाली आहे. ही पत्रिका श्री. रसिकलाल मणीलाल शहा यांची असून, सध्या त्यांचें वास्तव्य पुण्यांतील 'सोन्या मारुती' चौकाजवळील 'मोती माणिक मॅन्शन' मध्यें आहे. १३ एप्रिल १९२३ रोजीं लग्नीं कर्क दोन अंश उदित होत असतांना श्री. रसिकलाल यांचा जन्म झाला. शहा मुलुकचंद दौलतराम, क्लॉथ मर्चंट, या दुकानाचे संचालक म्हणून ते काम पहातात. त्याचबरोबर 'गव्हर्मेंट बिल्डिंग कॉन्ट्रॅक्टस्' जोडधंदा म्हणून ते स्वीकारतात. श्री. शहा यांना चार मुलें असून सगळ्यांत वडील मुलाचें नांव 'दीपक' आहे. पत्रिकेप्रमाणें त्यांना अजून दोन मुलगे होणार आहेत. एकंदरींत तीन मुलें व तीन मुली अशीं सम प्रमाणांत सहा अपत्यें त्यांना असतील.

बऱ्याच वर्षांपूर्वीं श्री. अजंता जैन पांचगणी येथें औषधोपचारासाठीं राहिले असतां श्री. शहांची व त्यांची भेट झाली व श्री. अजंता जैन यांनीं त्यांचें संपूर्ण जीवन-कथन (Life Reading) केलें. 'स्टार लाइन' या माझ्या पुस्तकांतील ७० व्या पृष्ठावर या पत्रिकेचा थोड्याफार प्रमाणांत उहापोह करण्यांत आलेला होता. या पत्रिकेंत तीन उच्चीचे ग्रह असल्यामुळें ही एक प्रभावी पत्रिका आहे असें नमूद केलेलें आहे. श्री. अजंता जैन यांच्या

आत्यंतिक इच्छेमुळेंच या पत्रिकेचें भविष्यकथन करण्याचें मी ठरविलें आहे. ही पत्रिका श्री. अजंता जैन यांनीं तयार केलेली आहे.

या पत्रिकेचा कल थोड्याफार प्रमाणांत 'धर्मयुगा' कडे आहे. सरकारनें व्यापारावर नियंत्रण घालण्यापेक्षां त्यांत चढाओढीस वाव ठेवणें चांगलें, अशा मताची ही व्यक्ति असल्याचें ही पत्रिका साक्ष देत आहे. परंतु 'चंद्र व हर्षल' यांच्या युतीमुळें त्यांचा असा विश्वास आहे कीं, घरगुती धंद्यांनीं वा ग्रामोद्योगांनीं देशापुढील अडचणी नाहींशा होणार नसून यांत्रिक




उद्योगधंद्यांमुळेंच हे प्रश्न सुटतील. अर्थात् सध्यां त्यांच्याजवळ कांहींच साधनें नाहींत. तथापि पुढील वर्षी म्हणजे १९५५ नंतर ते यांत्रिक उद्योगधंद्यास सुरुवात करतील, असें भविष्यकथन करावेसें वाटतें. त्यांची जन्मपत्रिका अचूक असल्यामुळें त्यावर आधरलेलीं भविष्यकथनें अचूक ठरतील असा विश्वास आहे. एकादश आणि पंचमस्थानीं इंटरसेप्टिक चिन्ह असल्यामुळें संपत्ति मिळविण्याकडेच या पत्रिकेचा जोरदार कल आहे. आणि मेष-रवि व्यक्ति असल्यामुळें भरपूर पैसा कसा मिळवावा हें त्यांच्याइतकें चांगलें

कुणालाच समजणार नाहीं. परतु रवि–शनि प्रतियोग असें सुचवितो कीं त्यांच्यामध्यें व सरकारमध्यें वैमनस्य निर्माण होईल. तथापि थोड्याफार त्रासानंतर ते त्यांतून सहीसलामत बाहेर पडतील. अर्थात् हा त्रास कसा चुकवावयाचा हें त्यांचें त्यांनींच ठरवावयाचें आहे.

पत्रिकेंत दिसून येणारी एक स्पष्ट गोष्ट म्हणजे ते एका गर्भश्रीमंत कुटुंबांत जन्माला आले असून याहून अधिक श्रीमंतींत ते कालवश होणार आहेत. आणि भारतांत भांडवलशाहीचा नाश कधींच होणार नसल्यानें श्री. शहा यांचीं मुलें श्रीमंतींतच वाढतील. १९९३ मध्यें ते कालवश होतील. आणि त्यांची पत्नी त्यांच्या आधीं दोन वर्षे म्हणजे १९९१ मध्यें कालवश होईल. लवकरच सुरूं होणाऱ्या त्यांच्या यांत्रिक निर्मितीच्या धंद्यांत १९६१ सालीं कांहीं अडयळे येतील, आणि १९६६ मध्यें त्यांच्यांत व सरकारमध्यें वितुष्ट येईल. १९६८ ते १९७४ पर्यंत त्यांच्या धंद्याची एकसारखी भरभराट होईल. परंतु त्यानंतर कांहीं काल थोड्याफार अडचणी येतील. १९८३ मध्यें सरकारचा गैरसमज झाल्यामुळें त्यांच्या कापडाच्या व्यापारावर गंडांतर येऊन ते त्या धंद्यांतून आपलें लक्ष काढून घेतील व नातेवाईकांच्या व मुलांच्या सहकार्यानें दुसरा नवीन धंदा सुरू करतील. या धंद्यांत मात्र त्यांच्या निधनापर्यंत कसलाहि त्रास वा नुकसान त्यांना सोसावें लागणार नाहीं. मरतांना आपल्या मुलांच्यासाठीं भरपूर स्थावर इस्टेट व मालमत्ता ठेऊन एक लक्षाधीश म्हणून ते प्रसिद्धी पावतील. मध्य क्षितिजावर हर्षलचें अस्तित्व आणि रवि–शनि प्रतियोग यामुळें त्यांचें जीनव सुरळीत जाणार नसलें, तरी त्या ग्रहांच्यामुळें त्यांच्या अंगी दूरदृष्टि व कर्तृत्वशक्ति निर्माण होत असून ते सर्व संकटांतून यशस्वी रीत्या पार पडतील, आणि थोडाफार त्रास असल्याशिवाय 'जीवन' तरी कसलें? पंचमस्थानांतील गुरु असें सुचवितो कीं त्यांच्या मृत्यूच्या वेळीं जिवंत असणाऱ्या त्यांच्या सहाहि मुलांना दीर्घायुरोग्य प्राप्त होऊन त्या सर्वांचें जीवन यशस्वी होईल.

एक गोष्ट ध्यानांत ठेवली पाहिजे आणि ती म्हणजे श्री. रसिकलाल यांना राजकारणाची आवड नाहीं. तथापि त्यांच्या कुटुंबांतील राजेन रमणलाल शहा नांवाच्या त्यांच्या पुतण्याची पत्रिका तो मंत्री होणार असें दर्शवीत असून ३० वर्षांनंतर आपण त्याला राज्यसभेंत पाहूं शकूं.

* * *

# गुरु-नेपच्यून-योग

कित्येक ग्रहयोग असे असतात कीं, ज्यांची प्रतिक्रिया कोणत्याहि विशिष्ट दिवसांत दिसत नाहीं, परंतु एका विस्तृत कालखंडांत ती पसरलेली असते. व्यक्तिगत जीवनांत पूर्णपणें ही गोष्ट लागू नसली तरी राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत हा दृष्टिकोन अवश्य लागू पडतो. कारण राष्ट्रीय विचारधारा किंवा कार्यक्रम सामूहिक असल्यामुळें कोणत्याहि कार्याबाबत कल्पना होणें, तें कार्य करण्याची इच्छा होणें, त्यासाठीं शक्ति-सामर्थ्य व जनमत एकत्रित करणें, उघडपणें तें कार्य करणें, आणि तें कार्य झाल्यानंतर राष्ट्रीय जीवनांत त्याची प्रतिक्रिया होणें. ह्या सर्व गोष्टी एका दिवसांत होत नसून एका विशिष्ट आणि विस्तृत कालखंडांत त्या पसरलेल्या असतात. अर्थातच त्या सर्व कार्याच्या अथवा कल्पनेच्या मागें कांहीं विशिष्ट प्रमुख ग्रहयोग असतात.

आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवावी लागते ती म्हणजे कोणताहि प्रमुख ग्रहयोग एका विशिष्ट दिवसांत आणि समयांत घडून येत असला तरीहि ते प्रमुख ग्रह योगाच्या कक्षेंत बराच काल आधींपासून येतात आणि त्या योगाच्यानंतरहि बराच काल कक्षेंत रहाणारे असतात. म्हणून लेखिकेचें असें मत आहे कीं, प्रमुख ग्रहांच्या योगायोगाबाबत चर्चा करीत असतांना कोणत्याहि विशिष्ट दिवसाला अगर वेळेला महत्त्व न देतां एका विस्तृत कालखंडांत त्याच्या प्रतिक्रियेचा समावेश केला जातो.

या लेखांत किंवा पूर्वीच्या सर्व लेखांत प्रमुख योगांच्या तारखा व वेळ देण्याचें एक कारण म्हणजे ज्योतिषशास्त्राच्या विद्यार्थ्यांना तो ग्रहयोग पंचागांत हुडकून काढण्यास सोपें पडावें, आणि तो विस्तृत कालखंड त्या विशिष्ट दिवसाच्या आधीं व नंतर किती आहे याची कल्पना यावी हेंच होय.**' भावी काल 'पुस्तकांत लेखिकेनें हें स्पष्ट केलें आहे कीं सध्यां आपण संमिश्र युगांत आहोंत. म्हणजे धर्मयुगापासून दूर जात असून क्रमाक्रमानें मानवयुगाकडे जात आहोंत. याच कारणास्तव धर्मयुगाचे प्रतिनिधि ग्रह नेपच्यून व गुरु आणि मानवयुगाचे ग्रह हर्षल व शनि या

चार प्रमुख ग्रहांच्या पारस्परिक योगायोगांना या संमिश्र युगांत फार महत्त्व आहे. म्हणजे गुरु–नेपच्यूनमधीन योगायोग, हर्षल–शनिमधील योगायोग राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत फार महत्त्वाची भूमिका वठवीत असतात. आतां आपण गुरु–नेपच्यूनमधील योगायोगांच्या प्रतिक्रियेमुळें भूतकालांत काय घडलें, वर्तमानकालांत काय घडत आहे हें पाहूं. आणि पुढें भविष्य-कालांत काय घडूं शकेल त्याचें अध्ययन करूं.

गुरु–नेपच्यून योगायोगाबाबत चर्चा करीत असतांना आपणांला प्रामुख्यानें चार योगांवर लक्ष केंद्रित करावें लागतें. प्रथम म्हणजे गुरु-नेपच्यून युति; द्वितीय, गुरु–नेपच्यून प्रतियोग; तृतीय गुरु-नेपच्यून केंद्रयोग; चतुर्थ, गुरु–नेपच्यून योगावर इतर प्रमुख ग्रहांचे शुभाशुभ दृष्टियोग. हें सर्व लक्षांत घेऊनच मुद्याची गोष्ट न विसरतां आलोचना करावी लागते. मुद्याची गोष्ट अशी कीं, गुरु–नेपच्यूमधील योगायोग राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत कांहीं नवीन घटना व गोष्टी ( आणि त्या ऐतिहासिक स्वरूपाच्या असतात. ) निर्माण करतात आणि त्याची प्रतिक्रिया पुष्कळ काळ टिकते. तें कार्य किंवा घटना चांगल्या कीं वाईट हें प्रत्येकाच्या निरनिराळ्या दृष्टिकोनावर निर्भर आहे. कांहीं लोक ती घटना चांगली म्हणतील तर कांहीं लोक तिलाच वाईट म्हणतील. परंतु लेखिका त्यांना कांहींच न म्हणतां "महत्त्वाची" घटना किंवा ऐतिहासिक गोष्ट असेंच म्हणणार.

२९ डिसेंबर १८०४ रोजीं गुरु–नेपच्यून युति झाली. प्रतिक्रिया. नेपोलियन बोनापार्ट सम्राटाच्या सिंहासनावर आरूढ झाला आणि पुढें जाऊन पवित्र रोम साम्राज्याचा अंत झाला. ट्राफलगारचें युद्ध झालें. महाराष्ट्रांत शिंदे आणि इंग्रजांमध्यें लाखारीची लढाई झाली.

२४ डिसेंबर १८१७ च्या युतीची प्रतिक्रिया–इंग्रजांशीं कोरेगांवचीं लढाई आणि अष्टयाची लढाई झाली. बाजीराव इंग्रजांच्या स्वाधीन झाला.

१५ डिसेंबर १८३० च्या युतीची प्रतिक्रिया–बेल्जियम, हॉलंडपासून फुटून निघालें. इटली आणि जर्मनीमध्यें थोडी क्रांति झाली आणि यापेक्षांहि फार महत्त्वाची क्रांति रशियन-पोलंडमध्यें झाली.

१८४९ मधील प्रतियोगाची प्रतिक्रिया–प्रशियाच्या राजानें जर्मनीची एकता नष्ट केली. फ्रेड्रिक विल्यम रशियाचा सम्राट झाला. फ्रान्समध्यें द्वितीय रिपब्लीक स्थापित होऊन, इटली व हंगेरीला ऑस्ट्रिया विरुद्ध; पोल लोकांना जर्मनी विरुद्ध उत्तेजित करण्यांत आलें. आणि रोमहून पोपला पळवून लावण्यांत आलें.

१६ मार्च १८५६ च्या युतीची प्रतिक्रिया–भारतांत शिपाई विद्रोह झाला व नंतर झांशीची राणी लक्ष्मीबाई कालवश झाली. पॅरीसमधील शांततेची बैठक झाली.

२५ फेब्रुवारी १८६९ च्या युतीची प्रतिक्रिया–तृतीय नेपोलियननें प्रशियाविरुद्ध लढाई केली.

१८ जून १८८१ च्या युतीची प्रतिक्रिया–मजुबा पहाडाची लढाई झाली. ट्रान्सव्हाल स्वतंत्र झाला. तीन सम्राटामध्यें युरोपांत तह झाला. स्टॅंडर्ड ऑईल कंपनीची स्थापना झाली.

१ जून १८९४ च्या युतीची प्रतिक्रिया–जपान–चीन युद्ध; कील कॅनॉलचें उद्घाटन झालें.

२२ मे १९०७ च्या युतीची प्रतिक्रिया–दक्षिण आफ्रिकेचे कॉन-फिडरेशन स्थापित झालें. ऑस्ट्रियानें बॉस्निया आणि हर्जेगोव्हिना ताब्यांत घेंतला. द्वितीय शांति परिषद.

९ जानेवारी १९१४ च्या प्रतियोगाची प्रतिक्रिया—या वर्षी पहिलें महायुद्ध सुरू झालें. आणि यामुळें जें कांहीं झालें तें इतिहासाच्या पानावर पहावयास मिळतें.

२४ सप्टेंबर १९१९–२० च्या प्रतिक्रिया—पहिलें महायुद्ध संपलें. व्हर्सेलिसचा तह झाला. डेनिकिन पराजित झाला, लीग ऑफ नेशनची प्रथम बैठक झाली. इराणमध्यें रिआस पाशा सत्तारूढ झाला.

१९ सप्टेंबर १९३२ च्या युतीची प्रतिक्रिया–जर्मनींत नाझी पक्ष आणि त्याचा नेता म्हणून हेर हिटलर शक्तिशाली होऊं लागले. अमेरिकेंत रुझवेल्टच्या नेतृत्वाखालीं डेमोक्रॅटिक पार्टी सत्ताधीश झाली. जिनेव्हांत निःशस्त्रीकरणाची बैठक झाली.

२ एप्रिल १९३९ च्या प्रतियोगाची प्रतिक्रिया — हिटलरच्या नेतृत्वाखालीं जर्मनीनें झेकोस्लोव्हाकिया जिंकला. सोव्हिएट राष्ट्र आणि नाझी जर्मनीमध्यें संधि झाला, आणि जर्मनीनें पोलंडवर आक्रमण केलें. जर्मनीच्या धोरणामुळें ब्रिटन व फ्रान्सनें युद्ध पुकारले आणि त्या कारणानें द्वितीय महायुद्धास सुरवात झाली.

२३ सप्टेंबर १९४५ च्या युतीची प्रतिक्रिया—द्वितीय महायुद्धांत जर्मनी पराजित झाला आणि हिटलर मरण पावला. जपानमध्यें हिरोशिमा व नागासाकीवर प्रथम अणुबाँबचा प्रयोग करण्यामुळें जपानहि पराजित झाला. सर्व दुष्मन राज्यें पराजित झाल्यामुळें द्वितीय महायुद्ध संपलें.

ब्रिटनमध्यें साधारण निवडणुकींत विन्स्टन चर्चिल आणि त्यांच्या कॉन्झर्वेटिव्ह पार्टीचा पराभव झाला आणि क्लिमेंट ॲटलीच्या नेतृत्वाखालीं मजदूर पक्ष सत्तेवर येऊन पुढें भारत व पाकिस्तानला ब्रिटिश जोखडांतून मुक्त केलें. अमेरिकेंत हॅरी ट्रूमनच्या नेतृत्वाखालीं पुन्हा डेमोक्रॅटिक पार्टी सत्तारूढ झाली.

२१ मार्च १९५२ च्या प्रतियोगाची प्रतिक्रिया—ब्रिटनमध्यें मजदूर पक्ष पराजित होऊन सर विन्स्टन चर्चिलच्या नेतृत्वाखालीं कॉन्झर्वेटिव्ह पार्टी सत्तारूढ झाली. अमेरिकेंत कित्येक वर्षांनंतर डिमोक्रॅटिक पार्टी पराजित होऊन जनरल आयसेन-होअरच्या नेतृत्वाखालीं (पूर्वी भाकित केल्याप्रमाणें, रिपब्लिकन पार्टी सत्तारूढ झाली. इराणमध्यें पंतप्रधान डॉ. मुसादिकची चळवळ, जनरल नजीब व कर्नल नासारच्या नेतृत्वाखालीं इजिप्त-मध्यें सैनिक गटानें राजा फरुकविरुद्ध विद्रोह केला आणि राजा फरुकला देश सोडावा लागला व सैनिक गट सत्तारूढ झाला.

सुएझ कालव्याबाबत इजिप्त व ब्रिटनमधील मतभेद उग्र झाला. पॅरिसमध्यें फ्रान्सच्या एका मंत्र्यानें युरोपियन डिफेन्स कम्युनिटीची ( E. D. C. ) कल्पना आंखली.

१८ सप्टेंबर १९५४ च्या प्रथम केंद्रयोगाची प्रतिक्रिया—ब्राझीलच्या प्रेसिडेंटनें आत्महत्या केली. १८ सप्टेंबर रोजीं इंडोचायना देशांत लाओ-सचें संरक्षणमंत्रि काव वोराओंग यांचा खून करण्यांत आला व तेथें कांहींशी

राजकीय अस्वस्थता पसरली. माओ-त्से-तुंगचा लाल चीन व मार्शल चँग कै-शेकच्या फोर्मोसामध्यें कटकटी वाढल्या. सप्टेंबरमध्यें इराणमधील तेलाचा झगडा मिटून इराण सरकार व इतर तेल कंपन्यामधील करारावर सह्या झाल्या. सुएझ कालव्याबाबत इजिप्त व ब्रिटनमध्यें करार झाला; ज्यामुळें ब्रिटनला सुएझ कालवा सोडावा लागणार. या वाटाघाटींत ब्रिटनचे परराष्ट्रीय मंत्रि सर अँन्थनी ईडन यांचा बराच मोठा भाग होता. भारतामध्यें स्पेशल मॅरेज अॅक्ट विधान सभेपुढें ठेवण्यांत आला. अमेरिकेच्या विरुद्ध फ्रान्सनें ई. डी. सी. कल्पनेवर बहिष्कार टाकला. जर्मनीला पुन्हा सशस्त्र करण्यासाठीं ब्रिटननें नवा प्रयत्न केला. मॅनिला (फिलिपाइन्स) येथें सीटो (S. E. A. T. O.) करारावर फ्रान्स, इंग्लंड, अमेरिका, ऑस्ट्रेलिया, न्यूझीलंड, सयाम, पाकिस्तान, फिलिफाइन्स यांनीं सह्या केल्या. याचा भारत, बर्मा इंडोनेशिया व सिलोन या आशियाई राष्ट्रानीं उघड विरोध केला. भारत व चीनमध्यें मैत्री वाढली, आणि भारताचे प्रधानमंत्रि पंडित नेहरू चीनला भेट देण्यास कबूल झाले. जिनिव्हा येथें कित्येक बड्या राष्ट्रांत इंडोचायनाबाबत शांतिकरार झाला, आणि या कराराची अंमलबजावणी करण्यासाठीं भारताला नेतृत्व देण्यांत आलें. लाल चीनमध्यें कम्युनिस्ट पार्टीनें नवीन राष्ट्रीय विधानांची सृष्टि केली; आणि माओ-त्से-तुंगला त्याचें अध्यक्षपद देण्यांत आलें. बौद्धधर्माला बर्माचा राष्ट्रधर्म म्हणून मान्यता द्यावी यासाठीं बर्मींत चळवळ, ....इत्यादि;

*लंडन येथें ३-१०-५४ रोजीं दुपारीं २ वाजून ५५ मिनिटांनीं पश्चिम जर्मनीला सशस्त्र करण्यासाठीं ९ दोस्त राष्ट्रांमध्यें करारावर सह्या झाल्या. व नंतर पॅरीस येथें २३-१०-५४ रोजीं दुपारीं (स्थानिक वेळ) २ वाजून २९ मिनिटांनीं पश्चिम जर्मनीच्या शस्त्रीकरणाचा करार व 'सार' प्रकरणीं फ्रान्स-जर्मनी करार अशा दोन्ही करारांवर १५ राष्ट्रांच्या सह्या झाल्या. यामुळें उत्तर अटलांटिक संघांत ५ लक्ष सैन्यासह जर्मनीचा समावेश होणार व ब्रिटन युरोपांत आपली सेना ठेवणार. ** दिल्ली येथें १४-१०-५४ शुभ दिवशीं, भारत-चीनमध्यें २ वर्षांच्या व्यापारी करारावर सह्या झाल्या.

* २४-१०-५४ (शुभ दिवस) रोजीं पाकिस्तानचे गव्हर्नर जनरल

गुलाम महंमद यांनीं पाकिस्तान घटना परिषदेचें विसर्जन करून देशांत आणीबाणीची परिस्थिती जाहीर केली; आणि तेथें नवें मंत्रीमंडळ स्थापन करण्यांत आलें. त्यांत जनरल अयूबखान, मे. ज. इस्कंदर मिर्झा, उद्योगपती इस्पहानि व नंतर राष्ट्रवादी डॉ. खानसाहेब यांच्यासारख्या व्यक्तींचा समावेश करण्यांत आला.

२२–११–५४ (अशुभ दिवस) रोजीं सायंकाळीं पाकिस्तानचे पंत-प्रधानानीं पश्चिम पाकिस्तानचा एक प्रांत बनविण्याची घोषणा केली. यामुळें प्रांतांचीं नांवें नाहींशीं होतील, पूर्व व पश्चिम पाकिस्तानाचीं दोन विधिमंडळें रहातील व कराचींत एक संयुक्त केंद्रीय विधिमंडळ राहील.

* २६–१०–५४ (अशुभ दिवस) रोजीं आलेक्झांड्रियांत इजिप्तचे प्रधानमंत्री कर्नल नासेरवर गोळ्या झाडणारा इसम मुस्लिम ब्रदरहूड संघटनेचा सभासद होता, व ही संघटना अत्यंत संकुचित विचारांची, जातीय व आत्यंतिक उपायांवर भिस्त ठेऊन हालचाल करणारी असल्यामुळें या संघटनेस बेकायदा ठरवून तिच्या शेंकडों सभासदांची धरपकड करण्यांत आली व कांहीं काळानंतर कांहीं सभासदांची चौकशी करून त्यांना फांशीं देण्यांत आलें. प्रथम आणीबाणीची परिस्थिती जाहीर करण्यांत आली व कांहीं दिवसांनंतर अध्यक्षपदावरून जनरल नगीबला बडतर्फ करण्यांत आलें.

** १–११–५४ रोजीं सकाळीं ६ वाजून ५४ मिनिटांनीं पाँडेचरी, कारीकल, येनाम व माहे या चार फ्रेंचशासित प्रदेशांचा प्रत्यक्ष कारभार भारताच्या हातीं आला. म्हणजे भारताच्या भूमीवरून फ्रेंच वसाहतवादाचा शेवट झाला.

३०–११–५४ रोजीं डॉ. मालान् सेवानिवृत्त झाल्यामुळें प्रेटोरिया येथें श्री. स्ट्रिसडॉम दक्षिण आफ्रिकेचे प्रधान मंत्रीपदावर आरूढ झाले आणि तेहि डॉ. मालानच्या इच्छेविरुद्ध.

२–१२–५४–(अशुभ दिवस) मास्को येथें सात कम्युनिस्ट पूर्व युरोपीय राष्ट्रांचा सैनिकी करार झाला. (E. E. M. A. i.e. East European Military Alliance) आणि त्यांत "दोस्तांनीं जर पश्चिम जर्मनीला शस्त्रसज्ज करण्याचा निर्णय प्रत्यक्ष अंमलांत आणला तर आम्ही

पूर्व जर्मनीला सशस्त्र करूं एवढेंच नव्हे तर ' नाटो ' स्थापूं '' अशी घोषणा केली. * २–१२–५४ (अशुभ दिवस) संयुक्त राष्ट्र अमेरिकेबरोबर फोर्मोसा येथें असलेले राष्ट्रीय चीनचे नेते (मार्शल चँग–कै–शेक) यांमध्यें परस्परसंरक्षण तह झाला.

*** "In the works of man, as in those of Nature, it is the intention which is cheifly worth studying."**— *Goethe.*

* ९–१२–१९५४ रोजीं इचिरोहाटोयामा जपानचे मुख्यमंत्री झाले; कारण कांहीं दिवसांपूर्वीं अमेरिकावादी लिबरल पक्षाचे नेते शिगेरू योशिदा यांनीं राजीनामा दिला होता. * १५ डिसेंबर १९५४ रोजीं भारतीय राज्य-सभेंमध्यें हिंदु विवाह बिल एकमतानें पास झाले. * याच दिवशीं दुपारी तेहरान येथें ( इराण ) भारत व इराण यामध्यें व्यापार आणि नौकानयनाचे तहावर सह्या झाल्या.

भावी कालांत गुरु–नेपच्यूनमध्यें पुन्हा अशुभ केंद्रयोग २३ डिसेंबर १९५४ रोजीं आणि २२ मे १९५५ रोजीं घडत आहेत. त्यामुळें आणखी कांहीं महत्त्वाच्या गोष्टी घडणार आहेत. २४ सप्टेंबर १९५८ रोजीं गुरु-नेपच्यून युति होत आहे. १ फेब्रुवारी, २२ मे व १६ सप्टेंबर अशी तीन वेळेला १९७१ मध्यें गुरु-नेपच्यून युति होत आहे. १९जानेवारी १९८४मध्यें गुरु-नेपच्यून युति होऊन, विसाव्या शतकांतील शेवटची गुरु-नेपच्यून युति ९ जानेवारी १९९७ योजीं मकर राशींत होत आहे आणि ही युति भारतासाठीं फार महत्त्वाची ठरणार आहे अशी प्रस्तुत लेखिकेची कल्पना आहे. इतर युति व योगायोगांच्या प्रतिक्रियेबद्दल राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय वर्षभविष्यांत आलोचना करण्यांत आली आहेच, तेव्हां त्याची येथें पुनरावृत्ति करीत नाहीं. एकंदरींत या संमिश्रित कालांत गुरु-नेपच्यूनमधील योगायोग राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत फार महत्त्वाची भूमिका बजावतात हें ज्योतिषशास्त्राच्या विद्यार्थ्यांनीं लक्षांत ठेवणें जरूर आहे.

* * *

# मानवयुग

लेखिका– इन्दुमती

'भावी काल' या पुस्तकांतील ३० पासून ६७ पर्यंतच्या पृष्ठांत या लेखाचा प्रथमार्ध आलेला असून, त्यांत शेवटीं शेवटीं मी असें म्हटलें होतें कीं, "स्थलाभावीं हा लेख येथेंच आंखडता घ्यावा लागत आहे, पुढील पुस्तकांत येथें सोडलेला या लेखाचा धागा पुन्हा हातीं घेण्याचें मीं ठरविलें आहे." आणि याच पार्श्वभूमीवरून हा लेख वाचला जावा अशी माझी विनंति आहे.

पुढें दिलेल्या विचारावरून वाचकांना समजेल कीं कुंभ, सिंह, वृश्चिक व वृषभ ह्या चार राशि मानवयुगाच्या द्योतक असून, यांत शनि, हर्षल, रवि, मंगळ आणि शुक्र या ग्रहांना प्राधान्य आहे.

कोणत्या व्यक्तीचा दृष्टिकोन किंवा भावना कोणत्या युगाकडे जास्तींत जास्त कललेल्या आहेत हें जाणण्यासाठीं त्यांच्या जन्मपत्रिकेंतील रवीला तीस टक्के, चंद्राला पंचवीस टक्के, जन्मलग्नाला पंचवीस टक्के व राहिलेले वीस टक्के युग व स्वतःच्या भावना व्यक्त करणाऱ्या ग्रहांच्या पारस्परिक योगांना व स्थानाला महत्त्व दिलेलें आहे.

मीन, कन्या, धनु व मिथुन या चार राशि धर्मयुगाच्या द्योतक असून यांत गुरु, नेपच्यून आणि बुध या ग्रहांना प्राधान्य आहे आणि ज्यांच्या पत्रिकेंत या राशींचें व ग्रहांचें प्राधान्य असेल त्यांची विचारधारा धर्म–युगासारखी असेल. धर्म–युगाला मीन–युग, ब्राह्मण–युग, धर्म–युग इत्यादि नांवें देण्यांत आलेलीं आहेत.

मानव-युगाला मानव-युग, कुंभ-युग, जनता-युग, आर्थिक साम्यता-युग, व्यक्तिस्वातंत्र्य-युग किंवा ऐक्य-युग इत्यादि नांवें देण्यांत आलेलीं आहेत.




ग्रह-नक्षत्रांनीं सुचविल्याप्रमाणें कोणत्या व्यक्ति पारिवारिक, सामाजिक, राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत कसें धोरण ठेवतील याचें विश्लेषण करण्यासाठीं पुढें कांहीं व्यक्तींच्या पत्रिका व त्यांचे विशिष्ट ग्रह-योग देत आहें. या सर्वच " प्रकाशांतील व्यक्ति " आहेत असें नाहीं. याचें एक कारण सध्या " प्रकाशां " त आसणाऱ्या संस्था, व सर्वच वृत्तपत्रें पूर्णतया मानव-युगाकडे वळलेलीं नसून पुष्कळशीं पत्रें व्यक्ति विशेषांचे दोष व गुण

न पहातां विशिष्ट कारणानें कुणालाहि प्रकाशांत आणतात, आणि पुष्कळशा योग्य व्यक्तींना "अंधाराच्या कोपऱ्यां"त ठेवून देतात. प्रस्तुत लेखांत, योग्य वाटणाऱ्या पुष्कळशा व्यक्तींची नांवें नसण्याचीं दोन प्रमुख कारणें आहेत. पहिलें म्हणजे त्यांच्या पत्रिकेंतील ग्रहयोग मानव युगाच्या ज्योतिषशास्त्रीय उपपत्तींशीं जमत नाहींत; दुसरें कारण म्हणजे कांहीं व्यक्तींच्या पत्रिका किंवा जन्मतारखा प्रस्तुत लेखिकेला मिळालेल्या नाहींत.

या लेखांत कोणालाहि "खूष" वा "नाखूष" करण्याचा प्रयत्न करण्यांत आलेला नाहीं. तसें करण्याचें प्रयोजनहि लेखिकेला वाटत नाहीं. शास्त्रीय उपपत्ति सरळ रीतीनें समजावण्याचा प्रामाणिक प्रयत्न करण्यांत आलेला आहे. यांत त्यांच्या जीवनांत काय घडेल याचीं भाकितें न करतां प्रत्येक व्यक्ति कशी वागते किंवा वागेल, आणि आजपर्यंत त्यांनीं जें केलें त्याचें शास्त्रीय कारण इत्यादि गोष्टी दर्शविण्याचा प्रयत्न करण्यांत आलेला आहे.

'भावी काल' पुस्तकांत 'वर्तमान युग आणि आपण' या प्रकरणांत (पृष्ठ ४९) सर्व व्यक्तीचें पांच प्रकारांत वर्गीकरण करण्यांत आलेलें आहे; आणि येथें कांहीं व्यक्तींच्या पत्रिका समोर ठेऊन त्याचें विश्लेषण करण्यांत आलेलें आहे. प्रस्तुत लेखांत मेष-युग व धर्म-युग म्हणजे मीन युगाच्या प्रतिनिधींच्या पत्रिकांची आलोचना नसून फक्त मानव युगाच्या प्रतिनिधि व्यक्तींच्या पत्रिकांची आलोचना करण्यांत येणार आहे. आणि ही आलोचना सोपी करण्यासाठीं पुन्हा चार वर्गात वर्गीकरण करण्यांत येत आहे.

प्रथम वर्ग,—म्हणजे ज्यांच्या पत्रिकेंत पन्नास टक्क्यापेक्षां अधिक ग्रहयोग मानव युगाकडे वळलेले आहेत.

द्वितीय वर्ग,—म्हणजे ज्यांच्या पत्रिकेंत पन्नास टक्क्यापेक्षां कमी परंतु धर्म युगाचे कांहींच ग्रहयोग नाहींत अशा व्यक्ति.

तृतीय वर्ग,—म्हणजे ज्यांच्या पत्रिकेंत धर्म युग व मानव युग या दोन्ही युगांचे द्योतक ग्रहयोग मिसळून गेलेले आहेत व दोन्हीहि परस्पर प्रकारांचें समतोलत्व आहे.

चतुर्थ वर्ग,—म्हणजे ज्याच्या पत्रिकेंत इतर युगांचे द्योतक ग्रहयोग जास्ती प्रमाणांत असूनहि मानव युगाचे द्योतक ग्रहयोग कांहीं प्रमाणांत आहेत.

हें वर्गीकरण कोणत्याहि व्यक्तीचे दोष व गुण यांचें द्योतक नसून त्यांच्या पत्रिकेंत मानव युगाचे ग्रहयोग किती प्रमाणांत आहेत याचें निदर्शक आहे. म्हणजे कोणत्याहि व्यक्तीच्या नांवापुढें "तृतीय वर्ग" लिहिण्यांत आलेला असेल, तर ती व्यक्ति "पहिला वर्ग" असे लिहिलेल्या व्यक्तीपेक्षां कमी सन्माननीय आहे असें समजण्यांत येऊं नये, अशी प्रस्तुत लेखिकेची विनंति आहे. कारण हे वर्ग म्हणजे भारत सरकार ज्याप्रमाणें "पद्मविभूषण-प्रथम वर्ग" अथवा "पद्मविभूषण-तृतीय वर्ग" असें किताब वा पदव्या देतें, त्या प्रकारचे नाहींत.

भारताचे पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू यांची पत्रिका मानव युगाच्या प्रथम वर्गांत जात आहे. महात्मा गांधी, कार्ल मार्कस्, अब्राहम लिंकन, रवींद्रनाथ टागोर इत्यादींच्या पत्रिकाहि प्रथम वर्गांत येतात हेंहि मागील पुस्तकावरून ( भावी काल ) वाचकांना कळलें असेलच.

या पुस्तकांत, या लेखापूर्वी चर्चिलेल्या पत्रिकेंत मानव युगाचे द्योतक ग्रहयोग कसे आहेत याचा विचार केलाच आहे; त्याचा येथें पुनरुच्चार करीत नाहीं. "तुमचें भविष्य" या लेखांत सर्व राशींच्या शिष्ट्यांची विस्तृत चर्चा करण्यांत आलेली आहे त्यामुळें येथें व्यक्तींच्या पत्रिकांचें समालोचन करीत असतांना राशीवैशिष्ट्यांची पुनरुक्ति करीत नाहीं. जिज्ञासू वाचक ती सर्व माहिती त्या प्रकरणांत वाचूं शकतीलच. आलोचना करण्यांत आलेले सर्व ग्रह आणि राशि सायन पंचांगाप्रमाणें आहेत.

## महाराणी

दहा जन्मकुंडल्यांवर व्यक्तींचीं नावें न देतां एकदां "जन्मकालीन ग्रहांनीं दर्शविल्याप्रमाणें सर्वांत अधिक बुद्धिमानतेची व धडाडीची निदर्शक पत्रिका" त्यांतून निवडून काढण्याचें काम एका नामवंत ज्योतिर्विदावर सोंपविण्यांत आलें होतें. बऱ्याच विचारानंतर व निष्कर्षानंतर त्यानें देवास येथें वृश्चिक लग्न उदित होत असतांना १६ नोव्हेंबर १८७१ रोजीं जन्मलेल्या एका व्यक्तीची पत्रिका पुढें ठेवली; आणि इतर नऊ पत्रिका-ज्या भारतांतील केंद्रीय व प्रांतीय मंत्र्यांच्या होत्या,—बाजूस ठेवल्या. पुढें ठेव-

लेली जन्मपत्रिका वडोद्याच्या महाराणी चिमणाबाईसाहेब गायकवाड यांची होती. पत्रिकेंत प्रमुख ग्रहयोग असे आहेत.—वृश्चिक लग्न, लग्नीं रवि, तूळेंत एकादशस्थानीं शुक्र, मकरेंत उच्चीचा मंगळ, स्वगृहीं शनि आणि त्याचबरोबर चंद्र, नवमात कर्केत उच्चीचा गुरु. याच कारणास्तव महा राणीसाहेबांचा ओढा जुन्यापेक्षां आधुनिक (मानव युग) जगाकडेच अधिक आहे. अर्थातच यांची पत्रिका मानव युगाच्या प्रथम वर्गात मोडते.

सुधारणावादी मनोवृत्ति असल्यानें प्रगति निदर्शक कृति त्यांच्या हातून होतात याचें कारण जन्मकालीन ग्रहयोगच ! त्या महाराणी आहेत ही गोष्ट निराळीच, पण याहीपेक्षां असामान्य बुद्धिमत्ता व निधडी छाती त्यांना लाभलेली आहे; यामूळेंच त्यांच्याविषयीं आकर्षण वाटून या बाबतींत या पुस्तकांत लिहावयाचें ठरविलें.

तत्कालीन सर्व हिंदी संस्थानांत ( States ) सर्वांगीण सुधारणेच्या आघाडीवर असलेले वडोदा नरेश महाराज सर सयाजीराव गायकवाड यांचेबरोबर महाराणी या नात्यानें अर्धे-अधिक शतक वावरून, महाराज कैलासवासी झाल्यापासून वडोदें सोडून मुंबई-पुणें येथें गेलीं १५ वर्षे त्या वास्तव्य करुन आहेत. असेंहि कळतें कीं अखिल भारतांत महाराणीसाहेबांइतकी असंख्य वेळा जलपर्यटन करून आलेली, नाना देश पाहिलेली, वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध महिला सांपडणें कठीण आहे. त्यांच्या हातून पूर्वाश्रमांत महिला समाजाच्या उन्नतीसाठीं अनेक गोष्टी झालेल्या आहेत. त्यांतील प्रामुख्यानें सांगावयाची झाल्यास "National Council of Women In India" या संस्थेच्या त्या "Founder President" आहेत, एवढें सांगितल्यास कल्पना येईल.



इ. स. १९४७ पूर्वी आपल्या भारतावर ब्रिटिशांचें वर्चस्व असतांना

पुष्कळ संस्थानेंहि आपापला राजकारभार चालवीत असत. अर्थात् ब्रिटिशांच्या हुकमतीखालीं असल्यानें त्यांचा राज्यकारभार नांवापुरताच असून, या राजांना निष्क्रीयच बनावें लागलें. या गटांतील बहुसंख्य राजे महाराजे, व राण्या यांना शहाणपणापेक्षां त्याविरुद्ध गुणांचाच 'लाभ' झालेला होता असें इतिहासावरून दिसून येतें...." जन्मजात मोठेपणा " ऐवजीं ज्ञान, दूरदृष्टी, साहस व धैर्य इत्यादि गुणांनीं मोठेपणा प्राप्त करून घेणारे संस्थानिक विरळाच होते! तथापि महाराणी चिमणाबाईसाहेब गायकवाड सी. आय्. यांच्या व्यक्तिमत्वांत आपल्याला या दोन्ही गुणांचा मनोहर विलास पहावयास सांपडतो. " महाराणी चिमणाबाई स्कॉलरशिप ट्रस्ट करून त्या ९-१० कॉलेजच्या व १५-१६ हायस्कूलच्या विद्यार्थीनींना सध्याच्या परिस्थितींतहि यथाशक्ति मदत करीत असून, ही व्यवस्था त्या पुढेंहि अशीच चालू ठेवणार आहेत असें कळतें. बदललेल्या परिस्थितीशी समरस होऊन, मुबई सरकारच्या " पार्लमेंटरी सेक्रेटरी " म्हणून सध्यां काम करीत असलेल्या श्रीमती निर्मलाराजे भोसले, अक्कलकोट, या त्यांच्या नात होत. म्हणजे राष्ट्राला ही त्यांनीं दिलेली परोक्ष देणगीच होय.

## महाराणी दुसरी एलिझाबेथ

इंग्लंडची महाराणी दुसरी एलिझाबेथच्या (२१-४-१९२६) पत्रिकेंत वृषभेंत रवि, सिंहेंत चंद्र आणि मध्यक्षितिजावर शनि असल्यामुळें तिचा दृष्टिकोन मानव युगाकडे वळणें स्वाभाविक आहे. महाराणी असूनहि तिच्या हातीं कांहींही सत्ता नसल्यामुळें त्या दिशेनें ती कांहीं करूं शकणार नाहीं हेंहि तितकेच खरें. परंतु व्यक्तिगत जीवनांत तसा दृष्टिकोन असल्यामुळें ती फार लोकप्रिय होईल यांत शंका नाहीं. ही पत्रिका प्रथमवर्गांत मोडते. (पत्रिका पृष्ठ १३४)

## शाहेनशाह इराण

सिंह लग्न व वृश्चिकेंत रवि असतांना जन्मास आलेले (२६।१०।१९१९) इराणचे शहा रेझा पहेलवी मानव युगाच्या तत्त्वांना अंतःकरणांत मान्यता देत असल्यामुळें त्यांनीं इराणी प्रजेसाठीं कांहीं प्रगतीशील कार्य करण्याचें ठरविलें होतें. आणि स्वतःच्या मालकीची जमीन शेतकऱ्यांना वांटण्याचा

प्रयत्नहि त्यांनीं केला होता. परंतु डॉ. मुसादिकनें त्याला विरोध केला. याच पत्रिकेंत लग्नी गुरु-नेपच्यून युति आणि धनु राशींत चंद्र त्यांचे मनांत कांहीं वेळां अशी भावना उत्पन्न करतात कीं, तो राजा म्हणून जन्मास आलेला आहे आणि तो तसाच राहिला पाहिजे. विचाराची मतप्रणाली येथें थोडीशी गोंधळाची दिसते. द्वितीयांत शनि-मंगळ युति त्यांना एक दिवस पैशासाठीं रस्त्यावर नेऊन बसवील आणि त्यानंतर आपण ह्या पत्रिकेचा चमत्कार पाहूं.

पुष्कळ दिवस ते राजा राहणार नाहींत हें जसें खरें तसेंच त्यांच्याकडे पैसाहि फार काल टिकणार नाहीं हेंहि तितकेंच खरें. ह्या दोन्ही गोष्टी घडल्यानंतर पुन्हा ते राजकारणांत पडतील आणि मानवयुगीन कांहीं नवा सूर काढतील. ही पत्रिका तृतियवर्गात मोडते. ( पत्रिका, पृष्ठ १८० )

## जपानचे सम्राट

लग्नीं धनु राशि उदित होत असून चंद्र कन्येंत व रवि वृषभेंत असतांना जन्मास आलेले ( २१-४-१९०१ ) जपानचे सम्राट हिरोहिटो यांचा दृष्टिकोन विचित्र आहे. ते ईश्वराचें खास प्रतिनिधि नाहींत असें अंतःकरणापासून मानीत असल्यानें, जनरल मॅकऑर्थरच्या निर्देशाखालीं त्यांनीं जपानला लोकशाही विधान दिलें. परंतु जगावें सम्राट म्हणून अशी त्यांची इच्छा असणें स्वाभाविक आहे. आणि ह्या इच्छेमुळें ते जपानला पुन्हा एकदां वर आणण्याचा पडद्याआडून प्रयत्न करतील. ही पत्रिका चतुर्थवर्गात मोडते.

## माओ-त्से-तुंग

सिंहेंत चंद्र आणि वृश्चिकेंतील मंगळ आणि हर्षल दशमांत असतांना ( २६-१२-१८९३ ) नवचीनचे राष्ट्रपिते माओ-त्से-तुंग ( पत्रिका, पृ. १७१ ) यांनीं विशाल चीन देशाला नवें जीवन आणि नवें विधान दिलें. दुसऱ्या वर्गांत मोडत असलेल्या या पत्रिकेंत धर्मयुगाचे द्योतक कोणतेहि ग्रह प्रमुख नसल्यानें त्यांच्या जीवनांत चीनला ते मागें घेऊन जाणार नाहींत. परंतु मानव युगाचे ग्रहयोग फारसे नसल्यामुळें साम्यवादी तत्त्वालाहि पूर्णपणें मान्यता देणार नाहींत. त्याचप्रमाणें चीनचा ते

रशियाहि करणार नाहींत असा ज्योतिषशास्त्राचा विश्वास आहे. ते सुवर्ण-मध्य साधतील. रशियापासून चीनचा संबंध केव्हां तुटेल हा वेगळा प्रश्न असून आशियामध्यें चीन देश मार्गदर्शक बनण्याचा ते प्रयत्न करतील. आणि असें विधान करून त्याप्रमाणें तें पावलेंहि टाकीत आहेत. स्टॅलिनच्या मृत्यूनंतर कम्युनिस्ट राष्ट्रांत माओ–त्से–तुंग सारखा दुसरा शक्तिशाली व दूरदर्शी नेता नाहीं हें तितकेंच खरें.

## डॉ. हो चि मिन्ह

वृषभेंत रवि आणि मीनेंत चंद्र असतांना जन्मास आलेले इंडोचायनाचे 'गांधी' व साधारणपणें कम्युनिस्ट नेता म्हणून ओळखले जाणारे डॉक्टर हो-चि-मिन्ह (२०–५–१८९२) स्वतःचे राष्ट्राला पूर्णतया रशियाचे निर्देशकत्वाखालीं किंवा चीनच्या छत्राखालीं जाऊं देणार नाहींत. परंतु इतर राष्ट्रीय नेत्यांच्या बहुमतानें कांहीं झालें तर ती गोष्ट वेगळी. व्हिएटनामला मानव्य विधान मिळावें परंतु तें फ्रान्सशीं फार शत्रुत्व न करतां, असें ही तृतीय वर्गांत मोडणारी पत्रिका दर्शविते.

## व्ही. के. कृष्ण मेनन

वृषभ लग्न, लग्नीं रवि आणि मिथुनेंत चंद्र असतांना (३–५–१८९७) जन्मास आले. आणि भारताचे वर्तमान प्रधानमंत्र्यांचे आवडते फिरते दूत श्री. व्ही. के. कृष्ण मेननच्या पत्रिकेंत तृतीय वर्गाचे ग्रहयोग आहेत. पुष्कळसे लोक त्यांना कम्युनिस्ट समजतात, परंतु तसे नसून ते मानव युगाचे ध्येयाला मान देणारी व्यक्ति आहेत असें म्हणणें रास्त ठरेल. कोरिया व इंडोचायनांत शांति स्थापन करण्यासाठीं आणि भारतीय परराष्ट्रीय धोरणाला विशिष्ट वळण लावणारी बुद्धिमत्ता या पत्रिकेंत आहे. जास्ती आजारी पडले नाहीं, तर (कदाचित अस्थमा किंवा फुफ्फुसांच्या विकारानें) ते भावी भारतांतील राजकारणांत मोठी कामगिरी व फार महत्त्वाचें आसन विभूषित करतील, यांत शंका नाहीं.

## विजयमाला बोबडे

वृश्चिकेंत रवि असतांना जन्मास आलेल्या, मुंबईच्या बाळाजी पांडुरंग

आणि कंपनीचे श्री. पांडुरंग बाबुराव बोबडे यांच्या पत्नी श्रीमती विजयमाला बोबडे यांचे विचार कांहीं प्रमाणांत मानव युगाकडे वळलेले असल्यामुळें त्यांना यावर्षीं झालेल्या 'दुष्यंत' नामक मुलाचा रवि सिहेंत आहे. श्रीमती विजयमाला यांची पत्रिका तृतीय वर्गांत मोडते, म्हणूनच त्यांचा भाग्यशाली पुत्र दुष्यंत याचा चंद्र मीनेंत आणि लग्न कन्या आहे. मानव युग पुस्तकाची प्रथम आवृत्ती "जनता-संस्करण" म्हणून प्रसिद्ध व्हावी याची प्रथम कल्पना त्यांची होती. आणि त्यांच्या सक्रिय सहानुभूतीमुळें जनता-संस्करण प्रसिद्ध झालें. वृषभेंत रवि असतांना जन्मलेले श्री. पां. बा. बोबडे



स्वतःहि ज्योतिषाला कांहीं अंशीं मान देतात. या शास्त्राबद्दल त्यांचा दृष्टिकोन शास्त्रीय असून याविषयीं त्यांची अंधश्रद्धा नाहीं. श्री. बोबडे (१५-५-१९२६) यांची पत्रिका द्वितीय वर्गांत मोडते.

## डी. सी. शहा

Tobacco-king म्हणून ओळखले जाणारे, निपाणीचे श्री. डी. सी. शहा, M. L. C. एक व्यापारी आहेत. लग्नीं वृश्चिक राशि उदित होत असतांना जेव्हां रवि वृषभेंत आणि शनि सप्तमांत होता (६।५।१९१२) तेव्हां जन्मास आलेले श्री. शहा मानवयुगीन धोरणामुळें राजकारणांत पडले.

* ते एक श्रीमंत व्यापारी असल्यामुळें, धंदेवाईक राजकारणी व्यक्तीला बोलण्याचालण्यांत जिंकू शकणार नाहींत हें जितकें खरें तितकेंच, राष्ट्रीय उद्योगधंद्याची प्रगति होऊन जनतेचें कल्याण कसें होईल याची पूर्ण योजना आंखण्यांत दूरदृष्टी या पत्रिकेंत आहे. ते एक 'लोकप्रिय पुढारी' (Mass leader)नसूनहि प्रगतिशील विचार करणारे आहेत, हें भावी काल सिद्ध करील.

* शिक्षण क्षेत्रांतहि श्री. शहा चांगलें कार्य करीत आहेत. ते बेळगांवच्या आर. पी. टी. शिक्षण संस्थेचे उपाध्यक्ष आहेत. त्यांनीं या

संस्थेच्या कॉलेजच्या विद्यार्थ्यांसाठीं एक ट्रस्टहि केलेला आहे. ही पत्रिका प्रथम वर्गांत मोडते.

## रमणलाल म. शहा

वृषभेंत रवि आणि चंद्र असतांना पुणें येथें जन्मलेले (८–५–१९२१) श्री. रमणलाल शहा (केशवलाल मणिलाल-फर्म) यांचा दृष्टिकोन मानव-युगाकडे बराच वळलेला आहे. म्हणूनच त्यांचें धोरण प्राचीन व्यापाऱ्यां-सारखें दिसत नाहीं. याच कारणास्तव असेल कदाचित्, पण त्यांच्या दुसऱ्या मुलाला पूर्ण शिक्षण मिळेल. तो मुलगा म्हणजे " राजेन! " पुढें तो महाराष्ट्राचे राजकारणांत भाग घेऊन एक अधिकारी व्यक्ति बनेल. परंतु श्रीमति पद्मा रमणलाल शहा, कन्या-रवि आणि मिथुन-चंद्र असल्यामुळें त्यांचा पहिला मुलगा दिलीप राजकारणाच्या भानगडींत न पडतां आईच्या इच्छेनुसार पारिवारीक धंद्यांत बापाला हातभार लावून एक यशस्वी व्यापारी बनेल. ही पत्रिका प्रथम वर्गांत मोडते.

## एस. एम्. जोशी

लग्नीं धनु उदित होत असतांना आणि रवि वृश्चिकेंत व चंद्र मकरेंत असतांना (१२-११-१९०४) जन्मास आलेले राष्ट्रीय सेवा दलाचे, महा-राष्ट्रीय समाजवादी पक्षाचे पुढारी व सध्या मुंबई विधिमंडळाचें सभासद श्री. एस. एम्. जोशी यांची पत्रिका तृतीय वर्गांत मोडते. दशमांतील राहु त्यांना एक धंदेवाईक राजकारणी पुरुष बनवीत आहे. भावी कालांत त्यांची प्रगति होऊन त्यांचें कार्य-क्षेत्र वाढेल आणि तसें करण्याची बुद्धिमत्ताहि या पत्रिकेंत आहे.

## नरुभाऊ लिमये

वृश्चिकेंत रवि आणि कन्येंत चंद्र असूनहि हर्षल व नेपच्यूनमधील प्रतियोग, दैनिक लोकशक्तीचे संपादक, श्री. नरुभाऊ लिमये यांच्या पत्रिके-मध्यें युगद्वंद्व निर्माण करीत आहे. ही पत्रिका तृतीय वर्गांत मोडते.

## विजयालक्ष्मी शहा

लग्नीं सिंह राशि उदित होत असतांना जेव्हां रवि कर्केत व चंद्र



कन्येंत होता तेव्हां जन्मलेल्या श्रीमती विजयालक्ष्मी मोतीलाल शहा (मुंबई) यांची पत्रिका चतुर्थ वर्गात मोडते. त्यांनीं लग्नानंतरहि आयुर्वेदिक शास्त्राचें अध्ययन केलें; परंतु कन्येंत असलेल्या चंद्रामुळें समग्र शिक्षण त्यांनीं पूर्ण केलें नाहीं. मानव युग पुस्तकाची जनता-संस्करण आवृत्ति अवश्य निघावी अशी त्यांची दृढ इच्छा होती. आतां ती पूर्ण झाल्याचें समाधान त्यांना लाभेल. यांचा जन्म ठाणें जिल्ह्यांत वसई तालुक्यांत झाला आहे.

## नंदा शिर्के

लग्नीं सिंह राशि उदित असतां आणि रवि वृषभेंत व सप्तमांत शनि असतांना (१ मे रोजीं) जन्मलेल्या नंदिनी एस्. शिर्के या वर्षी (१९५४) बी. एस्सी. होऊन वनस्पतिशास्त्र घेऊन एम्. एस्सी.चा अभ्यास करीत आहेत. लग्न करून घरसंसार करण्यापेक्षां देश व समाजासाठीं कांहीं करावें अशी इच्छा त्यांच्या मनांत होणें अगदी संभवनीय आहे. परंतु कालांतरानें धनु राशींतील चंद्र व मीनेंतील शुक्र त्यांना पाठीमागें खेंचतील. प्रगतिशील दृष्टिकोन असल्यामुळें आमचीं भाकितें त्यांना कदाचित् आवडणार नाहींत. ही पत्रिका तृतीय वर्गात मोडते.

## मालती भागवत

तूळ लग्नांत शनि उदित होत असतां जेव्हां रवि कन्येत आणि चंद्र वृश्चिकेंत होता त्यावेळेस (२८-८-१९२२) जन्मास आलेल्या श्रीमती मालती मनोहर भागवत (सातारा) यांनीं दोन मुलें झाल्यानंतरहि स्वतःचें शिक्षण पुढें चालू ठेवलें आणि हिंदीची उच्च परीक्षा पहिल्या वर्गात उत्तीर्ण

होऊन परीक्षिका होण्याचा मान त्यांनीं मिळविलेला आहे. शिक्षकाचें कार्य कन्या-रवि व्यक्तींना आवडणें स्वाभाविक असलें तरीहि सामाजिक कार्यांत फार पुढें जाण्याची इच्छा त्यांच्या मनांत न होणें स्वाभाविक आहे. ही पत्रिका चतुर्थ वर्गांत मोडते.

## अशोक मेहता

लग्नीं वृषभ राशि उदित होत असतांना आणि रवि वृश्चिकेंत असल्यामुळें समाजवादी पुढारी आणि सध्या दिल्ली लोकसभेचे सदस्य श्री. अशोक मेहता (२४-१०-१९११) यांचा दृष्टिकोन मानव युगाकडे वळणें स्वाभाविक आहे. आणि त्यामुळें ते समाजवादी बनले यांत कांहींच नवल नाहीं. ज्योतिषशास्त्रावर त्यांचा कटाक्ष नसून त्याला ते फारसें महत्वहि देत नाहींत. राष्ट्रीय जीवनांत या शास्त्राचा थोडासा उपयोग होऊं शकतो असे विचार एकदां त्यांनीं प्रकट केले होते. राष्ट्रीय जीवनांत कम्युनिस्टांपेक्षां कॉंग्रेसजनांबरोबर सहयोग व्हावा असे विचार धनु राशींत चंद्र असल्यामुळें त्यांच्या मनांत येणें स्वाभाविक दिसतें. ही पत्रिका द्वितीय वर्गांत मोडते.

## हरकचंद वखारिया

बार्शीचे श्री. हरकचंद व्ही. वखारिया, A. C. A., यांचा जन्म धनु लग्न, मीनेंत चंद्र आणि सिंहेंत रवि असतांना झाला. ही पत्रिका तृतीय वर्गांत मोडत आहे; म्हणूनच प्रगतिशील दृष्टिकोन असतांनाहि श्री. वखारिया धार्मिक कार्यांत आनंदानें भाग घेतात. ' मानव युग ' सारखें पुस्तक प्रकाशित व्हावें याची प्रथम कल्पना यांचीच होय असें नमूद करणें जरूर आहे.

## बाळासाहेब पंत

कर्क लग्न, लग्नीं हर्षल उदित होत असतांना जेव्हां रवि वृश्चिकेंत व चंद्र कुंभेंत होता तेव्हां जन्मास आलेले औंध संस्थानचे माजी राजेसाहेब कै. बाळासाहेब पंत यांची पत्रिका द्वितीय वर्गांत मोडते. दशमस्थानीं गुरु व नेपच्यून हे दोन्ही असल्यामुळें त्यांना धर्म व धार्मिक कृत्यें यांची आवड होती. रवि व चंद्र प्रगतीशील राशींत असल्यामुळें त्यांनीं अनेक लोकप्रिय कार्यें केलीं. आगामी कालाची पूर्ण कल्पना त्यांना होती व त्याचप्रमाणें नवीन मतप्रणालीची आवडहि होती.

## भाऊराव पाटील

कुंभ प्रधान व्यक्तित्व असल्यामुळे कर्मवीर म्हणून ओळखले जाणारे रयत शिक्षण संस्थेचे संस्थापक श्री. भाऊराव पाटील यांनी धंदा सोडून बहुजनसमाजांत शिक्षणाच्या प्रसारासाठीं सन १९२४ पासून आजपर्यंत महाराष्ट्रांत जी कामगिरी केली आहे त्याची जितकी प्रशंसा करावी तितकी थोडीच. भारतांत जर असे शंभर महापुरुष जन्माला आले तर एकाच दिवसांत भारतांत मानव युगाची स्थापना होईल. रवींद्रनाथ टागोरांची खालील कविता साकार करणारे कर्मवीर भाऊराव पाटील यांची पत्रिका प्रथम वर्गात मोडते.

" ज्यांना तूं खालीं टाकलेंस,
ते तुला खालीच बांधून ठेवीत आहेत,
अज्ञानाच्या अंधःकाराच्या आड
ज्यांना तूं झांकून ठेवलेंस
त्यांनीं तुझें मंगल झांकून गाढ आवरण
निर्माण केलें आहे.
त्यांच्याशीं अपमानामध्यें तुला समान दर्जाचें व्हावें लागेल."

## आचार्य अत्रे

लग्नीं मीन राशि उदित होत असतांना जेव्हां चंद्र कर्केत आणि रवि सिंहेंत होता ( १३–८–१८९८ ) तेव्हां जन्मलेले विख्यात मराठी साहित्यिक व ' नवयुग ' साप्ताहिकाचे संपादक आचार्य प्रल्हाद केशव अत्रे यांची पत्रिका तृतीय वर्गात मोडते. याचसाठीं कदाचित् आचार्य पदवीवर त्यांचा लोभ असेल. सप्तमांत, कन्येचा बुध आणि तुळेच्या शुक्रामुळें त्यांना सामाजिक क्षेत्रांत लोकप्रियता मिळाली आहे, आणि पुढेहि मिळत राहील. मंगळ व बुध यांमध्यें अशुभ केंद्रयोग असल्यामुळें ते एक तिखट टीकाकार झाले आहेत.

## समाजवादी नेते

प्रगतीशील राशि वृषभेंत रवि असतांना जन्मास आलेले भारतीय समाजवादी पक्षाचे कार्यकर्ते—मधू लिमये, बा. न. राजहंस, सुरेश देसाई, प्रेम भसीन, इत्यादींची नांव येथें नमूद केली पाहिजेत.

## अच्युतराव पटवर्धन

कुंभेंत रवि, चंद्र आणि शनि असे तिन्ही ग्रह युतींत असतांना जन्मलेले ( ५–२–१९०५ ) समाजवादी पुढारी श्री. अच्युतराव पटवर्धन यांची पत्रिका प्रथम वर्गांत मोडते. त्यांचा दृष्टिकोन किती प्रगतीशील आहे, याची यावरून कल्पना येईल. खरें सांगायचें म्हणजे मानव युगाच्या तत्त्वाला पूर्णपणें जाणणारी व्यक्ति समाजवादी पक्षांत श्री. अच्युतराव पटवर्धनांसारखी दुसरी नव्हती. खेदाची गोष्ट अशी कीं सध्यापुरतें त्यांनीं राजकारण सोडल्यामुळे एक पोकळी निर्माण झाली आहे, हें जनतेचें दुर्भाग्य होय.

## लोकमान्य टिळक

सिह रवि, सिंह लग्न व दशमांत हर्षल असल्यामुळें कै. लोकमान्य टिळकांनीं जनतेला नवा दृष्टिकोन दिला व अमर झाले. गतकालांतच या आगामी युगाचा (मानव युग) प्रकाश पाहूं शकणाऱ्या फार थोड्या लोकांपैकीं ते एक होते. ही पत्रिका प्रथम वर्गांत मोडते.

## लाला लजपतराय

समाजांत कित्येक नवीन सुधारणा घडवून आणणारे पंजाबी नेते लाला लजपतराय यांच्या कुंडलींत दशमस्थानीं शनि, कुंभ लग्न व प्रथमस्थानीं रवि असल्यामुळें त्यांची पत्रिका द्वितीय वर्गांत जात आहे.

## मिर्झाकाका

पांचगणी येथें वेलफेअर सॅनिटोरियममध्यें रुग्ण जनतेच्या सेवेसाठीं स्वतःचें जीवन अर्पण करणारे श्री. फिरोज दिनशा मिर्झा ऊर्फ 'मिर्झाकाका' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या व्यक्तीचा जन्म सिंहेंत रवि व कन्येंत चंद्र असतांना झाला. म्हणून त्यांची पत्रिका तृतीय वर्गांत मोडते. श्री. अजंता जैन यांना प्रेरणा देणाऱ्यांपैकीं मिर्झाकाका हे एक होत. खेदाची गोष्ट अशी कीं इ. स. १९७१ सालीं ते आपणांस पारखे होणार आहेत. परंतु इ. स. १९५७ सालच्या जवळपास होणारा वहातुकींतील अपघात त्यांना कांहीं काल रुग्णालयांत टाकील इतकेंच.

## बी. व्ही. रमण

बेंगलोरचे इंग्रजी ज्योतिष मासिक 'ॲस्ट्रॉलॉजिकल मॅगॅझीन 'चे

संपादक डॉ. बी. व्ही. रमण, बी. एस्सी., मीन लग्न व मिथुन चंद्र असल्यामुळें ज्योतिषासारख्या प्राचीन शास्त्राचें काम त्यांनीं हातांत घेतलें आणि सिंहेंत रवि असल्यामुळें या शास्त्राला कांहीं नवीन दृष्टिकोन त्यांनीं दिला आहे; परंतु प्राचीनतेचे जोखडांतून ते पूर्णपणें निघूं शकले नाहींत. त्यांची पत्रिका तृतीय वर्गांत मोडते.

## राफाईल व कार्टर

सायन पद्धतीचें विख्यात राफाईल पंचांगकर्ते लग्नीं शनि व हर्षल असतांना जेव्हां रवि वृषभेंत होता ( १५–५–१८५० ) तेव्हां जन्मास आले. कै. श्री. राफाईल यांची पत्रिका द्वितीय वर्गांत मोडते. ब्रिटनचे एक विख्यात फलज्योतिषी ' कार्टर ' यांचा जन्महि कुंभेंत रवि असतांना झाला होता; इतकेंच काय पण विख्यात लेखक व ज्योतिषी किरोचा जन्महि वृश्चिकेंत रवि असतांना झाला होता, आणि सिंहेंत रवि असतांना ॲलन लिओचा जन्म झाला होता. या सर्व ज्योतिषांनीं ब्रिटिश जनतेला एक नवा दृष्टिकोन दिला हें सांगणें नकोच.

## अमृतलाल ल. शहा

बॉम्बे ॲस्ट्रॉलॉजिकल सोसायटीचे वर्तमान सेक्रेटरी श्री. अमृतलाल ल. शहा यांचे ग्रहयोग असे आहेत—सिंह लग्न, वृषभेंत चंद्र आणि कुंभेंत रवि, म्हणूनच ही पत्रिका प्रथम वर्गांत मोडत आहे. ज्योतिषशास्त्रावर त्यांचा अंधविश्वास नाहीं; याच कारणास्तव कदाचित् फलज्योतिषापेक्षां त्यांनीं जन्मभूमि पंचांगांत गणित विभागाचें कार्य हातांत घेतलें. इतके प्रगतीशील ग्रह असल्यामुळें या संमिश्रित युगांत ते फार लोकप्रिय होऊं शकणार नाहींत; कारण जनता अजूनहि पूर्णपणें शास्त्रीय विचाराची झालेली नाहीं. परंतु भावी काल त्यांच्या इच्छेला व कल्पनेला मान देईल यांत शंका नाहीं.

## बी. एम्. चऱ्होलीकर

कुंभेंत रवि व मिथुनेंत चंद्र असल्यामुळें ' बुद्धिरेखा ' पुस्तकाचे ग्रंथकार श्री. बी. एम. चऱ्होलीकर यांची पत्रिका तृतीय वर्गांत मोडते. शनि-चंद्र युतीमुळें महाराष्ट्राला ते बुद्धिरेखेसारखें अद्वितीय पुस्तक भेट देऊं शकले.

## हरिकृष्ण याज्ञिक

कर्केत चंद्र–नेपच्यून युति होऊन, ते हर्षलबरोबर प्रतियोग करीत असतांना जेव्हां रवि आणि बुध वृश्चिकेंत होते आणि लग्नीं मीन राशि उदित होत होती तेव्हा (१–११–१९१२) जन्मास आलेले 'ज्योतिष पत्रिका' व 'ज्योतिर्विज्ञान' या मासिकांचे संपादक श्री. हरिकृष्ण रेवाशंकर याज्ञिक यांची पत्रिका तृतीय वर्गात मोडते. म्हणूनच त्यांच्याजवळ एका हातांत भारतीय पंचांग आणि पिशवींत राफाईलचें पंचांग असतें. प्राचीन भारतीय शास्त्राला कितपत मान्यता द्यावी याविषयीं त्यांचे मनांत थोडी शंका उत्पन्न होणें स्वाभाविक आहे. परंतु भावी कालांत जेव्हां त्यांना प्रथम कन्या व द्वितीय पुत्ररत्न प्राप्त होईल, तेव्हां त्यांच्या लक्षांत येईल कीं, प्राचीन शास्त्रांत तथ्य आहे. * परंतु वर्तमानकालांत कांहीं लोकांनीं स्वार्थासाठीं त्याचा दुरुपयोग केला आहे.

## जे. आर. डी. टाटा

'टाटा' औद्योगिक संस्थांचे संचालक श्री. जे. आर. डी. टाटा यांच्या पत्रिकेंतील वृषभ लग्न, सिहेंत रवि व मीनेंत चंद्र त्यांना विशिष्ट प्रगतीशील दृष्टिकोन देत आहेत. यांच्या हातून औद्योगिक क्षेत्रांत कांहीं महत्वाचें कार्य होईल अशी अपेक्षा करण्यास कांहीं हरकत नाहीं. त्यांची पत्रिका द्वितीय वर्गांत मोडते.

## जयप्रकाश नारायण

सध्या भूदानकार्यांत गुंतलेले, समाजवादी पक्षाचे जन्मदाते श्री. जयप्रकाश नारायण, लग्नीं सिह राशि उदित होत असतांना व मकरेंत शनि व चंद्र असतांना जन्मास आल्यामुळें त्यांची पत्रिका द्वितीय वर्गांत जात आहे. बिहारवर झालेल्या (१९५४) समग्र नैसर्गिक उत्पाताबद्दल श्री. अजंता जैन यांनीं लेखिकेचीं भाकितें (चित्र-पृ. ३६२) त्यांना वाचून दाखविलीं होतीं.

## ल. के. तांबे

'करदर्शन' पुस्तकाचे लेखक श्री. ल. के. तांबे यांचा जन्म वृश्चिकेंत रवि असतांना (१०–११–१९०९) झाला. म्हणून त्यांचा दृष्टिकोनहि प्रगतीशील आहे, असें नमूद केलें पाहिजे.

## राजाराम देसाई

लग्नीं सिंह राशि उदित होत असतांना जेव्हां रवि कुंभेंत आणि चंद्र वृश्चिकेंत होता तेव्हां सांगलीचे सुप्रसिद्ध व श्रीमंत तंबाखूचे व्यापारी श्री. राजाराम अण्णाप्पा देसाई यांचा जन्म झाला; म्हणून ही पत्रिका प्रथम वर्गात मोडते. आपण स्वतःच पुढारी होण्यांत भूषण आणि आनंद मानणारेच बहुतेक असतात, परंतु स्वतः पडद्याआड राहून पुढारी तयार करण्यांत आनंद मानणारे फारच विरळा. आणि अशा विरळ लोकापैकींच श्री. देसाई हे एक आहेत. कुंभेंतील रविमुळें असें करतांना त्यांना सात्विक समाधान लाभतें. * जो स्वतः पुढारी बनतो तो महान् कीं, जो दुसऱ्याला सुखी किंवा थोर पुढारी बनवितो तो महान् याचा निर्णय वाचकांनींच करावा. * एक सामान्य नोकरीपेशापासून सिंह लग्नामुळें श्री. देसाई आज एक सन्मान्य धनिक झाले आहेत, आणि त्या स्वकष्टार्जित धनाचा उपयोग आपल्या इच्छेप्रमाणें त्यांनीं देशाच्या कल्याणासाठीं केला आहे.

प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्षरीत्या त्यांनीं मदत केलेले अनेक लोकपुढारी आज दाखवितां येतील. आणि हें सर्व गाजावाजा न करतां गुप्तपणानें चालत असल्यानें त्यांचा वृत्तपत्री गवगवा जरी झाला नसला तरी ते खऱ्या अर्थानें थोर आणि प्रगतिशील व्यक्ती आहेत असें पत्रिकेवरून स्पष्ट दिसत आहे.

## मेजर जनरल थोरात

सिंह लग्न, सिहेंत रवि आणि वृषभेंत चंद्र असतांना (१२-८-१९०६) जन्मलेले महाराष्ट्राचे "मुकुटमणि" मेजर जनरल शंकरराव थोरात यांची पत्रिका प्रथम वर्गांत मोडते. म्हणूनच त्यांच्या हातून भावी कालांत महाराष्ट्रांत कांहीं मोठें कार्य झालें तर त्यांत कांहीं नवल नाहीं. सैन्यविभागांत त्यांचा प्रगतिशील दृष्टिकोन कसा अंमलांत येतो तें आम्हांस माहीत नाहीं. महाराष्ट्राला अभिमान वाटण्यासारखी त्यांची पत्रिका आहे, एवढें सांगितलें म्हणजे पुरे.

## शंकरराव ओगले

एस्. पी. ओगले आणि कंपनीचे—कांच, एनॅमल व प्रभाकर कंदिलांचे कारखानदार—अग्रहक्काचे भागीदार श्री. शंकर प्रभाकर ओगले यांचा जन्म सिंहेंत रवि आणि मिथुनेंत चंद्र असतांना झाल्यामुळें त्यांची पत्रिका तृतीय वर्गात मोडते.

## दादाभाई नौरोजी

काहीं सुधारणांना अनुकूल असणाऱ्या दादाभाई नौरोजींच्या कुंडलीत दशमस्थानीं हर्षल, वृषभेंत चंद्र व शनि, व रवि कन्येंत होता. त्यांची पत्रिका तृतीय वर्गात मोडते. म्हणूनच संमिश्रितयुगांत आपल्या मतांमुळें व आचरणामुळें ते भरपूर लोकप्रियता संपादन करूं शकले.

## वीर सावरकर

मिथुनेंत रवि व कुंभेंत चंद्र असल्यामुळें स्वातंत्र्यवीर, हिंदुमहासभेचे माजी अध्यक्ष यांची पत्रिका तृतीय वर्गात मोडते. अशा ग्रहयोगामुळें त्यांच्या जीवनांत नवीन व प्राचीन दोन्ही गोष्टींचा मिलाफ दिसून येतो.

## ना. सी. फडके

सिंहेंत रवि, कन्येंत चंद्र, कर्केत बुध व शुक्र असतांना जन्मलेले (४–८–१८९४) प्रा. ना. सी. फडके यांची पत्रिका तृतीय वर्गात मोडते. श्रीमती कमलाबाई फडके (३–८–१९१६) सिंहेंत रवि, कन्येंत चंद्र आणि कर्केत शुक्र असतांना जन्मल्यामुळें त्यांची पत्रिकाहि तृतीय वर्गात मोडते. प्रगतीशील दृष्टिकोनामुळें हे सिंह–रवि लेखक चिरस्मरणीय रहातील.

## उमा राणा

१० जुलै १९५० रोजीं लग्नीं वृश्चिक राशि उदित होत असतांना जेव्हां वृषभेचा चंद्र सप्तमांत होता तेव्हां उमा अमरसिंह राणा ( चित्र पृष्ठ २ ) यांचा जन्म झाला. त्यांची पत्रिका द्वितीय वर्गात मोडते. साधारण वयाच्या अठराव्या वर्षी त्यांचा विवाह होईल, व त्यांना चार अपत्ये होतील. ६३ व्या वर्षी सौभाग्यवति असतांनाच त्या कालवश होतील, असें या पत्रिकेवरून वाटतें.

* * *

# अण्णासाहेब कर्वे

कांहीं कालापूर्वी समाजवादी पुढारी श्री. जयप्रकाश नारायण आणि त्यांची पत्नी श्रीमती प्रभावती यांच्याबरोवर श्री. अजंता जैन आणि मी पुण्यांत भारत सेवक समाजाचें केंद्रीय ऑफिस पाहण्यासाठीं गेलों होतों. तेथून परत येत असतांना गाडींत जयप्रकाशजी म्हणाले--"आतां मी तुम्हांला पुण्याच्या एका महापुरुषाच्या भेटीला घेऊन जात आहें." ते म्हणजे कोठें व कोणाकडे तें आम्हीं समजूं शकलों नाहीं. थोड्या वेळानंतर गाडी एका लहान व सुंदर बंगल्यासमोर थांवली आणि श्री. जयप्रकाशजी एका वयोवृद्ध व्यक्तीकडे निर्देश करून म्हणाले, "हीच ती महान् व्यक्ति, श्री. कर्वे."



थोड्याच वेळांत असें निश्चित झालें कीं, आम्हीं दोघें त्यांना पुन्हा भेटण्याकरितां जावें. सुमारें तीन वेळां आम्हीं महर्षि अण्णासाहेब कर्वे यांना भेटावयास गेलों आणि तेथें अनेक विषयांवर चर्चा झाली आणि त्यांनीं स्वत: त्यांच्या कार्याबद्दल माहिती दिली. त्यांची जन्मपत्रिकाहि मिळाली ती मी येथें देत आहें.

संभाषणाच्या ओघांत मी विचारलें,--"ज्योतिषाबद्दल आपले काय विचार आहेत?"

त्यांनीं प्रथम उत्तर दिलें कीं,–" मी ज्योतिष मानत नाहीं. "




मी पुन्हा विचारलें,–"ज्योतिषशास्त्रावरील आपल्या अविश्वासाचें कांहीं विशेष कारण मी जाणूं शकतें काय ?"

थोडा वेळ घेऊन त्यांनीं उत्तर दिलें–" खरें सांगावयाचें म्हणजे ज्योतिषशास्त्र काय आहे आणि भाकितें कशीं वर्तविलीं जातात याविषयीं मला कांहीं माहिती नाहीं आणि ती करून घेण्याचा प्रयत्नहि मी केला नाहीं."

मी सांगितलें,–" अविश्वास होण्यासारखा अनुभव आपणांस नाहीं हें खरें कीं नाहीं ? शास्त्राबद्दल माहिती नाहीं म्हणून आपण ज्योतिष मानत नाहीं हें आपण आतांच सांगितलें नाही का ?"

थोडा वेळ विचार करून त्यांनीं सांगितलें–" होय खरें आहे "

पत्रिका घेऊन आणि माहिती टिपून आम्हीं परतलों. संभाषणांत श्री. जैन यांनीं कित्येक छायाचित्रें घेतलीं होतीं त्यांतील एक येथें देण्यांत येत आहे.

अण्णासाहेबांनीं स्त्रियांकरितां जें कांहीं केलें आहे तें आतां सामाजिक इतिहासाचे पानावर अंकित झालें आहे. त्यांचें जीवन आतां इतिहास झाल्यामुळें ज्योतिषांचें तेथें कांहींच काम नाहीं. तथापि ज्योतिषशास्त्राच्या विद्यार्थ्यांना ही पत्रिका आणि माहिती अभ्यासाकरितां उपयोगी पडेल म्हणून देण्यांत येत आहे. त्यांचा जन्म इंग्रजी तारखेप्रमाणें १८ एप्रिल १८५८ सालीं झाला आणि दिलेली पत्रिका निरीयण पंचांगाप्रमाणें आहे.

१८९३ मध्यें प्रोफेसर पदावर असतांना त्यांनीं मोठ्या धैर्यानें आनंदीबाईशीं पुनर्विवाह केला. यामुळें सबंध महाराष्ट्रांत मोठी खळबळ उडाली. साधेसुधे दिसणारे कर्वे-मास्तर एवढे पुढें जातील अशी कोणास फारशी

कल्पना नव्हती. १८९६ सालीं त्यांनीं पुण्यास अनाथ बालिकाश्रमाची स्थापना केली. नंतर १९०० सालीं आश्रम पुण्यापासून पांच मैलांवर हिंगणें ठिकाणीं नेण्यांत आला. पुढें तेथेहि कुमारिकांच्या शिक्षणासाठीं ४ मार्च १९०७ रोजीं त्यांनीं महिला विद्यालयाची स्थापना केली. २ जून १९१६ सालीं त्यांनीं एका नव्या संस्थेची स्थापना केली, ती म्हणजे "महिला विद्यापीठ." सामाजिकदृष्टया विधवा, सधवा, कुमारी, गुन्हेगार मुलें, खेडयांतील शिक्षण इत्यादि कित्येक प्रश्न सोडवून त्यांनीं एक फार मोठी सामाजिक क्रांति घडवून आणली आहे.

जानेवारी १९४४ मध्यें वयाच्या ८६ व्या वर्षी त्यांनीं 'समता संघ' नांवाच्या संस्थेची स्थापना केली. या संस्थेच्या प्रसारासाठीं जुलै १९४७ पासून 'मानवी समता' हें छोटेसें मुखपत्रहि त्यांनीं चालू केलें. ९६ वर्षें वयाचे महर्षि अण्णासाहेब कर्वे अजूनहि खेळकर आहेत. भारतांत अशा व्यक्ति पुन्हापुन्हा जन्मास येवोत.

* * *



श्री. अजंता जैन (डावे) श्री. जयप्रकाश नारायण (उजवे)

# अभिप्राय, अभिनंदन आणि आशीर्वाद

" श्रीमती इंदुमती पंडित यांनीं ज्योतिर्विज्ञानमधील त्यांच्या लेखांत वर्तविलेल्या भविष्यकथनांत, सुवेझ कॅनॉलबाबतचें समाधान, अल्जेरिया येथील भयानक भूकंप, अतिवृष्टी आणि पूर्व भारतांत महापूर, हैद्राबाद काझीपेठ-जवळ झालेला आगगाडीचा अपघात, भारतांतून फ्रान्सचें प्रयाण इत्यादि खरें झालें आहे......अशा प्रकारची, कांहीं काळापूर्वीं, अचूक भविष्य वर्तविणाऱ्या ज्योतिर्विदांची संख्या भारतांत फक्त हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीच आहे;



आणि त्यांमध्येंहि इंदुमतींचें ( चित्र ) स्थान फार वरचें आहे......२५ वर्षांचें राशिभविष्य आणि पुढील ५० वर्षांचें राष्ट्रीय भविष्य वर्तविणारें पुस्तक " मानव युग " हे भारतांत प्रथम आणि एकमेव होय......."

**पुणें–१९५४, दिवाळी अंक** **संपादक ' ज्योतिर्विज्ञान '**

\+ \+ \+

.....प्रदीर्घ कालखंडांत आपल्या दिव्यचक्षूनें संचार करून, इंदुमतींनीं आपलें प्रतिवृत्त परिश्रमपूर्वक या ग्रंथांत सादर केलें आहे. त्यांच्या या प्रयत्नाला निदान भारतांत तरी तोड नाहीं. हा ग्रंथ सफाईदार इंग्रजींत प्रसिद्ध करण्यांत आल्यास इंदुमतींचें नांव त्रिखंडांत दुमदुमत राहील यांत शंका नाहीं. इंदुमती इतर देशांत जन्मल्या असत्या तर तद्देशीय सरकारनें त्यांचें केवढें कौतुक केलें असतें ! आपलें सर्व पाठबळ ज्योतिष–संशोधनार्थ सरकारनें त्यांना देऊं केलें असतें....

**मुंबई, ता. २१–११–१९५४** **दै. "नवशक्ति"**

..... प्राचीन भारतांतील जैनधर्मीय श्रेष्ठ ज्योतिषी वराहमिहीर यांनीं ज्याप्रमाणें ज्योतिषशास्त्राधारें मौलिक संशोधन केलें, त्याचप्रमाणें, प्राचीन भारतीय ज्योतिषशास्त्राच्या आधारावर संशोधन करून श्री. अजंता जैन यांनीं या शास्त्रांत कांहीं नवीन मूलभूत उपपत्ती व सिद्धांत बसवलेले आहेत......प्रस्तुत " मानव युग " ह्या विस्तृत पुस्तकांत महायुगांच्या ह्या माहितीबरोबर इ. स. २००० पर्यंतची ग्रहस्थिति, आगामी २५ वर्षांचें वैयक्तिक राशि भविष्य व ४६ वर्षाचें राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतील राजकीय, अर्थीक, नैसर्गिक व सामाजिक भविष्य दिलेलें आहे. इतक्या वर्षाचें भविष्य वर्तविणें ही गोष्ट खरोखरच जगांत अद्वितीयच आहे...

**पुणे–ता. १६–११–५४** **पाक्षिक "जैन ज्योति"**

\+ \+ \+




"The fault, dear Brutus, is not in our Stars
but in ourselves that we are underlings."

— *Julius Caesar*, *Act 1, Sc.2.*

सुप्रसिद्ध लेखिका श्रीमती इंदुमती पंडित यांनीं ज्योतिषमालेंतील पुष्प 'मानव युग' जनतेला सादर करून या अनमोल शास्त्राबाबत चांगल्या पद्धतीनें जनतेला मार्गदर्शन केलें आहे. हें त्यांचें पुष्प त्यांच्या कीर्तिमंदिराचें वैभवशिखर होणार आहे......एकमुखी पंचांग झाल्याशिवाय बिचाऱ्या ज्योतिषी वर्गाची कुचंबणा थांबणार नाहीं, ह्या त्यांच्या मताशीं आम्हीं सहमत आहोंत.....

**पुणें–ता. २४–११–१९५४** **दैनिक "काळ"**

...... ज्योतिषासारखा रुक्ष विषय श्रीमती पंडित यांनीं आपल्या चटकदार भाषाशैलीनें मनस्वी वाचनीय बनविला आहे. प्रस्तुत पुस्तक वाचक एखाद्या कादंबरीप्रमाणें वाचतो. त्याचे त्याच्या मनावर ठसे उमटतात. आपणहि या शास्त्राचा अभ्यास करावा अशी इच्छा त्याच्या मनांत निर्माण होते. हें कार्य सामान्य नाहीं. एखाद्या प्रज्ञावंताला शोभेल अशीच ही कामगिरी आहे...... श्रीमती इंदुमती पंडित यानीं भविष्य हें थोतांड नसून तें एक शास्त्र आहे अशी कबुली मान्यवरांना द्यावयास लावली आहे. त्यांची ही कामगिरी इतिहासांत नमूद केली जाईल अशी आम्हांस उमेद आहे......

**कोल्हापूर–ता. २२–१०–१९५४** **दै. "सत्यवादी"**




*** "No people is so great as not to need to learn from another, nor is any so poor as not to be able to offer something to another..."**

— *Dr. B. C. Roy.*

..... भारतांतील कुठल्याही भाषेंत अशा तऱ्हेचें इतक्या दूरवरचें २० शतकाअखेरचें राष्ट्रीय भविष्य वर्तविलें गेलेलें नाहीं. त्यामुळें इंदुमतींनीं या पुस्तकाच्या द्वारा एक वेगळाच वैशिष्ठ्यपूर्ण व अभिमानास्पद असा इतिहास निर्माण केला असून तो साऱ्या राष्ट्राला खचित् भूषणावह असाच आहे. त्यामुळें जवळ जवळ तीन पिढ्यांचें भविष्य देणाऱ्या या महान् ग्रंथाबद्दल इंदुमती यांचें कौतुक करावें तितकें थोडेंच आहे.......हा महान् ग्रंथ लिहून इंदुमतीनीं आपल्याबरोबर महाराष्ट्राचें नांवही उज्ज्वल केलें आहे. या पुस्तकाचें अन्य भाषांत अवश्य भाषांतर व्हायला हवें असून त्यामुळें त्यांचें व महाराष्ट्राचें भाग्य खात्रीनें मोठें होईल......

**पुणें, दिवाळी अंक (१९५४)** **'माधुरी'**

# ग्रहनकाशांची अनुक्रमणिका

**श्रीमती इन्दुमती पंडित, यांचीं सर्व पुस्तकें--**

(१) **दि नाइन्टीन फिफ्टी थ्री** ( इंग्रजी )
प्रकाशन : ता. १४ ऑक्टोबर १९५२ (आवृत्ति संपली)

(२) १९५३ **वर्ष भविष्य** ( मराठी ) (आवृत्ति संपली)

(३) **आर्थिक भविष्य** ( मराठी ) (आवृत्ति संपली)
प्रकाशन : ता. ९ फेब्रुवारी १९५३.

(४) **स्टार लाईन** ( इंग्रजी )
प्रकाशन : ता. १९ फेब्रुवारी १९५३.
पृष्ठें ९६, किंमत २ रुपये.

(५) **आगामी काल** ( मराठी )
प्रकाशन : ता. १ सप्टेंबर १९५३. गोकुळ अष्टमी.
पृष्ठें १२८, किंमत १॥ रुपया ( आवृत्ति संपली ).

(६) **अनागत काल** ( मराठी )
प्रकाशन : ता. २२ नोव्हेंबर १९५३.
पृष्ठें १४४, किंमत २॥ रुपये ( आवृत्ति संपली )

(७) **भावी काल** ( मराठी ) पृष्ठें १२८, किंमत १। रु.
मुद्रणारंभ—अक्षय्य तृतीया. प्रकाशन, २—६—१९५४.

(८) **मानव युग** ( मराठी ) जनता—संस्करण
मुद्रणारंभ २—६—५४. प्रकाशन, १४—१०—१९५४.
पृष्ठें ३५२, किंमत ३॥ रुपये. (आवृत्ति संपली)

★ सुधारून वाढवलेली दुसरी आवृत्ति
मुद्रणारंभ, १४-११-५४. प्रकाशन, २६-१२-१९५४.
पृष्ठें ३६८, किंमत ३॥ रुपये.

— पुस्तकांसाठीं लिहा —

**कॉन्टिनेंटल बुक सर्व्हिस**. आप्पा बळवंत चौक, पुणें २.